वादः प्रवदतामहम् ।

# कायदेमंडळांतील सहा वर्षें

( भाग पहिला )

गांधी जयंती

२ आक्टोबर १९४४

— लेखक —

नरहर विष्णु गाडगीळ

किंमत ३॥ रुपये

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५ | १३ | मानिली है | मानली है |
| ६९ | २५ | Recovery cut | Economy cut |
| ७० | १२ | Recovery cut | Economy cut |
| ७८ | १६ | Commany | Command |
| ८४ | १८ | मिरवणुकीचे | निवडणुकीचे |
| ८९ | १६ | पौत्रिक | पैतृक |
| ९४ | ८ | स्तंडुलाः प्रस्थमूलाः | स्तंडुलप्रस्थमूलाः |
| १२६ | १२ | संघ | संच |
| १३१ | २४ | येऊन | होऊन |
| १४० | १३ | कार्यप्रवीण | कार्यप्रवण |
| १४९ | २५ | रियासत | सियासद |
| १५६ | १५ | वावरतो | वापरतो |
| १६० | १३ | not can | cannot |
| १८७ | २६ | होण्याचा | करण्याचा |
| १९९ | २६ | नियमित | नियमितपणें |
| २७६ | १६ | वाढीका | वाढीला |
| ३२७ | ११ | मुक्य | मुख्य |
| ३३३ | १ | अमल | अंमल |
| ३७४ | १ | रेल्वेने उत्पन्न | रेल्वेनें ती उत्पन्न |
| ३९९ | ७ | भरल | भरले |
| ४३२ | १८ | निद्यन्ति | निघ्नन्ति |

## कॉंग्रेसपक्ष सभासद ( मार्च १९४० )



**( बसलेले-डावीकडून उजवीकडे )**—श्री. हेगडे, असफअली, सौ. सुबरायन, चंदर, रामनारायणसिंह, डॉ. देशमूख, मुदलीयार, गाडगीळ, सत्यमूर्ति, भुलाभाई, सत्यनारायणसिंह, शेठ गोविंददास, बी. दास, लाला शामलाल, प्रो. रंगा, शेट डागा.

**( मागें उभे-पहिली रांग )**—श्री. होसमनी, छालिया, मिश्र, सिंग, तिरुमल राव, व्यंकटाचलम् चेट्टी श्रीप्रकाश, अविनाशलिंगम चेट्टी, सरदार मंगलसिंग, रायजादा हंसराज, काझमी, संतानम, कैलास बिहारीलाल, ( कारकून ).

**( शेवटची उभी रांग )**—( शिपाई ), प्यारेलाल, चौधरी रघुवीरसिंग, (कारकून), अबदूल कयूम, गौरीशंकर, सक्सेना, अनंतशयनम आयंगार, देशमूख, पांडे, गुप्ता, महंमद.

# अनुक्रमणिका

# भूमिका.

"परवांचे तुमचें भाषण अगदीं सडेतोड झालें," "कारण ते शेवटचेच होते. आतां असेंब्ली संपली. अब तो शुरू हुवा है जंग" हे संभाषण १९४० च्या नोव्हेंबरमध्यें झालेल्या खास अधिवेशनाला अनुसरून होते. दिल्लीहून सदरहू अधिवेशन संपवून परत येतांना मुंबईस एक वृत्तपत्र व्यवसायी मित्र यांचे कचेरींत वरील उत्तर मी त्यांना दिलें. ता. ४ डिसेंबर १९४० रोजीं मला व श्री. केशवराव जेधे यांना प्रत्येकी १८ महिने शिक्षा वैयक्तिक सत्याग्रहांत झाली. आमच्या आधींच्या व नंतरच्या सत्याग्रह्यांपैकीं एक वर्षापेक्षां कोणालाही जास्त शिक्षा झाली नाहीं. हा मान आमचेसाठींच होता ! ! वर्षापेक्षां जास्त शिक्षा झाली म्हणून आमचे दोघांचेही सभासदत्व रद्द झाल्याचें हिंदुस्थान सरकारनें जानेवारी १९४१ मध्यें जाहीर केलें व हा निर्णय आम्हांला तुरुंगांत कळविण्याची तत्परता पण दाखविली. आयुष्यांतील हें प्रकरण शिवणी तुरुंगांत सुरू झाले व येरवडा मुक्कामांत संपले. उपक्रम व उपसंहार यांत सुसंगति राहिली. अनेक स्नेही व कार्यकर्ते यांनीं आठवणी लिहून काढा म्हणून सुचविलें. जशी व जेथें विश्रांति मिळाली तसा तिचा उपयोग करून प्रस्तुत लिखाण लिहिलें आहे. यांत व्यक्ति व पक्ष या दोघांनाही उपेक्षिलें नाहीं; अधिकारारूढ सरकार व विरोधीपक्ष यांच्यांत डावे उजवे न करतां प्रत्येक प्रश्नाबाबत उभयतांचे दृष्टिकोन स्पष्ट होतील इतकी व इतक्यापुरतीं भाषणें अगर त्यांतील उतारें प्रातिनिधिक होतील अशा रितीनें दिलें आहेत. राज्यकारभार कसा चालला, प्रश्न कसे उपस्थित झालें, त्यांचे निकाल कसें लागलें याचे ज्ञान व्हावें या दृष्टीनें मांडणी केली आहे. माहिती व मनोरंजन यांचा मिलाफ यांत आहे. यांत थोडेसें काव्यही असेल, थोडा विनोदही आहे, पण त्यांत कवींचे अधिकारातिक्रमण करण्याचा उद्देश नाहीं, व कोणाला दुखवावें म्हणूनही विनोद केलेला नाहीं. सर्व माहिती कागदपत्रें व सरकारी प्रकाशनें यावर आधारलेली आहे. अप्रिय पण सत्य कथन करण्याचा प्रसंग जेथें प्रस्तुत वाटला तो स्वार्थी अगर पक्षार्थी दृष्टीनें टाळला नाहीं. काव्य, शास्त्र, इतिहास व विनोद यांचे हें मिश्रण मराठी वाचकांना आवडेल अशी आशा बाळगून लिहिलें आहे. मुद्रितें तपासण्याचे काम ज्या मित्रानें माझे गैरहजेरींत केले त्याचा नांवानें उल्लेख न व्हावा अशी त्याची इच्छा असल्यामुळें तो करतां येत नाहीं; तथापि त्याचे आभार मी जरूर मानतों.

गांधी जयंती
पुणें ता. २ आक्टोबर १९४४

न. वि. गाडगीळ

# कायदेमंडळांतील सहा वर्षें

## : उमेदवारी :

"दिल्ली येथें पुढील आठवड्यांत कायदेपंडित जमणार आहेत. ते काय करतील हें उघड आहे, क्रांति लांबच राहिली, जी काय कायदेभंगाची चळवळ चालू आहे तिलाही नख लागणार हें स्पष्ट आहे" हा माझे मित्र श्री. ना. ग. गोरे यांच्या पत्रांतील मजकूर वाचून मी सर्दच झालों. १९३४ च्या मार्च अखेरचें हें पत्र होतें. त्यावेळीं मी मध्यप्रांतांतील शिवणी तुरुंगांत होतों. श्री. घटवाई, तिजारे, हरीभाऊ मोहनी, राधाकृष्ण बजाज, असे आम्ही अगदीं थोडेसे राजबंदी तेथें होतों. पहिले दोघे मार्चमध्यें सुटून गेले. श्री. गोरे यांचे पत्रावर आम्ही बरीच चर्चा केली. कोठ-ल्याही परिस्थितींत चळवळ परत न घेतां, निदान सुधारणेचा कायदा पास होईपर्यंत चळवळ चालविणें जरूर आहे असें माझें मत होतें. चळवळ थंडावत आली असतां बंद करणें योग्य, असें कांहींचें मत होतें. मार्च १९३४ चे अखेर श्री. भुलाभाई, असफअल्ली, डॉ. अन्सारी, सत्यमूर्ति, डॉ. बिधनचंद्र रॉय वगैरे मंडळी दिल्लीस जमली. त्यांनीं, निवडणुकी लढवाव्यात असा निर्णय घेतल्याचें कळलें. हें झालें १९३४ ईस्टर अखेर; म्हणजे एप्रिलचे पहिले आठवड्यांत. शिवणी तुरुंगांत जिल्हा-धिकारी (हे दक्षिणी गृहस्थ होते) एका सकाळीं आले व म्हणूं लागले कीं, "तुम्ही लवकरच सुटणार!" मी उत्तर दिलें कीं, "सुटून पुन्हां यावें लागणार!" त्यावर त्यांनीं सांगितलें कीं, आजच्या वृत्तपत्रांतून महात्माजींनीं चळवळ परत घेतल्याचें प्रसिद्ध झालें असून स्वतःशिवाय कोणीही वैयक्तिक कायदेभंग करूं नये असें जाहीर केलें आहे. माझी मनःस्थिति अधिक चमत्कारिक झाली. दुपारीं वर्तमानपत्र आलें व त्यांत महात्माजींनीं नेहमींप्रमाणें "ईस्टर सोमवारीं आंतल्या आवाजानें संदेश दिला व त्याला अनुसरून चळवळ परत घेतली" असा मजकूर होता! मी खूप संतापलों. सहकारी राजबंदींचा बापूजींवर संपूर्ण विश्वास, व त्यामुळें महात्माजींनीं योग्य केलें, असें म्हणून त्यांनीं जास्त विचार करण्याचें सोडून दिलें! मागील चार वर्षांत

झालेल्या घटनांचा विचार मी कितीतरी दिवस करीत होतों. इतिहास, अनुभव, तात्त्विकभूमिका–कोणत्याही दृष्टीनें हा निर्णय मला पटेना. चळवळ सुरू करण्यांत जर चूक होती, तर ती थांबविण्यांत गुन्हा होत आहे असेंच माझें मत झालें व अद्यापिही तसेंच आहे. मे १९३४ मध्यें पाटणा येथें ऑ. इ. कॉं. क. ची बैठक भरणार असेंही जाहीर झालें. गांधीजींनीं डॉ. अन्सारी यांना पूर्वीप्रमाणें स्वतंत्र स्वराज्यपार्टी काढून निवडणुकी लढवाव्या असा सल्ला दिल्याचेंही वाचलें. वर्तमानपत्रांतून उमेदवारांचीं नांवेंही जाहीर होऊं लागलीं. पुन्हां एकदां श्री. गोरे यांचें पत्र आलें. त्यांत त्यांनीं होत असलेल्या घटनांबद्दल नापसंती व्यक्त तर केलीच पण जें पुढें होणार आहे त्यामुळें ज्या तरुण पिढीनें ही चळवळ जोरांत चालविली तिजवर अन्याय होणार असेंही लिहिलें. उभे रहाणारे उमेदवार, जे चळवळ सुरू झाली म्हणजे अदृश्य होतात व संपली म्हणजे अजिंक्य असतात ( Invincible in peace and invisible in struggle ) असेच पसंत केले जातील व स्वार्थत्याग, राजकीय शील, निष्ठा, यांना भाव राहणार नाहीं अशी भीति व्यक्त केली. अर्थात् हा मजकूर महाराष्ट्रांत जे उभे राहणार म्हणून जाहीर झालें होतें त्यांच्याच संबधांत होता असें नाहीं. मीं त्यांना लिहिलेल्या उत्तरांत कळविलें कीं, "काँग्रेसचा निवडणुकींशीं संबंध नाहीं; तेव्हां त्याबद्दल विचार करण्याचें कारण नाहीं;" मात्र चळवळ बंद केल्यामुळें माझी मनःस्थिति चमत्कारिक झाली असल्याचें कळविलें. काँग्रेसनें गांधीजींचें ऐकून चळवळ बंद केली तर ती चूक होणार हें माझें मत अनेक दृष्टींनीं विचार करून बनलें होतें. त्याजबरोबर निष्ठा म्हणून जी गोष्ट पटत नाहीं ती मानणें ही आपत्ति सरळ पुढें उभी होती. याच स्थितींत मध्यप्रांतांतील सरकारनें माझेशिवाय सर्व राजबंदी सोडून दिले. मजबरोबर असलेले कै. जमनलाल बजाज यांचे पुतणे श्री. राधाकृष्ण बजाज हेही सुटले. त्यांचेबरोबर, माझे राजकीय परिस्थितीसंबंधीचे विचार विस्तारशः गांधीजींना कळविण्याकरितां एक टांचण करून दिलें.

ता. १।५।३४ पासून मी एकटाच राजबंदी शिवणी–जेलमध्यें राहिलों. किंबहुना मध्यप्रांतांतही एकटाच राहिलों. मला एकट्यालाच मुदतीआधीं कां सोडलें नाहीं हें एक कोडेंच वाटलें. पण ता. ३०।५।३४ ला मुदत संपून सुटेपर्यंत हा मिळालेला एकांतवास फारच उपयुक्त ठरला. तासचे तास लहानशा आवारांत फेऱ्या घालतांना विचार करण्यांत घालविले. दररोजच्या वर्तमानपत्रांतून

निघणारीं निवदनें व मुलाखती वाचून, चळवळ बंद केल्याचा निर्णय, ऑ इ. कॉ.क. कायम करणार हें स्पष्ट झालें. मेच्या दुसऱ्या आठवड्यांत पाटण्याला ऑ. इं. कॉ. क. ची बैठक भरली व तींत निवडणुकी सरकारने जाहीर कराव्यात व कॅांग्रेसनें पक्ष म्हणून त्या लढवाव्यात असा निर्णय घेण्यांत आला. पाटणा येथील बैठक संप-ल्याबरोबर श्री. शंकरराव देव, शिवणी जेलमध्यें मला भेटावयास आले व त्यांनीं मी निवडणुकीस उभें व्हावें असें सुचविलें, व आतां कॅांग्रेसनें निवडणुकी लढविण्याचें ठरविलें असल्यामुळें, व हें कॅांग्रेसकार्य असल्यामुळें, मी तें मान्य केलें पाहिजे असा त्यांनीं आग्रह धरला. आतां कॅांग्रेसच यांत पडल्यामुळें निष्ठेला आणखी ताण पडला. मी त्यांना प्रांतांतील परिस्थिति लक्षांत घेऊन श्री. केशवराव जेधे यांना उभें करावें असें सुचविलें. परंतु त्यांचें नांव मतदारांचे यादींत नाहीं म्हणून तें अशक्य झालें, अशी माहिती त्यांनीं दिली. त्यानंतर मी श्री. खेर यांचें नांव सुचविलें असतां श्री. खेर हे कोठल्याही भानगडींत पडण्यास तूर्त तयार नाहींत असें त्यांनीं मला सांगितलें. मुंबई-तील एक गृहस्थ उभे राहण्यास तयार आहेत परंतु तुम्हांस प्रथम उभें करण्याची सर्वांची इच्छा आहे व तुम्ही तें ऐकलें पाहिजे असें श्री. देव यांचें म्हणणें पडलें; माझा निर्णय त्यांना तेथेंच व तावडतोब पाहिजे होता. मुलाखतीची वेळ संपत आली होती. शेवटीं मी नाकारीत नाहीं पण तूर्त कांहीं जाहीर करूं नका असें सांगि-तलें. मुलाखत संपली व श्री. शंकरराव देव अगदीं खूष व खरोखर आनंदित होऊन निघाले. या घटनेनंतर सुमारें २० दिवसांनीं मी सुटलों, पण तत्पूर्वी बहुतेक वर्तमानपत्रांतून माझ्या उमेदवारीचें वृत्तही फडकल्याचें कळलें.

माझ्या राजकीय जीवनांत यामुळें काय काय होणार याचा विचार मी करूं लागलों. निवडणुकी मला अपरिचित नव्हत्या. कॅांग्रेस कमिटया, बँका, म्युनिसि-पालिटी वगैरेंच्या अनेक निवडणुकींत यश व अपयश अनेक वेळां घेऊन निवडणुकांचें तंत्र मी हस्तगत केलें होतें; परंतु कायदेमंडळाची निवडणूक स्वतः उमेदवार म्हणून लढविणें ही गोष्ट साधी नव्हती. १९२३ सालीं स्वराज्यपक्षातर्फे श्री. केळकर उभे असतांना मी त्यांचेकरितां अर्थात् स्वराज्यपक्षाचें म्हणून काम केलें होतें. १९२३, १९२६ या सालीं झालेल्या कायदेमंडळाच्या निवडणुकींत मी घेतलेला भाग कांहीं कमी महत्त्वाचा नव्हता. कॉलेजमध्यें असतांना वादविवाद मंडळांतून मी अप्रसिद्ध नव्हतों. इतिहास, अर्थशास्त्र, राजकारण याच विषयांत मी पदवी घेतली होती. ब्रिटिश राजकीय जीवनविषयक सिद्धांताचा थोडासा परिणाम एतद्

विषयक दृष्टिकोणावर झाला होता. विधिमंडळांत जीवनाविषयीं ( Parliamentary life ) आकर्षण वाटणें साहजिक होतें. कौन्सिल प्रवेश व घटनाभंग या स्वराज्यपक्षाच्या भूमिकेशीं १९२३ सालापासून मी सहमत होतों. १९२५ अखेर जेव्हां अधिकारस्वीकाराचा प्रश्न महत्त्व पावला, व प्रतिसहकारपक्ष अस्तित्वांत आला, तेव्हांपासून केळकरपक्ष व मी प्रथम विरोधी बनलों. महाराष्ट्रांत गांधीवादी नाफेर व कौन्सिलविरोधी म्हणून दूर, व केळकरपक्ष अधिकारस्वीकारवादी म्हणून दूर, अशी स्थिति १९२५ अखेरपासून १९३० ची चळवळ सुरू होईपर्यंत होती. तरुणांची चळवळ, जागतिक घडामोडी, अधिकारस्वीकाराबाबत निरनिराळ्या प्रांतांत दिसून आलेला अनुभव लक्षांत घेतां कांहींतरी तेजस्वी, कांहींतरी तीव्र मार्गाचा अवलंब केल्याशिवाय पुढचें पाऊल पडणार नाहीं हें माझें मत निश्चित झालें होतें. मद्रास, कलकत्ता व १९२९ ची लाहोर काँग्रेस, यांतून उसळत जाणारी स्फूर्ति कायदेमंडळाकडे नेणारी नसून क्रांतीकडे नेणारी होती. १९३० च्या सत्याग्रहांत निर्माण झालेलें वातावरण अपूर्व होतें. तें सर्व वातावरण आतां आमूलाग्र बदललें. स्वातंत्र्याचा मार्ग कायदेमंडळांतून नसून त्याला दूर सारूनच तो जातो. स्वातंत्र्यानंतर घटना, नंतर विधिमंडळें, नंतर एतद्विषयक गोष्टी हा अनुक्रम अगदीं सरळ होता. स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाल्यानंतर कायदेमंडळाच्या—त्या परकी सरकारच्या अंमलाखालील कायदेमंडळाच्या—निवडणुकी लढविणें म्हणजे नुसती विसंगतीच नसून राजकीय जीवनाचा विपर्यास होता; काडीमोड झाल्यानंतर पोटगी मागण्याइतकें तें हास्यास्पद व निर्लज्जपणाचें होतें. १९३०।३१ चा सत्याग्रह संग्राम "स्वातंत्र्य मिळाल्याशिवाय साबरमती आश्रमांत परत पदक्षेप नाहीं" या पार्श्वभूमीवर सुरू झाला होता. त्याच लढ्याचें पुढील स्वरूप म्हणजे १९३२–३३–३४ सालची चळवळ होती. मनापासून मी या चळवळीला स्वातंत्र्य संग्राम मानून त्यांत पडलों होतों. सुरवातीस अग्रभागीं होतों व संपतांना जवळजवळ अखेरच्या तुकडींत सुटलों. मुख्य सैन्य बचावण्याकरितां थोडेसें निवडक सैन्य बळी देतात तसाच प्रकार वैयक्तिक सत्याग्रहाबाबत १९३३–३४ सालीं झाला होता, अशा तुकडींतील मी एक होतों. या एकंदर परिस्थितीचे हेलकाव्यांत मी निवडणुकीस उभें रहाणें म्हणजे स्वाभिमानशून्यता होती. अनेक सभांतून गर्जलेले माझेच शब्द, व ते माझेच असल्यामुळें तितक्याच तीव्रतेनें व तिरस्कारानें मजवर विचारसंग्रामांत तुटून पडत होते. "मोडेन पण वाकणार नाहीं" म्हणून होतों धरलेली

पताका, आज खालीं करण्याचा हा प्रसंग आला. पडून पुन्हां उभें रहाण्याचा हा संदेश आहे असें सांगितलें जात होतें. पहिला भाग प्रत्यक्ष झालाच होता, व पुढील भविष्याचे हातीं होता. क्रांतीला लागणारा निश्चय, परिणामाला न जुमानणारा निर्धार, मरणाचें मोल देणारी चिकाटी, अविचल धैर्य, ज्या सद्‌गुणांशिवाय स्वातंत्र्याचे प्रयत्न यशोमंदिर गांठूंच शकणार नाहींत, ते गुण अवश्य त्या ठिकाणींच अभावानें तळपत होते. एका चंद्रानें रात्र प्रकाशित होते, तथापि तान्यांनाही कांहींतरी तेज असावें लागतें. येथें एकच महात्मा होता, असंख्य तारे होते, पण ती केवळ संख्या होती; अशा स्थितींत तेजस्वी कार्यक्रम अशक्य होता हें कळून चुकलें.

मे १९३४ अखेर महात्माजींनीं मला कळविण्याकरितां श्री. राधाकृष्ण बजाज यांच्याकडे धाडलेला मजकूर—प्रत्यक्ष पत्रच—मला बजाज यांनीं धाडून दिलें. एका वाक्यांतच माझ्या विस्तृत टांचणाला उत्तर होतें तें. 'गाडगीळजीको कहना कि मेरी राय अब तो सबने मानेली है। आपकोभी उसी तरह चलना होगा!' अद्यापि मी हें पत्र माझ्याजवळ बाळगून ठेवलें आहे. कॉंग्रेसची आज्ञा पाळणें हा एक श्रेष्ठ धर्म, स्वस्थ बसणें हा दुय्यम धर्म, व कॉंग्रेसला तिचे निर्णयानंतर तिचे घटनेविरुद्ध विरोध करणें हा अधर्म, असें माझें मत होतें व आहे. संस्था अगर पक्ष समर्थ व प्रभावी व्हावयाचा असेल तर, हीच विचारसरणी योग्य आहे. निर्णयापूर्वी विचारविनिमय, वादविवाद, स्पष्टीकरण, निर्णयानंतर—हा निर्णय केव्हांही बहुमतानेंच असणार—त्याला अनुसरून निष्ठापूर्वक वर्तन, यांतच व्यक्तीचें श्रेष्ठत्व व संस्थेचें अगर पक्षाचें महत्त्व व शक्ति यांचें रहस्य असतें हा इतिहासाचा सिद्धांत व शिकवणूक आहे. लोकशाही म्हणजे व्यक्ति व समाज यांच्यांतील समन्वय होय. व्यक्तीचें व्यक्तित्व न मारतां अगर मरूं न देतां सामाजिक हित जास्तींत जास्त साधावयाचें हें लोकशाहीचें तंत्र दृष्टीआड होतां कामा नये. लोकशाही ही व्यक्तिवर्चस्वासाठीं नाहीं. व्यक्तिनिष्ठा गौण, व कार्यनिष्ठा, संस्था अगर संघटननिष्ठा श्रेष्ठ हें उघड आहे. लोकशाही म्हणजे एकाची शक्ति नव्हे, तर सामुदायिक शक्ति व तीही जो सर्वांत कमी सामर्थ्यवान् घटक असणार त्याचेच वेतानें असणार. सर्वज्ञ अगर श्रेष्ठ व्यक्तींचें म्हणणें स्वीकारलें जातेंच असें नाहीं. मात्र प्रत्यक्ष कृतींत जो कमताकत असेल त्याचे कुवतीवरच बहुतेक कार्य अवलंबून असतें. सत्याग्रहसंग्रामांत हाच अनुभव १९३०-३४

मध्यें आला. हा अनुभव लक्षांत घेऊन वागणें अनिष्ट असलें तरी अपरिहार्य दिसत होतें. अनिच्छेनें "वास्तववाद" स्वीकारणें जरूर होत होतें. कोणतीही गोष्ट शिस्तीनें झाली तर त्यांतूनसुद्धां सामर्थ्य उत्पन्न होतें. शिस्तींतील माघारही यशस्वी होते. तात्पर्य करावयास लागणाऱ्या अगर करूं इच्छिणाऱ्या गोष्टींकरितां नैतिक भूमिका तयार होत होती, व कायदेमंडळांबद्दलचें सुप्त आकर्षण जागृत होऊन भावनेनें व विचारानेंही वाटणाऱ्या अधःपतनाला, गौरवाची प्रतिष्ठा मी मनाशीं सजवीत होतों. सतत, सारखा व संतत विरोध करून कायदेमंडळें उधळून लावून, पूर्वीच्या अनुभवावर मात करूं, असा अभिमान चमकूं लागला. श्री. तात्यासाहेब केळकर सभासद असतांना सहज माझ्या एका मित्रानें 'दिल्लीस जाऊन असेंब्ली अधिवेशन तर पहा' असें म्हटलें होतें. त्यावर 'नुसता प्रेक्षक म्हणून जाणार नाहीं' असें मी उत्तर दिलें होतें, तें खरें करण्याची संधि पुढें उभी राहिली. १९३२चे एप्रीलमध्यें कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या वेळीं ज्या कायदेमंडळाचे इमारतीसमोरून हातकड्या घालून मला नेलें, त्याच ठिकाणीं मी सभासद म्हणून गेलों तर माझाच नव्हे तर संघटनेचा अपूर्व विजय होईल, अशी मनाला संतोष देणारी आशाही उत्पन्न झाली. एका वाक्यांत सांगावयाचें म्हणजे शिवणी तुरुंगांतून ३० मे १९३४रोजीं बाहेर पडण्यापूर्वी, निवडणुकीस उभें राहावयाचें असा निश्चय करूनच मी बाहेर पडलों, व सोडणारा तुरुंगाधिकारी—मजबरोबर फर्ग्युसन कॉलेजमध्यें सहाध्यायी होता—त्यानें तुम्ही निश्चित निवडून येणार म्हणून सर्वांचे आधीं माझें आगाऊ अभिनंदन करून मला बीदा केलें.

शिवणीहून जबलपुरास वडील बंधूंस भेटून ता. १।६।३४ला पुण्यास आलों. प्रवासांत श्री. जमनलाल बजाज व मिस् हॅरिसन यांची भेट झाली. श्री. जमनलालजींनींही निवडणुकीस उभें राहणें जरूर आहे असेंच सांगितलें. मिस् हॅरिसन् ज्या सफरेजिस्ट चळवळींत होत्या त्यांच्याशीं, त्यांच्या इंग्लंडमधील एकंदर निवडणुकीसंबंधानें चर्चा केली, व पुष्कळ उपयुक्त माहिती मिळविली. पुण्याचे स्टेशनवर अनेक स्नेही जमले होते त्यांनीं निवडणुकीसंबंधींच चर्चा करावयास सुरुवात केली. घरींदारीं निवडणुकीशिवाय विषयच दिसत नव्हता.

जून १९३४ चे दुसरे आठवड्यांत, हरिजन चळवळीचे दौऱ्यांत महात्माजी पुण्यास येणार होते व त्यांचा मुक्काम एक आठवडा येथें होणार होता. पुणें शहरातर्फे त्यांचें स्वागत व्हावें म्हणून तत्संबंधीं योजना करण्याकरितां ता. २।६।३४ला

नगरपालिकेचे सभागृहांत नागरिकांची सभा भरली होती. नगराध्यक्ष श्री. बाबूराव बाळेकर अध्यक्ष ठरले होते. सर्व नागरिकांतर्फे होणाऱ्या स्वागतास अनेक सनातनी गृहस्थांचा विरोध होता. सभा गाजणार हें उघड होतें. गांधीजींचा कार्यक्रम ठरविणारे चिंताग्रस्त होते. मी त्यांना स्पष्ट सांगितलें कीं, ज्या पुण्यांत दयानंदांची अवहेलना झाली. आगरकर, रानडे यांचा अपमान झाला, तीच प्रवृत्ति कायम असतां, सर्व पुण्यातर्फे स्वागत करण्याचा घाट घालणें हें चूक आहे. मत-भेद दाखवून सार्वजानिक आयुष्यांत व वर्तणुकींत सौजन्य व सरळपणा दाखविणें यांत कमीपणा नसून जास्त प्रतिष्ठा आहे हें अद्याप लोकांना पटलें नाहीं हें दुर्दैवानें खरें आहे, हें विसरून चालणार नाहीं असेंही मी बजावलें. तथापि सभा बोला-विली आहे, तरी तुम्ही पुढाकार घेऊन हें काम निभावून नेलें पाहिजे असेंच मला सांगण्यांत आलें. सभेचे वेळीं सभागृहांत विरोधक बहुसंख्याक होते. या स्थितींत ठराव मांडून नापास करून घेणें इष्ट नव्हतें. मी, विरोधकांपैकीं श्री. गणपतराव नलावडे, श्री. लेले वकील यांच्याशीं तडजोड करतां येईल कीं काय हें पहाण्यासाठीं बोलूं लागलों व आपली मंडळी जमवून आणा असें सांगितलें. अर्धा तास वाटा-घाटी झाल्या व ठरावाचा मसुदा श्री. नलावडे यांना पसंत पडला. पण इतर सनातन्यांना पसंत होईना. साधारणपणें एवढ्या वेळांत आमचे बाजूची जनता बहुसंख्यांक झाली. तावडतोब सभा सुरू करण्यास अध्यक्षांना इशारा दिला. मूळचा ठराव मांडण्यात आला. अनुमोदन देण्यांत आलें. विरोधकांतर्फे सभा बेकायदेशीर आहे असा आक्षेप घेण्यांत आला. मी उत्तर दिलें कीं, "तसें तुमचें मत अस-ल्यास तुम्ही भाग घेऊं नका." अध्यक्षाकडून तावडतोब ठराव मतास टाकण्यांत आला. विरोधकांत, हात वर करून विरोध दाखवावा तर सभा कायदेशीर होती अशी कबुली देण्यासारखें होतें अशी शंका उत्पन्न झाली. यामुळें कांहींनीं हात वर केले, कांहीं स्तब्ध राहिले. मूळ ठराव प्रचंड बहुमतानें पास झाला असें अध्य-क्षांनीं जाहीर केलें, व तावडतोब सभा बरखास्त केली. म्युनिसिपल अधिकाऱ्यांनीं सभागृह ताब्यांत घेतलें, सभा यशस्वी झाली. मूळ ठराव पास झाला याबद्दल लोकांना आनंद झाला, पण मला मात्र त्यायोगें विरोध वाढणार हें दिसू लागलें.

वर्तमानपत्रांत वादविवाद सुरू झाला व त्यांत स्तुति व निंदा दोन्हींचा वर्षाव होऊं लागला. सनातन्यांच्या सभांवर सभा होऊं लागल्या; व एका वक्त्यानें गांधीजी आततायी आहेत, तेव्हां गीताधर्माप्रमाणें आततायी माणसाला ठार मारलें पाहिजे

'इन्क्रेव' अशी घोषणा केली. कांहींनीं सूचना केली कीं, नगरपालिकेतर्फे मानपत्र देण्यांत यावें. यांतील अडचण मला माहीत होती, पण शेवटीं प्रयत्न करण्याचें ठरलें. नगरपालिकेनें ठराव केला, सभा बेकायदेशीर आहे म्हणून प्रकरण कोर्टांत गेलें. दुसरी सभा घेतली व रविवारचें मानपत्र सोमवारीं संध्याकाळीं देण्याचें ठरविलें. गांधीजी स्टेशनवर आले. हजारों माणसांनीं त्यांचें स्वागत केलें. पण कांहीं मूठभर लोकांनीं काळीं निशाणें दाखविलीं. सोमवारीं मानपत्र घेण्याचें गांधींनीं बऱ्याच नाखुषीनें मान्य केलें. शनिवारीं कोर्टानें दुसरी सभा कायदेशीर आहे असा निर्णय दिला. रविवारीं सभा होऊन मानपत्राचा ठराव प्रचंड बहुमतानें पास झाला, पण विरोध वाढूं लागले. कोणत्या प्रकारचा हल्ला गांधीजींवर होणार अशी सूचना कांहीं जणांकडून मला मिळाली. रविवारच्या शनिवारवाड्यापुढील सभेंत उच्चासनावर व जवळपास निवडक मंडळी ठेवण्याची खबरदारी घेतली. अन्य ठिकाणीं पोलीस बंदोबस्तही होता. सभेंत १० हजार रुपये गांधीजींना हरिजन कार्याकरितां देण्यांत आले. सुमारें २०,००० लोकांची सभा विशेष कांहीं न घडतां पार पडली. फक्त आतां सोमवारचें मानपत्र राहिलें होतें, व तेथें कांहीं घडेल ही कल्पनाच नव्हती

सोमवारीं ४ चे सुमारास मी गांधीजींचे निवासस्थानीं गेलों. माझे मुलांकडून ५ रुपये घेऊन त्यांनीं स्वाक्षरी दिली, व ही खास सवलत म्हणून दिली असेंही त्यांनीं सांगितलें!! तेथून घरीं जाऊन स्वस्थ पडावें व गांधीजींच्या प्रयाणवेळेस स्टेशनवर जावें असा विचार करून बंगल्याबाहेर पडलों. परंतु ज्यांच्या गाडींतून गांवांत जाणार होतों त्यांनीं आग्रह करून मला म्युनिसिपल हॉलमध्यें नेलें. सभागृह चिकार भरलें होतें. गांधीजी संध्याकाळीं ६-३० ला येणार असें ठरलें होतें, ६-१५ला एकदम मोठा आवाज झाला. लोकांना वाटलें कीं गांधीजींचे सन्मानार्थ आवाज काढणें सुरू झालें. मी धावपलों व सभागृहांतून जिन्याजवळ येतों, तों, डॉ. नायडूंनीं बॉम्बस्फोट झाला असें सांगितलें. त्यांना, सभागृहांत ही बातमी सांगूं नका असें सांगून मी जिना उतरूं लागलों. तेथें श्री. अण्णासाहेब भोपटकर भेटले, त्यांनीं "बॉम्बस्फोट झाला व आपले पायांस इजा झाली" असें सांगितलें. त्यांनाही तशीच विनंति केली व खालीं आलों. तेथें २ इसमांना गंभीर व कांहींना किरकोळ जखमा झाल्याचें कळलें. चीफ ऑफिसर श्री. भागवत हे मक्याजवळील रक्त पुशीत होते. सर्वांनीं "काय करावयाचें" असें विचारलें. मी सांगितलें "ठरलेला कार्यक्रम झालाच पाहिजे. दरवाज्यावरील सज्जांतील मंडळी कांहीं न सांगतां

आंत घालवा." त्याप्रमाणें करण्यांत आलें. रस्त्यावरील मंडळी, पोलीसांना सांगून मागें सरकविली. एवढ्यांत गांधीजींची गाडी आली. मी पुढें होऊन त्यांना थोडा वेळ न उतरण्यास सांगितलें. नंतर सज्जांत कोणी नाहीं असें पाहून त्यांना एकदम मी व श्री. गंगारामबोवा पाषाणकर यांनीं जवळ जवळ पोटाशीं धरून आंत आणिलें. पोलीस अधिकाऱ्यांना "सभा संपेपर्यंत कांहीं करूं नका, सभा संपतांच तुम्हांस योग्य वाटेल तें करा" असें सांगितलें. जिना चढतांना महात्माजींना झालेली हकीगत सांगितली; व कार्यक्रम जसा ठरला आहे तसाच होणार आहे, ( No change in programme ) असें सांगितलें. गांधीजी सभागृहांत आले. मानपत्र-समारंभ झाला. करंड्याची विक्री होऊन श्री. मोपटकरांनीं तो घेतला. परत जातांना, "स्त्रिया बरोबर आहेत तेव्हां त्याच रस्त्यानें परत जावयाचें काय?" असें गांधीजींनीं विचारलें. मी होय म्हटलें, त्यांना धरून खालीं आणलें, मोटारींत बसविलें; व परत येऊन पोलीस अधिकारी यांना सांगितलें कीं, "तुम्हास जें योग्य वाटेल तें करा" असें सांगून कार्यक्रमांत त्यांनीं कांहीं गडबड केली नाहीं याबद्दल त्यांचे आभार मानले. गांधीजी जातांच बॉंबची बातमी सभागृहांत पसरली, व गोंधळ झाला. घरीं आलों तों शिपायानें मुलांस घरीं आणून पोंचविलेलें कळलें. रात्रीं बंगल्यावर जाऊन गांधीजींची गांठ घेतली, त्यांनीं निवेदन सांगितलें तें घेतलें. स्टेशनवर आलों. गाडी सुटण्यापूर्वी कांहीं संदेश मी महाराष्ट्रासाठीं मागितला असतां त्यांनीं अर्थपूर्ण दृष्टीनें मजकडे पहात "महाराष्ट्रको मैं क्या संदेश दूं" एवढेंच सांगितलें व तो मागण्यांत माझी चूक झाली असें मला वाटलें. गाडी सुटली. वर्तमानपत्रांच्या बातमीदारांना निवेदन सांगितलें. घरीं आलों व झालेल्या घटनांचा विचार करूं लागलों. जर गांधींना कांहीं अपघात झाला असता तर, केवढें लांछन शहरावर, प्रांतावर, व देशावर होतें! ज्यानें आयुष्याचा प्रत्येक क्षण देशासाठीं खर्चिला, त्यावर बॉंब टाकण्याची इच्छा कोणाही हिंदी माणसाच्या मनांत यावी, हें देशाचें केवढें दुर्दैव ! ज्यांनीं लोकमत प्रक्षुब्ध केलें, त्यांनीं आपली जबाबदारी ओळखली नाहीं, हें उघड होतें. खरोखर गांधीजी आततायी होते का ? निव्वळ अहंकारानें, खोट्या समजुतीनें, पक्षांधतेनें विरोध होत होता हें उघड आहे. सौजन्य, सहिष्णुता व प्रामाणिक विरोध अशा तऱ्हेनें काम करीत नाहीं. हेंच तर महात्माजींचें मुख्य सूत्र! ज्यानें हें कृत्य केलें त्याला त्यांनीं क्षमाच जाहीर केली. गुन्हेगार कोण हें कळलें पण आम्ही पोलीसांना सांगण्याचें नाकारलें. वर्तमानपत्रां-

तून, सभेतून वाद झाले, अभिनंदन व निषेधही झाला. लोकमत अनेक दृष्टींनीं खळबळून निघालें. पुढें होणाऱ्या निवडणुकीचे दृष्टीनें यांकडे पहाणें जरूर होतें. पुण्यांतील मुक्कामांत, "निवडणुकीस जरूर उभे रहा कॉंग्रेसच्या आज्ञेप्रमाणें कायदेभंग केलात, तुरुंगांत गेलांत, तर कॉंग्रेसच्या आज्ञेप्रमाणें निवडणूकही लढा" असेंच गांधींनीं सांगितलें. निवडणूक म्हणजे लोकमताचा कौल. वृद्ध मनुष्य ज्याप्रमाणें आपले तरुण स्त्रीस हातांतील दीपाप्रमाणें जपतो, तसेंच लोकमतास जपलें पाहिजे हें सरळ होतें, आणि लोकमत सर्व महाराष्ट्रभर वरील घटनेनें चिघळलें होतें. थोडा वेळपर्यंत तरी कोण कुणाचा हें कळणं कठिण झालें.

जून १९३४ चे अखेर खानबहादूर कूपर यांची मुंबई सरकारचे कार्यकारी-मंडळांत नेमणूक झाली, व त्यामुळें सातारा जिल्ह्याची पोट निवडणूक जाहीर झाली. कॉंग्रेसनें निवडणुकी लढविण्याचें ठरविल्यानंतर निवडणुकीचा कार्यक्रम अंमलांत आणण्याची ही पहिलीच संधि आली. महाराष्ट्र प्रां. कॉंग्रेस कार्यकारी मंडळांत,या बाबतींत समसमान मतें पडलीं; व अध्यक्ष श्री. देव यांनीं आपलें जादा मत दिलें व 'लढवावी' असा कमिटीचा निर्णय झाला. मी 'लढवूं नयेत' असें मत दिलें. कारण वेळ थोडा व खुद्द मतदारसंघांतील लोक किती उत्सुक आहेत याबद्दल शंका होती. तथापि निर्णय झाल्याबरोबर त्याच रात्रीं मी साताराला गेलों. दुसरे दिवशीं संध्याकाळीं पाठक हॉलमध्यें आमचे उमेदवार श्री. भाऊसाहेब सोमण यांच्या निवडणुकीच्या लढ्याची पहिली घोषणा केली. 'अब तो सुरू हुआ है जंग" ही घोषणा करून सातारा जिल्ह्यांत, मी व श्री. केशवराव जेधे यांनीं दौरा काढून सर्वत्र खळबळ उडवून दिली. श्री. केशवरावांना, सभेंत जातिनिष्ठांकडून तीव्र विरोध होत होता. नानाप्रकारचे आरोप त्यांचेवर करण्यांत येत होते. रहिमतपूरच्या सभेंत मारहाणीपर्यंत पाळी आली. पण हातीं घेतललें कार्य त्यांनीं सोडलें नाही. शेंकडों कार्यकर्त्यांची खटपट यशस्वी होऊन श्री. भाऊसाहेब सोमण प्रचंड बहुमतानें निवडून आले. कॉंग्रेसची पकड जनतेवर किती आहे हें शाबीत झालें. जातिनिष्ठा, राष्ट्रियत्वापुढें टिकत नाहीं. खरोखरीच जनता—बहुजनसमाज—जातिनिष्ठ नाहीं, जातिनिष्ठा शिकलेल्या व नोकरीसाठीं हपापलेल्या लोकांत आहे, हें माझें मन या घटनेमुळें अनेकांना पटलें.

साताराच्या निवडणुकीमुळें प्रांतांतील कॉंग्रेस-कार्यकर्त्यांचा विश्वास वाढला. कांहींना निवडणुकींत यश येईल का? दोन्ही जागा कॉंग्रेसला मिळतील का?

अशा शंका वाटत होत्या त्या यामुळें बऱ्याच कमी झाल्या. मला दोन्ही जागा कॉंग्रेसला मिळतील याबद्दल शंका नव्हती. फक्त माझी एक अट होती. ती म्हणजे महाराष्ट्रांतील कॉंग्रेस-कार्यकर्त्यांनीं कोठल्याही परिस्थितींत केसरीपक्षाशीं तडजोड करूं नये. ही माझी विचारसरणी होती व आजही आहे. सदरहू पक्ष कोणत्याही नांवानें वावरो, जोंपर्यंत त्याचीं सूत्रें केसरीसंस्थेच्या वातावरणांत हलविलीं जातात तोंपर्यंत माझा हा आक्षेप कायम आहे. पूर्वी काय स्थिति होती तें सोडून दिलें तरी १९२० सालापासून माझा अनुभव असा आहे कीं, हा पक्ष अथवा हें वातावरण, धार्मिक, राजकीय व आर्थिकदृष्ट्या प्रतिगामी आहे. वर्णाश्रमव्यवस्था व तदंग-भूत वर्णवर्चस्व व जन्मजात जातिभेद हा ज्या धर्माचा अगर समाजव्यवस्थेचा पाया, त्या समाजांत समतेला वाव नाहीं, त्या समाजांत लोकशाही नाहीं. लोक-शाही म्हणजे सर्व माणसें सारखीं व येथेंतर पूर्वजन्मींच्या सुकृतानें वरच्या वर्णांत अगर जातींत जन्म म्हणून श्रेष्ठत्व, या परिस्थितींत लोकशाही पाहिजे तर वर्ण-व्यवस्था निकालीं लागली पाहिजे; व वर्णव्यवस्था पाहिजे तर लोकशाही नाहीं हें अगदीं स्पष्ट आहे. रोटीबंद बेटीबंद या तटबंदींत व्यक्तिविकास तर खुंटतोच पण समाजाची प्रगति थंडावते, नवीनाला वाव नाहीं व जुन्याची घाण कस्तुरी म्हणून मानण्याकडे प्रवृत्ति होते; नेतृत्व—अर्थात् सामाजिक-जन्मसिद्ध असल्यामुळें कर्तृत्वानें तें मिळवण्याच्या अगर वाढविण्याच्या प्रयत्नाला चालना नसते, प्रेरणा नसते.

गेल्या ६० वर्षांतील प्रत्येक सामाजिक व म्हणूनच एका अर्थानें धार्मिक सुधारणेला केसरीपक्षाकडून विरोध झालेला आहे. नवीन सामाजिक सुधारणेनें जे वास्त-विक आचार, पण धर्म म्हणून मानले गेले, त्यांच्यांत बदल झाला व अशा सर्व बाबतींत—लग्न, वारसा, आहार, वर्तनादि बाबतींत—फरक झाला तर सर्व समाज रचना बदलणार व त्यायोगें कांहीं वर्णांचें वर्चस्व कमी होणार ही भीतिच या विरोधाचे मुळाशीं होती. महाराष्ट्रांतील ब्राह्मण—ब्राह्मणेतर वाद वाढविण्यांत व चिघळविण्यांत अजाणतां कां होईना, केसरीपत्राचें धोरणच कारणीभूत झालें हें अप्रिय सत्य नमूद करणें जरूर आहे. कुळांविरुद्ध जमीनदारांची बाजू घेऊन, मजुरांविरुद्ध मालकांची तळी उचलून, ऋणकोविरुद्ध सावकारांकडे सहानुभूतीचा कल दाखवून, या पक्षाचें आर्थिक धोरण, सर्वांच्या परिचयाचें झालें आहे. राजकीय बाबतींतलि प्रतिगामी-पणा सहज दिसून येणारा नाहीं. जर नवीन येणाऱ्या राजकीय वातावरणांत खाजगी

मालमत्ताविषयक हक्क मर्यादित होणार असतील, धर्मामध्यें हस्तक्षेप होणार असेल तर तें स्वातंत्र्य नको; अशी विचारसरणी या पक्षाची आहे हें थोडें सूक्ष्मपणें पहाणारास दिसून येईल. स्वातंत्र्य, जर वर्णवर्चस्व रहाणार असेल, जें ज्यांचेजवळ आहे म्हणजे ' आहे रे ' हें जर कायम रहात असेल, तरच वरच्या वर्गाला तें हवें आहे व वरच्या वर्गाच्याच प्रतिनिधींतून हा पक्ष रूढ आहे. कॉंग्रेस-मंत्रिमंडळानें ' कुळ कायदा ' मांडला त्यावेळेस, " यापेक्षां इंग्रजांचें राज्य बरें " असे उद्गार या पक्षांतील अनेक लोकांनीं काढले आहेत. इंग्रजांचें संचितवादी धोरण व त्याला अनुसरून त्यांनीं घटनेंत घातलेलीं संरक्षक बंधनें, हेंच धोरण या पक्षाचें असून तशींच संरक्षक बंधनें नवीन घटनेंत यांना हवीं आहेत. हा पक्ष सर्व दृष्टींनीं ( Vested interst ) संचितवाल्यांचा प्रतिनिधि आहे. खोत, इनामदार, सावकार, मालक यांच्या संयुक्त आघाडीचा हा पक्ष आहे म्हणून लोकशाही स्वातंत्र्याच्या विरोधांत, साम्राज्यशाही, सनातनशाही व संचितशाही यांची एकजूट आहे. या पक्षाचें, हें अंतर्यामींचें व मध्यवर्ति धोरण आहे. या पक्षांतील कांहीं मंडळींचीं मतें प्रगतिकारक आहेत पण त्यांचा प्रभाव पडून, धोरणांत क्वचितच फरक पडत असतो. तात्पर्य अशा पक्षाशीं तडजोड करून, बहुजनसमाजाचा विश्वास संपादन करतां येणार नाहीं, हें माझें मत महाराष्ट्रांतील जातिविषयक वाद, त्याची पार्श्वभूमि व त्यांत वावरणाऱ्या व्यक्ति लक्षांत घेतां बनलें होतें. कॉंग्रेसनें या पक्षाशीं तडजोड केल्यास, बहुजनसमाजाचें नेतृत्व कॉंग्रेसला मिळणार नाहीं हा माझे विचारसरणींतील मूलभूत सिद्धांत आहे.

माझी ही विचारसरणी त्यावेळेस अनेक कॉंग्रेसकार्यकर्त्यांना पटत नव्हती. जून १९३४ मध्यें कॉंग्रेससंस्थांची पुनर्घटना करण्याकरितां झालेल्या प्रांतिकसभेंत उभयपक्षांचें निवडणुकीसाठीं मंडळ नेमण्यांत आलें. कॉंग्रेसवर सरकारी वरवंटा फिरत असतांना जे आपल्यापरी दूर होते, कॉंग्रेसला विरोध करीत होते, कॉंग्रेसकार्यक्रमाची चेष्टा करीत होते, त्यांचीच नेमणूक त्या पक्षातर्फे या मंडळावर झाली. ज्या दोन पक्षांत आमूलाग्र फरक आहे, त्यांना एके ठिकाणीं काम करण्यास सांगणें, यांत राजकीय प्रगति आहे असें मानणें कठीण आहे. शिवाय या घटनेनें बहुजनसमाजावर काय परिणाम होईल याची दखलसुद्धां घेण्यांत आली नाहीं. निवडणुकीसाठीं लवकरच जाहीरनामा तयार होणार होता. जातिनिवाडा हा एक महत्त्वाचा प्रश्न होता ही गोष्ट खरी. १९३२ चे ऑगस्टमध्यें हा निवाडा

देण्यांत आला होता. १९३४ जुलैपर्यंत त्याविरुद्ध मोठी तीव्र चळवळ लोकशाही स्वराज्यपक्ष ऊर्फ केसरीपक्ष यानें केली नव्हती; पण निवडणुकीचे दृष्टीनें त्याचा उपयोग होईल हें जाणून पुन्हां एतद्विषयक चळवळीला ऊत आला. खुद्द या पक्षांतील एका मोठ्या व्यक्तीनें मला सांगितलें कीं, " वाटलें तर या निवाड्याला महत्त्व देतां येईल, वाटलें तर देतां येणार नाहीं, " यांतच खरी कळकळ दिसून येत होती. हा वाद चालू होता, वर्किंग कमिटीची बैठक व्हावयाची होती; या सुमारास श्री. अणे हे पुण्यास आले. त्यांची इच्छा श्री.केळकर यांनीं निवडणुकीला उभें रहावें अशी होती. श्री. केळकर नाखूष नसावेत, पण त्यांना कॉंग्रेसनें विनंति करावी असें वाटत होतें व तें साहजिक होतें. श्री. अणे यांनीं हें घडून यावें म्हणून निवडणुकीचे बाबतींत व जातिनिवाड्याचे बाबतींत या प्रांतापुरता समेट व्हावा म्हणून श्री. तुळपुळे यांचे घरीं भरलेल्या सभेंत प्रयत्न केला. मीं माझी समेट-विरोधी विचारसरणी पुढें मांडली व बहुजनसमाजाचा यामुळें द्रोह होतो हेंही स्पष्ट केलें. पहांटेपर्यंत वाद चालू होता आणि शेवटीं सर्वजण समेटाला अनुकूल आहेत, मीच एकटा विरोध करतों व यांत माझा स्वार्थ आहे असा आक्षेप कांहींनीं घेतला, म्हणून मी समेटाला मान्यता दिली. लवकरच वर्किंग कमिटीची सभा भरली. कॉंग्रेसनें जाहीरनाम्यांत निवाड्याबाबत तटस्थतेची भूमिका घेतली. श्री. अणे हे कॉंग्रेसमधून निघाले. त्यांनीं कॉंग्रेस-नॅशनॅलिस्ट-पक्ष काढला. महाराष्ट्रांत, " जातिनिवाड्याला विरोध" हीच घोषणा करून कॉंग्रेसविरोधी सर्व पक्ष एक झाले. समेट आपो-आपच संपला. मात्र हें होण्यापूर्वी संयुक्तमंडळानें मी व जेधे यांची दोन उमेद-वार म्हणून शिफारस केली. पार्लमेंटरी बोर्डानें ती मान्य करून आम्ही दोघे अधिकृत उमेदवार म्हणून जाहीर झालों.

---

# : निवडणूक :

निवडणुकीसंबंधांत चर्चिलसाहेब म्हणतातः" No part of the education of a politician is more indispensable than the fighting of elections. Here you come in contact with all sorts of persons and every current of national life. You feel the constitution at work in its primary processes. Dignity may suffer, the superfine gloss is soon worn away; nice particularisms and special private policies are scraped off, much has to be accepted with a shrug, a sigh or a smile; but at any rate in the end one knows a good deal about what happens and why."

पक्षाच्या धोरणांतील प्रत्येक गोष्ट उमेदवाराला पसंत असतेच असें नाहीं. पक्षांतील अन्य उमेदवारांच्या गुणदोषांचा परिणाम एकमेकांचे कार्यावर होतो. पक्षामार्फतची निवडणूक म्हणजे अथीमथी पद्धतीनें करावयाचें कार्य. कोणीही प्रचारक कांहीही बोलला तरी त्याचा परिणाम स्थानिक न राहातां सर्वत्र पसरतो. उत्साहाचे भरांत, ध्येयाचे धुंदींत, क्वचित् रागानें व त्राग्यानें मर्यादातिक्रमण होतें. कार्यकर्ते सर्व प्रेमानें, निष्ठेनें, शुद्धबुद्धीनें निःस्वार्थबुद्धीनेंच कार्य करीत असतात. उमेदवाराची परिस्थिति मात्र मोठी नाजूक असते. पक्षाचे बरोबर वैयक्तिक भविष्यहि निगडित झालेलें असतें. स्वतःचा मानापमान तर विसरावा लागतोच, पण तेवढ्यानें भागत नाहीं. योग्याप्रमाणें शांतचित्त व जागरूकही रहावें लागतें. निवडणुकींत स्वभावांतील कानेकोपरे, तिरकसपणा पार कानसून निघतात. वाटेल त्यानें विचारलेल्या व वाटेल त्या भाषेत विचारलेल्या प्रश्नांना शक्य तितकें हंसून व जमल्यास नम्रतेनें उत्तर द्यावें लागतें. वधूपरीक्षा यापुढें कांहींच नाहीं. संपत्तीचा, शहाणपणाचा अभिमान कडु घोटाप्रमाणें गिळावा लागतो. समतावाद शिकविण्याची निवडणूक म्हणजे प्राथमिक शाळा होय असें म्हटलें तरी चालेल. श्रीमंताचे महालापासून गरीबाचे चंद्रमौळी झोंपडीपर्यंत, नारदाप्रमाणें या सर्व लोकांतून भ्रमण करावें लागतें,

व नारदाप्रमाणें प्रसंगीं कलह पण पेटवावा लागतो. राजनीतिशास्त्रज्ञांपासून अक्षरशत्रु ग्यानबापर्यंत आपली बाजू मांडून, आपलाच पक्ष देशाला विद्यमान दारुण प्रसंगांतून सोडविण्यास कसा समर्थ आहे हें पटवावें लागतें. पक्षनिष्ठ मतदारांपासून अनिश्चित मताच्या मतदारांपर्यंत धीर न सोडतां प्रचारकार्य करावें लागतें. विरुद्धबाजूच्या खोटया व काल्पनिक आक्षेपांबद्दल खुलासा करावा लागतोच, पण त्याचबरोबर स्वपक्षांतील लोकांच्या विधानांबद्दलही खुलासे करण्याचा प्रसंग येतो. जाहीर सभेंतील प्रश्नोत्तरांपासून दगड फेकीपर्यंत होणाऱ्या घटनांना, रणसंग्रामांना धीरानें तोंड द्यावें लागतें व त्याचबरोबर घरोघर जाऊन ( House to house fight ) वादविवादाचेही व्यक्तिव्यक्तीगतप्रसंग अनुभवावे लागतात. पक्षाचें सामान्य धोरण म्हणजे युद्धांतलि ( Grand strategy ) मुख्य योजना. पण ठिकठिकाणीं व निरनिराळ्या मतदारांशीं कसें वागावें हे ( Tactics ) 'डावपेंच' ही सांभाळावे लागतात. सर्वांत महत्त्वाची बाब म्हणजे वर्तमानपत्रांतून होणारा प्रचार; याबाबत दक्षता घेऊन प्रसंगीं नाजूक रीतीनें हें शस्त्र वापरावें लागतें. युद्धाला ज्याप्रमाणें Men, Money and Munition मनुष्यबळ, द्रव्यबळ व सामुग्रीचें बळ अवश्य असतें व त्याचा भरपूर पुरवठा झाल्याशिवाय यश मिळणें दुरापास्त, त्याचप्रमाणें निवडणुकीचे बाबतींतही आहे. निवडणूक म्हणजे संग्राम. राग, द्वेष, मत्सर, अभिमान, दुरभिमान या मानासिक बाबींचा जसा आविष्कार होतो त्याचबरोबर दगड, खुर्च्या, अंडीं व प्रसंगीं तीक्ष्ण शस्त्रें व स्फोटक पदार्थ यांचाही प्रयोग होतो. अन्य संग्राम राष्ट्राराष्ट्रांत होतो; हा राष्ट्रांतील लोकांच्या दोन तटांत, दोन पक्षांत असतो एवढाच फरक. बाकी दोन्हींतलि भावनावशता, तीव्रता सारखीच.

निवडणुकीबाबत वर्किंग कमिटीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यापासूनच या संग्रामाचें रणशिंग फुंकलें गेलें. ठिकठिकाणीं कार्यकर्त्यांनीं कामास सुरवात केली. मी प्रथम नाशिक, मालेगांव नंतर चाळीसगांव, जळगांव, भुसावळ, अंमळनेर, धुळें, या ठिकाणीं जाऊन व्याख्यानें दिलीं. लोक मोठ्या प्रमाणांत जमत होते. जातिनिवाडा, राजकीय सुधारणा, हिंदुमुसलमानऐक्य, हरिजनोद्धार वगैरेबाबत शंका विचारल्या जात, व त्यांना मी उत्तरें पण देई. जातिनिवाड्याबाबत काँग्रेसचें धोरण योग्य होतें हें समजूनसुद्धां, सुशिक्षित वर्ग तें मान्य करण्यास तयार नव्हता. सदरहू निवाड्यानें प्रांतिक बाबतींत, हिंदुमुसलमान या दोन्ही जमातींवर सारखाच

न्याय अगर अन्याय केला होता. बंगाल व पंजाबमध्यें मुसलमानांची संख्या अधिक असून, बंगालच्या, कायदेमंडळांत या निवाड्यानें मुसलमान बहुसंख्याक होत नव्हते. पंजाबमध्यें ५१–४९ असें मुसलमान–मुसलमानेतर यांचें प्रमाण होतें. बंगाल्यांतील गोऱ्या लोकांनी त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षां अनेकपटींनीं जास्त प्रतिनिधित्व देऊन या दोन्ही जमातींवर, उघड अन्याय केला होता. या निवाड्यांतील खरें विष मध्यवर्ति कायदेमंडळाबाबत होतें. तेथें बहुसंख्याक हिंदूंना बहुसंख्याक प्रतिनिधित्व नव्हतें. जातीवार प्रतिनिधित्व ठेवून, स्वातंत्र्याविरुद्ध, लोकशाहीविरुद्ध, एक तटबंदी इंग्रजी धूर्त राजकारणानें रचली होती; तथापि सिमला तत्कालीन दाखला होता. लखनौ करार, अनेक तत्सम करार यांमुळें हें मान्य झालेलें तत्व, अमान्य करण्यास सर्व पक्षांची संमति पाहिजे त्याशिवाय शक्य नाहीं, ही विचारसरणी निदान विचार करण्यासारखी तरी होती. परन्तु त्याबरोबर अन्य हितसंबंध म्हणजे जमिनदार, व्यापार, उद्योगधंदे, मागासलेले जन, सरदार, इनामदार यांनाही प्रतिनिधित्व देऊन प्रगतिकारक राजकारणाविरुद्ध दुसरी तटबंदी उभारण्यांत आली होती. लोकशाही स्वातंत्र्याचें घटनात्मक स्वरूप म्हणजे जबाबदार विधिमंडळें हा इंग्रजी राजनैतिक सिद्धांत, हिंदुस्थानांतील राजकारणांत समाविष्ट झाला होता. जबाबदार विधिमंडळें कार्यक्षम व्हावयाचीं तर दोनच प्रमुख राजकीय पक्ष पाहिजेत हा अनुभव विसरतां येणें शक्य नाहीं. ज्या पक्षाला निवडणुकींत बहुसंख्या व बहुमत मिळेल त्या पक्षानें प्रधानमंडळ बनवावें व विधिमंडळांत बहुमत असेपर्यंत राज्यकारभार हांकावा, हा दंडक अलिखित असा असला तरी अनिवार्य आहे. बहुमतवाल्या संघटित पक्षाच्या संमतानें, सल्ल्यानें, राजा अगर गव्हर्नर यानें वागलेंच पाहिजे हा सिद्धांत आहे. सल्ला पटत नसेल तर निवडणूक जाहीर करावी, पुन्हां तोच पक्ष बहुमतवाला झाला तर लोकमताचा कौल कळला, हें जाणून, त्याप्रमाणें वागलें पाहिजे; याप्रमाणें न झालें तर लोकशाही नाहीं, स्वातंत्र्य नाहीं व जबाबदारीही नाहीं, एवढेंच नव्हे तर बुरखा घेतलेली हुकूमशाही आहे, हें उघड आहे. याप्रमाणें दोन पक्ष तर पाहिजेतच पण तेही संघटित, राजकीय कार्यक्रमावर आधारलेले, राजकीय ध्येयानें व दृष्टीनेंच काम करणारे पाहिजेत, हेंही तितकेंच खरें. जातिनिवाड्यानें हें अशक्य नसलें तरी, कठीण केलें होतें. राजकीय कार्यक्रमावर जोर दिला कीं, जातिहित नेमकें त्यांत घुसडून देण्याची सोय यांत होती. प्रत्येक योजना जातीजातींचे दृष्टीनें विचारांत

घेतली जावी असा त्यांत बाव होता. त्यामुळें पंजाब, बंगाल, सिंध या प्रांतांत तर संघटित बहुमतवाला राजकीय पक्ष उत्पन्न होणें बरेंच कठीण होतें, व हुकमी बहुमत व पक्षसंघटना यांच्या जोरावर, गव्हर्नरला वांकविणें अशक्य होतें. या परिस्थितींत गव्हर्नरला अनेक छोटे छोटे गट–पक्ष ( Groups ) झाल्यामुळें मनांस येईल त्याप्रमाणें राज्यकारभार हांकणें सहजीं साध्य होण्यासारखें होतें. बंगालमध्यें मुसलमान बहुसंख्याक नाहींत, हिंदुही नाहींत; दोघांची एकी व्हावयाची तर अनेक आर्थिक हितसंबंध फुटून निघणार. युरोपियन पक्ष,–व तो तर गव्हर्नरचे हातांत–जिकडे जाईल त्या पक्षाचें मंत्रिमंडळ निश्चित; तात्पर्य, या निवाड्यानें कांहीं प्रांतांत गव्हर्नरची सत्ता संरक्षणाशिवाय अबाधित राहील अशी योजना करण्यांत आली होती. वरीलप्रमाणें विचारसरणी डोळयांपुढें ठेवून जातिनिवाडयाबाबत माझा दृष्टिकोन मी मांडीत होतों; जातिनिवाडा मान्य करणें वरील कारणाकरितां चुकीचें होतें, कारण अमान्य केला तर मुसलमान व अन्य अल्पसंख्याक यांना आपणांस कांहीतरी मिळालें म्हणून कॉंग्रेस त्याला विरोध करते असें वाटलें म्हणून तसें करणें इष्ट नव्हतें. घटना अंमलांत आल्यानतर ‘ जातिनिवाडा ’ अल्पसंख्याकांना हितकारक वाटणार नाहीं याची खात्री दीर्घदृष्टि लोकांना होती व तो अनुभव पुढें आलाच. नियोजित सर्व घटना फेंटाळून लावण्याचें असल्यामुळें जातिनिवाडाही त्यांत निघून जातो हें उघड होतें. अल्पसंख्याकांवर कोठलीही गोष्ट कॉंग्रेस सक्तीनें लादणार नाहीं, हा प्रश्न तडजोडीनेंच सुटेल, हें कॉंग्रेसचें धोरण सनातन व सर्वस्वीं योग्य असेंच होतें. स्वातंत्र्यापूर्वींच यादवीची अवस्था उत्पन्न करणें, ह्यांत राजकारण नव्हतें. ब्रिटिशसत्तेच्या कच्छपीं अल्पसंख्याक लागतील व नेमकें तेंच न व्हावें म्हणून कॉंग्रेसचे प्रयत्न होते व ते योग्य होते. दोन लाख इंग्रजांचे पदरांत चुकीचे धोरणानें कोटी कोटी मुसलमान घालणें शहाणपणाचें खास नव्हतें. जातिनिवाडयावर उतारा आर्थिक कार्यक्रम व तोही समतावादी तत्त्वावर आधारलेला, हाच होय हेंही प्रतिपादीत होतों. लोकांना बुद्धीनें पटत होतें, पण हिंदु–मुसलमान हा वाद उकरून खोट्या भावनेनें व केवळ निवडणुकींसाठीं उत्पन्न केलेल्या भावनेनें लोक भडकून बोलत होते. अर्थात् हे लोक म्हणजे वरचा सुशिक्षितवर्ग विशेषतः ब्राह्मणवर्ग, अर्थात् तो सर्वच या मनोवृत्तीचा होता असें नाहीं. निवाडा होऊन दोन वर्षें झालीं होतीं. उभे राहिलेले विरोधी उमेदवार यांनीं याबाबत कांहींही केलेलें नव्हतें. ज्या वस्तूचा व्यवहारांत फायदा मिळेल तिचा व्यवहार करणारे लोक जसे असतात

त्याचप्रमाणें राजकारणांतही लोक असतात. कापसापासून चामड्यापर्यंत व्यापार करावयाचा, त्याच फायद्याचे दृष्टीनें जातिनिवाड्यास विरोध केल्यास जास्त मतें मिळतील हें जाणून विरोध करणारेही उमेदवार होते. चळवळ नसेल तेव्हां काँग्रेसवादी कौन्सिलांत प्रवेश, असेल तेव्हां काँग्रेसवादी चळवळींतून मात्र अदृश्य! सत्य पण अप्रिय गोष्टी—हरिजन उद्धारासारख्या—काँग्रेस करील तर निव्वळ लोकमताचे भीतीनें तिजपासून दूर, असेही उमेदवार होते!! प्रसंगीं व्यक्तिगत पण सार्वजनिक महत्त्वाचें वर्तन यांवरही टीका करणें जरूर होई. उमेदवारांचे वैयक्तिक लायकीची तुलना विरोधी पक्षांकडून होई त्यावेळीं व तेवढ्यापुरतें उत्तर देणें जरूर होतें व झणझणीत रीतीनें मी तें देतही होतों. ऑगस्ट, सप्टेंबर, आक्टोबर व नोव्हेंबरचे १० दिवस, म्हणजे सुमारें साडेतीन महिन्यांत मी ४०० चेवर सभांत भाषणें केलीं. याशिवाय खाजगी चर्चा, मुलाखती, प्रश्नोत्तरें, हीं निराळींच. सातपुड्याचे पायथ्यापासून तों थेट कृष्णाकांठापर्यंत शेंकडों गांवांतून, हजारों मैल प्रवास करून, लाखों लोकांना काँग्रेसचें निवडणुकीचें धोरण मी समजावून सांगितलें. पूर्वींच्या चळवळींत मी प्रमुख शहरांबाहेर फारसा गेलों नव्हतों. या दौऱ्यामुळें खऱ्या जनतेशीं निकट संबंध आला. शेतकऱ्यांच्या झोंपड्यांतून जाऊन आलों, महारवाड्यांतून जाऊन आलों, जनतेच्या हृदयाचा ठाव घेतला व तेथें अपूर्व असें काँग्रेस--प्रेम, केलेल्या त्यागाची व कष्टाची जाणीव व कृतज्ञता, प्रयत्न करण्याबद्दल प्रचंड सहानुभूतिच दिसली. हजारों डोळयांचें, हजारों हातांचें, हें जनतेचें विश्वस्वरूप मीं ऐनजिनसी पाहिलें. मी त्यांच्याशीं समरस झालों. बुद्धिवादाचीं, आणि तर्काचीं ताठर चिलखतें फेंकून भावनेच्या सहृदय पावलानें, एकतेच्या जाणीवेनें त्यांच्या मनोमंदिरांत प्रवेश केला. माझा आत्मविश्वास वाढला, वर्तमानपत्रांतील कठोर टीकेला मी महत्त्व दिलें नाहीं. शहरीं सभेंतील तंटेबखेडे, दगडफेंक यांना जुमानिलें नाहीं; जें मी खेडेगांवांत पाहिलें, जें मला गवसलें, ज्यानें माझे मनांत संपूर्ण क्रांति झाली, त्याच अनुभवानें नंदुरबारचे सभेंत झालेल्या वादविवादानंतर पुढील शब्द बोलविले. "हृदयहीन, खोट्या, कोत्या बुद्धिवादानें तुम्ही वरच्या वर्गानें मला कितीही विरोध केलात तरी आज परमेश्वरानें माझ्या वाणींत एवढें सामर्थ्य उत्पन्न केलें आहे कीं, त्याचे जोरावर, महाराष्ट्रांतील सर्वसाधारण जनतेच्या अंतःकरणाचा पारिजातक हलवून हजारों मतरूपीं फुलें मी गोळा करणार हें निश्चित समजा."

वास्तविक स्वातंत्र्याकरितां त्याग करून, कष्ट सोसून, लढयाचे आघाडीस असणारा काँग्रेस हा एकच पक्ष आहे. निर्भेळ स्वातंत्र्य हें काँग्रेसचें ध्येय होतें. म्हणूनच तिला नामशेष करण्याकरितां इंग्रज सत्तेचे साम–दाम–दंड–भेदादिक सर्व प्रयत्न चालू होते. आमजनता इंग्रजी अधिराज्यास अनुकूल आहे, फक्त काँग्रेस ही आडमुठी, अशक्यवादी व जनतेचा पाठिंबा नसलेली संस्था आहे, हें इंग्रजी मुत्सद्द्यांना दाखवावयाचें होतें. जनता कोणामागें आहे हें अगदीं निकाली पद्धतीनें पण सनदशीर पद्धतीनें ठरविण्याचा आधुनिक मार्ग म्हणजे निवडणूक होय; व हें आव्हान काँग्रेसनें चार वर्षांच्या खडतर संग्रामानंतर स्वीकारलें होतें. निवडणुकीचा मूलभूत व मध्यवर्ति प्रश्न, जनतेला हवें असलेलें स्वातंत्र्य व त्याचें स्वरूप ठरविण्याचा हक्क कोणाचा, हा होता. आमच्या भवितव्याचें चित्र आम्ही काढणार, आमचें स्वातंत्र्यमंदिर आम्हांस पाहिजे तसें आम्ही रचणार. परकी इंग्रज व त्यांचे येथील पट्टेवाले व गुलाम, यांना तो अधिकार नाहीं. हिंदुस्थानातर्फें काँग्रेस स्वातंत्र्यासाठीं आहे–नव्हे लढत आहे, चिरडली असतांना पुन्हां उसळून लढत आहे, पडत आहे, धडपडत आहे, पुन्हां उठत आहे, व सतत प्रयत्नाचें तिचें पाऊल पुढेंच आहे. डोकें फुटलें आहे, हात जायबंदी, पायाला मार जबर बसला आहे, पण प्रत्येक आघाताबरोबर प्रतिज्ञा दृढतर व प्रयत्न अधिक तीव्र करणारा, हा काँग्रेसचा पुरुषोत्तम याच्या मागें तुम्ही आहांत कीं नाहीं असा सवाल जनतेला या निवडणुकींत टाकला आहे, असाच अर्थ सर्व व्याख्यानांतून मी सांगत होतों. अन्य गौण प्रश्न हितशत्रूंनीं व स्वार्थी लोकांनीं उत्पन्न केलेले होते. द्रोणाचार्यांच्या मृत्यूचा सूड अश्वत्थाम्यानें घ्यावयाचा नाहीं तर कोणी? तसें न झालें तर बापाचा लौकिक, व त्याचा आत्मा अन्य कोण राखणार व संतुष्ट करणार? जनतेनें काँग्रेसला धिक्कारिलें, निवडणुकींत पाठिंबा दिला नाहीं, तर काँग्रेसनें कोणाच्या जिवावर, कोणत्या श्रद्धेवर काम करावयाचें? निवडणुकींत पराभव म्हणजे काँग्रेसची जनमनावरील मालकीच नाकारणें होय. याशिवाय परदेशांतून जे परिणाम होतील ते निराळेच. याप्रमाणें मी परिस्थिति उकलून सांगत होतों. जेध्यांनाही, होणाऱ्या विरोधाशीं टक्कर द्यावी लागत होती. जातीचें राजकारण केलें त्यांत कांहीं व्यक्तींनीं प्रतिष्ठा व पैसा मिळविला आणि जनतेचें हित कागदोपत्रींच राहिलें! काँग्रेसमध्यें सामील होऊन व्यापक कार्यक्षेत्रच ब्राह्मणेतर कार्यकर्त्यांना मिळणार हा त्यांचा दृष्टिकोण, निर्भीडपणें ते मांडीत होते.

सत्यशोधक समाजाचीं तत्त्वें घेऊन त्यांनीं कॉंग्रेसमध्यें प्रवेश केला होता. आपल्या निःस्वार्थीपणाचा पूर्व पुरावा प्रत्येक लढ्यांत भाग घेऊन त्यांनीं शाबीत केला होता. ब्राह्मणेतरांचें हित म्हणजे नुसतें मराठ्यांचेंच नव्हे तर सर्व जनतेचें, किंवा माझ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे 'नाहीं रे' वर्गाचें हित हें त्यांचें गणित बिनचूक होतें; व हें साधावयाचें असल्यास अधिक नोकऱ्या हा उपाय नसून, संपूर्ण स्वातंत्र्य हाच उपाय होय हेंही त्यांचें म्हणणें पटणारें होतें. श्री. भास्करराव जाधव, श्री. केशवराव बागडे, श्री. शंकरराव मोरे वगैरे अनेक कार्यकर्त्यांनीं त्यांना पाठिंबा जाहीर केला होता. त्याचे उलट कांहीं संस्थानिक, इनामदार, व इतर सर्व जातीची सरदार मंडळी, यांनीं सरदार पाटणकरांना पाठिंबा देण्याचें ठरविलें होतें; व त्याप्रमाणें त्यांचें कार्य चालू होतें. निवडणुकींत जनता कोणाच्या पाठीशीं हा मुख्य मुद्दा डोळ्यांपुढें ठेवूनच आमचें प्रचारकार्य चालू होतें.

ऑक्टोबर १५ला उमेदवारांच्या अर्जांची छाननी होऊन मी, जेधे, शेट बालचंद, गुंजाळ, सरदार पाटणकर, व बटाणे याप्रमाणें उमेदवार निश्चित झालों. कमिशनरचे कचेरींत जेधे यांच्या उमेवारीविरुद्ध घेतलेली हरकत दूर झाल्यानंतर, शेठ वालचंद मला म्हणाले, "आतां आपण असें करूं या कीं, ही निवडणूक नमुनेदार व्हावी; सभा, व्याख्यानें, त्यांतील दंगली ह्या नकोत, सर्व गोष्टी शांततेनें व्हाव्यात." मी उत्तर दिलें, "तुम्ही या घटकेला जर कॉंग्रेसचे अधिकृत उमेदवार होत असाल तरी मी माझी उमेदवारी परत घेतों, व तुमचे दोघांच्या निवडणुकीसाठीं शिकस्त करतों. ४ वर्षांच्या तुरुंगवासानंतर, निवडणुकीला लागणारी आर्थिक सामुग्रीही मजजवळ नाहीं तेव्हां तुम्ही माझें म्हणणें मान्य केल्यास चांगलें होईल." त्यांनीं उत्तर दिलें, "तें शक्य नाहीं." त्याचबरोबर मी त्यांना बजाविलें. "तुमचें भांडवल पैसा, तो काम करणार, हजारों लोक तुमचे नोकर ते काम करणार, आणि मी मात्र माझें शस्त्र व भांडवल म्हणजे वक्तृत्व व प्रचार, हें बंद करावें हें सांगणें बरोबर नाहीं. तुमच्या उमेदवारीनें व तुमच्या चाललेल्या प्रचारानें वर्गकलह (Class war) हा अपरिहार्य आहे, मला तो अप्रिय नाहीं, पण कॉंग्रेस तो टाळूं इच्छिते" नंतर इंग्रजींत बोललों. "Remember, I shall hit you and hit you hard, but not below the belt मी तुमचेवर प्रहार करीन, जबर प्रहार करीन पण अधर्मयुद्ध करणार नाहीं" जेधे यांनाही त्यांनीं माझ्यासारखीच बिनंति केली; त्यांनींही अर्थात् ती अमान्य केली. शिक्षेमुळें नालायकी होती ती सरकारनें दूर केल्यामुळें एक निराशा झाली, केशबराव जेधे

यांच्या उमेदवारीविरुद्ध घेतलेला आक्षेप अमान्य केला त्यामुळें दुसरी निराशा झाली, व वरील विनंति अमान्य केल्यामुळें तिसरी निराशा होऊन, सर्व विरोधी उमेदवार निवडणूक गाजणार हें समजून चुकले.

ता. १५ ऑक्टोबरपासून ता. १४ नोव्हेंबरपर्यंतचा काल म्हणजे कसोटीचा होता. मनुष्यबळ कॉंग्रेसजवळ अपरंपार होतें. गांधीजी महाराष्ट्राबद्दल नेहमीं म्हणतात कीं, "महाराष्ट्र हें कार्यकर्त्यांचें पोळें आहे." (Maharashtra is beehive of workers) व तें अगदीं खरें आहे. असंख्य कार्यकर्ते शहरांतून व खेडयापाडयांतून मतदारांना भेटून प्रचारकार्य करीत होते. मतदारसंघ, अगदीं दाणादाणा खळयांतील वेंचून काढावा त्याप्रमाणें मतदारांसाठीं शोधला जात होता. इंग्रजींत Combing the Constituency म्हणतात त्याप्रमाणें अगदीं मतदारसंघ विंचरून काढला जात होता. सर्व उमेदवारांचा वर्तमानपत्रांतील प्रचार तुफानी वेगानें चालला होता. संपूर्णपणें कॉंग्रेसकार्य व प्रचार करणें हें कार्य एकमेव 'नवाकाळ' हें प्रमुख वर्तमानपत्र करीत होतें. अन्य वर्तमानपत्रांतून संकीर्ण प्रचार होत होता. श्रीमंत उमेदवारांचे जाहीरनामे जाहिरातींचे दरानें छापिले जात होते. नवाकाळानें मात्र कॉंग्रेस विरोधी उमेदवारांचे जाहिरनामे छापण्याचें नाकारिलें, व आपली जाज्वल्य निष्ठा नेहमींप्रमाणें शाबित केली. केसरी व तदृणानुबंधी वर्तमानपत्रांनीं जहरी प्रचार, आम्हां दोघांविरुद्ध व विशेषत: मजविरुद्ध चालविला होता. विपर्यास, विसंगति, विद्वेष या त्रिदुर्गुण संपन्नतेंत 'त्रिकाळानें' विक्रम केला. चुकीच्या बातम्या, न बोललेले शब्द देऊन, सत्यनिष्ठा नसली तरी, पक्षनिष्ठा अव्वल दर्जाची दाखविली. व्यक्तिशः मला 'सकाळ,' 'विविधवृत्त' व मधून मधून 'ज्ञानप्रकाश' यांचा पाठिंबा होता. जिल्ह्यागणिक 'समर्थ' वगैरे जीं कॉंग्रेसवादी पत्रें होतीं, तीं मनापासून कॉंग्रेस उमेदवारांचा प्रचार करीत होतीं. पोष्टामार्फत आमचा प्रचार बिलकूल नव्हता. आमचीं हस्तपत्रकें गांवोगांव आमचे कार्यकर्ते व कॉंग्रेस कमिट्या पोंहोंचवीत. पैशाचें बळ अर्थात् मर्यादित होतें. वाहनांचा प्रश्न कार्यकर्त्यांच्यापुढें दत्त म्हणून उभा होता. श्री. जेधे हे पैशाचे दृष्टीनें समर्थ होते; माझी तशी स्थिति नव्हती. पार्लमेंटरी बोर्डानें आम्ही दोघे व तिसरा मुसलमान उमेदवार डॉ. काझी या सर्वांसाठीं म्हणून जी रक्कम दिली तिचा मोठा भाग डॉ. काझी यांचेसाठींच आम्ही दिला व तीन जागांसाठीं जी मदत केली तिच्यापेक्षां जास्त कर्नाटकचे एका जागेसाठीं बोर्डानें केली. सर्वांत कमी रकमेनें, व जागेच्या प्रमाणानें त्याहूनही कमी मदत, आम्हांस झाली. विरोधी उमेदवार

सर्व लक्षाधीश होते, व त्यांचे बाजूस परंपरागत पुढारी, व प्रतिष्ठित समाज होता. तथापि हातीं घेतलेलें कार्य तडीस न्यावयाचें हा सर्वांचा दृढनिश्चय होता. ऋणानुबंधी आप्तांनीं व मित्रांनीं बाजू राखिली. यथाकाल त्यांची मदत परत केली असली तरी, त्यांनीं दाखविलेल्या प्रेमाची परतफेड करणें अथवा विसरणें शक्य नाहीं. तथापि एक घटना जरूर उल्लेखली पाहिजे. श्री. ग. स. मराठे हे उमेदवार म्हणून जाहीर झाले होते, पण अनेकांचे सांगण्यावरून त्यांनीं आपला बेत रहित केला, व मला पत्र लिहून, त्याबरोबर मोठ्या रकमेचा चेक धाडून सदरहू रक्कम निवडणुकीसाठीं मीं खर्चावी, व सवडीप्रमाणें परत करावी असें कळविलें. मी तो चेक साभार परत केला, पण त्यांच्या या दिलदार वृत्तीचा विसर पडणें शक्य नाहीं. शक्य तितक्या काटकसरीनें व जास्तींतजास्त प्रयत्न करून किमान पैसा व कमाल प्रयत्न, या धोरणानें निवडणुकीचें कार्य चालू होतें. १६ आक्टोबर ते २५ आक्टोबर या १० दिवसांत आम्ही दोघांनीं दोन्ही खानदेश अगदीं खणून काढले. पश्चिम खानदेशांतील श्री. बाळूभाईंचे दिग्दर्शनाखालील दौरा अपूर्व व अगदीं वेळापत्रकाप्रमाणें झाला. प्रचंड सभा, क्षणाक्षणाला वाढणारें वक्तृत्व, उसळणारा कार्यकर्त्यांचा उत्साह, यांनीं मर्यादा गांठली. पश्चिम खानदेशांतील दौरा संपून, पूर्व खानदेशचे हद्दींत चोपडा भागांत प्रवेश करतांना अणेर नदी लागते. सदरहू नदीचे मध्यभागीं श्री. बाळूभाईंनीं चोपड्याचे श्री. मगनशेट यांचे ताब्यांत मला दिलें व मला सांगितलें, "काका, पश्चिमखानदेश सर्वस्वीं तुम्हीं जिंकला, आतां पूर्व खानदेश त्याचप्रमाणें होऊं दे." पूर्व खानदेशमध्यें जेधे व बागडे यांचें प्रचारकार्य, सभा, भेटी, चर्चा, याप्रमाणें चालूच होतें. ता. २५ पर्यंत आम्ही दोघांनीं पूर्व खानदेश संपवून, काँग्रेसचे अधिवेशनासाठीं मुंबईस आलों. सदरहू अधिवेशनानिमित्त, प्रांतांतील सर्व कार्यकर्ते जमले होते. आपापल्या भागांतील अनुभव सर्वांनीं सांगितला. पूर्वींच्या निवडणुकीचे वेळीं फक्त तालुक्यांच्या गांवीं निवडणुकीचीं स्थानें होतीं; या खपेस प्रत्येक तालुक्यांत ५–६ ठिकाणें (पोलिंग स्टेशनें) सरकारनें ठरविलीं, त्यामुळें आमची एक सोय झाली. आमचे बहुतेक मतदार खेड्यांतील, ते या वाढलेल्या पोलिंग स्टेशनामुळें अधिक येतील, पण त्यांना आणण्याकरितां अधिक वाहनें पाहिजेत हेंहि तितकेंच खरें. भाड्यानें वाहनें ठेवणें बेकायदेशीर व पैसा नाहीं, खाजगी वाहनेंवाले अर्थात् श्रीमंत व बहुतेक विरोधी उमेदवारांच्या बाजूचे. प्रत्येक ठिकाणीं सहानुभूति संपूर्ण

पण वाहनादिक सामुग्री अगदीं अपुरी, या स्थितींत अनिश्चितता व भीतिही वाटते असाच रिपोर्ट सर्वांनीं दिला.

काँग्रेसचें अधिवेशन चालू असतां, एका विरोधी उमेदवारानें श्री. वल्लभभाई वगैरे पुढाऱ्यांना खाजगी बैठकींत असें सांगितलें कीं, " महाराष्ट्रांतील सर्व पुढारी वर्तमानपत्रें काँग्रेसविरोधी. या स्थितींत दोन्ही जागा लढवून अपयश घेण्यापेक्षां गाडगीळांना जर बसविलें तर एक जागा व ती जेधेच असले तर मिळेल, एरव्हीं नाहीं." याप्रसंगीं कै. महादेवभाई हजर होते, व त्यांनीं ही हकीगत गांधीजींना सांगितली. कर्मधर्मसंयोगानें त्याच दिवशीं प्रदर्शनाचे मंडपांत गांधीजी आले असतां मी भेटलों व त्यांनीं पहिला प्रश्न विचारला " निवडणुकीचें काम कसें चालू आहे, तुमची परिस्थिति कशी आहे ! (How do you stand)" मीं उत्तर दिलें कीं, " खेडेगांवांतील शेतकरी मतदार सर्वस्वीं आम्हाला मतें देतील, व्यापारीवर्ग द्विधाचित्त आहे, पण बहुसंख्येनें आम्हास मतें देईल, बरचा वर्ग मात्र विरोधी आहे व जहरीप्रचार करीत आहे. तथापि ऐनवेळीं कांहींतरी अकल्पित घडून (Land slide) त्याही वर्गांतून, कांहीं मतें मिळतील असें वाटतें." " मग काय करावें असें वाटतें (What should be done)" असें त्यांनीं विचारलें, व मी मनापासून पण हसत म्हटलें " मजबद्दल प्रार्थना करा" (Please pray for me) यावर गांधीजींनीं त्यांचें सार्थ व अनुपम असें हास्य केलें. मी निवडणूक जिंकली, जेधे यांनीं निवडणूक जिंकली, असा संपूर्ण शकुन घेऊन मी त्यांची रजा घेतली. अधिवेशनाचे शेवटले दिवशीं महाराष्ट्र कँपांत सर्व कार्यकर्ते जमले, व सर्वांनीं वाटेल त्या अडचणी असल्या तरी त्या न जुमानतां राहिलेले १५ दिवस आपण तुरुंगांतच आहोंत असें समजून घरीं न राहतां, अहोरात्र काम करावयाचें, प्रयत्नांची शिकस्त करावयाची व महाराष्ट्रांत काँग्रेस ही जिवंत आहे, प्रभावी आहे, हें दाखवावयाचें असा निश्चय केला. आम्ही व देवांनीं सर्वांचे आभार मानले. शेवटच्या विद्युद्वेगी कार्यक्रमाला सर्वत्र सुरुवात झाली. सर्व काँग्रेस कमिट्या, कार्यकर्ते, १५ दिवसपर्यंत अविरत खटपट करीत होते. सभा व गांठीभेटी, दंगली, यांचा कहर झाला. शंकरराव देव, देवगिरीकर, बाळूभाई, टिळक, डॉ. घोगरे, साने गुरुजी, धनाजी नाना, दास्ताने, देवकीनंदन, कान्नेजी, गुलाबसिंग, नवल पाटील, गोविंदराव देशपांडे, बाघ, दादासाहेब गद्रे, अच्युतराव पटवर्धन, स्वामी सहजानंद, रामराव बोर्डे, ताकटे,

गरूड, भाऊसाहेब फिरोदिया, डॉ. अंत्रोळीकर, जाजूजी, बाबूराव जोशी, जाधव, कवडी, कथले, पवार, कुदळे, भाऊसाहेब सोमण, गोसावी, भावे, आत्माराम पाटील, एस. एम्. जोशी, खाडिलकर, गोरे, गुप्ते बंधू, मोरे, बागडे, पोपटलाल, हरिभाऊ बाधिरे, अतीतकर, हरीभाऊ फाटक, मगनभाई पटेल, पाषाणकर-बंधू, वगैरे असंख्य लहानथोर, कार्यकर्ते, श्रमाची तमा न बाळगतां ठिक-ठिकाणीं झटत होते. त्यांच्यावर वार होत होते. पण जणूं आपलीच निवडणूक आहे असें समजून सर्व कार्य करीत होते. कॉंग्रेसचा लौकिक, कार्यकर्त्यांची प्रतिष्ठा, पुण्याई व प्रयत्न यांना यश मिळणार हें क्षणाक्षणाला निश्चित होत गेलें. मीं २८ आक्टोबरला पुणें सोडलें. खेड, जुन्नर तालुके घेऊन नाशिक जिल्हा, नगर जिल्हा, सोलापूर जिल्हा व नंतर सातारा जिल्हा याप्रमाणें हिंडून ता. ११ नोव्हेंबरला साताऱ्याला आलों. खोट्या प्रचाराबद्दल बारंबार खुलासे प्रसिद्ध करीत असतां, ते न छापतां, केसरीतून दुष्ट प्रचार होत होता म्हणून पंढरपुराहून श्री. तात्यासाहेब केळकर यांना पत्र लिहून कळविलें कीं, "होत आहे तें योग्य नाहीं. निवडणूक आठवड्यांत संपेल, मी निवडून येणार हेंही निश्चित. पण निवडणुकीचे शेवटीं वैराचा वारसा रहावा हें अनिष्ट आहे, व तुम्ही तें होऊं देऊं नये" अशी विनंति केली. तथापि आधींच झालेल्या प्रचाराचा परिणाम साताऱ्यास फार झाल्याचें कळलें. पोट निवडणुकीनें सातारा हा अगदीं कॉंग्रेसचा खास महाल आहे असें आम्हांस वाटत होतें. सांगली, अष्टें, रहिमतपूर, कोरेगांव, कऱ्हाड, वगैरे भागांतून आलेला अनुभव तसेंच सांगत होता. पण साताऱ्यांतील कार्यकर्त्यांनीं थोडें निराशाजनक चित्र उभें केलें. श्री. भाऊसाहेब सोमण यानीं 'आजच्या सभेवर सर्व अवलंबून आहे' असें सांगितलें.

सभा संध्याकाळीं राजवाड्यासमोरील पटांगणांत होती. श्रोतृवृंद हजारोंनीं जमला होता. मित्र व विरोधक दोन्ही होते. व्याख्यानानंतर प्रश्नोत्तरें होतील असें अध्यक्ष श्री. सोमण यांनीं जाहीरही केलें. मी सुमारें १ तास अगदीं शांतपणें सर्व आक्षेप सांगून त्यांचें खंडण यथामति केलें. याप्रमाणें सर्व सभांतून मी करीत होतों. तथापि ही जवळजवळ शेवटचीच सभा होती. दिवस रविवारचा होता व निवडणूक बुधवारीं होती. सभेचें महत्त्व काय आहे हें मला कळलें होतें. काय रामबाण असेल तो योजणें जरूर होतें; म्हणून विवेचन संपतांच मी म्हणालों, "यथामति जेवढें सांगतां येण्यासारखें होतें तें मी सांगितलें आहे. येवढ्यानें कॉंग्रेसची भूमिका तुम्हां

कोणाला पटली नसेल तर ती भूमिका चूक नाहीं, माझ्यांत ती पूर्णपणें पटवून देण्याइतकें बुद्धिसामर्थ्य नाहीं असें समजा. प्रश्न विचारूं नका, मी उत्तरेंही देणार नाहीं पण मी तुम्हांस अशा वातावरणांत नेत आहें कीं, जेथें शब्दांना वाव नाहीं, वाचेला प्रतिबंध आहे. 'यत्र वाचा निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह' तर्क व बुद्धि यांना प्रवेश नाहीं. सदरहू वातावरणांत निर्मळ अंतःकरणानें, ध्येयाच्या भावनेनेंच प्रवेश करतां येतो. तुम्हांस गुलामगिरी नको, स्वातंत्र्य हवें, हें इंग्रजांना व जगाला कसें दाखविणार ? हा हात—(हात वर करून) दिल्लीस १९३२ सालीं, या हातांत, स्वातंत्र्याचा प्रयत्न करीत होतों म्हणून इंग्रजसत्तेनें बेड्या घातल्या व असेंब्लि-गृहासमोरून मला नेलें. साम्राज्य व सत्ता यांच्या मदानें धुंद होऊन, या स्वातं-त्र्याचे प्रयत्नांची विटंबना केली. यांत जेवढा वैयक्तिक अपमान आहे त्याचा बदला मी स्वतः घेईन. मीं जन्मानें राजपुतान्यांत जन्मलेला म्हणून रजपूत आहें. पण यांत जर सबंध महाराष्ट्राचा, देशाचा अपमान झाला असें तुम्हांस वाटत असेल तर, हाच हात, त्याच असेंब्लिगृहांत लॉर्ड विलिंग्डनचे समोर, 'तूं देत असलेली घटना आम्ही हिंदी लोक ठोकरतों, संपूर्ण स्वातंत्र्य हवें आहे असें सांगून त्याचेविरुद्ध उभारलेला पहाण्यांत तुमचा लौकिक आहे, तुमची प्रतिष्ठा आहे. यांतच साम्राज्यशाहीला स्वातंत्र्यवादी लोकांचें ठणठणीत उत्तर आहे. यापेक्षां जास्त सांगणें नाहीं. तुमचें हृदय जें सांगेल तें करा," असें सांगून मी बसलों. अध्यक्षांनीं सभा बरखास्त केली, सभेंत विलक्षण वातावरण पसरलें. विरोधकांची बैठकच हादरली ! अनेकांनीं माझें अभिनंदन केलें व आमच्या कार्यकर्त्यांनीं 'जिंकलें' म्हणून सांगितलें.

त्याच रात्रीं वांईस व्याख्यान दिलें व सोमवारीं पुणें येथें आलों. साताऱ्याच्या व्याख्यानांतील शेवटचा भाग मंगळवारचे ज्ञानप्रकाशांत यावा अशी अनेकांनीं इच्छा प्रदर्शित केली. खुद्द साताऱ्याला 'समर्थानें' खास अंक काढून वरील भाग प्रामुख्यानें छापला, त्याचा परिणाम भलताच अनुकूल झाला. मंगळवारचे ज्ञान-प्रकाशांतही वरील भाग आला, व मंगळवार संध्याकाळपर्यंत सर्व महाराष्ट्रभर कार्य कर्त्यांच्या हातीं सदरहू मजकूर पडला. अनेक ठिकाणीं रातोरात सदरहू मजकूर घालून जाहीरपत्रकें कार्यकर्त्यांनीं काढलीं, व गांवोगांवीं मतदारांचे हातीं मत दानापूर्वीं तीं पडतील अशी व्यवस्था केली. सर्वत्र वातावरण विलक्षण रीतीनें बद ललें, व अनेक ठिकाणीं 'तो हात' असेंब्लींत दिसला पाहिजे अशी घोषणा होऊन,

जनदृष्टीनें अकल्पित पण मी अपेक्षित केलेली घटना घडून बरच्या वर्गांतील अनेक मतदारांनीं आम्हां दोघांनांही मतें दिलीं. सोमवारीं श्री. राजाजींनी शनिवार वाड्यापुढें व्याख्यान देऊन आपल्या बिनचूक व मार्मिक बुद्धिवादानें बरेंच कार्य केलें. केसरीनें कांहीं लागणारे शब्द व्यापारी वर्गाबद्दल लिहिले, त्याचेविरुद्ध पुण्यांतील कॉंग्रेसप्रेमी व्यापाऱ्यांनीं शेंकडों सह्यांनिशीं जाहीरनामा काढून कॉंग्रेस-लाच पाठिंबा देण्याविषयीं व्यापारीवर्गाला, विनंति केली होती.

खुद्द केसरीच्या ता. १३ मंगळवारच्या अंकांत विद्वेषी विरोध कमी झालेला दिसत होता. कदाचित् हा पंढरपुराहून लिहिलेल्या पत्राचाही परिणाम असूं शकेल. तात्पर्य निवडणुकीच्या आदले दिवशीं सर्व वातावरण आशादायी व कार्यकर्त्यांत जबर विश्वास उत्पन्न करणारें असेंच सर्वत्र झालें होतें. कांहीं ठिकाणीं दोघांच्याही अतिस्नेही चाहत्यांनीं गैरसमज उत्पन्न करणाऱ्याही गोष्टी केल्या होत्या. परंतु त्या फारच अल्पप्रमाणांत. प्रत्यक्ष निवडणूक सुरू होऊन मतदान सुरू होतांच कार्यांत एकता उत्पन्न होऊन दोन्ही उमेदवार निवडून येतील या दृष्टीनें कॉंग्रेस कार्यकर्ते सूत्रें हालवीत होते. दुजागीं अगर अधिक जागीं (Plural) मतदार संघाची निवडणूक व जेथें मतदाराला असलेलीं सर्व मतें एकालाच देतां येतात (Cumulative-vote) अशा एकहा मतदानपद्धतींत एकाच पक्षाच्या उमेदवारांमध्यें अविश्वास व गैरसमज होण्याला जास्त मार्ग असतो. त्याचबरोबर, खरोखर बहुसंख्याक जनतेला नको असलेला उमेदवार पैसा, वशिला व जातिनिष्ठेच्या जोरावर थोड्या मतदारांचे पाठिंब्यावर निवडून येऊं शकतो. आश्चर्य हें कीं, हीच मतदानपद्धति व असेच अधिक जागीं मतदारसंघ हवेत म्हणून लोकशाही स्वराज्यपक्षातर्फे श्री. केळकरांनीं मागणी केली, बहुसंख्याकांचे प्रतिनिधी ब्राह्मणेतरांनीही मागणी केली, व प्रगतीचे भोक्ते म्हणविणाऱ्या प्रागतिक पक्षानेंही मागणी (Delimitation committee) मतदार संघ वांटणी कमिटीपुढें केली !! असो, या पद्धतीचा फायदा जर मतदारसंघ संघटित, कार्यकर्ते निःपक्षपाती, उमेदवार निःस्वार्थी व दिलदार वृत्तीचे असले तर १०० टक्के होतो हेंही खरें. जातिभेदामुळें काम करणारा, परस्परांतील अविश्वास, प्रथमच सर्व जातींचे कार्यकर्ते कार्याकरितां एकत्र आलेले, त्यामुळें परस्परांच्या स्वभावांतील व कार्यपद्धतींतील वैशिष्ट्याचा समन्वय न झालेला, या स्थितींत आप-सांत लाथाळी होऊन एक तरी कॉंग्रेसचा उमेदवार पडेल अशी विरोधकांना शेवट-पर्यंत आशा होती. पण प्रत्यक्ष मतदानाचे दिवशीं, ज्या समजूतदारपणानें व्यापक-

हितावर दृष्टी ठेवून, आमचे कार्यकर्ते वागले तें पाहिल्यानंतर विरोधकांना धक्काच बसला!! सर्व जिल्ह्यांतील मिळून ४०० चे वर मतें देण्याचे ठिकाणीं सर्वत्र कॉंग्रेसचे झेंडे उभारलेले होते. कार्यकर्त्यांचा उत्साह शतगुणित होऊन काम करीत होता. पारिजातकाचे फुलांप्रमाणें कॉंग्रेसचे अंगणांत मतें पडत होतीं. शेतकरी मतदार, गांवागांवाहून, बैलगाड्यांतून, घोड्यावरून, चालत, विरोधी उमेदवारांच्याही वाहनांत बसून, जमावानें येऊन, मतें देत होते. त्यांच्या मतांबद्दल शंकाच नव्हती. त्यांच्या नाण्यांत बट्टा नव्हता, रुपया वाजवून घ्यावा अशीं 'कलदार' माणसें तीं होतीं. व्यापारी वर्गाचीं माणसें द्विधाचित्त होतीं. शेठ वालचंद हे नामवंत व हुशार व्यापारी, त्यांचा लौकिक मोठा, पसाराही मोठा, या गोष्टींचा परिणाम होणें अपरिहार्य होतें. हे मतदार गोड बोलत होते. कोणा-लाही दुखवीत नव्हते व या वर्गानें मोठ्या प्रमाणांत कॉंग्रेस उमेदवारांनाच मतें दिलीं. सुशिक्षित मतदार कांहीं हसत, कांहीं टाकून बोलत, कांहीं स्पष्टपणें मत कोणास देणार हें सांगून सुखवीत अगर दुखवीत मतदान करीत होते. पण मोठ्या प्रमाणांत या वर्गानें कॉंग्रेस विरोधकांना मतें दिलीं. ता. १४ नोव्हेंबर बुधवार या दिवशीं निवडणूक संपली व रात्रीं १२ वाजेपर्यंत सर्व जिल्ह्यांतून तारेनें प्राथमिक रिपोर्ट आले व त्यावरून आम्हीं दोघेही निवडून येणार हें निश्चित झालें.

निवडणुकीचा निकाल ता. २२ नोव्हेंबर गुरुवार रोजीं होणार होता. निर-निराळ्या उमेदवारांचे अंदाज अनेक वृत्तपत्रांतून येत होते. ज्ञानप्रकाशनें शेठ वालचंद व जेधे व पाटणकर यांच्यांतून दोन येणार म्हणून अंदाज प्रसिद्ध केला. केसरीनें १६ नोव्हेंबर शुक्रवारचे अंकांत सर्वत्र मतें शेठ वालचंद, गुंजाळ व जेधे यांनाच पडलीं, दुसऱ्या कॉंग्रेस उमेदवाराला किती पडलीं हें एक 'देव' जाणे म्हणून कोटी करून जनतेबद्दलचें आपलें अज्ञान प्रकट केलें. २।३ दिवसांत सर्व ठिकाणचे, अगदीं माहितीपूर्ण तक्ते आमचे निवडणूक कचेरींत आले, व त्यांचा निष्कर्ष मोठ्या बहुमतानें दोघेही निवडून येणार हाच निघाला. हळू हळू लोकांनीं कोठें कशीं मतें दिलीं हें समजलें. दोन्ही खानदेश-मध्यें शें. ९० मतें कॉंग्रेस उमेदवारांना पडलीं ही गोष्ट बोलली जाऊं लागली. ता. २२।११।३४ ला कमिशनरच्या ऑफिसमध्यें सकाळीं ११ वाजतां मतमोजणीला सुरुवात झाली, व १॥ पर्यंत खानदेश व नाशिक या जिल्ह्यांतील मतमोजणी झाली, त्यांच्यांत आम्ही दोघे, अन्य उमेदवारांपेक्षां ३५०० मतांनीं अधिक होतों. ६॥

वाजतां पूर्ण मोजणी होऊन जेध्यांना १६३०० मतें पडलीं, मला १५७०० मतें पडलीं. तिसरे उमेदवार शेठ वालचंद यांना १०३०० मतें पडलीं व बाकीचे गुंजाळ, पाटणकर यांना पांच हजारांपेक्षां जास्त पडलीं नाहींत. आम्ही निवडून आलों म्हणून कमिशनरनें जाहीर केलें. सामान्य शिष्टाचार म्हणून त्यानें अभिनंदनसुद्धां केलें नाहीं. गुंजाळांनींही कोणाचें केलें नाहीं. श्री. वालचंद यांनीं फक्त श्री. जेधे यांचें केलें व तेंही साहजिक होतें. मतें मोजतांना १०००० मतपत्रिकेंत दोघांनाही एक एक मत अशी विभागणी झालेली होती!! मोजणारे 'जेधे गाडगळि' म्हणत होते, बाहेरील जनता 'ग्यानबा, तुकाराम' म्हणत होती. यावरून जातिनिष्ठा बाजूला सारून मागील गोष्टी विसरून, मोठ्या संख्येनें, कॉंग्रेसच्या शिस्तीस अनुसरून मतें दिलीं हें स्पष्ट होतें. कमिशनरचे कचेरींतच अन्य ठिकाणचे निकाल कळले. जमलेल्या हजारों लोकांचा आनंद व उत्साह वर्णन करणें शक्य नाहीं. बळजबरीनें आम्हां दोघांना मोटारींत घालून, शहरांतून मिरवीत रात्रीं १ वाजतां जेधे मॅन्शनमध्यें आणलें; तेथील उत्साह, आपुलकी व आनंद कल्पनातीत होता. आमचें स्वागत तेथें झालें. रात्रीं २ वाजतां मी घरीं आलों. घरांत गर्दी, अर्थात् तेथेंही जवळच्या इष्टमित्रांनीं स्वागत केलें. श्री. शिवरामपंत करंदीकर अभिनंदनासाठीं बसून होते. विरुद्ध प्रचार करून, निवडणुकीचा निकाल झाल्यावर अभिनंदानार्थ त्यांना आलेले पाहून माझ्याशिवाय सर्वांना आश्चर्य वाटलें. व्यक्ति म्हणूनच माझें त्यांनीं अभिनंदन केलें, इतकेंच नव्हे तर तीन महिने दिलेल्या त्रासाबद्दलचा गोड विसर पडावा म्हणून १० रु.चे पेढे आणून जिव्हा व लेखणी विषारी असली तरी अंतःकरण गोड आहे असें दर्शविलें !! दुसरे दिवशीं उजाडतांच, केसरीचे अंकांत गृह्यसंस्कारापेक्षांही लहान प्रमाणांत 'श्री. जेधे, व श्री. गाडगीळ निवडून आले' एवढीच बातमी होती! तिजपुढें उद्गार चिन्ह मात्र घालण्याचें विसरलें !! तथापि संस्थेनें कांहीं केलें तरी सकाळींच श्री. केळकर यांचें मनापासूनचें अभिनंदनपर पत्र आलें व त्यांत खालील मजकूर होता. ' I hasten to congratulate you. I wished you to be returned unopposed but that was not to be for reasons now obvious. I heartily congratulate you; this however need not prevent you from saying anything in to-day's public meeting, where you are free to criticise me as you desire or as I deserve!" "मी तावडतोब तुमचें अभिनंदन करीत आहें. तुम्ही बिनविरोध निवडून यावेत अशी इच्छा होती, पण जीं कारणें आतां उघड आहेत,

त्यामुळें हें होऊं शकलें नाहीं. मी तुमचें मनःपूर्वक अभिनंदन करतों; याचा अर्थ असा नव्हे कीं, आजचे सार्वजनिक सभेंत तुम्हीं मजसंबंधीं कांहीं बोलूं नये. सदरहू सभेंत तुम्हांस तुमचे इच्छेप्रमाणें अगर मला यथायोग्य होईल अशी टीका मजवर करण्यास पूर्ण मोकळीक आहे." सार्वजनिक विरोधांत सौजन्य, व सहिष्णुतेचा हा उत्कृष्ट नमुना अनुकरणीय नाहीं असें कोण म्हणेल !

ता. २३।११।३४ चा दिवस व्यक्तिशः मला अभिमानाचा वाटला, असें मीं म्हणालों तर तो खास माझा अपराध नव्हे. निवडणुकींतील विषारी प्रचार, दगडफेक, अपमान, तिरस्कार, या सर्वांवर माझा विजय झाला होता. तीच गोष्ट जेध्यांची होती. जेधे फितले, भटाळले, मानाला भुलले, एक नाहीं हजार आरोप त्यांचेवर केले जात होते. ब्राह्मणेतरांचे हितास नख लाविलें, येथपर्यंत म्हणण्याची पाळी गेली होती. अभिनंदनार्थ होणाऱ्या सभांतून व सत्कार समारंभांतून उट्टें काढण्याचा मोह होणें साहजिक होतें; तथापि हें मीं केलें नाहीं व जेध्यांनाही माझी विचारसरणी पटून तेही तसेच वागले. यशांत मर्यादा राखावी व पराभवांत सौजन्य सोडूं नये हेंच खरें. श्री. भुलाभाई नेहमीं म्हणतः "Let us win without arrogance and lose without bitterness." सायंकाळचे विराट सभेंत मी म्हणालों "निवडणुकीला कॉंग्रेस उभी होती, कॉंग्रेसचा जय झाला; अभिनंदन व सत्कार कॉंग्रेसचा करा. या प्रांताचे कॉंग्रेस प्रमुख देव यांनींच अभिनंदन स्वीकारावें व आभार मानावे, आम्हीं निमित्तमात्र होतों. जेधे हेही याच धर्तीवर बोलले. देव गहिंवरून बोलले व शेवटीं म्हणाले "उपनिषदांत सांगितल्याप्रमाणें आत्मा हा वादानें, धनानें, मिळत नाहीं. हीच गोष्ट या नव्या परिस्थितींत जनतेनें निक्षून सांगितली कीं, जनतेचें मन, अंतःकरण, धनानें, वैभवानें, मिळत नाहीं, तें प्रेमानें व सेवेनेंच मिळतें."

अनेकांनीं तारा व पत्रें धाडून, प्रत्यक्ष भेटून अभिनंदन केलें; मित्रांनीं केलें, विरोधकांनींही केलें. तथापि एकंदरीनें विचार करतां आमजनतेकडूनच खरेंखुरें अभिनंदन झालें. पुण्यांतीलच आठवण द्यावयाची तर, ५० वर अभिनंदन समारंभ पूर्वभागांत झाले; व फक्त दोन पश्चिम भागांत, व त्यांतील एक आमचेच आळींत म्हणजे घरचाच, व दुसरा नारायण पेठेंतील थोड्या व्यक्तींनीं केलेला, आणि तोही श्वशुरांचे आळींतीलच !! ही गोष्ट मुद्दाम देण्याचें कारण, कॉंग्रेसप्रेम वर्गशः कसें होतें हेंच दाखविण्याचें आहे. या निवडणुकीनें समाजांतील दोन वर्ग स्पष्टपणें आप-

आपल्या भूमिकेनें हितविरोधी आहेत, हें दिसूं लागलें. व्यापारीवर्ग, अपरिहार्य अशा व्यापारी दृष्टीनें पूर्वीपासून राजकारणाकडे पहातच होता. सुशिक्षित समाज स्पष्टपणें मोठ्याप्रमाणांत कॉंग्रेसविरोधी आहे हें यापुढें दृष्टीआड करून चालणार नाहीं, हें उघड झालें. गरीब जनता 'नाहीं रे' वर्ग कॉंग्रेसकडेच आपल्या उद्धारार्थ डोळे लावून व आशेनें पहात आहे हेंही कळून आलें. महाराष्ट्रांतील परंपरागत राजकारण पूर्वीच चैतन्यहीन झालें होतें, पण ही गोष्ट या निवडणुकीनें जाहीर झाली. वडिलांचा लौकिक सांगून, यापुढें राजकारण चालणार नाहीं अशी स्पष्ट सूचना या निकालानें मिळाली. निदान महाराष्ट्रांत प्रचलित राजकीय मूल्यें तपासून घेणें जरूर आहे. जुन्या सोन्याचाच कां होई ना नवा भाव काय आहे हें बाजारांत पाहून घ्यावें, जमल्यास त्याला उजळा द्यावा, असेंही अनेकांना वाटूं लागलें. महाराष्ट्रांतील राजकारणाचीं प्रभावी सूत्रें युवकांचे चळवळीपासून ज्यांच्या हातीं होतीं, त्यांची विचारसरणी व त्यांचें नेतृत्व, कॉंग्रेसचे कोंदणांत जडलें असल्यामुळें जनतेनें तें मान्य केलें, असेंच शाबीत झालें. महाराष्ट्रांत कॉंग्रेसला किंमत नाहीं, तेथें परंपरागत प्रतिष्ठित व स्वागतिक—म्हणजे मिळेल तें घ्यावें, मग त्याचें स्वरूप कांहीही असो या—राजकारणाचें वर्चस्व आहे, असें येथील कांहीं वर्तमानपत्रें म्हणत असत; इंग्रज अधिकारी व इंग्रजांचीं वर्तमानपत्रेंही तोच सूर काढीत असत. राजकारणांत 'प्रागतिक' एकवेळ पुरवला पण 'स्वागतिक' नको, कारण मिळेल तें घेण्यानें, जें पाहिजे तें मिळणें कठीण होतें. शुभ्रपत्रिका व त्यावर आधारलेली नवीन घटना हें, जे गोलमेज परिषदेच्या अधिवेशनांना हजर होते, व ज्यांनीं इंग्रजांशीं सहकार्य केलें, त्याचें फळ होतें. शुभ्रपत्रिका १९३३ चे मार्च महिन्यांत प्रसिद्ध होण्यापूर्वी, याच लोकांनीं मुंबई ब्राह्मण सभेच्या हॉलमध्यें झालेल्या सभेंत, अलाहाबाद व अन्य ठिकाणीं झालेल्या सभांतून येणाऱ्या घटनेची वाहवा केली, व स्वराज्य आलें, व तेंही कॉंग्रेसचे मदतीशिवाय, वादविवादानें, उपमा अलंकार देऊन, वक्तृत्व दाखवून, वकिली चातुर्य दाखवून मिळालें, अशीही ग्वाही दिली. कॉंग्रेस जनांनो ! पश्चात्ताप करा. कारण आतां कायदेमंडळाचें राज्य येणार आहे (Repent ye Congressmen, for the Kingdom of Councils is at hand) हें स्वागतिक प्रागतिककृत 'शुभवर्तमान' जाहीर करण्यांत आलें होतें. आणि प्रत्यक्ष शुभ्रपत्रिका बाहेर पडली तेव्हां, विश्वामित्री पवित्र्यांत "हें आमचें नव्हे, हें आमचें नव्हे" असें सांगण्यास याच लोकांनीं सुरुवात केली होती. त्यांच्याच सहकार्याचें हें फळ होतें. इंग्रज मुत्सद्दी अदूरदृष्टि

सहकार्याचा कसा फायदा घेतात, याचें हें उदाहरण आहे. जें झालें होतें त्याचा धिक्कार करणें जरूर होतें, ही घाण काढणें प्राप्त होतें. राजकारणांतील घाणही काढण्याचें काम हरिजन उद्धारार्थ निघालेल्या कॉंग्रेसलाच करावयाचें होतें, व त्यासाठींच कॉंग्रेसनें कमीपणा पत्करून निवडणुकी ठरविल्या होत्या. पण जें झालें तेंच योग्य म्हणून कॉंग्रेसचे मागें निदान महाराष्ट्र नाहीं हें दाखविण्याचा विरोधकांचा हट्ट होता. खुद्द गांधीनांही याबाबत थोडी शंका होती असें दिसतें, कारण निवडणुकीचे निकालानंतर मी त्यांना सर्व हकीगतीचें पत्र लिहिलें, त्याला दिलेल्या उत्तरांत त्यांनीं खालीलप्रमाणें उद्गार काढले आहेत. " विजय की खबरें सब प्रांतोंसे आयी हैं, लेकिन मैं तुम्हारा जय बहुत महत्त्वका मानता हूँ; और तुमको बधाई देता हूँ." महाराष्ट्र कोणामागें आहे याची खात्री या निवडणुकीनें सर्वांची झाली. आमच्या प्रांतांचे राजकारणांत नवीन युग सुरू झालें.

ता. ९।१२।३४ रोजीं नाशिकला प्रांतिक कॉंग्रेस कमिटीची सभा झाली. सर्वत्र आशा, नवा उत्साह, व नवे मन्सुबे, दृग्गोचर होत होते. संघटना प्रबल करण्याचें ठरलें. 'लोकशक्ति' काढण्याची योजना झाली. कार्यकर्त्यांचा आत्मविश्वास वाढला. भावी काळांत होणाऱ्या प्रांतिक निवडणुकी खास जिंकूं अशी भाषा ऐकूं येऊं लागली. ब्राह्मणेतर कार्यकर्ते व कॉंग्रेस यांची एकी प्रांताला प्रभावी करणार; जुनें जिणें, जुने वाद व विवाद मागें टाकून प्रांतांतील राजकीय जीवन जातिनिष्ठेपासून दूर पण बहुजन समाजाच्या हिताशीं संलग्न होणार, व त्यांतच खरी प्रतिष्ठा व विकास आहे, याची जाणिव सर्वांना सुखवूं लागली. नाशिकला त्याच दिवशीं सायंकाळीं गोदावरीचे दक्षिण तीरावरील पटांगणांत अभिनंदनाची विराट सभा झाली. त्यांत जेधे यांनीं म्हटलें " जनतेनें आम्हांस निवडून दिलें, मोठें केलें पण आम्ही लहान आहोंत, जनतेचे सेवक आहोंत, कृतज्ञ आहोंत. आम्ही जनतेला विसरणार नाहीं. आम्ही दोघे रामलक्ष्मणाप्रमाणें राहूं. शत्रूला आमची मैत्री फोडतां येणार नाहीं, असें वचन या प्रसंगीं तुम्हाला—महाराष्ट्रांतील जनतेला—मी देतों." या त्यांच्या हृदयस्पर्शी भाषणाचा विलक्षण परिणाम झाला. त्यांनीं सांगितल्याप्रमाणें आजही ते वागत आहेत. रामलक्ष्मणाप्रमाणें आम्ही लवकरच दिग्विजयार्थ निघणार होतों! ते दक्षिणेकडे गेले, आम्ही मात्र उत्तर दिशेकडे गेलों!!

---

## : पहिलें अधिवेशन :

निळया कागदावर गव्हर्नर जनरल यांच्या सहीशिक्क्यानिशीं असेंब्लीचें अधिवेशन ता. २१।१।३५ ला सुरू होणार असून तुम्ही त्यास हजर राहिलें पाहिजे, असें आज्ञापत्र (Command paper) येऊन थडकलें. असेंब्ली कचेरींतून अनेक फिरतीं (Circulars) येऊं लागलीं. राहण्याचे जागेसंबंधीं, कोणत्या पद्धतीनें तुम्हीं संबोधूं इच्छितां Mr. कां, Prof. कां, Sjt वगैरे, कामकाजाच्या तारखा, इत्यादि बारीकसारीक गोष्टींबद्दल पत्रांचा भडिमार सुरू झाला. कॉंग्रेस पार्लमेंटरी बोर्डाचे अध्यक्ष डॉ. अन्सारी यांचें, पक्षाची सभा ता. १८।१।३५ ला असल्याचें पत्र आलें; त्याचबरोबर कॉंग्रेसच्या सभासदांनीं कसें वागावें, कसें राहावें, यासंबंधीही पण सूचना देण्यांत आल्या. " तुम्ही कॉंग्रेसचे सभासद आहांत या दृष्टीनें तुमचेवर फार मोठी जबाबदारी आहे. प्रस्तुत कार्यक्रम सहकार्याचा नाहीं. नोकरशाहीविरुद्ध प्रचंड विरोध करून लढा निराळ्या आघाडीवर चालवावयाचा आहे. तुम्ही तुरुंगांतच आहां असें समजून आपली राहणी ठेवावी व कायदेमंडळांत येणाऱ्या प्रत्येक विषयाचा पूर्ण अभ्यास करून, संघटितपक्ष जास्तींतजास्त काय कार्य करूं शकतो, हें दाखवावें." हा त्यांच्या पत्रांतील मजकूर वाचून एकपरी बरें वाटलें, व आपल्या हातून किती जमेल, याविषयीं काळजी पण वाटली. उपयुक्त असलेलीं पुस्तकें जमविलीं, तेथील राहण्याचे व्यवस्थेसंबंधीं पण निश्चित केलें. दिल्लीच्या महाराष्ट्र मंडळाचे चिटणीसास कांहीं माहिती विचारली होती, पण आम्ही केसरीपक्षाच्या विरुद्ध पक्षाचे,—कॉंग्रेसचे म्हणून—व तेथील महाराष्ट्र मंडळ त्यावेळीं तरी आमचे विरुद्ध होतें असें दिसलें, या कारणामुळें उत्तर सुद्धां धाडण्याची तसदी घेतली नाहीं. गोष्ट क्षुल्लक होती, पण निवडणुकीनें महाराष्ट्रीय समाजांत कसें वर्गशः द्वंद्व निर्माण झालें होतें याचा हाही एक पुरावा होता. तुरुंगाप्रमाणेंच रहावयाचें म्हणून, त्या दृष्टीनेच बेत करून बरोबर फक्त नारायणराव धारू व जेधे यांनीं आपला पुतण्या यशवंतराव यांस

घेऊन निघावयाचें ठरविलें, त्याप्रमाणें मुंबईस आलों. सर कावसजी जहांगीर यांची ओळख पुण्यास नाताळांत प्रागतिकांचे अधिवेशनाचे वेळीं झाली होती, त्यांना मुंबईस भेटलों. डॉ. देशमुख, श्री. भुलाभाई यांना भेटून आम्ही ता. १५।१।३५ला दिल्लीस प्रयाण केलें. वाटेंत अनेक ठिकाणीं आम्हांस गुप्तपोलिसांनीं तिकिटें तपासण्याचें निमित्त करून त्रास दिला. मला वाटलें खासदार झालों तेव्हां आतां तरी हा त्रास चुकेल. शेवटीं ता. १७।१।३५ला सकाळीं भयंकर थंडींत आम्हीं नव्या दिल्लीचे स्टेशनावर उतरलों. ९ इलेक्ट्रिक लेन ( विजेची आळी ) या मिळालेल्या निवासस्थानांत पोहचतांच समोरील हिरवळीवर बर्फ पडलेलें दिसलें. विजेची उष्णता न लागतां ह्या कडाक्याच्या थंडीचा धक्का मात्र बसला !! आळीचें नांव जगांत येणाऱ्या अन्य अनुभवांप्रमाणें अयथार्थ होतें. दिल्लींतील जीवन असेंच आहे कीं काय अशी शंकाही मनांतून चमकून गेली.

निवासस्थानांत व्यवस्था चांगली होती. प्रवेश करून पांच मिनिटें होतात तोंच रोटीवाला, वर्तमानपत्रवाला, न्हावी, धोबी, वगैरे येथील जीवनांतील बाराही बलुतेदार हजर झाले, व तेरावा म्हणजे वर्तमानपत्राचा बातमीदार हाही हजेरी देऊन गेला ! अर्थात् त्याचा हेतु अगदीं निःस्वार्थी होता असें म्हटलें पाहिजे !! बऱ्याच प्रमाणांत, बराच वेळ, चहावर तुटून पडल्यानंतर डोकें थोडें विचार करूं लागलें. आसपास राहणारे अन्य सभासद भेटून गेले. कांहींनीं अध्यक्षाबद्दल चर्चाही केली. सर गुलाम हुसेन हिदायतूल्ला यांनीं पूर्वींच पत्र धाडलें होतें; त्यांचाही एक चिठ्ठी आला. आमचा पक्ष ठरवील तें आमचें मत हें पत्रानें पूर्वीं कळविलें होतें, तेंच सांगितलें. निवडणुकीचे पराक्रम अनेक सभासद सांगत, आम्हालाही कांहीं सांगणें भाग पडे. तथापि मी अस्वस्थ होतों. दुपारीं आम्ही दोघे हरिजनवसाहतींत महात्माजींचे दर्शनार्थ गेलों पुष्कळ बोलण्याचें ठरविलें होतें, पण कांहींही न बोलतां परत आलों. दुसरे दिवशीं ४ वाजतां पक्षाची सभा होती व तिला हजर राहण्यासाठीं म्हणून निघालों. निम्या वाटेंत आल्यावर एकदम विचार बदलून पुन्हां गांधीजींचे निवासस्थानीं गेलों. खोलींत प्रवेश करतांच "मला वाटलेंच तुम्हीं पुन्हां याल," असें म्हणून गांधीजींनीं बसण्यास सांगितलें. "पुन्हां कां आलांत" म्हणून विचारलें तेव्हां मी म्हणालों "मी मनांत अस्वस्थ आहें. नव्या जीवनांत प्रवेश करीत आहें, व जें होत आहे, त्याशीं सहमत नाहीं; कर्तव्य म्हणून करीत आहें, तेव्हां तुमचा शुभाशिर्वाद पाहिजे." "तो आहेच" असें हंसत म्हणून "मधून मधून येत जा" असें त्यांनीं सांगितलें.

आम्ही उठलों व सरळ दर्यागंजमधील डॉ. अन्सारींचे यमुना कांठावरील प्रशस्त निवासस्थानीं आलों. तेथें श्री. राजाजी व बहुतेक निवडून आलेले काँग्रेसचे सभासद हजर होते. पुढील पटांगणांत वर्तमानपत्रांच्या बातमीदारांचा तांडा उभा होता.

डॉ. अन्सारींनीं सर्वांचें स्वागत केलें. परस्परांची ओळख करून देण्यांत आली. डॉ. अन्सारी ही एक असामान्य व्यक्ति होती. दिसण्यांत भव्य, चेहरा प्रशांत, वाणी गंभीर व बोलणें मोजकें; पाहिल्याबरोबर मनांत आदर उत्पन्न होई. काँग्रेसचे ते १९२७ सालीं—मद्रास अधिवेशनाचे—अध्यक्ष होते. निवडणुकीचा कार्यक्रम हें त्यांनीं निदान करून सांगि तलेलें औषध होतें. युनानीं पद्धतींत पथ्य नसतें म्हणतात, पण येथें मात्र त्यांनीं कसें रहावें पासून कसें व किती बोलावे पर्यंत, स्थूल मर्यादा घालून दिल्या होत्या. दिल्लीचे ते अनभिषिक्त राजे होते. १९३२ चे दिल्लीचे अधिवेशनाचे वेळीं ते दिल्ली तुरुंगांत होते, व मीही तेथेंच होतों, व त्यामुळें पूर्वींचा परिचय होता. त्यांची प्रतिष्ठा मला माहीत होती. वागणुकींतील सौजन्य परिचयाचें होतें. राजकारणांत त्यांचें स्थान मोठें होतें. इस्लामी संस्कृतींतील जें कांहीं अत्युत्तम आहे त्याचे ते सारसर्वस्व होते. हिंदु-मुसलमान एकीचे ते मोठे आधारस्तंभ होते. त्यांच्या शब्दाला सरकारांत पुष्कळ मान होता. त्यामुळेंच निवडणुकी जाहीर झाल्या असें म्हणतात. साहजिक त्यांचा शब्द जमलेल्या सभासदांना महत्त्वाचा वाटे. त्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारून पुढारी निवडण्यास सांगितलें. आम्ही काँग्रेसचे शिक्कामोर्तब झालेले ४४ सभासद निवडून आलों होतों. पैकीं एक म्हणजे नागपुरचे श्री. मोरोपंत अभ्यंकर, हे निवडणुकीच्या निकालानंतर, पण अधिवेशनाचे आधीं, मुंबई येथें डॉ. देशमुख यांच्या घरीं वारले होते. निवडणुकींतील काँग्रेसचा जय सर्वांआधीं परमेश्वराला कळविण्याकरितांच जणूं त्यांनीं हें जग सोडलें असावें! त्यांनीं पूर्वीं गाजविलेल्या कामगिरीमुळें त्यांचें महत्त्व जास्तच वाटत होतें, व तसा त्यांचा उल्लेखही पहिल्या सभेंत झाला. उरलेल्या ४३ जणांनीं ही निवड करावयाची होती. पक्षाचा पुढारी कसा असावा हें अध्यक्षांनीं सांगून सूक्ष्मरीतीनें त्यांना अभिप्रेत असलेली व्यक्ति दर्शित केली होती. मुंबईत असतांना कांहीं मित्रमंडळींत ही चर्चा निघाली होती. या चर्चेंत मुंबईकर मित्रांचा श्री. भुलाभाई विरुद्धच सूर होता. पंडित गोविंदवल्लभ पंत यांचा नामनिर्देश तेथें प्रामुख्यानें झाला होता.

पंडितजी विद्वान्, संयुक्तप्रांतांतील कायदेमंडळांत स्वराज्य पार्टीचे नेते म्हणून काम करून, मित्रांचे धन्यवाद व विरोधकांचा आदर त्यांनीं संपादन केलेला होता;

पंडित मोतीलाल नेहरू यांचे ते उजवे हात होते. कांहीं मंडळी त्यांचेकडे भावी नेता म्हणून पहात होती. अध्यक्षांचा अभिप्राय समजूनच कीं काय, पंडितजींनी खुद्द भुलाभाई हे सालमजकुरासाठीं पक्षनेते असावे, अशी सूचना मांडली. सर्वानुमतें ती पास झाली. पंडितजी दुय्यम नेते निवडले गेले. सत्यमूर्ति व श्री. नीळकंठदास यांना चिटणीस निवडण्यांत आलें. या सर्व घटनेंत श्री. राजाजींचाही हात होता. स्वतः ते हजर होतेच व आपलें मत सांगत होते. शेवटीं प्रतोद(Whip) निवडण्याचा प्रश्न आला, व तीं नांवें, मी स्वतः, बॅ. असफअल्ली व डॉ.राजन, याप्रमाणें खुद्द राजाजींनींच सुचविलीं दोनतीन उपसूचना आल्या पण त्या सर्वांत मी होतोंच. पण शेवटीं राजाजींची सूचना सर्वांनीं मान्य केली. कार्यकारी मंडळ नेमण्यांत येऊन, घटना तयार करण्यास कांहीं मंडळी नेमून सभा संपली. प्रतोद झाल्यामुळें, जिकडे जाण्यासच तयार नव्हतों तिकडेच आणखी प्रगति झाली. जेधे व अन्य महाराष्ट्रीय मंडळी अभिनंदन करीत होती, तर मी मनात आणखी चरफडत होतों. सदरहू सभेनंतर रात्रभर आत्मनिरीक्षण करून जर एखादी गोष्ट कर्तव्य ठरली, मग ती व्यक्ति स्वतः ठरवो अगर संस्थेकडून ठरविली जावो, तर ती शक्य तितकी चांगल्या रीतीनें करणें, यांतच प्रामाणिकपणा आहे, निष्ठेची कसोटी आहे ह्या निर्णयाला पोहोंचलों व त्याप्रमाणें वागण्याचें ठरविलें.

कायदेमंडळाची इमारत भव्य व गोल आहे. मध्यभागीं ग्रंथालय व या गोल ग्रंथालयाचें तीन बाजूंस तीन अर्धवर्तुळाकार इमारती असून त्यांत असेंब्ली, कौन्सिल ऑफ स्टेट (वरचें कायदेमंडळ) व नरेंद्र मंडळ, (Princes' Chamber) यांच्या बैठकी भरतात. या तिन्ही इमारतींत होणाऱ्या कामकाजांत व भूमिकेंत विरोध असतो, व तो असला तरी या सर्व इमारतींतून ग्रंथालयांत येण्यास भव्य मार्ग असल्यामुळें, या सरस्वतीचे निवासांत तरी सर्व सभासद एकत्र यावेत व त्यांनीं ज्ञानपान सहकार्यानें करावें, असाही उद्देश बांधणाऱ्यांचा असावा! "तेजस्विनावधीतमस्तु" असें जरीं होत नसलें तरी "सह नौ भुनक्तु" असें मात्र चालूच असते!! कारण आजूबाजूच्या रम्य हिरवळीवर बसून, आंत चाललेले वादविवाद टाळून, अनेक कर्तव्यदक्ष सभासद चहा पितांना आढळतात, व हे दृश्य सर्व परिचित आहे. ग्रंथालयांत नरेंद्रमंडळाचे सभासद क्वचितच दिसतात. त्यांचा प्रवेश मार्ग मोकळा असतो. परंतु अजराजानंतर निसर्गभिन्नास्पद लक्ष्मी व सरस्वती यांना एकत्र आणणें, म्हणजे या सूर्यवंशी राजांना पूर्वजांचा अपमान करणें

वाटत असल्यामुळेंच, ते कदाचित् येत नसावेत!! असो. इमारतीचा व्याप, त्याची कलापूर्ण उभारणी, सभासदांच्या सोई, उत्तम ग्रंथालय, सुंदर व स्वच्छ उपाहार-गृहें, व एकंदर बादशाही रुबाब पाहून, द्वारका पाहून सुदाम्याची जी स्थिति झाली, ती आमची झाली असल्यास नवल नाहीं. प्रतोद या नात्यानें पक्षाची जागा ताब्यांत घेतली आणि प्रतोदाची खोलीहि ताब्यांत घेतली. १० सभासद एकत्र झाले म्हणजे त्याला पक्ष म्हणून मान्यता मिळते, व पक्षाच्या कचेरीकरितां म्हणून एक प्रशस्त खोली पण या इमारतींत देण्यांत येते. कॉंग्रेसपक्ष हा मुख्य पक्ष म्हणून त्या पक्षाच्या प्रतोदास शिवाय आणखी एक खोली देण्यांत येते. खुद्द बैठकीची जागा पाहून कॉंग्रेसपक्ष कोठें बसणार हें सभागृह खात्याचा चिटणीस (Secretary Legislative Assembly) यांचेकडून समजून घेतलें. बैठकीचें सभागृह घोड्याच्या नालाच्या आकाराचें आहे. सभासद वर्तुळाकार भागांत बसतात, अध्यक्ष उच्च-स्थानावर, सरळबाजूचे मध्याबर बसतात. त्यांचे उजवे बाजूस सरकारी नोकरांची गॅलरी आहे. त्या ठिकाणीं निरनिराळ्या खात्यांचे चिटणीस कागदपत्र घेऊन हजर असतात. त्यांना तेथें येण्याचा मार्ग निराळा असतो. त्यांनीं सभा चालू असतां बोला-वयाचें नाहीं, टाळ्या वाजवावयाच्या नाहींत, इतकेंच नव्हे तर पुढें असलेला कट्टा ओलांडून सभागृहांत कधींही प्रवेश करावयाचा नाहीं. बैठक सुरू झाली म्हणजे फक्त सभासद, लघुलेखक, कारकून, पट्टेवाले यांनाच प्रवेश आहे. याव्यतिरिक्त केवढीही मोठी व्यक्ति असली तरी तिला प्रवेश नाहीं. अध्यक्षांचे डावे बाजूस व्हाइसरॉयांची गॅलरी आहे, व तेथें जागा पाहिजे असल्यास व्हाइसरॉयांच्या चिटणीसाची परवानगी लागते. पार्लमेंटचे सभासद, प्रांताचे गव्हर्नर, व्हाइसरॉयचे पाहुणे, त्यांचे आप्त या-व्यतिरिक्त कोणालाही हा मान मिळत नाहीं. येथें बसणारांनाही वर लिहिलेल्या मर्यादा संभाळाव्या लागतात. एकदां वादविवाद प्रसंगीं या गॅलरींतील एकानें टाळ्या वाजविल्या; त्याबरोबर सत्यमूर्तींनीं ताडकन उठून अध्यक्षांना सांगितलें कीं, "अध्यक्ष महाराज या सभागृहांत, सभासद नसलेले लोक आहेत अशी शंका येते तेव्हां माझी सूचना अशी आहे कीं, या सभागृहांतून त्यांना बाहेर काढण्यांत यावें." (" Sir, I suspect strangers in the House, I move that this House be cleared off of the strangers ") अध्यक्षांनीं ताबडतोब गॅलरींतील मंडळींनीं कसें वागावें हें सांगितलें, व त्यांना तेथें बसतां येतें तें केवळ सभेच्या मर्जीमुळें. सभेच्या कामांत व्यत्यय येणार नाहीं असेंच प्रेक्षकांनीं वागलें पाहिजे, नाहींतर त्यांना

बाहेर जावें लागेल. यानंतर अर्थात् प्रेक्षक म्हणजे नुसते प्रेक्षकच आहेत, त्यांनीं पहावयाचें व ऐकावयाचें: यापेक्षां कांहींही करावयाचें नाहीं हें सर्वांना कळून चुकलें.

अध्यक्षांचे उजवेकडील वर्तुळाकार भागांत सरकारी पक्ष बसतो; त्याचेविरुद्ध डावेकडील वर्तुळाकार भागांत प्रमुख विरोधी पक्ष ( Opposition ) बसतो. बसण्याकरितां ठेवण्यांत आलेल्या खुर्च्या व पुढील डेस्कें दोन अगर तीन माणसांकरितां असून रांगेमागून रांग वर वर चढत जाते. त्यामुळें सर्व सभासद, सर्व सभासदांना पाहूं शकतात व अध्यक्षही सर्वांना पाहूं शकतो. या दोन मुख्य पक्षांनीं व्यापून उरलेल्या भागांत अन्य पक्ष बसतात. डावीकडील पहिला भाग काँग्रेसपक्ष, नंतर संख्येनें कमी असलेला स्वतंत्र पक्ष, नंतर काँग्रेस नॅशनॅलिस्ट पक्ष, नंतर युरोपियन ग्रूप, व त्यानंतर बिनपक्ष सभासद अशी व्यवस्था केलेली होती. प्रत्येक पक्षाचे वांट्यास संख्येच्या मानानें पहिल्या रांगेच्या जागा येतात. यांना (Front Benches) म्हणतात; अर्थात् पक्षांतील प्रमुख येथें बसावयाचे असा संकेत असतो; व येथ बसणारांना पक्ष प्रमुख ( Front Benchers ) असें संबोधलें जातें. येथें कोणी बसावें हें पक्षानें ठरवावयाचें असतें. त्यांतही भांडणें होतात! मानापमानाचे पेचप्रसंग उत्पन्न होतात. पुढें चिटणीस झाल्यानंतर माझी जागा या रांगेंत असूनसुद्धां मी तेथें बसत नसें, व एकानें त्याचें कारण विचारलें असतां त्याला 'Front bench seat does not mean front bench mind' या एका इंग्रज मुत्सद्द्याचे शब्दांत मी उत्तर दिलें. तात्पर्य, मनुष्यस्वभावांतील गुणदोष सर्वत्रच असतात. नेत्यानें सांगितल्याप्रमाणें कोणी कोठें बसावें हें ठरून त्याप्रमाणें सभागृह चिटणिसास कळविणें अवश्य असतें त्याप्रमाणें मी केलें. कारण सभागृहाचा छापील नकाशा सभासदांच्या नांवासह अध्यक्षांकरितां तयार करावा लागतो. पक्षांतील सर्व सभासदांना वेळेवर हजर राहण्यासाठीं, कोणत्या पोषाखांत यावें याबद्दल व्हिप (आज्ञा अगर सूचना) कळविण्यांत आल्या. पक्षाच्या सभेंत सर्वांनीं पांढरी गांधी टोपी घालूनच बैठकीस हजर राहिलें पाहिजे, असें ठरलें होतें. थोडासा विरोध मद्रासी सभासदांचा होता; पण राजाजींच्या मार्मिक कोटिक्रमापुढें तो विरला. आदले दिवशीं सर्व सभासदांनीं आपआपल्या जागा पाहून ठेविल्या. असेंब्लीचे प्रवेश-द्वारावरील घुमटांत सोनेरी अक्षरांत पुढील संस्कृत श्लोक लिहिलेला आहे.

न सा सभा यत्र न सन्ति वृद्धा: । वृद्धा न ते ये न वदन्ति धर्मम् ।
धर्मः स नो यत्र न सत्यमस्ति । सत्यम् न तद्यच्छलमभ्युपैति ॥

ज्यांत वृद्ध, ज्ञानी व अनुभवशीर माणसें नाहींत ती सभा नव्हे. जे धर्माप्रमाणें (नियमानुसार) अभिप्राय बोलत नाहींत ते वृद्ध नव्हेत; ज्यांत सत्य नाहीं तो धर्म नव्हे; व जें कपटानें व्यापलें आहे तें सत्य नव्हे, याप्रमाणें सभा असावी. हें ध्येय असलेल्या सभेंत दुसरे दिवशीं आमचा अधिकृत प्रवेश व्हावयाचा होता! ता. २१।१।३५ रोजीं बरोबर सकाळीं ११ ला १ मिनिट कमी असतांना पक्षाचे कचेरींतून जोडी जोडीनें भुलाभाई व पंडित गोविंदवल्लभ पंत यांच्या नेतृत्वाखालीं निघून बरोबर ११ वाजतां आम्हीं सभागृहांत प्रवेश केला. अन्य पक्षीय व बिगर-पक्षीय सभासद, आधींच जागेवर येऊन बसले होते. सभागृहांतील सर्व गॅलऱ्या चिक्कार भरलेल्या होत्या. चार वर्षें कॉंग्रेसला दाबून टाकण्याचा प्रचंड प्रयत्न होऊन कॉंग्रेसपक्ष प्रचंड बहुमतानें निवडून आलेला होता. बरखास्त झालेल्या असेंब्लीचे अध्यक्ष सर षण्मुखम् चेट्टी, लॉर्ड विलिंगडनचे मानसपुत्र, यांनीं निवडणूक जाहीर झाल्यानंतर बैठकींत कॉंग्रेसचे सभासदांना कसें वागावें हें शिकवीन असें तोऱ्यानें सांगितलें होतें, ते तेथें दिसले नाहींत! अनेक सद्‌गृहस्थ, नामवंत व निर्विशेष, ज्यांनीं आपल्या कर्तृत्वानें, व वक्तृत्वानें, अगर निष्क्रियतेनें, निश्चळपणानें, मागील असेंब्लींत नांव कमविलें होतें, अगर ज्यांचें नांवच फक्त होतें असे अभावानें तळपत होते! हजर होते त्यांच्या मनांत कॉंग्रेसबद्दल काय वाटत होतें हें पाहण्यासाठीं साहजिक उत्सुकता होती. सभागृहांत भुलाभाई व पंडितजींनीं प्रवेश करतांच सर्व सभागृहांतील सभासद, हिंदु, मुसलमान, युरोपियन, सरकारी, बिनसरकारी, उभे राहिले व सर्वत्र टाळ्यांचा कडकडाट झाला. स्वातंत्र्य उपासनेचा हा यदृच्छया पण योग्य असाच सत्कार होता. दोन दोनच्या रांगांमागून रांगा शुभ्र पोषाख केलेल्या सभासदांच्या येत होत्या, व शिस्तीनें सैनिक ज्याप्रमाणें आपआपली जागा धरतात, त्याप्रमाणें कॉंग्रेसपक्षीय सभासद जागेवर जात होते. सौजन्य, व्यासंग, व शिस्त, यांचा हा अनुपम संगमच दिसत होता. अध्यक्षांचे मागें, दुसऱ्या मजल्यावर प्रेस गॅलरींत भयंकर खळबळ झाली होती. जो तो बातमीदार पुढें येऊन कोण कोण सभासद कोणा कोणाचा पराभव करून आले आहेत, त्यांना पाहण्यास उत्सुक होता. प्रसिद्ध प्रेक्षकांची गॅलरी (Distinguished Visitors' Gallery) नामवंत नागरिकांनीं गच्च भरली होती. शेजारील स्त्रियांचे गॅलरींत तर कमलवनच फुललें होतें! अध्यक्षांची गॅलरी, कौन्सिल ऑफ स्टेटची गॅलरी, सामान्य प्रेक्षकांची गॅलरी, कांठोकांठ भरली असून सर्वत्र उत्कंठा पसरली होती. ११ वाजून कांहीं

सेकंद होतांच मार्शल कॅप्टन नूरमहंमद, अध्यक्षांचे खुर्चीजवळ आले. कॅ. नूर-महंमद हे उंचेपुरे पठाण, मागील युद्धांत पराक्रम गाजवून नांव कमाविलेले मोठे दिलदार गृहस्थ आहेत. त्यांनीं आपल्या मोठया आवाजांत Gentlemen, the Honourable the Chairman अशी घोषणा केली; त्याबरोबर सर्व सभासद उभे राहिले. अध्यक्षांची निवडणूक होईपर्यंत सर हेन्री गिडने यांना सरकारनें तात्पुरतें सभापति नेमिलें होतें, त्यांनीं प्रवेश केला. त्यांनीं मान लववून सभासदांना प्रणाम केला. सभासदांनींही तशाच पद्धतीनें त्यांना प्रणाम केला. सभागृह खात्याचे चिटणीस मि. रफी यांनीं शपथविधीसाठीं पहिलें नांव सभागृहाचे नेते सर नृपेन्द्रनाथ सरकार यांचें पुकारलें. त्यांनीं शपथ घेतली, सभापतींशीं हस्तांदोलन करून सोनेरी पुस्तकांत सही करून ते स्वस्थानीं गेले. याप्रमाणें एकामागून एक सभासद येत होते आणि शपथ घेत होते. त्या सोनेरी पुस्तकांत सही करून आपलें नांव देशाचे इतिहासांत अजरामर करण्याचा प्रयत्न करीत होते. प्रसिद्ध सभासद येतांच टाळयांचा कडकडाट होई. शपथविधींत राजनिष्ठेचा भाग होता, व शपथ न घेतल्यास सभासदत्व कायद्यानें रद्द होतें, अशी व्यवस्था आहे. शपथेबाबत पक्षाचे सभेंत वाद होऊन शपथ घेणें, अपरि-हार्य ठरलें. तथापि अनेक वैताग उत्पन्न करणाऱ्या गोष्टी स्वीकारल्यानंतर एवढयाबद्दल कोण अडणार व कोण त्याला अडूं देणार ? शपथविधि संपून सभासद जागेवर बसल्यावर सभापतींनीं सभा त्या दिवसापुरती बरखास्त केली. पहिल्या दिवसाचें वर्णन करतांना दिल्लींतील एका अँग्लो इंडियन पत्रानें असें लिहिलें कीं, कॉंग्रेसपक्षानें पुन्हां एकदां सनदशीर मार्गापुढें मान वांकविली. पण कांहीं सभासदांची नजर मात्र भयंकर आहे !! (Congress Party has made its second bow to constitutionalism, but some of its members have at any rate dangerous looks) त्यांची भीति अस्थानींच होती का ?

ता. २५।१।३५ला अध्यक्षांची निवडणूक व्हावयाची होती. अध्यक्षपदाचें महत्त्व पूर्वीं श्री. पटेल यांची निवड करून कॉंग्रेसपक्षानें अगर त्या वेळचे स्वराज्यपक्षानें अचूक ओळखलें होतें. इंग्लंडमधील कॉमन्ससभेचें अध्यक्षपद महत्त्वाचें तर आहेच पण त्याहीपेक्षां येथील जास्त महत्त्वाचें आहे. तेथें समतोल बुद्धीचा, निःपक्षपाती, सभासदांच्या व सभेच्या अधिकाराबद्दल व हक्काबद्दल जागरूक व दक्ष असलेला मनुष्यच, सामान्यपणें बिनविरोध निवडून येतो; एवढेंच नव्हे तर खुद्द निवडणुकींत त्यानें स्वीकारलेल्या मतदार संघांत त्याला कोणी विरोध करूं नये असा इंग्रजी राज-

कारणाचा अलिखित संकेत आहे. अधिकारारूढ असलेल्या सरकारच्या तंत्रानें तो चालत नाहीं. सभेचे नियम, सभेची शिस्त, वादविवादांत सर्वपक्षांना व सभासदांना न्याय मिळेल, (Fair Debate,) सभेचें वातावरण सभ्य व समंजस राहील एवढेंच तो पहात असतो. अगदीं खऱ्या अर्थानें तो सभेचा नियंत्रक व नायक असतो. पक्षापक्षांच्या राजकारणापासून अलिप्त असतो. प्रधान मंडळें येतात व गडगडतात, तथापि अनेक सार्वजनिक निवडणुकी होऊनसुद्धां वर्षानुवर्षे एकच व्यक्ति, कॉमन्स सभेचा अध्यक्ष (Speaker) म्हणून राहते. सभेच्या परंपरेचा व प्रतिष्ठेचा तो एक पहारेकरीच असतो. येथें सार्वजनिक निवडणुकींत तो बिनविरोध क्वचित्‌च निवडून येतो. पक्षाचा म्हणून तो उभा असतो, व पक्षाचा म्हणून येतो. जेव्हांपासून अध्यक्षपद निवडणुकीवर अवलंबून आहे तेव्हांपासून बिनविरोध अशी निवडणूक झालीच नाहीं.

श्री. पटेल, सर इब्राहीम रहिमतुल्ला सर षण्मुखम् चेट्टी, हे सर्व निवडणूक गाजवून अध्यक्षपदांवर आले होते. आपल्या पक्षाचा अगर आपले तंत्राचा अध्यक्ष असण्या पासून होणारा सभाविषयक कामाचा फायदा अगदींच क्षुल्लक नाहीं, हें कॉंग्रेस व सरकार, दोन्ही पक्ष जाणून होते. यामुळें दोन्ही पक्षांची खटपट सुरू झाली. असेंब्लीचे सभासद १४५ यांत सरकारी अधिकारी व सरकार नियुक्त ३८ सभासदांचा हुकमी गट सरकारजवळ होता. कै. मोरोपंत अभ्यंकरांचे जागीं निवडून आलेले डॉ. खरे धरून, हुकमी ४४ कॉंग्रेस सभासदांचा गट होता. जिनांचें नेतृत्व मान्य करून केवळ असेंब्लींतिल प्रयोगाचे सोईसाठीं बनलेला 'स्वतंत्र पक्ष' १८ शिलेदारांचा होता. कॉंग्रेस नॅशनॅलिस्ट पक्ष म्हणजे दसकी लकडी व श्री. अणे यांचा बोजा होता. युरोपियन ग्रूप १० चा पण हा आंकडा नेहमीं सरकारी नागावे फणीवरच असावयाचा अशी त्याची ख्याती होती. उरलेले २५ बिनपक्षाचे ( Non-descript ) जिकडे नशीब ऊर्फ स्वार्थ नेईल तिकडे जाण्यास सामान्यत: तयार, अशा वृत्तीचे होते. स्वतंत्रपक्षानें सर अबदुल रहीम यांना अध्यक्षपदासाठीं उभें केलें. जिनांना नेतृत्व हवें होतें; किंबहुना जेथें नेतृत्व नाहीं तेथें जिना नाहींत. जेथें ते अध्यक्ष नाहींत तेथें ते वक्ते नाहींत अशी त्यांची ख्याती होती. म्हणून युक्तीनें व सरकारी धोरण ओळखून सर अबदुल रहीम यांना उभें केलें. असेंब्लींतिल संकेत असा आहे कीं, एकदां हिंदु अध्यक्ष व एकदां मुसलमान; या खेपेस मुसलमानाची पाळी होती. कॉंग्रेसनें मि. शेरवाणी यांची निवड करून त्यांना उभें केलें होतें. सर अबदुल रहीम हे नामवंत माजी न्याया-

धीश होते. कांहीं काळ, बंगालमधील कार्यकारी मंडळाचे सभासद होते. पब्लिक सर्व्हिस कमिशनवरील त्यांची कामगिरी उल्लेखनीय होती. अनेक दृष्टींनीं त्यांची लायकी मान्य होण्यासारखी होती; पण सरकारनें त्यांना मतें देण्याचें ठरविलें, तें केवळ कॉंग्रेसपक्षाचा अध्यक्ष नको म्हणूनच. शेरवाणी हे विद्वान् बॅरिस्टर असून मोठया घराण्यांतील सद्गृहस्थ होते. त्यांचा त्याग, तुरुंगवास, स्वराज्यपक्षाचे वेळची कायदेमंडळांतील त्यांची कामगिरी लक्षांत घेऊन, कॉंग्रेसपक्षानें त्यांची निवड केली होती, व ती अगदीं योग्य होती. पक्षानें निवडणूक करावयाची हें मान्य केल्यास अधिक चांगली निवड शक्यच नव्हती. कॉंग्रेस नॅशनॅलिस्ट पक्षानें त्यांनाच पाठिंबा देण्याचा ठरावही केला. सरकारचे हुकमी ३८, युरोपियन ग्रूपचे १० व स्वतंत्रपक्षाचे १८ मिळून ६६ सभासदांचें पाठबळ सर अबदुल रहीम यांना होतें. शेरवाणी यांना ५४ सभासदांचें; बिनपक्षी कोठें जाणार यावर सर्व अवलंबून होतें. तसेंच स्वतंत्र-पक्षांतील लोक आपआपल्यापरीनें स्वतंत्रच होते. त्यांच्या मतांची शाश्वती नव्हती म्हणून शेरवाणी आशा धरून खटपट करीत होते. आम्ही आपापले परीनें खट-पट करीत होतों. निवडणुकीचे दिवशीं सकाळीं पक्षसभा झाली. त्यांत शेरवाणींनीं आपल्याला गुप्तदान मिळणार म्हणून माहिती दिली. दुपारीं सभागृहांत आम्हीं आलों, तर सभासदांत निराळाच वाद सुरू झाल्याचें दिसलें. बंगाली अध्यक्ष आला पाहिजे हा प्रांतीय अभिमान जागृत झाल्याचें दिसलें! गुप्त मतदान झालें व सर अबदुल रहीम ६ मतें अधिक मिळून निवडून आले!! प्रांतीय अभिमान पक्षाभिमाना-पेक्षां जास्त ठरला, कां गुप्तदान ऐनवेळीं गुप्त झालें हें सांगणें कठीण, तें एक गुपितच राहणार व तसेंच राहणें योग्य आहे. तात्पर्य, पहिल्या चकमकींत कॉंग्रेस-पक्षानें मार खाल्ला ही गोष्ट स्पष्ट झाली. पुढें प्रत्यक्ष कामकाजांत काय घटना घड-णार व कॉंग्रेसपक्ष सरकारवर कशी मात करणार याविषयींही शंका प्रदर्शित करण्यांत आली. ही निवडणूक बिनविरोध होणें जरूर होतें; तसें न झाल्यामुळें अध्यक्ष साहजिकच कॉंग्रेसपक्षाबद्दल रुसलेला, व मदत केल्यामुळें सरकारवर खुष राह-णार, व त्याचा परिणाम कामकाजावर होणार अशी टीकाही अनेक वर्तमानपत्रांतून आली. प्रत्यक्ष निवडणुकीचा निकाल झाल्याबरोबर खुद्द शेरवाणी यांनीं सर अबदुल रहीम यांचें अभिनंदन करून आपली दिलदारवृत्ति दाखविली; पण त्याचबरोबर भुला-भाई यांनीं जे अनुपम उद्गार काढले त्याचा परिणामही सर्व सभागृहावर उत्कृष्ट झाला. "लढणें जरूर म्हणून लढतों, पराभव अपरिहार्य झाला तर तो द्वेषरहित होऊन

स्वीकारतों. आम्ही तुमचें अभिनंदन करतों तुम्ही आमचे अध्यक्ष आहांत. या सभेची प्रतिष्ठा व सभासदांचे हक्क यांचें संरक्षण तुम्ही कराल, असा आमचा भरंवसा आहे." ("We fight only when necessary, and lose if we must; we do it without bitterness. We congratulate you, you are our President, President of this Assembly in whose hands our rights and our dignity, we trust, are safe.") सर अबदुल यांनीं "जोंपर्यंत सभागृहाचा आपल्यावर विश्वास आहे तोंपर्यंतच आपण सभापति राहूं, व जोंपर्यंत सभापति आहों तोंपर्यंत सदरहू स्थानाची गौरवयुक्त परंपरा आपण सोडणार नाहीं" असें सांगितलें व सर्वांचे आभार मानिले. हें सर्व झालें खरें पण पराभवाचा कडवटपणा आमच्या कित्येकांचे तोंडांतून पुढें कित्येक दिवस गेला नाहीं, हें प्रांजळपणें सांगणें जरूर आहे.

ज्या मुख्य प्रश्नावर सर्वंच निवडणूक लढविली गेली होती, तो घटनात्मक प्रश्न असेंब्लीमध्यें कसा व केव्हां येणार याबद्दल चर्चा सुरू झाली. कांहींनीं शंका काढली कीं सरकार आपण होऊन तो प्रश्न असेंब्लीपुढें आणणारच नाहीं.खाजगी सभासदांनीं ठराव आणण्यासाठीं बॅलटचा आश्रय घेतला पाहिजे. कारण सर्व खाजगी ठराव अगर बिलें योग्य भाषेंत योग्य मुदतींत रीतसर आलीं म्हणजे चिठ्या टाकून त्यांचा क्रम ठरतो,व क्रमाप्रमाणें बिगर सरकारी कामकाजाचे दिवशीं, त्यांच्यावर वादविवाद होतो. दिल्ली अधिवेशनांत खाजगी ठरावाकरितां तीन दिवस व खाजगी बिलांकरितां तीन,याप्रमाणें साधारणपणें दिवस सरकार मुक्रर करतें पण तें एकसारखें न करितां अडीच महिन्यांत केव्हांतरी सोईनें करतें. या स्थितींत ठराव येऊन त्याची चर्चा सांगोपांग व्हावयाची व मतनोंदणी व्हावयाची म्हणजे हें सर्व दिल्ली अधिवेशनांत शक्य नव्हतें. कॉंग्रेसपक्षानें निवडणुकीला मुख्य मुद्दा म्हणून एकादां प्रश्न धरला असला तरी सभेचें कामकाज कसें चालावें हें बव्हंशीं सरकार ठरविणार. प्रतिपक्षाला कांहींच वाव न देतां निष्फळ करणें, याप्रमाणें शक्य होतें. याप्रमाणें सरकार डावपेंच करून हिंदुस्थानचें मत घटना बिलाबद्दल काय आहे हें सनदशीर रीत्या जगाला कळणें अशक्य करील, ही भीति अगदींच अस्थानीं नव्हती. तथापि अध्यक्षांचे निवडणुकींत आलेला अनुभव लक्षांत घेऊन किंवा वर्तमानपत्रांतून सरकार आपण होऊन सभेचें मत घटना बिलावर अजमविणार नाहीं अशी होत असलेली टीका लक्षांत घेऊन सरकारनें पार्लमेंटच्या संयुक्त कमिटीचा रिपोर्ट (Joint Parliamentary Committee's Report) सभेपुढें विचारार्थ मांडण्याचें ठरवून त्याप्रमाणें सभानेते सर नृपेंद्र सरकार यांनीं जाहीर केलें.

साधारणपणें दरगुरुवारीं सरकारतर्फे सभानेते, हे पुढील आठवड्यांतील सरकारी कामकाजाचा क्रम सांगतात व त्याप्रमाणें कार्यक्रम पत्रिका (Order Paper) सभाखात्याचा चिटणीस तयार करीत असतो. बैठक कोणकोणत्या तारखांस भरणार, खाजगी कामकाज कोणते दिवशीं होणार, हें अधिवेशन सुरू होण्यापूर्वीच गव्हर्नर जनरल जाहीर करीत असतो. कामकाज पुरें न झालें तर बैठक अधिक दिवस चालू ठेवण्याकरितां सरकार अध्यक्षांस सांगतें व अध्यक्ष त्याप्रमाणें जाहीर करीत असतो.

दिल्ली अधिवेशनांत मुख्यत्वें अंदाज–पत्रकांचाच विचार व्हावयाचा असतो; व म्हणूनच या अधिवेशनाला बजेट अधिवेशन म्हणतात. सामान्यपणें जानेवारीचे शेवटीं सुरू होऊन एप्रीलचे पहिल्या अगर दुसऱ्या आठवड्यांत हें अधिवेशन संपतें. रेल्वे-बजेट, सामान्य-बजेट व फडणिशी-कर-योजना बाबत बिल (Finance Bill) यांच्या वादविवादांत व चर्चेत या अधिवेशनांतील बहुतेक दिवस जातात. यामुळें अन्य प्रश्न महत्त्वाचे असले तरी, त्यांना भरपूर वेळ मिळतोच असें नाहीं. सरकारनें रिपोर्ट विचारार्थ मांडण्याचें ठरविलें, व एकंदर या कामाला ५ दिवस देण्याचें ठरविलें. साधारण प्रथा अशी आहे कीं, कामकाजासंबंधीं सरकार विरोधीपक्षांच्या नेत्यांची अनौपचारिक बैठक भरवून तपशील ठरवितात. रिपोर्टावरील चर्चा ही अत्यंत महत्त्वाची बाब होती. एकंदर कामाचा विचार करून चर्चेला ता. ५ फेब्रुवारीला सुरुवात व्हावी व ता. ५।६।७।११ व १२ या दिवशीं चर्चा होऊन १२ फेब्रुवारीला ती संपावी; याप्रमाणें पक्ष नेत्यांची व सभा नेत्याची बैठक होऊन ठरलें व त्याप्रमाणें अध्यक्षांनीं जाहीर केलें. सामान्यपणें बैठकी सोमवार ते शुक्रवार भरतात व शनिवार, रविवार या दिवशीं कामकाज ठेवलेलें नसतें. त्याचप्रमाणें शुक्रवारीं बहुशः खाजगी ठराव अगर बिलें चर्चेकरितां येतात. बैठक सकाळीं ११ ला सुरू होते. ११ ते १२ पर्यंत प्रश्नोत्तरें. प्रश्नोत्तरें संपतांच अगर १२ वाजतांच अन्य कामास सुरुवात होते. १ वा. १५ मिनिटांनीं सभा तहकूब होते, व पुन्हां २ वाजून ३० मिनिटांनीं भरून ५ वाजतां संपते; व पुढें सभा चालविणें झाल्यास सर्व सभेची, निदान फार मोठ्या बहुसंख्य सभासदांची संमति लागते व ती फारच थोड्यावेळां मिळते. यामुळें दररोज चर्चेला फक्त ३।। स मिळतात. या हिशेबानें रिपोर्टाचे चर्चेला ५ दिवस म्हणजे प्रत्यक्ष १८। च मिळणार होते. इतका महत्त्वाचा विषय निवडणुकींत इतका गाजलेला, त्या मानानें हा वेळ अल्पच म्हटला पाहिजे. सरकारी व सरकार नियुक्त सभासद सोडले तरी, १०६ निवडलेले सभासद या सर्वांनीं बोला-

बयाचें व चर्चेंत भाग घ्यावयाचा म्हणजे माणशीं १० मिनिटेंसुद्धां येत नव्हतीं. निवडून आलेले अनेक हितसंबंधाचे प्रतिनिधि होते. प्रत्येकाला, त्याचा सुधारणाविषयक दृष्टिकोण सांगणें अवश्य होतें. किंबहुना तें त्याचें कर्तव्य होतें. अनेक सभासद नामवंत वक्ते होते. राजकारणी पुरुषाचें लोकशाहींत—खऱ्या अगर बेगडी—मुख्य लक्षण म्हणजे भाषणबाजी; तिलाच येथें संयम बसणार होता. सामान्य विषयांवर तासतास बोलणारे पट्टीचे वक्तेही, कांहीं कमी नव्हते. येथें तर विषय महत्त्वाचा; प्रत्येकाला बोलण्याची साहजिक इच्छा व महत्त्वाकांक्षाही होती. इतक्या थोड्या वेळांत, इतक्या महत्त्वाचे विषयावर इतक्या विविध हितसबंधाचे, इतक्या प्रतिनिधानीं बोलण्यास भाग पाडणें म्हणजे कलकत्याचे ब्लॅक होलचीच घटना करण्यासारखें होतें! त्या घटनेप्रमाणेंच—पण अवकाशाऐवजीं काळांत (Not in space but in time) येथेंही वक्त्यांची चिरडाचिरड झाली; चिडाचिडीही झाली हें खेदपूर्वक नमूद करणें जरूर आहे. जास्त वेळ मिळणें हेंही शक्य नव्हते, हेंही सत्य सांगितलें पाहिजे.

मंगळवार ता. ५ फेब्रुवारी रोजीं ही चर्चा सुरू व्हावयाची होती. प्रसंगाचें महत्त्व जाणून वर्किंग कमिटीचे बहुतेक सभासद दिल्ली येथें हजर होते. रविवारी पक्ष सभा भरली, व त्यावेळीं चर्चा होऊन सरकारी ठरावाला कोणती उपसूचना द्यावयाची हेंही ठरलें. वक्ते कोण ठेवावेत हा प्रश्न निघाला असतां ४४पैकीं जवळजवळ ३०चे वर मंडळींनीं बोलण्याची इच्छा व आवश्यकताही दाखविली. तथापि २० सभासद मुक्र झाले व दररोज ४ नांवें द्यावींत असें ठरलें व पहिल्या दिवशीं माझें नांव घालण्यांत आलें. पक्ष नेत्यांचा अनौपचारिक सभेत असें ठरलें होतें कीं, पक्षनेता याला ३०पासून ४० मिनिटें व अन्य सभासदांना फक्त २० मिनिटें; जास्त मिळावयाचीं नव्हतीं. २० मिनिटांत एवढ्या प्रचंड विषयासंबंधीं मुद्देसूद बोलावयाचें हें निःसंशय कठीण काम होतें. जुन्या व जाणत्यानां सुद्धां हें कठीण होतें, मग मजसारख्या नवीन सभासदाला, तर हें मोठें संकटच होतें. माझें हें पहिलें भाषण आणि त्यावर व्यक्तिगत प्रतिष्ठा व लौकिक अवलंबून होता. माझ्यापरीनें मी तयारी करीत होतों. मित्र व विरोधक-विशेषतः महाराष्ट्रांतील विशिष्ट दृष्टीने मजकडे पहात होते. मि. स्मिथ जे पुढें लॉर्ड बर्कनहेड म्हणून गाजले त्यांनीं कॉमन्समधील पहिल्या भाषणानें आपली कीर्ति दिगंत केली. भाषणापूर्वी त्यांनीं आपल्या पत्नीस सांगितलें होतें कीं, 'मी माझें सर्वस्व पणाला लावलें पाहिजे. आज जर मी बाजू मारली नाहीं तर, लागलाच माझा निकाल!' (I must stake everything to-day, if I don't win I am

lost for good") सामान्यपणें पहिल्या भाषणावर ('Maiden speech') कॉमन्स सभेंत सभासदांच्या भवितव्याची कुंडली मांडली जाते. कॉमन्स सभेचा संकेत असा आहे कीं, नवीन सभासदाच्या पहिल्या भाषणाचे वेळीं त्यास अडवावयाचें नाहीं, त्रासही द्यावयाचा नाहीं, उलट सहानुभूति व उत्तेजनच द्यावयाचें, मग तो सभासद कोणत्याही पक्षाचा कां असेना. या व अन्य चांगल्या संकेतामुळें वक्त्यांची व राजकारण धुरंधरांची परंपरा कायम टिकते, नवीन माणसें तयार होतात. त्याजबरोबर पहिलें भाषण बिन तयारीचें, उद्दाम, गर्विष्ठवृत्तीचें, उपदेशाचा व शहाणपणाचा आव आणणारें झालें तर, त्याचा परिणाम सभासदाला कायमचाच भोगावा लागतो. त्या भाषणाचा सभेवर होणारा परिणाम त्याच्या जीवनावर—विधिमंडळाच्या जीवनावर—राहूच्या छायेप्रमाणें पडत असतो. पक्षाचा प्रतोद (व्हिप) हा, बोलणारा सभासद नवीन असल्यास व त्याचें तें पहिलें भाषण असल्यास, सभागृहांतील सभासदांना अनौपचारिक रीतीनें कळवीत असतो. थोड्याबहुत प्रमाणांत असेंब्लीचा लौकिकही असाच आहे. पहिल्या भाषणास सहानुभूतीचें व उत्तेजनाचें असें अनुकूल वातावरण सामान्यत: असतें. बोलणाऱ्या सभासदाचा लौकिकही याच भाषणानें, भविष्यकाळाबाबत रेखाटला जातो.

सर्वसामान्यपणें मिळणारी सहानुभूति तर होतीच पण अनपेक्षित रीतीनें आणखीही सहानुभूति व उत्तेजन मिळणार होतें. निवडून आलेल्या सर्व सभासदासंबंधीं व्यक्तिगत माहितीपत्रकें गुप्तपणें प्रत्येक प्रांतिक सरकारनें आपआपल्या प्रांतांतील सभासदांसंबंधीं हिंदुस्थान सरकारचे सांगण्यावरून तयार करून बैठक सुरू होण्यापूर्वी हिंदुस्थान सरकारकडे धाडलीं होतीं. सदरहू पत्रकांत सभासदांचे खाजगी व सार्वजनिक जीवनविषयक माहिती होती; एवढेंच नव्हे तर प्रत्येकाच्या कमकुवत नसा (Weak points) कोणत्या त्या सांगितल्या असून सदरहू सभासदाबद्दलचें मत नमूद करण्यांत आलें होतें. अशा या पत्रकासंबंधीं बरींच प्रश्नोत्तरें खुद्द असेंब्लीमध्यें झालीं होतीं. पत्रकें गुप्त म्हणून व त्यांतील माहिती सरकारनें केवळ आपले माहितीकरितां गोळा केली, सबब ती सभासदांना देतां येणार नाहीं, म्हणून सरकारतर्फे सांगण्यांत आलें होतें. तथापि या माहितीचा परिणाम सरकारी सभासदांचें निवडून आलेल्या सभासदांशीं जें वर्तन होई त्यांत दिसून येई. कळकळीचे, त्यागी, शिस्तप्रिय कॉंग्रेसचे सभासद कोण, हेतु धरून आलेले कोण, निवडणुकीसाठीं खादीचीं चिलखतें घातलेले कोण, जात्याभिमानी

कोण, खऱ्या राष्ट्रीय एकीसाठीं तळमळणारे मुसलमान कोण, व्यापारी फायद्यासाठीं मताचा सौदा करणारे कोण, हें ओळखून त्या त्या प्रमाणें कार्यकारी मंडळाचे सभासद, निरनिराळ्या भावानें वागत. बाह्यतः सर्वांशीं गोड व सभ्य वागणूक त्यांत बिलकुल चुकत नसत. त्यांच्या वर्तनावरून सभागृहाच्या त्याही भागांतून सहानुभूति मिळणार असें दिसत होतें.

चर्चेला सुरुवात मंगळवारीं (५।२।३५) रोजीं बरोबर १२ वाजतां झाली. सर्व गॅलऱ्या भरून गेल्या होत्या. वर्किंग कमिटीच्या सभासदांपैकीं राजाजी, श्री. वल्लभभाई, सौ. सरोजनीबाई नायडू, वगैरे मंडळी अध्यक्षांचे गॅलरींत विराजमान झालेली दिसत होती. बरोबर १२ वाजत सरकारी सभासदांच्या टाळ्यांच्या गजरांत सभागृह नेते सर नृपेंद्रनाथ सरकार उभे राहिले, व त्यांनीं "सभागृहानें संयुक्त कमिटीचा रिपोर्ट विचारांत घ्यावा" असा ठराव मांडला व सुमारें ३५ मिनिटें भाषण केलें. जातिनिवाड्याबाबतचा त्यांचा विरोध, सरकारी सभासद होण्यापूर्वीपासून प्रसिद्ध होता. तथापि आपल्या भाषणांत सरकारनें नाइलाज म्हणून तो निवाडा मान्य केला आहे, सर्व जातींनीं,एकजुटीनें दुसरा खर्डा तयार केल्यास सरकार त्याचा विचार करील एवढेंच याबाबत सांगितलें. फेडरेशन, 'प्रांतिक स्वायत्तता' या बाबतची प्रगति वर्णन करून हिंदुस्थाननें देऊं केलेली घटना स्वीकारावी अशी विचारसरणी मांडली.कॉंग्रेसची उपसूचना भुलाभाईंनीं मांडली. तिचा सारांश, घटना लोकमतास न विचारतां केली आहे: त्यांत स्वारस्य नाहीं, कांहीं प्रगति नाहीं, सबब ती अस्वीकार्य आहे. नंतर जिना यांनीं आपली उपसूचना मांडली. त्यांत जातिनिवाडा मान्य, प्रांतिकबाबींत संरक्षक बंधनें काढून टाकावींत, व फेडरेशनचा भाग अस्वीकार्य ही विचारसरणी होती. अन्य कांहीं एकदोन उपसूचना होत्या, पण त्या महत्त्वाच्या नव्हत्या. सर्व उपसूचना मांडल्यानंतर आमचे नेते भुलाभाई यांचे भाषणास सुरुवात झाली. ते उभे राहतांच सर्व सभागृहांत टाळ्यांचा प्रचंड गजर झाला. कॉलेजांतून अनुभविलेलें स्टॅंपिंग थोडावेळ चालू होतें. शांतता झाल्यावर त्यांनीं भाषणास सुरुवात केली. ४० मिनिटेंपर्यंत सरस्वतीच बोलत आहे असा भास होत होता. शालीनतेनें जडविलेलें पण निर्दोष विवेचन, मृदुभाषा पण तीव्र विचार, एकामागून एक निघणाऱ्या विचारांच्या लाटा भाषेच्या अप्रतिहत प्रवाहांत, वाणी माधुर्यानें, श्रोतृवृंदांना सुखवीत होत्या. सभासदांचे मनावर होणारा परिणाम हळुवार पद्धतीनें होत असल्यामुळें विरोधकांची न्यायबुद्धि जागृत होत होती, सद्भाव-

नेला आवाहन होत असल्यामुळें ती हळुहळू उमलत होती. ४० मिनिटें केव्हां संपलीं हें कळलेंच नाहीं. असें वक्तृत्व सभागृहांत पूर्वी ऐकिलें नाहीं, हाच लोकमताचा कौल सर्वत्र दिला गेला आणि प्रचंड टाळ्यांचे कडकडाटांत ते खालीं बसले. आम्ही अनुयायांनीं तर त्यांचें अभिनंदन केलेंच, पण विरोधी सभासदांनींही केलें. उपाहाराकरितां सभा स्थगित झाली. २॥ला पुन्हा सुरू झाली, कांहीं तीनचार वक्त्यांचीं भाषणें झालीं, व बरोबर ४॥ वाजतां अध्यक्षांचे नजरेंत मी आलों व त्यांनीं माझें नांव पुकारलें.

माझे अगोदर ५।६ वक्त्यांचीं भाषणें झालीं होतीं. ते सर्व वृद्ध, जाणते व कीर्तिमान होते. सर नृपेंद्र यांचें युक्तिवादपूर्ण भाषण, भुलाभाईंचें हृदयस्पर्शी वक्तृत्व, युरोपियन ग्रुपचे पुढारी सर लिंडसे यांचें समतोलवृत्तीचें वक्तृत्व, नेहमीं धाचकळ व पाल्हाळिक बोलणारे निमगोरे सर हेन्री गिडने, यांनींही प्रसंग ओळखून केलेलें गंभीर भाषण, यामुळें एक विशिष्ट वातावरण सभागृहांत उत्पन्न झालें होतें. भुलाभाईंच्या मागली जागा माझी होती. मी उभा राहिलों खरा, पण क्षणमात्र स्तब्ध होतों. आतांपर्यंत अनेक सभा माझ्या 'गावरान' वक्तृत्वानें गाजल्या होत्या. कोर्टकचेऱ्यांतून लागणारें मुद्देसूद वक्तृत्वही मी थोडेंफार कमविलें होतें. तथापि विधिमंडळांतील वक्तृत्व या दोन्हींपेक्षां प्रभावी व्हावयाचें असेल तर तें निराळें असलें पाहिजे. सोनाराला लोखंड काम जसें अवघड, तसेंच लोहारालाही सोन्याचें कलाकुसरीचें काम अवघड वाटणें साहजिक असतें. येथें दोहोंतील गुणांचा समन्वय हवा होता. कसें पाहिजे याची जाणीव झाली होती, पण तें प्रयत्नानें कमाविण्याइतकी अवकाशही मिळाला नव्हता. मनाशीं आंखलेली रूपरेषा योग्य व पटणारी होती, रंग संगती अथवा उत्कृष्ट शब्दयोजना मात्र जमत नव्हती. कांहीं शब्द अंतर्यामि उसळणाऱ्या भावनांना पूर्णपणें प्रकट करण्यास असमर्थ होते, तर कांहीं जास्त कडवटपणा दाखविणारे होते. स्वातंत्र्याचे ध्येयार्थ चाललेली तळमळ, योग्य प्रमाणांत दाखविण्याकरितां कांहीं शब्दयोजना, घातकी व विपर्यास करणारी होती. तर कांहीं जळजळीत सर्वत्र आग लावणारी, व मित्रांनामुद्धां पोळणारी होती. तात्पर्य बोलण्यास सुरुवात करीपर्यंत शब्दांची अखेरची निवड झालेली नव्हती, म्हणून क्षणभर स्तब्ध होतों. त्यांत कविवर तांब्यांच्या "नववधूचा बावरेपणा नव्हता," झडप टाकणाऱ्या शिकारी श्वापदाचा, निर्णयापूर्वीचा अस्थिरपणा होता. पहिलें वाक्य उच्चारतांच सभेला पहिला, पण पुढें काय येणार याची जाणीव देणारा, धक्का बसला! तें वाक्य पुढीलप्रमाणें होतें. "महाशय, ज्या मनोभूमिकेच्या पार्श्वभूमीवर माझे

मान्यवर नेते यांनीं आज भाषण केलें त्या मनोभूमिकेशीं मी सहमत नाहीं, हें माझें दुर्दैव आहे." ("Sir, it is my misfortune that I cannot share the mentality which is behind the speech of my esteemed Leader who spoke this morning") यानंतर काँग्रेसच्या मुंबई अधिवेशनांतील ठरावाच्या अनुरोधानें संपूर्ण स्वातंत्र्याचे निकषावर रिपोर्टांतील घटनेंतील मुख्य मुद्दे तपासले. फेडरेशन, प्रांतिकसत्ता, संस्थानें, हिंदुमुसलमान प्रश्न, संरक्षक बंधनें या सर्व मुद्दयांवर चर्चा केली. स्वातंत्र्य याचा अर्थ व पहिलें लक्षण ब्रिटिश संबंध तोडणें, हें दाखविलें. ब्रिटिश संबंध मान्य केला कीं, संरक्षक बंधनें आलीं, संरक्षक बंधनें आलीं कीं, तीं सर्वांनाच आलीं. मग त्यांत संस्थानिक आले, अल्पसंख्याक आले व हे सर्व आले म्हणजे स्वातंत्र्य गेलें! मागील युद्धांतील मदत जगाचे स्वातंत्र्याकरितां केली व माझा देश मात्र परतंत्र राहिला! लक्षावधि हिंदी सैन्याचा, साम्राज्यशाही टिकविण्यासाठीं संहार झाला. हिंदुस्थानांतील दारिद्र्याचें महाकारण पारतंत्र्य व ब्रिटिश संबंध आहे तोंपर्यंत तें राहणार: ब्रिटिशांकडून न्याय मिळेल याला आधार नाहीं. आपण होऊन ते आमच्या हवालीं स्वातंत्र्य करतील अशी आशा करणें व्यर्थ आहे. हिंदुमुसलमान हा प्रश्न इंग्रजांच्या सत्तेमुळेंच उत्पन्न झाला आहे. जर स्वातंत्र्याच्या वृक्षानें येथें मूळ धरावें म्हणून हिंदुमुसलमानांत यादवी होऊन रक्त वाहणें अवश्य आहे असाच इतिहासाचा संकेत असेल, तर तें होऊं दे; मात्र ब्रिटिशांच्या देखरेखीखालीं नको-("If the process of history requires that Hindus and Muslims should fight each other and shed their blood before the plant of freedom can take root, let it be done, but not under British aegis") दिलेली घटना, प्रतिगामी, संचितवाल्यांचें, संस्थानिक, सावकार, भांडवलवाले, गोरे व काळे यांचें वर्चस्व कायम करणारी, बहुजन समाजाचे हितविरोधी, सर्व दृष्टीनीं त्याज्य, म्हणून ती परत घ्या. "परमेश्वरासाठीं म्हणून परत घ्या आणि मी 'नष्ट व्हा' असें म्हणत नाहीं, कारण तसें म्हणणें सुशिष्ट व समोचित होणार नाहीं." ("For God's sake take it back and I won't add 'and be damned' for it may not be exactly Parliamentary or proper") एवढें बोलून बसलों. वास्तविक २० मिनिटांची मर्यादा मी केव्हां ओलांडली हें मला कळलें नाहीं, व भाषणाचे प्रवाहांत अध्यक्षांनींही लक्ष दिलें नाहीं! ठरलेल्या वेळेपेक्षां कोणी जास्त बोलल्यास 'वेळ संपला' म्हणून अन्य सभासद ओरडतात, तसेंही कोणी ओरडलें नाहीं. सर्व सभासद मुग्ध होऊन भाषण ऐकत होते.

माझ्यासमोर सरकारी सभासदांच्या रांगा होत्या. इंग्रज सभासद चुळबुळ करीत व रागावलेले दिसत होते. वरच्या मजल्यांतील स्त्रियांची गॅलरी बरोबर समोरच होती; तेथें दिसणारा परिणाम सुखवीत होता, व उत्तेजन देणाराच होता! मधून-मधून पडणाऱ्या टाळ्यांमुळें माझा आत्मविश्वास वाढत होता. शेवटचें वाक्य उच्चारून खालीं बसतांच टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. अध्यक्षांनीं दुसरे दिवसांपर्यंत सभा स्थगीत केल्याचें जाहीर करून अध्यक्ष आपले खोलींत गेले.

माझेभोंवतीं गर्दी जमली. कॉंग्रेसपक्षीय व विशेषतः तरुण सभासद यांनीं अभिनंदनाचा वर्षावच केला. जिन्हा येऊन म्हणाले, 'भाषण उत्कृष्ट झालें.' ("Mr. Gadgil, it is damned good") श्री. अणे यांनीं मनःपूर्वक अभिनंदन केलें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सर्व हिंदी सभासदांनीं, सरकारी, सरकार-नियुक्त, हिंदु, मुसलमान, पार्शी–सर्वांनीं अभिनंदन केलें. मी कागदपत्र घेऊन बाहेर आलों. तेथें सौ. सरोजिनीबाईंनीं खूप अभिनंदन केलें. सरदारांनीं "पहिलें वाक्य नको होतें, बाकी उत्तम झालें," असें म्हटलें! प्रेक्षकांमध्यें मला जवळ येऊन पाहण्याची उत्सुकता दिसत होती. श्री. वालचंदशेटही प्रेक्षकांत होते त्यांनींही अभिनंदन केलें, व महाराष्ट्राच्या लौकिकाला साजेल असेंच भाषण झालें म्हणून उद्गार काढले. वर्तमानपत्राच्या बातमीदारांनींही हजेरी दिली. तात्पर्य माझा 'भाव' भलताच वाढला. वस्तुतः मला इतकें होईल याची कल्पना नव्हती. घरीं पोहोचतांच तेथेंही कांहीं मंडळी भेटण्यास आलेली दिसली. श्री. तटणीस, संपादक विविधवृत्त यांचे भाचे श्री. नेरुरकर हे आमचे बरोबर राहत होते, व ते सर कावसजी जहांगीर यांचे सेक्रेटरी म्हणून आले होते. त्यांनीं पण प्रेक्षक वर्गातील लोकमत विस्तृतपणें सांगितलें. झालेल्या घटनेबद्दल आनंद वाटणें साहजिकच होतें. दुसरे दिवशीं व नंतर अनेक वर्तमानपत्रांतून खास बातमीदारांनीं केलेली झडती व अनेक पत्रांतून आलेले फोटो पाहून अभिमान वाटूं लागला, हें कबूल करणें जरूर आहे. मागील १५ वर्षांच्या सार्वजनिक जीवनांतील अनुभवाला विसंगत असें होत होतें. विरोध, विद्वेष, केलेल्या गोष्टींचा विपर्यास, या शस्त्रास्त्रांना तोंड देत देत प्रगतीच्या प्रत्येक पावलागणिक झगडत आलों होतों. मीं केलेल्या कोणत्याही कृत्याबद्दल अभिमान बाळगणारी व सहानुभूति दाखवून हातीं घेतलेल्या कार्यांत उत्तेजन देणारी एकच व्यक्ति होती. सार्वजनिक धकाधकीच्या जीवनांत प्रसंगीं बेताग, प्रसंगीं अपयश येई त्याही वेळीं आपल्या मधुर, पण कार्यप्रवणवृत्तीनें पुन्हां विजिगीषा

दुप्पट करणारी व्यक्ति माझी पत्नी माझा अनन्यसाधारण मित्र होती व आहे. आम्ही तुरुंगाप्रमाणें जीवन आचारावें हा दंडक शिरसा मान्य करून, आम्ही सडे आलों होतों. बाकीच्यानीं आमच्यासारखा शब्दशः अर्थ घेतला नव्हता! साहजिक मी तिला धाडलेल्या पत्रांत झालेला आनंद, सान्निध्यानें दुप्पट झाला असता असें लिहिलें असें मी सांगितलें तर, ही खाजगी गोष्ट जाहीर केल्याबद्दल सदभिरुचिप्रियवाचक मला क्षमाच करतील.

वर्तमानपत्रांतील बातमीदारांनीं जरी वर्णनें केलीं तरी अ. प्रे. च्या बातमीदारानें भाषणाचा त्रोटकच गोषवारा दिला होता, व याचें कारणही उघड होतें. भाषण अत्यंत जहाल, सडेतोड, स्पष्ट शब्दांत झालेलें असल्यामुळें, सरकारला तें मोठ्या प्रमाणांत वर्तमानपत्रांत येणें इष्ट नाहीं, असें वाटणें साहजिकच होतें; सरकारला वाटणारी गोष्ट या बातमीदारांना नेहमीचे पद्धतीनें कळते, व त्याबरहुकूम सर्व गोष्टी होतात; तसेंच झालें. तथापि मी आपल्या भाषणाच्या संपूर्ण प्रती, अनेक वर्तमानपत्रांना धाडल्या. भाषण होत असतांना सरकारीं लघुलेखक तें टिपून घेतात. त्याच रात्रीं भाषणाची समग्र कॉपी टाईप होऊन सभासदांकडे येते. भाषणांत व्याकरणदृष्ट्या जेवढी दुरुस्ती करावयाची असेल, अगर न बोललेला शब्द लिहिला असेल, तेवढ्यापुरती दुरुस्ती करण्यास परवानगी असते. याप्रमाणें दुरुस्त करून दुसरे दिवशीं दुपारी ५ चे आंत, तें असेंब्ली खात्यांतील नोटीस कचेरींत ( Notice office ) दिलें पाहिजे. याप्रमाणें मुदतींत न झालें तर, लघुलेखकांनीं जी कॉपी केली असेल, त्याप्रमाणें भाषण सरकारी रिपोर्टांत छापलें जातें. मी माझें भाषण तावडतोब दुरुस्त करून धाडलें, व त्याच्या अनेक प्रती मराठी वर्तमानपत्रांकडे धाडल्या. विस्तृत गोषवारा, फक्त लोकशक्ति, विविध वृत्त व नवाकाळ यांतच आला. बाकीच्या वर्तमानपत्रांतून बरीच छाटछाट झाली होती. मी त्यांना दोष देणें योग्य होणार नाहीं. पण ज्यांनीं विस्तृतपणें दिलें त्यांचें व विशेषतः विविधवृत्ताचें अभिनंदन केलें, तर यथायोग्यच होणार आहे. दिल्लीमधील 'स्टेटसमन' पत्रांत या भाषणाबद्दल खटला करावा, अशीही सूचना केली होती. सभागृहांत केलेल्या भाषणाबद्दल खटला होऊं शकत नाहीं, या गोष्टीचा दुरुपयोग मीं केला असेंही त्यानें सुचविलें होतें. प्रत्यक्ष सरकारला व महाराष्ट्रीय जनतेला पूर्णपणें माझी भाषणपद्धति माहीत होती. स्थलपरत्वें भाषणाभाषणांत भेद करण्याचें चातुर्य दाखवून, पटलेल्या सत्याशीं प्रतारणा करून आपलें मुत्सद्दीपण शाबित करण्याची आव-

श्यकता मला कधींच वाटत नाहीं. कदाचित् हा दोषही असेल. १९३४ अखेर डिसेंबर महिन्यांत सातारा जिल्हा परिषद बिळाशीं येथें भरली होती, तिचा मी अध्यक्ष होतों. हजारों लोकांपुढें त्यावेळीं केलेलें भाषण, व सभागृहांतील भाषण, हीं दोन्हीं एकाच गोलाचीं होतीं. त्याबाबत राजद्रोहाचा खटला करावा म्हणून साताऱ्याचे डि. मॅ. नें मुंबई सरकारकडे परवानगी मागितली होती. कायदेमंडळांतील सभासदावर खटला करून त्यांस पकडण्याचे वेळीं, जर तो अधिवेशनानिमित्त दिल्लीस अगर सिमल्यास असेल तर, त्याला पकडण्यास हिंदुस्थान सरकारची परवानगी लागते. त्यामुळें मुंबई सरकारनें सर्व कागदपत्र याच सुमारास हिंदुस्थान सरकारकडे धाडले होते. हिंदुस्थान सरकारला कांहीं करावयाला ही संधि होती. पण हिंदुस्थान सरकारनें संमति दिली असती तर, त्याचा अर्थ विकृत होण्याचा संभव होता; जनतेनें सभागृहांतील भाषणांचें उट्टें सरकार काढीत आहे असा अर्थ घेतला असता. सरकारनें प्रकरण फेटाळलें एवढीच गोष्ट मला कळली. दोन्हीं भाषणांबद्दल कांहीं झालें नाहीं. सभागृहांतील भाषणांत बेअब्रूकारक, सदभिरुचीला सोडून अगर राजद्रोहात्मक असेल तर तें अध्यक्षानें वक्त्यास परत घ्यावयास लावावें, अगर अधिकृत रिपोर्टांतून तें वगळावें, असे नियम आहेत त्याहीप्रमाणें कांहीं झालें नाहीं. राजद्रोह हा मानला तर आहे नाहीं मानला तर तो 'जहाल टीका' एवढाच त्याचा अर्थ. प्रत्यक्ष न्यायाधीश ज्या वृत्तीचा असेल त्यावरच हें अवलंबून राहणार. दीर्घदृष्टि, व्यापकबुद्धि, समतोलवृत्ती एवंगुणाविशिष्ट न्यायाधीश एका दृष्टीनें विचार करील तर उलट अल्पदृष्टि,संकुचित बुद्धीचा भावनावश न्यायाधीश सामान्य व रास्त टीकेलासुद्धां राजद्रोह मानील. हा सगळा धोका पत्करून, ज्या वर्तमानपत्रांनीं सदरहू भाषण छापलें त्यांना धन्यवादच दिले पाहिजेत.

असो, असेंब्लीमधलि माझ्या भाषणाबद्दल त्यावेळीं आनंद मला वाटला आणि अभिमानही वाटला. स्वतःच्या फणीवर खूष होऊन नाग डोलतो, पिसाऱ्या वर खूष होऊन मोर नाचतो, यांत अभिमान अगर अहंकारापेक्षां स्वाभाविकताच जास्त नाहीं कां? मला कबूल करणें भाग आहे कीं मात्र माझ्या बाबतींत अभिमानच जास्त होता. मनाला अहंकाराची चाहूल पण लागली व त्याचीं पाऊलें अस्पष्टरीतीनें कां होई ना ऐकूं येऊं लागलीं होतीं. भुताप्रमाणेंच अहंकाराचीं पाऊलें उलटीं असतात!! एक विशिष्ट गोष्ट झाली नसती तर मी कदाचित् वाहवलों असतों. मी भाषणें 'जास्त जबाबदार रीतीनें' करावयास पाहिजेत असा महात्माजींचा अभिप्राय आहे असें मला

कळलें! मी हें खरें आहे काय हें मुद्दाम पाहिलें नाहीं. पण थोडेसें आत्मनिरीक्षण केल्यानंतर तसें वागण्याचें ठरविलें हें मात्र खरें. भाषणांतील विचार व सत्य, जास्त गोड अगर मृदु भाषेंत खास सांगतां आलीं असतीं, व कदाचित् तितकाच परिणाम झाला असता. परंतु ज्या वातावरणांत, उमलणाऱ्या यौवनांत मी वावरलों होतों, त्या वातावरणांत भाषेचा संयम म्हणजे हृदयाची व विचाराचीही भीरुता असा अर्थ केला जात होता. आयुष्यांतील ज्या काळांत म्हणजे वयाचे १२ ते २०, मनुष्याची मनोभूमिका आकार धरते, त्या काळांत मी पुण्यांत विद्यार्थी होतों. १९०८ ते १८ मधील पुण्यांतील राजकीय वातावरणांत, ज्वलज्जहाल जो बोलेल तोच देशभक्त होता. कृतीपेक्षां शब्दाला जास्त भाव होता. संयम, सहिष्णुता, सार्वजनिक आयुष्यांतील सौजन्य हें तिरस्कारलें जाई. या वातावरणाचा परिणाम तरुण पिढीवर होणें अपरिहार्य होतें. माझ्या भाषणामागें कांहीं तरी कां होई ना, कृतीची पार्श्वभूमि होती म्हणून, बोलघेवडेपणाचा आरोप करणें शक्य नव्हतें. तथापि, मला जास्त जबाबदारीनें बोलणें शक्य होतें, व तें अधिक चांगलें झालें असतें, असें आज कालांतरानें वाटतें. "न ब्रूयात् सत्यमप्रियम्" हा सनातन धर्म आकर्षक वाटतो. तथापि अप्रिय पण सत्य बोलणेंही प्रसंगीं धर्म असतो हेंही खोटें नाहीं. सदभिरुचीची मर्यादा सहसा ओलांडली जात नाहीं. मात्र निष्ठुर सत्य निर्णयात्मक भाषेंत बोलावें कीं संयमानें बोलावें याचा विवेक ठेवून प्रसंग ओळखावा लागतो. मनुष्य कधीं कधीं चुकतो. मीही चुकतों. सिद्ध अवस्थेपेक्षां साधकाची अवस्था श्रेष्ठतर म्हणतात. मीही साधक आहें. प्रयत्नांची उपासना करीत आहें.

एकसारखें पांचदिवस संयुक्त रिपोर्टावर चर्चा झाली. पहिले दिवसाइतकें विवेकी वातावरण पुढेंपुढें राहिलें नाहीं. वादविवादांत जातीय तेढ उघडउघड दिसूं लागली. इंग्रज सभासदांना यामुळें अर्थात् आनंद वाटे. जातिनिवाड्याचे मुसळानें यादवीला चांगलेंच कार्यक्षेत्र दिलें. अणे यांचें भाषण नेहमीं मुद्देसूद व प्रसंगीं उच्च दर्जाच्या वक्तृत्वाचें असतें. जातिनिवाड्याबाबत ते तळमळून बोलले. राष्ट्रीयत्वाला विघातक हें त्याचें उघड लक्षण जास्त तीव्रतेनें त्यांनीं मांडलें. त्यांच्याकडे लोकमान्यांच्या राजकारणाचे विद्यमान प्रतिनिधि म्हणून मजप्रमाणें अनेकजण पहात होते. प्रतिपक्षाची कुटील नीति ओळखून, चातुर्यानें प्रसंग पाहून, तडकाफडकीनें कार्य साधणें, यांत लोकमान्यांचें श्रेष्ठत्व होतें. हिंदुमुसलमानांच्या ऐक्याभावीं राजकीय सुधारणा न देण्याचा डाव लखनौ करार चातुर्यानें घडवून आणून त्यांनीं

उचलून लाविला होता. तेंच चातुर्य व प्रासंगिकता श्री. अणे यांचेकडून अपेक्षिली होती. तथापि यावेळीं तरी तें घडून आलें नाहीं. पहिल्या गोलमेज परिषदेचे वेळेस सर महंमद शफी यांनीं मुसलमानांतर्फे अशी सूचना केली होती कीं, लोकसंख्येचे मानानें प्रतिनिधित्व व संयुक्त मतदारसंघ जर हिंदूंना पसंत असेल, तर त्यांनीं १५ मिनिटांत मान्यता द्यावी. यांत बंगालमधील हिंदूंना शिक्षणानें, संपत्तीनें, प्रांतांत वर्चस्व असूनसुद्धां संख्येनें कमी असल्यामुळें, प्रतिनिधित्व वर्चस्वाप्रमाणें मिळणार नव्हतें. शीख जातीला आपण लढाऊ म्हणून लोकसंख्येपेक्षां जास्त प्रतिनिधित्व पाहिजे होतें. तथापि सर शफी यांच्या सूचनेनें सर्वत्र एकसूत्रीपणा येत होता, व संयुक्त मतदारसंघ त्यांत असल्यामुळें, अल्पसंख्याकाचे मग ते कोणत्याही धर्माचे असोत, हितसंबंध सुरक्षित रहात होते; व राष्ट्रीयत्वही अबाधित रहात होतें. गोलमेज परिषदेंतील मुसलमान सभासद सर शफीवर चिडले होते. जर सर शफी यांची सूचना स्वीकारली असती तर, जातिनिवाडा टळला असता आणि ब्रिटिश सरकारवर मात झाली असती. सदरहू सूचना फेटाळून लावण्याचें पुण्यकार्य डॉ. मुंजे यांनीं केलें व करविलें; व पुण्यांतील १९३१ मध्यें एका सभेंत हें टिळकांचें राजकारण केलें असेंही सुचविलें !! डॉ. मजकूर नेत्रवैद्य आहेत, राजकारणांतील त्यांचीच दृष्टि यावेळीं तरी मंददृष्टिच ठरली व ते दूरवर पाहूं शकले नाहींत !! याही घटनेचा उल्लेख वादविवादाचे वेळीं झाला. शीख सभासद सरदार संतसिंग यांनीं शिखांतर्फे म्हणून जें भाषण केलें, त्यानें शीख हे लढाऊ आहेत एवढें मात्र शाबित झालें !! मोठ्या आवाजाला, कंकण असलेला हात पूर्वपश्चिम, दक्षिणोत्तर फिरवून टेबलावर वारंवार आपटल्यानें साथ देत होता. मुसलमानांना आव्हान, इंग्रजांना आव्हान देतदेत त्यांनीं आपलें भाषण दणदणविलें. सामान्य बिनपक्ष हिंदुमुसलमान सभासदांनीं, मुत्सद्दीपणांतील उणीव मुखमस्ति म्हणून खूप बोलून व वाटेल तें बोलून भरून काढली. बहुतेक भाषणांतून इंग्रजांबद्दल तीव्रता कमी, जातीय हिताचा विचारच जास्त; अपवाद म्हणून कॉंग्रेसपक्षीय सभासदांच्या भाषणांचा निर्देश करावा लागेल.

पं. गोविंदवल्लभ पंत यांनी आपल्या व्यासंगपूर्ण भाषणांत घटनेच्या मुख्यमुख्य भागांचें भेदक पृथक्करण केलें होतें. पंतजी म्हणजे शरीरानें जसे भव्य आहेत, तशीच त्यांची विद्वत्ता भव्य आहे. बाजूनें पाहिलें म्हणजे (Profile) ते न्यायमूर्ति रानडे यांचेसारखे दिसतात. शरांमागून शर, जसे अर्जुनाच्या अक्षय्य भात्यांतून निघत त्याप्रमाणें पंडितजींचे विचार, त्यांचीं विधानें मुखांतून पडत. बाणांना जसें

पीस लावतात व त्याचा समतोलपणा ठेवितात, त्याचप्रमाणें तर्कशुद्धता ही त्यांच्या विधानांची बैठक असते. लक्ष्यभेद त्याचमुळें अचूक असतो. त्यांनीं आपल्या भाषणानें मुख्य मुद्दा स्वातंत्र्यप्राप्ति, याकडे सभागृहाचें लक्ष खेंचून आणलें. सत्यमूर्ति हे नामवत वक्ते म्हणून गाजलेले होते. बोलण्याचे ते इतके शोकी होते कीं, कदाचित् इंग्रज मुत्सद्दी फॉक्सप्रमाणें जर एखादे दिवशीं भाषण त्यांनीं केलें नाहीं तर त्यांना झोंपही येत नसावी. सर्वांत जास्त प्रश्न विचारून जास्तींत जास्त उपप्रश्न (Supplementary Questions) विचारून त्यांनीं मद्रास कायदेमंडळांत विक्रम केला होता. पुढें एकाप्रसंगीं एकानें "श्री.सत्यमूर्ति हे जन्मतःच उपप्रश्न विचारत जन्मले (Mr. Satyamurti is born with a supplementary in his mouth) अशी कोटी केली होती. सर हेनरी गिडने यांनी त्यांना थट्टेनें उपप्रश्नमूर्ति (Supple Murti) हे नांव दिलें होते. तथापि हेंही खरें कीं, त्यांच्याइतका अभ्यासू, सभेचें हजेरींत इतका नियमित, व सभाविषयक कामकाजाचे माहितींत इतका तज्ज्ञ (Well-versed in Parliamentary Practice and Procedure) कोणीही म्हणण्यासारखा नव्हता. इंग्रजी भाषा त्यांची खरोखरच दासी होती. त्यांचें भाषण सर्वांनीं उत्सुकतेनें ऐकिलें. विस्तृत भाषण करून सर्व मुद्दे मांडले; पण सभा हालविली असें मात्र निश्चित म्हणतां येत नाहीं. सारखी तोफखान्याची सरबत्ती असावी पण प्रगति नसावी असें झालें! कांहींचीं भाषणें प्रतिपक्षाला उधळून लावणारीं असतात. कांहींचीं प्रतिपक्षाला चौबाजूंनीं घेरून विद्ध करणारीं असतात. कांहींच्या भाषणांत संमोहनास्त्राचा प्रयोग असतो. तात्पर्य, सर्व तऱ्हेचे नमुने प्रकृति स्वभावानुरूप कायदेमंडळांत दिसून येतात; ते याही वेळेस तसे आले.

बॅ. जिना हे एका दृष्टीनें असामान्य गृहस्थ आहेत. त्यांचें उत्कृष्ट शील, त्यांची पूर्वींची राष्ट्रीयवृत्तीची कामगिरी, जातीय दृष्ट्या त्यावेळीं सुद्धां त्यांना प्राप्त झालेलें महत्त्व लक्षांत घेतां, त्यांच्या भाषणांकडे सर्व सभा विशिष्ट दृष्टीनें पहात होती असें म्हणणें गैर नाहीं. गोलमेज परिषदेच्या पहिल्या अधिवेशनापासून त्यांनीं फेडरेशनला विरोध केला होता. दुसऱ्या अधिवेशनाचें वेळीं त्यांना फेडरल् स्ट्रक्चर कमिटींतून मुद्दाम वगळण्यांत आलें होतें असें म्हणतात. फेडरेशनला त्यांचा विरोध मध्यवर्ती सत्तेंत मुसलमान अल्पसंख्याक राहतील म्हणूनच होता, हें उघड आहे. संस्थानिक संयुक्त घटनेंत ( फेडरेशन ) आले तर एकंदर प्रतिनिधित्व मुसलमानांना त्यांच्या लोकसंख्येचे मानानें अधिक पाहिजे होतें. शिवाय शेषाधिकार

प्रांतांना असावेत अशीही त्यांची मागणी. मध्यवर्ति सत्तेला शक्य तितके अधिकार कमी असावेत हाच त्याचा अर्थ होता. संयुक्त रिपोर्टांत याविरुद्ध होतें. दोन्ही-कारणांकरितां त्यांचा विरोध फेडरेशनला होता. प्रांतिकसत्ता, संरक्षक बंधनें असलीं तरी हवी होती; मात्र सदरहू बंधनें नकोत, असूं नयेत अशी त्यांची उपसूचनाही होती. मिळेल तें घ्यावें ही वृत्ती त्यांची होती, पण यांत आणि प्रतियोगी सहकार-वाले यांचे तत्त्वज्ञानांत फरक होता. त्यांचें तत्त्वज्ञान रगेल होतें. प्रतियोगी सहकार-वाल्यांचें रडकें होतें. डॉ. सावरकर यांनीं १९२५ सालीं पालघरचे परिषदेंत प्रति-योगी सहकारिता ही पराभूतांचें राजकारण आहे, असें सांगितलें होतें. (Responsible co-operation is the policy of the defeated") पराभव झाला असतां हेंच करावयास पाहिजे असें त्यांनीं प्रतिपादलें होतें. जिना हे जें मिळालें ते आपल्या पराक्रमाचे मानानें, योग्यतेचे मानानें, न्यायाचेही दृष्टीनें, अपुरें आहे, तथापि तें घेऊन प्रतिपक्षांवर उपकार करीत आहोंत या रगेल वृत्तीनें वागणारे होते. तथापि कोणत्याही परिस्थितींत सत्याग्रह (Direct Action) असहकार करावा याविरुद्ध ते होते. एकदां बोलतांना त्यांनीं मला असें सांगितलें कीं, "जर आपण संघटित व एक झालों तर, याच सभागृहांत आपण स्वातंत्र्य कमवूं. ("If we are organised and united, we will achieve freedom inside these walls" इतका विश्वास त्यांचा कायदे-मंडळाचे शक्तीवर व सनदशीरपणावर होता व अद्यापि असावा असें वाटतें.

त्यांची राजकीय व मानासिक पार्श्वभूमि लक्षांत घेतां, त्यांची उपसूचना सुसं-गत अशीच होती. जातीयनिवाडा हिंदूंच्यामुळें द्यावा लागला; त्यांतही मुसलमानांना पूर्ण न्याय झाला नाहीं. प्रांतिक सत्तेंत कांहीं प्रगति आहे, तथापि संरक्षक बंधनें दूर व्हावींत अशी विचारसरणी मांडून मध्यवर्ति सत्तेच्या भागावर त्यांनीं खूपच सरबत्ती उडविली. भुलाभाईंनीं सत्ता मिळविणें हें पहिलें कार्य व त्याची बिभागणी हें दुय्यम महत्त्वाचें, म्हणून म्हटलें होतें; त्याला उत्तर देतांना जिना म्हणाले बिनशर्त अगर तडजोड न होतां सत्ता मिळाल्यास ती बहुसंख्य जातीलाच मिळणार, या स्थितींत अल्पसंख्याक समाजानें जागृत राहिलें पाहिजे. मुसलमानां-नाही स्वराज्य पाहिजे, पण हिंदुराज्य नको म्हणून वादविषयक घटना तेवढ्यापुरती त्याज्यच आहे. व्यवहारांतील प्रत्येक प्रश्न जातीय दृष्टीनें कोणी पहात नाहीं. प्रगति-पर राजकारण सुरू झालें म्हणजे आर्थिक वर्गदृष्ट्या राजकारणाची घडी बसत जाते, व त्याप्रमाणें जातिनिर्विशेष पक्षसंघटना होते हें जिनांना कळत नव्हतें असें नव्हे.

त्यावेळीं तरी मुसलमानांचे हिताकरितां जास्तींत जास्त संरक्षक बंधनें व त्याप्रमाणें प्रतिनिधित्व (Weightage) मिळावें हाच हेतु होता. द्विराष्ट्रभावना त्यावेळीं नव्हती. पाकिस्तानचा स्पर्श निदान त्यांचे मनाला झालेला नव्हता. त्यावेळचें त्यांचें भाषण आग्याचें अगर धमकीचें नव्हतें, कडवटपणाही त्यावेळीं नव्हता. जिना म्हणजे आविर्भावात्मक वक्तृत्व हेंच खरें. शेवटीं बोलावयाचें, सभागृहांतच मुद्दे जुळवावयाचे, आधीं बोललेल्या वक्तयांचे मुद्दे घेऊन कमी जास्त करून, प्रसंगीं गांभीर्याचा आव आणून, जबाबदारी नेहमीं आपणच ओळखतों अशी भाषा वापरून निःस्वार्थी स्पष्टवक्तेपणाच्या जोरावर ते सभागृहावर परिणाम करतात. भावना उचंबळविणारें वक्तृत्व त्यांचें नाहीं. राजकारणांतील मोठ्या व महत्त्वाच्या प्रश्नाकडे मुद्धां वकिलींतील किचकट दृष्टि त्यांची असते. देशाच्या राजकारणांत प्रसंगीं सावधानपणा सोडून व्यापक हितार्थ धोका पत्करावा लागतो. संकुचितवृत्ति व बुद्धीचा तिरकसपणा सोडतांच गुंतागुंतीचे अनेक प्रश्न सुगम व सरळ होतात; हा अनुभव घेण्यास ते तयार नसतात. विश्वास द्यावा व घ्यावा लागतो, यांतील पहिला भाग ते क्वचितच अंमलांत आणतात. लोकांचें म्हणणें ऐकावयाचें, व ऐकतच राहावयाचें, आपलें म्हणणें, विशेषणें, क्रियाविशेषणें यांनीं जागोजागीं बंदिस्त करावयाचें अशी त्यांची वागणूक त्यावेळीं तरी दिसे. वैयक्तिक मानापमानाला ते अधिक महत्त्व देत असल्याचें दिसे. बोलतांना ते कसेंही बोलले तरी " मी म्हणजे सर्व " हें त्यांचें खरें जीवनसूत्र आहे. मी म्हणजे सभा, मी म्हणजे मुसलमान, या वृत्तीचा आविर्भाव प्रसंगीं शालीन दिसला तरी तत्त्वतः त्यांच्यांत केव्हांच फरक होत नसे. त्यांच्या भाषणामुळें मुसलमान समाजाच्या एका दृष्टिकोणाचें निदर्शन झालें. त्यांचेपूर्वी राष्ट्रीय मुसलमान कॉंग्रेसपक्षांतील व बाहेरील, यांनीं आपलें म्हणणें मांडलेंच होतें.

जिनांच्या भाषणानंतर सरकारतर्फे ठराव मांडणारे सर नृपेंद्र यांचें उत्तरादाखल भाषण झालें. त्यांचें भाषण होण्यापूर्वी पण त्याच दिवशीं, सुरुवातीस जीं भाषणें झालीं, त्यामुळें सभागृह म्हणजे बखेडागृह असें दिसून आलें. जातिनिष्ठ सभासदांनीं, व त्यांत सर्व जातींनीं प्रतिनिधित्व घेतलें होतें, बेजबाबदार भाषणांनीं वातावरण दूषित केलें होतें. कांहीं सभासदांना शेवटीं असें वाटूं लागलें की हा वादविवाद नको, मतें घेणें नको; सरकार जर आपला ठराव परत घेईल तर बरें. या परिस्थितीचा फायदा सरकारनें घेण्याचें ठरविलें असावें. कारण सुमारें ३॥ चे सुमारास सभानेते सर नृपेंद्र सभागृहाबाहेरील जागेंत मला भेटले असता

म्हणाले, "एकंदर प्रकार पाहून तुम्हांस जर सबंध ठराव सरकारनें परत घ्यावा असें वाटत असेल तर, अर्ध्या तासांत मला कळवा म्हणजे त्याप्रमाणें सभागृहाची परवानगी मागून तो परत घेतां येईल." मी तावडतोब ही गोष्ट आमचे नेते भुलाभाई यांना कळविली. प्रेक्षकांत बसलेल्या राजाजींना बोलावून आणिलें; त्यांचें म्हणणें असें "ठराव परत घेतला तर घटनेबाबत इतका मतभेद देशांत आहे कीं, मतप्रदर्शन करणें सुद्धां मध्यवर्ति कायदेमंडळानें टाळलें; फेडरेशन हा घटनेचा आत्मा व केंद्र आहे तें फेटाळलें म्हणजे, घटना फेटाळली हें उघड आहे व या कामीं बहुसंख्याक सभासद कॉंग्रेसचे बाजूस राहणार." जातिनिवाडा जिनांच्या उपसूचनेंत मान्य असला तरी वरील कारणांसाठीं तो फेटाळला जातो, असें एकंदर स्वरूप सिद्ध होतें. गाडीच नाहीं तर आंत किती स्वाऱ्या बसावयाच्या हा प्रश्नच शिल्लक राहत नाहीं. हाच एकंदर घटनेचा सनदशीर अर्थ होईल. देशाचें मत निर्णायक रीतीनें जगाला दाखविणें हें जास्त महत्त्वाचें आहे. वर्किंग कमिटीचे अन्य सभासदांनीं या बाबतींत सर्व जबाबदारी राजाजींवरच टाकली होती. राजाजींची एतद्विषयक योग्यता असामान्य आहे. त्यांची कार्याकार्य जाणणारी अचूक विचारसरणी, बिनतोड कोटिक्रम, सुगम भाषा व नेहमींचे दृष्टान्त यामुळें त्यांचें म्हणणें बुद्धीला पटतें. विरोधक निरुत्तर होतात, पण त्यांना राग येत नाहीं; त्यांची वादविवादाची पठडीच (Approach) अशी विलक्षण आहे. विरोधकाबरोबर इंचच काय मैलभर मागें जातात. त्याचा विश्वास संपादन करून आपल्याबरोबर मग त्याला दोन मैल पुढें नेतात, नव्हे तोच जातो! थोड्यावेळांत, किंबहुना कांहीं क्षणांत हा निर्णय घ्यावयाचा होता. युद्धांत असे अनेक प्रसंग येतात असेच अनेक प्रसंग सभाविषयक कामकाजांत आम्हांपुढें पुढें आलें. अशाप्रसंगीं काय धोरणानें वागावें याचें शिक्षण, जें त्यावेळीं मला मिळालें, तें आयुष्यांतील मी एक अमोलिक ठेवाच समजतों. राजाजींच्या विचारसरणीप्रमाणें निर्णय आम्ही घेतला, व त्याप्रमाणें सभागृहनेते यांना मी कळविलें.

सदरहू निर्णयामुळें सर नृपेंद्र यांना काय वाटलें हें सांगणें कठीण आहे. त्यांनीं उत्तरादाखल केलेल्या भाषणांत सर्वांवर वार केले. बंगाल म्हणजे वक्त्यांची जन्मभूमि तथापि यावेळेचे सभागृहांत असामान्य अगर विशेष उच्च दर्जाचा एकही बंगाली नव्हता. श्री. लक्ष्मीकांत मित्र जे कॉंग्रेस नॅशनॅलिस्ट पक्षाचे प्रतोद होते ते साधारणपणें चांगलें बोलत, पण नेहमीं असंतुष्ट असेच दिसत. उपाध्यक्ष श्री. अखिल-

चंद्र दत्त हे वयानें वृद्ध, आबाजानें हळू, धंद्यानें वकील असून आपली बाजू सामान्यतः बरी मांडीत. डॉ. बानर्जी हे प्रोफेसर होते एवढें म्हटलें म्हणजे पुरें! लांबलचक, उपदेशवजा, असें त्यांचें भाषण नेहमींच सुसंबद्ध असे असें नव्हे. खुद्द सर नृपेंद्र हे वक्ते नसले तरी, वादविवादपटु होते. विशेषतः प्रतिपक्षाला बोचक बोलून चिडवीत व प्रतिपक्षी ओरडूं लागले म्हणजे वार बसला असें समजून आनंद मानीत. वादविवादांत आपला पक्षच आपल्याला सांभाळावयाचा आहे, ही वकिली-दृष्टि अनेकप्रसंगीं, त्यांच्या अंतःकरणांतील निःसंशय वास्तव्य करणाऱ्या देशप्रेमावर मात करी. यामुळें अनेकवेळां त्यांच्याबद्दल गैरसमज होत. पुढेंपुढें त्यांचें व कॉंग्रेस पक्षीयांचें जुळलें म्हणजे एकमेकांना एकमेकांनीं ओळखिलें. तथापि शाब्दिक प्रहार व केशाकेशी कधींच टळली नाहीं. याप्रसंगीं त्यांनीं विरुद्ध बाजूच्या प्रत्येक विधानावर कोटिक्रम करून, टिंगल करून, विपर्यास करून, प्रहार केला. "माझे तरुण मित्र श्री. गाडगीळ म्हणतात, 'ब्रिटिशांनीं जावें म्हणजे आम्हां हिंदुमुसलमानांस लढावें लागलें तरी आमचें आम्हीं पाहून घेऊं. जें काय होईल तें आम्हां सहन करूं.' मी काय होईल तें सांगतों. हिंदुमुसलमानांची यादवी सुरू होतांच कोणी तरी एक, ब्रिटिशांना मदतीसाठीं परत बोलावील. निष्कारण ब्रिटिशांना जाण्या-येण्याचा फक्त त्रास होईल! जिनांना एकंदरींत टाकाऊ वाटलेल्या या घटनेंत जातिनिवाडा तरी मान्य झाला हें कांहीं कमी नाहीं!! तथापि फेडरेशनचा भाग त्याज्य ठरवून त्याप्रमाणें मतें दिलीं तर, त्याचा अर्थ सर्व घटना पूर्णपणें या सभेला अमान्य आहे असाच घटनात्मक दृष्टीनें करावा लागेल, व तेंच करणें योग्य आहे. भुलाभाई यांना जेवढी प्रगति पाहिजे आहे ती ही घटना स्वीकारूनच होईल. तीव्रतर मार्ग नेहमींच झेपतात असें नाहीं." नोकरीछाप, जातिनिष्ठ हिंदु व मुसलमान यांना तर त्यांनीं तिरस्कारानेंच वागविलें. भाषण संपल्यावर त्यांच्या पंजाचा वार झाला नाहीं, असा पक्षच नव्हता. मुसलमान सुटले नाहींत, युरोपियन सुटले नाहींत, हिंदु नाहींत, हरिजन पण नाहींत; तथापि प्रत्येकाला, दुसऱ्यांनाही त्यांनीं तडाखे दिले याचें समाधान वाटलें, यामुळें उत्पन्न झालेल्या रागाची लघुतम विभागणी झाली होती!! त्यांना बसल्याबरोबर टाळ्याही पडल्या हेंही सार्थ होतें!!!

पांच दिवस बरेंच तास चाललेला वादविवाद संपला. सडकून कंठशोष झाला होता; मतदानानें काय तत्त्वबोध लोकांना झाला, एवढेंच कळावयाचें राहिलें होतें. सरकारी व सरकारनियुक्त सभासदांनी मतें देऊं नयेत, कारण ते लोकमताचें

प्रतिनिधी नाहींत. त्यांच्या मताची गणना केल्यास खरें लोकमत दिसणार नाहीं, विपर्यास होईल अशी रास्त तक्रार राजाजींनीं वर्तमानपत्रांत पूर्वींच करून सरकारी व सरकारनियुक्त सभासदांनीं तटस्थ राहावें, अशी मागणी केली होती. आपल्या निवेदनांत त्यांनीं असें म्हटलें होतें कीं, लोकमत नको आहे असें स्पष्ट म्हणा. वाण्यानें वाटेल तर कमी द्यावें पण पुरें माप आहे असें सांगून अगर तसा खोटा शिक्का मापावर मारून, कमी माप देणें अप्रामाणिक आहे. वाटेल तर कमी द्या पण कमी मापानें देऊन पुरें दिलें असें म्हणूं नका. ("Give us less if you like, but do not give me short measure") स्पष्ट सांगा कीं, लोकमत अजमावावयाचे नाहीं. खोट्या पद्धतीनें मोजून तें लोकमत आहे असें म्हणूं नका. वादविवादाचे वेळींही अनेकांनीं सरकारनें तटस्थ राहावें म्हणून मागणी केली होती. तथापि सरकारीपक्ष तटस्थ राहिला नाहीं. जिनांच्या जातिनिवाड्याचे उपसूचनेवर, काँग्रेसपक्ष निवडणुकीचे जाहीरनाम्याप्रमाणें तटस्थ राहिला; त्यांच्यापैकीं फक्त मुंबईचे डॉ. गोपाळराव देशमुख यांनीं विरुद्ध मत दिलें! काँ.नॅ.पक्ष व कांहीं बिनपक्षीय सभासदांनीं विरुद्ध मत दिलें. सर नृपेंद्र तटस्थ राहिले. बाकी सर्व सरकारी सभासद बहुतेक सरकारनियुक्त व अनेक बिनपक्षीय सभासद, युरोपियन ग्रूप, यांनीं 'बाजूनें' मत दिलें. भारतसेवक श्री. ना. म. जोशी यानीं पण 'बाजूनें' मत दिलें. जिना यांची ही उपसूचना बहुमतानें पास झाली. त्यानंतर सदरहू उपसूचनेसह फेडरेशन त्याज्य आहे असा दुरुस्त ठराव मांडण्यांत आला. त्यावर मत घेतां तो मोठ्या बहुमतानें पास झाला. काँग्रेसपक्ष काँ.नॅ.पक्ष, जिनांचा स्वतंत्रपक्ष, बहुतेक बिनपक्षीय सभासद, बरेचसे सरकारनियुक्त सभासद, यांनीं ठरावाचे बाजूनें मतें दिलीं. सरकारच्या बाजूस फक्त सरकारी अधिकारी व मूठभर भांडवलवाले इंग्रज व थोडेसे कोठल्याही अधिकारारूढ राजसत्तेचे नित्य गुलाम असलेले जमीनदार सोडले तर, कोणीही नव्हते. ४० वर सरकारी बाजूनें मतें पडलीं नाहींत. उलट ठरावाचे बाजूनें ९० वर मतें पडलीं. अध्यक्षांनीं "ठराव पास झाला ठरावाला पाठिंबा देणारे यांचा जय झाला, ("Ayes have it") असें म्हणून सभा स्थगित केली. खळबळ उडविणारा वादविवाद याप्रमाणें निकाल होऊन संपला. जनतेचें मत, निवडलेल्या प्रतिनिधींमार्फत समजाऊन घेणारांना कळलें.

मत नोंदणीचे वेळीं नेहमीं सभागृहांत खळबळ उडते. तेवढ्या २।३ मिनिटांत अनेक सभासदांवर अनेक प्रयोग होतात. प्रसंगीं सवदे-[illegible]

पक्षापक्षांत होतात,—डावपेंच व बनवाबनवी पण चालते. मनुष्यस्वभावाचा उत्कृष्ट व निकृष्ट दोन्हीं भाग दृष्टीस पडतात. ज्यावेळीं १–२ मतांनीं संख्याधिक्य व्हावयाचें असतें, त्यावेळची स्थिति विलक्षण असते. प्रतोदाचें कौशल्य, कार्यक्षमत्व, त्यावेळीं कसोटीस लागतें. आपल्यापक्षाचे सर्व सभासद वेळेस हजर ठेवावयाचे, विरुद्ध पक्षाचे जमल्यास गैरहजर, हजर असल्यास 'वोटचेप्या' कोण हें ओळखून, कोणती मात्रा द्यावी लागेल, व काम होईल याचा रिपोर्ट नेत्याकडे करून, त्याप्रमाणें योजना करावयाची. वादविवादाचा परिणाम काय होत आहे हें वेळोवेळीं अंदाजून कोणत्या मनःस्थितींत सभागृह असतांना मतनोंदणी मागितली असतां, आपल्यापक्षास बहुमत मिळेल, तो क्षण नेमका हुडकावयाचा, आपल्या पक्षांतील सभासदांच्या कुरबुरी नजरेंत ठेवून त्यांचें समाधान करावयाचें. कोणी कमिटींत घातलें नाहीं म्हणून रागावलेला असतो, कोणास बोलावयास संधि मिळाली नाहीं म्हणून रागावलेला असतो, कोणास रजा पाहिजे आहे पण मिळत नाहीं म्हणून रागावलेला असतो; कोणास पुढली जागा पाहिजे आहे, तिच्यासाठीं रुसलेला असतो. या सर्व विहिणींचा त्याला राग काढून टाकून मतनोंदणीचे पंक्तीस वेळेवर आणावें लागतें. पक्षाचे सभेंत झालेले निर्णय मतदानासंबंधीं व अन्यबाबतींत त्याच्यामार्फत सभासदांना कळत असतात. त्याच्या संदेशांना अगर सूचनांना व्हिप (Whip) म्हणतात. आयत्यावेळीं वादविवादाचा रंग पाहून, विरुद्धपक्षाचे डावपेंच लक्षांत घेऊन, पक्षाचा नेतृवर्ग (High Command) एकदम निर्णय घेत असतो, ते ताबडतोब एका निमिषांत सर्वांना कळवावें लागतात. पक्षांतील सभासद नेहमीं प्रतोदाकडे विचारणा करतात. तो सांगेल त्या लॉबींत (मतदानाची खोली) जातात. प्रतोदानें सभा जुळवावयाची, चालू ठेवावयाची, व नेता बोलण्यास उभा राहिला म्हणजे टाळ्या वाजवावयाच्या, (The duty of the Whip is to make the House, keep the House and cheer the Leader when he gets up to speak ") असें त्याच्या कार्यासंबंधीं वर्णन केलेलें आहे. कोरम (गणसंख्या) जमा करावयाची, तितके सभासद हजर राहतील ही व्यवस्था ठेवावयाची, सभासदांना उत्साह वाटेल असें उत्तेजन द्यावयाचें, हाच त्याचा व्यापक अर्थ आहे. पक्षसंघटनेचा मुख्य भर त्याचेवरच असतो. वादविवादाचे वेळीं आपले पक्षांतील वक्त्यांचा क्रम, परिणामाचे दृष्टीनें कसा लावावा हेंही त्याचे सल्ल्यानें, पक्षाचा चिटणीस ठरवितो. आयतेवेळीं त्यांत बदल करणें अगर कमीजास्त करणें हेंही त्याच्याच सल्ल्यानें चालतें.

मतनोंदणीबाबत सभागृहाचे कांहीं नियम आणि संकेत असतात. वादविवाद पुरे-प्रश्न मतास टाकावा, (Question be now put) ही सूचना प्रतोदानेंच करावयाची असा संकेत आहे. अर्थात् नेत्याचे विचारानेंच हें होत असतें. अध्यक्ष जर वादविवाद पुरेसा झाला असेल तर, " मतें घ्यावींत काय ?" (Question is Question be now put ?) असा प्रश्न मतांस टाकून सभेचें मत घेतो. जर पुरेसा वादविवाद झाला नसेल, तर तो तसें करीत नाहीं. जर एखादा पक्ष, केवळ संख्याधिक्यावर, वादविवाद टाळून अल्पसंख्यांकावर भाषणबंदीच करण्याचा प्रयत्न करील, तर तें होऊं नये म्हणून, हा अधिकार अध्यक्षांना असतो. योग्य चर्चा (Fair Debate) झाली पाहिजे, वादविषयक प्रश्नांवर सर्व बाजू ऐकून घेऊन सभासदानें मत बनवावें हाच हेतु त्याच्यांत असतो. पक्षसंघटित राजकारणानें हा फारसा साध्य होत नाहीं हें खरें; तथापि वादविवादाला अकारण बंदी संख्याधिक्याचे जोरावर होऊं नये, हें रास्त आहे. त्याचबरोबर बोलण्याच्या हक्काचा दुरुपयोग होऊन, सभेच्या कामकाजांत अडथळा अगर विलंब अगर व्यत्यय येऊं नये म्हणूनही कांहीं अधिकार, नियमानें अध्यक्षांना दिले आहेत. फाजील उपप्रश्न बंद करणें, ठरावावर बोलण्यास कालमर्यादा, बिलावर बोलण्यास कालमर्यादा नसते तथापि सभासद हा केवळ कालहरणाकारितांच बोलतो आहे, हक्काचा दुरुपयोग करतो आहे तेंच तें बोलून द्विरुक्ति करतो आहे, याप्रसंगीं अध्यक्षांना त्यास खालीं बसण्यास सांगण्याचा अधिकार आहे व ही परिस्थिति आहे याकडे लक्ष वेधण्याचें काम प्रायः प्रतोदाचें असतें. प्रश्न मतास टाकण्याचाही एक विशिष्ट संकल्प आहे. अध्यक्ष उभे राहतात व म्हणतात, "प्रश्न असा आहे कीं, ( Question is )" व नंतर तो ठराव अगर उपसूचना अगर बिल अगर कलम वाचतात; नंतर जे या मताचे आहेत, त्यांनीं होय म्हणावें असें सांगतात ( Those of this opinion say Aye ) त्याबरोबर या मताचे सभासद 'होय' (Aye) म्हणून ओरडतात; नंतर जे या मताविरुद्ध असतील, त्यांनीं " नाहीं म्हणावें " असें सांगतात (Those of the contrary opinion say No) जे विरुद्ध असतील ते 'नाहीं' (Noes) म्हणून ओरडतात. नंतर आवाजावरून त्यांना जे बहुमतांत, वाटतात त्याप्रमाणें प्राथमिक निर्णय ते देतात. 'होयवाल्यानीं जिंकलें (The Ayes have it) अगर नाहींवाल्यानीं जिंकलें, (The Noes have it)' जसें असेल तसें म्हणतात. तें जर मान्य नसेल तर विरुद्ध सभासद 'Noes have it अगर Ayes have it' याप्रमाणें ओरडतात. अध्यक्ष पुन्हां पूर्वी-

चाच मंत्र म्हणतो, त्यानंतर पुन्हां जर सभासदांनीं विरोध वरीलप्रमाणें म्हणून केला, तर अध्यक्ष 'मतमोजणी' ('Division') होईल असें जाहीर करतात. कोणत्या प्रश्नावर मतमोजणी मागावयाची, कोणत्या कलमावर मतमोजणी मागावयाची याचा तक्ता पक्षाचे निर्णयानुसार, प्रतोदाजवळ असतो. मतमोजणी पाहिजे असेल तर, दुसऱ्या खेपेस योग्य तें वाक्य तो ओरडतो व पक्षांतील लोकांना तसें ओरडण्यास सांगतो. नको असेल तर विरोधक गप्प राहतात, व अध्यक्ष तिसऱ्यांदा तो मंत्र म्हणतात, 'Ayes have it or Noes have it' व नंतर पुढील कामाला सुरवात करतात.

मतनोंदणीची वर लिहिल्याप्रमाणें मागणी झाली व अध्यक्षांनी 'मतमोजणी' (Division) असे शब्द उच्चारले कीं, लागलीच सभागृहखात्याचा चिटणीस विजेचें बटण दाबतो व वाळूचें घड्याळ उलटें करतो. घड्याळांतील वाळू खालीं पडण्यास २ मिनिटें लागतात. या दोन मिनिटांत, असेंब्लीगृहांत, ग्रंथालयांत, पक्षा-कचेऱ्यांतून, उपाहारगृहांतून, सर्व प्राकारांत, सारखा घंटानाद होतो. जेथें जेथें सभासद बसले असतील, खातपीत असतील, बाचीत असतील, तेथून लगबगीनें सभागृहांत येतात. सभागृह अर्धवर्तुळाकार आहे व त्याला लागून त्याच आकाराची सुमारें १० फूट रुंद अशी मार्गवजा जागा, या टोंकापासून त्या टोंकापर्यंत आहे. या जागेला 'लॉबी' (Lobby) म्हणतात. या बोळकंडीवजा जागेंत प्रशस्त बसावयास कोचें, खुर्च्या, टेबलें व छत्र्या, काठ्या, ओव्हरकोट ठेवण्याच्या जागा केल्या आहेत. टेलिफोन पण तेथें आहे. लॉबींत फक्त विद्यमान व माजी सभासद व वर्तमानपत्रांचे बातमीदार यांनाच सभा चालू असतांना प्रवेश मिळतो. अनंत खलबतें या लॉबींत चालतात. राजकीय वाटमारी याच ठिकाणीं होते. शेअर बाजारांत ज्याप्रमाणें धांदल दिसते तशीच येथें बैठकींचे वेळीं दिसते. येथें तसेंच बाहेरील हिरवळीवर बसून सभासद चहापान पण करतात. मतनोंदणीची घंटा सुरू झाल्याबरोबर या लॉबीच्या तिन्ही प्रवेशद्वारांजवळ, सभागृह खात्याचे तीन अंमलदार जातात. सभासदाव्यतिरिक्त इसम, लॉबींतून बाहेर घालविले जातात. तिन्ही दारांना हे अधिकारी आंतून कुलुपें लावतात. मग बाहेरील सभासद बाहेरच राहतो, तो आंत येऊं शकत नाहीं. सदरहू अधिकारी, किल्ल्या सभागृहखात्याचे चिटणीसाजवळ आणून देतात व सभासदांचे नांवांचे छापील फार्म घेऊन मतदानाचे खोलींत जातात. सभागृहाचे एका टोंकास एक, याप्रमाणें दोन खोल्या आहेत. एकीवर

होयवाल्यांची खोली ( Ayes Lobby ) व एकीवर नाहीं म्हणणारांची खोली (Noes Lobby) अशा पास्या आहेत. पहिली अध्यक्षांचे उजवे बाजूस व दुसरी डावे बाजूस आहे.

यात्रेचे ठिकाणीं ज्याप्रमाणें बारी असते, व एकामागून एक याप्रमाणें माणसें पुढें सरकतात, त्याचप्रमाणें या खोलींत व्यवस्था असते. सभागृहाचा अधिकारी छापील फार्म घेऊन उभा असतो. त्याचेजवळ बारींतील पहिला सभासद जातो व आपला मतनोंदणी नंबर (Division Number) उच्चारतो. अधिकारी त्यानंबरवाल्या सभासदाचें नांव उच्चारतो, व तोच तो अशी खात्री झाली कीं नंबरापुढें खूण करतो; सभासदांस सही करावी लागत नाहीं. अधिकारी हें बरोबर करतो कीं नाहीं हें पाहण्यासाठीं प्रत्येक पक्षाचा एक दुय्यम प्रतोद तेथें हजर असतो. इंग्रजांचे राज्यांत सर्वत्र नंबर! तुरुंगांत कैदी नंबर, प्रवासांत गुप्त पोलीस खात्याचा "संशयित मनुष्य" नंबर आणि येथें " मतनोंदणी नंबर "! बैठकीचे सुरुवातीस प्रत्येक सभासदाला सभागृहखात्याकडून त्याचा नंबर कळविण्यांत येतो. माझा २३ होता. त्यांतले त्यांत भाग्य हें कीं, एकदां नंबर दिला कीं, तो सदरहू इसम सभासद असेपर्यंत रहातो! याप्रमाणें मतनोंदणीचें काम चालू असतां, खुद्द सभागृहांत बिनपक्ष सभासदांचे भोंवती पक्षप्रतोदांची, पक्षनेत्यांची, झुंबड चाललेली असते. सभागृह नेते, गृहमंत्री, वाहतुक मंत्री, जसा सभासद, जशी त्याची इच्छा, त्या दृष्टीनें त्यांच्याकडे सरकारी प्रतोदांचे सांगण्याप्रमाणें हे जात असतात. सरकारी प्रतोद सभासदांचीं सुखदुःखें जाणतो. कोणाच्या जखमेला पदवीचें मलम लागेल; कोणाची उदासीनता कोणत्या नातेवाईकाला नोकरी मिळाली अगर बढती मिळाली म्हणजे नाहींशी होईल, कोणाचा रुसवा कोठल्या कमिटींत घातला म्हणजे जाईल, हें सर्व तंत्र त्याला अवगत असतें. ही कामगिरी तो अगदीं नाजूक रीतीनें करीत असतो. कॉंग्रेस प्रतोद अगर पक्षपुढारी हृदयाला आवाहन करतील, आभारापलीकडे त्यांचेजवळ देण्यास कांहीं नसतें. टाळ्यांच्या आवाजापेक्षां दुसरा म्हणजे लक्ष्मीच्या नुपुरांचा आवाज कांहींना प्रिय असतो. क्षणांत सुकणाऱ्या हारांपेक्षां हयातीपर्यंत टिकणाऱ्या राजमान्य व राजदत्त पदव्या कांहींना मोहवितात. कॉंग्रेसवाले फार तर एखाद्याचे नातेवाईकास शिफारसपत्र देतील, पण सरकारी नोकरीची शाश्वती ते कोठून देणार? अशा विषम झगड्यांत, अनेकवेळां, कॉंग्रेस प्रतोद अयशस्वी ठरला तर, आश्चर्य नाहीं. उलट जितकेवेळां तो यशस्वी ठरला ते प्रसंग अभिनंदनीय, आश्चर्यांचेच

म्हटले पाहिजेत. ५।१० मिनिटें हें मतनोंदणीचें काम चालू असतें. त्यावेळपर्यंत हें मत मिळविण्याचें झटापटीचें कामही पण चालू असतें. इतरत्र सभागृहांत, सभासद हिंडत असतात, व धूम्रपान पण चालू असतें. वादविवाद चालू असतां धूम्रपानाला बंदी असते. वादविवादांतील प्रकाशामुळें उजळ झालेली कर्तव्य-दिशा धुरामुळें मलीन झाली म्हणून मतदानांतील चूक झाली, अशी सबब सभासदांना मिळावी यासाठीं कदाचित् ही सवलत असेल! तसेंच सभा चालू असतां अध्यक्षासमोरून एका बाजूनें दुसऱ्या बाजूस जाणें झाल्यास अगदीं वांकून जावें लागतें. वादपुरुषालाही नम्रता दाखवून सभासदांना करभार द्यावा लागतो!! उलट वादविवाद बंद होऊन मतनोंदणी चालू असतां ताठ मान करून, मताला अभिमान किती आहे, हेंच जणूं दाखवितां येतें!! वादविवाद चालू असतां सभासदाला जागा सोडून बाहेर जाणें झाल्यास, अगर पुन्हां जागेवर बसणें झाल्यास अध्यक्षाकडे पाहून मस्तक नम्र करून बाहेर जाणें अगर बसणें करावें लागतें. मग अध्यक्षांचें लक्ष असो अगर नसो. तसेंच मतनोंदणी चालू असतां, सभासदांचे घोळके सभागृहांत जमतात, वर्तमानपत्रें वाचतात, चर्चा चालते. हें सर्व प्रकार अर्थात् वादविवाद चालू असेल त्यावेळीं बंद केलेले आहेत. वादविवाद चालू असतांना उतारा वाचण्याकरितां वर्तमानपत्राचा उपयोग करतां येतो, पण आमरीतीनें तें वाचण्यास मनाई आहे. गनिमीकाव्यांत शिक्षण घेतलेले, तुरुंगानुभवी सभासद यांना अर्थात् ही बंदी कधींच जाणवत नाहीं!! अन्य सभासद सुद्धां कांहीं कमी तरबेज असतात असें नाहीं, किंबहुना निवडणुकीच्या विश्वविद्यालयांतून आलेल्या सभासदांना, हें शिक्षण चांगलेंच मिळालेलें असतें. मतनोंदणी संपतांच दोन्ही लॉबींतील अधिकारी आपआपला तक्ता, सभागृह खात्याचा चिटणीस जो अध्यक्षांचे उच्चासनाखालील बाजूस बसलेला असतो, त्याचेजवळ देतात. तो बेरीज करून ते तक्ते अध्यक्षाजवळ देतो. अध्यक्ष 'शांत, शांत,' (Order, Order) म्हणून ओरडतात, त्याबरोबर सर्वत्र विखरलेले सभासद आपआपल्या जागीं बसतात. धूम्रपान बंद होतें, निकाल ऐकण्यासाठीं सभागृह व वरील मजल्यांतील बातमीदार, व अन्य प्रेक्षक उत्सुक होतात. अध्यक्षांनीं निकाल दिल्यानंतर थोडावेळ टाळयांची, घोषणांची, हुल्लड होते. नंतर शांतता; पुन्हां कार्यक्रम पत्रिकेंतील पुढील बाबीवर चर्चा सुरू होते.

संयुक्त कमिटीचे रिपोर्टावरील मतनोंदणीचे वेळीं डॉ. देशमुख यांनीं जातीय

निवाड्याच विरुद्ध मत नोंदविलें हें वर आलेंच आहे. प्रत्यक्ष मतनोंदणीचे वेळीं कॉंग्रेसपक्ष प्रतोद, व अन्य पुढारी, आपले बाजूस मतें जास्तींत जास्त कशीं मिळतील या खटपटींत होते. डॉ. देशमुख, पक्षनिर्णयाविरुद्ध मत देण्यास जात आहेत, ही बातमी मला एका सभासदानें दिली, म्हणून तावडतोब मी त्यांच्याकडे निघालों, पण ते इतक्या सपाट्यानें, बेफाम, व बेभान होऊन चालले होते कीं, त्यांच्याशीं बोलण्यासही सवड मिळाली नाहीं, व मिळून उपयोगही झाला नसता. डॉ. मजकुरांचें हें कृत्य बेशिस्त तर होतेंच, पण त्यात अयथार्थता पण होती. निवडणुकींत कॉंग्रेस-पक्षातर्फे उभें राहून, प्रतिज्ञा पत्रकावर सही करून, त्यांनीं कांहीं जबाबदारी स्वीकारली होती. निवडणुकीचे प्रचारांत जातिनिवाड्याबाबत कॉंग्रेसनें जें धोरण स्वीकारलें होतें तें मान्य करून, मतदारांनीं त्यांना निवडून दिलें होतें; म्हणून त्यांनीं निवडून दिलेल्या मतदारांची इच्छा विरुद्ध मत द्यावें अशी होती हें म्हणणें अयोग्य होतें. जेवढं शिव्याशाप विरुद्ध पक्षाचे बसावयाचे होते तेही बसले होते, त्यांत नवीन भर पडणार होती असा भाग नव्हता; म्हणून भिण्याचें कारण नव्हतें. पक्षधोरणाला विसंगत अशीं कांहीं वचनें अगर कबुली खाजगी रीतीनें त्यांना देण्याचा अधिकार नव्हता, व तशी त्यांनीं दिलीही नसावी. निवडणुकीचे आंदोलनांत आपण विरुद्ध मत देणार असेंही त्यांनीं जाहीर केलेलें नव्हतें. सदसद्‌विवेकबुद्धीचा कौल घेतला असला तर, निवडणुकीस कॉंग्रेसपक्षांतर्फे उभे राहून तिच्याशीं पूर्वीच प्रतारणा केली, असें म्हणावें लागतें. पक्षाची संमति घेतली नव्हती, किंबहुना प्रत्यक्ष मतदान करण्याला निघेपर्यंत, हे कोणास माहीत नव्हतें, कदाचित् त्यांनाही माहीत नसावें ! सर नृपेंद्र यांनीं तटस्थ राहण्याबद्दल सरकारची परवानगी घेतली होती. राजकीयदृष्ट्या झालेला जातिय निवाडा अपरिहार्य आहे असें प्रागतिकांचें मत होतें, व त्याप्रमाणें श्री. जोशी यांनीं "बाजूनें" मत दिलें होतें. खरें राजकारण व खरी मुत्सद्देगिरी प्रागतिक पक्षाबाहेर फारशी नाहीं, असें प्रामाणिकपणानें वाटणाऱ्या अनेक व विविध व्यक्ति आणि वृत्तपत्रेंही आहेत. त्यांनीं हें प्रागतिकांचें धोरण मान्यच केलें होतें. तथापि डॉ. देशमुखांनीं शिस्त सोडून विरुद्ध मत दिलें, याबद्दल त्यांचें अभिनंदनच केलें !! विकृतबुद्धि यालाच म्हणतात. पाटलाची सून रागानें घराबाहेर पडली कीं, गांवांतील गुंड तिच्या पाळतीवर असतातच आणि वर सहानुभूति दाखवितात!! राजकीयपक्ष शिस्तींत असेल तरच तो समर्थ असतो, त्याला महत्त्व मिळतें, हें प्रत्येक पक्ष ओळखतो; पण

विरुद्ध पक्षांतून एखादा बेशिस्त वागला कीं, लागलीच त्यानीं बौद्धिक गुलामगिरींतून आपली मुक्तता केली म्हणून त्याचें अभिनंदनही केलें जातें !! हें सर्व थोड्या अवकाशांत, याहीवेळीं अनुभवाला आलें. पक्षांतील मुसलमान मंडळी नाराज झाली त्यांनीं पक्षाचा निर्णय मानला होता. निवडणुकींत, त्यांनीं व्यक्तिगत भवितव्य, धोक्यांत टाकलें होतें. कॉंग्रेसपक्षीय असल्यनें सामाजिक दृष्ट्या काय आपत्ति, त्याचेवर येणार होती, याची जाणीव असून सुद्धां, ते जबाबदारीनें व प्रतिज्ञेबरहुकूम वागले. पहिल्याच अधिवेशनांत व सर्वांत महत्त्वाचे बाबतींत या झालेल्या प्रकाराकडे दुर्लक्ष करणें योग्य नव्हतें, असेंच प्रत्येकाचें म्हणणें होतें व ते रास्त होतें. नेत्यानीं माझ्याशीं चर्चा केली. मीं "जरा थंडाईनें घ्या, बाब महत्त्वाची खरी, पण सर्व दृष्टींनीं विचार करून तिला आपणच महत्त्व न देतां दृष्टीआड करावी" असें सुचविलें व शेवटीं त्याप्रमाणें झालें. डॉ. देशमुखांना या शिस्तभंगाबद्दल काय वाटलें अगर त्याबद्दल शासनतंत्र अमलांत न आणण्याबद्दल काय वाटलें, हें तेच एकटे सांगू शकतील. मुंबईतील त्यांचे चहाते, जें नंतर सांगत, तितकें अगर तितक्या प्रमाणांत डॉ.मजकूर शिस्तीस कमी लेखीत होते, असे मात्र मला वाटत नाहीं. झालेली घटना मानसचिकित्साशास्त्रज्ञानीं पृथक्करण करण्याजोगी आहे. कधींकाळीं खुद्द डॉ.मजकूरच तें करतील. अलीकडे त्यांच्या गीताविषयक लेखावरून याही शास्त्राशीं ते सलगी करीत आहेत असें दिसतें!

मुख्य प्रश्न, ज्यावर निवडणुकी लढविल्या तो घटनेबद्दलचा प्रश्न, कायदेमंडळापुरता संपला होता. वादविवाद व त्यावरील मतनोंदणी, यावर निरनिराळ्या लोकांनीं देशी व परदेशी वृत्तपत्रांनीं, दिलेलीं मतें लक्षात घेतां, कॉंग्रेसपक्षानें आपली कामगिरी योग्यप्रकारें बजाविली असें म्हणणें न्याय्य होईल. पुढें, पक्षाचें कोणतें धोरण ठरवावयाचें, यासंबंधीं विचार करणें जरूर होतें. पक्षाची साधारण सभा भरली. इतक्या थोड्या दिवसांत ॲसेंब्लीचे वातावरणानें बहुतेक सभासदांची क्रांतिकारक वृत्ति मलीन झालेली दिसली. सभासदत्वाची प्रतिष्ठा, त्यामुळें मिळणारा सामाजिक व राजकीय सन्मान, थोड्याशा कामगिरीबद्दल थोड्या खटपटीनें मिळणारी अखिलभारतीय प्रसिद्धि, बाहेरील चळवळीबद्दल वाढत असलेली उदासीनता, या सर्वांचा हा परिणाम होता हें उघड आहे. त्याचबरोबर सनदशीर राजकारणानें कांहींतरी मिळेल, विशेषतः येणाऱ्या घटनेंतून कांहींतरी मिळवितां येईल अशीही कल्पना बऱ्याच जणांचे मनांत उद्भवत होती; त्यांना कदाचित् त्याची त्यावेळेस

जाणीवही नसेल. ठरावांचीं, प्रश्नांचीं व बिलांचीं, पाउलें टाकावयास लावून क्रांतीच्या विरुद्ध दिशेला भवितव्यता त्यांना नेत होती. गांधीजींनीं हे होणार हें जाणूनच "सनदशीर राजकारणाची वृत्ति यापुढें वाढत जाणार व कायम राहणार" "(Parliamentary mentality has come to stay") हें जें म्हटलें होतें त्यांच्या या शब्दांमागें वस्तुस्थितीचा अर्थ धांवत जात आहे हें स्पष्ट दिसूं लागलें. पक्षसभेंत मतदार संघानें जो आदेश (Mandate) आपल्या पक्षाला दिला होता तो संपला. घटनात्मक प्रश्न निकालीं लागला. जर आपण यापुढें ॲसेंब्लींत रहावयाचें तर कोणत्या कार्याकरितां व काय धोरणानें, याबाबत मतदार संघाचा, जनतेचा पुन्हां आदेश घ्यावयास पाहिजे, असें माझें मत होतें व तें मीं मांडलें. कांहीं लोक खुद्द ॲसेंब्लींत तेजस्वी धोरण ठेवावें, चढाऊ (Militant) धोरण ठेवावें, या मताचे होते; कांहीं शक्य तेथें विरोध व अवश्य तेथेंच सहकारितां या मताचे होते; कांहीं सर्वत्र, व सर्व प्रसंगीं विरोध या मताचे होते. तथापि पुन्हा निवडणुकीचा प्रसंग उभा करून जनतेचा प्रक्षोभ करावा व निवडणुकीचें यंत्र, हत्यार म्हणून पुन्हा पुन्हां पाजळावें या मताचे कोणीच नव्हते. वास्तववाद्यांची, व्यवहार्यवाद्यांची, बहुसंख्या होती. शेवटीं निश्चित निकाल न होता सभा संपली !

अधिवेशनातील मुख्य कामकाज म्हणजे बजेट व 'फडणिशी व्यवस्थेचे बिल' (Finance Bill) हें फेब्रुवारींतच यावयाचें असतें. मध्यवर्ती सरकारच्या जमाखर्चाचा व्यवहार, पूर्वी सर्व बाबींचा एकत्रित मांडीत असत. कर व कर्जें यापासूनचें उत्पन्न त्याचप्रमाणें उत्पादनापासूनचें उत्पन्न, व्यापारी व्यवहारापासूनचें उत्पन्न, व त्याचप्रमाणें त्यांच्या बाबींतील खर्च, या सर्वांचा जमाखर्च एक, असें म्हणून एकत्रित बजेट मांडण्यांत येई. १९२४।२५ सालांपासून, रेल्वेचें बजेट निराळें माडण्यांत येतें आणि त्यांचें जमाखर्चही निराळे असतात. अन्यबाबींचे बजेट निराळें त्याला "सर्वसाधारण बजेट (General Budget)" म्हणण्यांत येतें. रेल्वे बजेट, फेब्रुवारीचे मध्यास मांडतात. रेल्वेमंत्र्याला तेवढ्यापुरते गव्हर्नर जनरल, अर्थ मंत्र्याचे अधिकार देतात व हा अधिकार देणारा व्हाइसरॉय साहेबांचा संदेश, सभागृहखात्याचा चिटणीस उभा राहून वाचतो. जेवढे संदेश व्हाइसरॉय साहेब सभागृहाला धाडतात ते जेव्हां सदरहू चिटणीस वाचून दाखवितो, त्यावेळेस हे राजप्रतिनिधीचे संदेश आहेत म्हणून सर्व सभासद -अध्यक्षसुद्धां- उभे राहून ऐकतात. संदेश संपतांच सभासद बसतात. पार्लमेंटमध्ये, उमराव सभेंत, राजा भाषण करतो अगर त्याचें भाषण वाचलें जातें त्या-

वेळीं सर्व सभासद उभे राहतात, या गोष्टीची ही हिंदी नक्कल होती. पहिल्या १०।१२ दिवसांत १।२ संदेश आले होते; त्यावेळीं सर्वांबरोबर आम्ही उभे राहिलों होतों. मध्यंतरी खुद्द व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यानीं ॲसेंब्लींत भाषण केलें होतें, त्याहीवेळीं पक्षाची इच्छा नसतां, महात्माजींचें मत आपण सभ्यता सोडूं नये, असें पडलें म्हणून आम्हीं सर्व हजर राहिलों व परंपरा पाळिली. दोन्ही मंडळांतील सभासदापुढें सोनेरी खुर्चीच्या पार्श्वभूमीवर, दोन्ही मंडळांचे अध्यक्ष गोगीपुढें बाळें ठेवतात त्याप्रमाणे पुढ बसलेले असतांना त्याचें भाषण आम्ही निमूटपणें ऐकलें. कॉंग्रेस मी चिरडली अशी बढाई मारणाऱ्या लॉर्ड विलिंग्डनला पांढऱ्या टोप्या समोर पाहून काय वाटले असेल हें सांगणें कठीण; माझ्या मतें माणसाच्या अंगीं संयम अभ्यासानें येतो, सौजन्य अंगीच असावें लागतें. दोन्ही गुण मोठ्या प्रमाणांत कांहीं सभासदांत तरी नव्हते. गव्हर्नर जनरलचा संदेश वाचतांना आम्हीं काय म्हणून उभें राहावें म्हणून चर्चाही सुरू झाली होती, व कांहींनीं पक्षाचा निर्णय घ्यावा असेंही ठरविलें होतें. रेल्वे बजेट मांडण्याचे दिवशीं सभागृह चिटणीस यानीं "गव्हर्नर जनरल याचा संदेश सभागृहाला आला आहे कीं" एवढें वाक्य उच्चारतांच सर्व सभासद उभे राहिले. माझें डोक्यांत यासंबंधीचे विचार घोळत होते, तथापि एकदम विचार आला कीं उभें राहू नये व मी उभा राहिलों नाहीं. सभेंत बॉंबगोळा पडावा असा परिणाम झाला! सर्व सभासद–भुलाभाईसुद्धां–सर्व उभें होते ते सर्व माझ्याकडे पाहूं लागले. गॅलरींतील प्रेक्षक व वर्तमानपत्रांचे बातमीदार यांच्यात खळबळ झाली, तेही पाहूं लागलें २–३ मिनिटांत संदेश संपला. ४० मिनिटांत रेल्वे मंत्र्याचें बजेटाचें भाषण संपलें व सभा उपाहाराकरितां उठली. मी लॉबींत आलो तेव्हां कोणी टाकून बोललें तर कोणीं अभिनंदन केलें! कांहीं बातमीदार लॉबींत आले. त्यानीं कसें कसें वर्णन केलें आहे तेंही सांगितलें. मी एकाला उत्तर दिलें. "माझ्या प्रांतांत माझ्या कीर्तींत (!) तुम्हांला क्वचितच भर टाकतां येईल." ("You can hardly add to my reputation in my Province") दुसरे दिवशींच्या स्थानिक वर्तमानपत्रांतून कॉंग्रेस प्रतोदाची असभ्यता (Discourtesy by Congress Whip), विलक्षण वागणूक (Strange behaviour), स्वाभिमानी वागणूक (Self-respecting behaviour), या प्रकारानीं झालेली घटना वर्णन करण्यांत आली होती. नंतर कांहीं दिवसानीं एका इंग्रज अधिकारी सभासदानें मला विचारलें "तुम्ही असें कां वाग-

त्यांना मला सांगा ! ("Tell me, why did you did this ?") मी त्याला उलट प्रश्न केला "वंदेमातरम् चालू असतां इंग्रज अधिकारी कां उभे राहात नाहीत हें सांगा!" (Tell me why English officers do not get up when Vandemataram is sung?") "ओहो तें असें आहे कां" ("Oh, that is that") येवढें म्हणून तो निघून गेला. याच सुमारास स कारन वंदेमातरम् म्हणत असता, अधिकाऱ्यांनी उभें राहू नये म्हणून सरक्युलर काढलें होतें, व त्याबद्दल प्रश्नही सभेंत विचारले होते. झालें तें सर्वांना पटलें व तेव्हांपासून निवडून आलेल्या सभासदांकी मूठभर सभासद सोडल्यास असल्या संदेश वाचनाचे वेळीं कोणी उभें राहत नाहीं. सरकारी व सरकारनियुक्त सभासद मात्र, ही कसरत इमानें इतबारें करतात !

रेल्वेमंत्री यांचे भाषण झाल्यावर त्यानंतर चर्चा होते. सामान्य चर्चेकरितां एक दिवस देतात, व रकमेच्या मागण्यांवरील चर्चेकरितां दोन (Demand for Grants). ज्यांना कपाती (Cuts) सुचवावयाच्या असतील, त्यांनीं २४ तास अगोदर कपातीची दखल (Notice) नोटीस ऑफिसमध्यें द्यावी लागते. सभासदांना जें काहीं लेखी द्यावयाचें असेल, चौकशी करावयाची असेल, तें सर्व कामें नोटीस कचेरीमार्फत होतात. सर्व कागद तर्थे द्यावयाचें व तेथून योग्य त्यांच्याकडे ते जातात. उपसूचना, कपात, बिल, ठराव, कांहीही असो, नोटीस ऑफिसमधील टेपलांत पडल्यापासून ५ मिनिटांत, योग्य त्या शाखेकडे कागद जातात. दुसरे दिवशीं सर्व उपसूचना अगर कपाती छापून सभासदांचे टेबलावर ठेवण्यांत येतात. कॉंग्रेसपक्ष आल्यापासून या कपाती असंख्य संख्येने येत व त्यामुळे छापलेल्या कागदांचे गठ्ठ सभासदाचे टेबलावर पडत. कोणीही उपसूचना धाडावी व नंतर पश्चात ठरेल तें, ठरेल त्यानें, मांडावी असा शिरस्ता असल्यामुळे उपसूचनांची लागण फार, व न मांडण्यांत आल्यामुळें मृगजळ संख्याही पुष्कळ! कपातीचे तीन प्रकार असतात जर एखाद्या बाबींत खरोखर मागितलेली रक्कम जास्त असेल तर काटकसरीने ती कमी खर्चिली तरी चालेल या दृष्टीने किती रक्कम कमी व्हावी हे सुचविणारी कपात दिली जाते, तिला काटकसर कपात (Recovery Cut) असें म्हणतात. तिचा नमुना साधारणपणें असा असतो: मागणी नं.... मधील रक्कम इतकी अगर इतक्या रकमेनें कमी करावी. (Grant No.....be reduced to or by Rs. दुसरा प्रकार: एखाद्या खात्यांतील कारभारसंबंधीं माहिती पाहिजे असेल अगर विशिष्ट तक्रार करणे असेल, अगर एखादें दाद लागत नसेल तर त्या बाबतीत सभागृहाचें मत दर्शविण्याकरितां कपात

करितां कपात सुचवितां येते तिला नाममात्र कपात (Token Cut) अगर तक्रार कपात म्हणतात.तिचा नमुना साधारणपणें असा: मागणी नं. .. मधील रक्कम रु.१नें कमी व्हावी. (Grant No.....be reduced by Re. I) तिसरा प्रकार, खात्याचा कारभार संपूर्ण नापसंत व सभागृह सदरहू खात्याला कांहींही रक्कम देऊं इच्छित नाहीं व त्यावर संपूर्ण अविश्वास आहे, हें दाखविण्याकरितां कपात सुचवितां येते तिला बिनमदतीची इन्कार कपात अगर अविश्वासनिदर्शक कपात (Refusal of Supplies)म्हणतात.तिचा नमुना साधारणपणें असा;मागणी नंबरमधील रक्कम कमी करून रु. १ असावी. (Grant No.....be reduced to Re. I) याप्रमाणें कपातीचे प्रकार आहेत. कपात देण्याचा उद्देश देणाराने कपातीचे पुढें कंसांत द्यावा लागतो. अमुक तक्रार अगर गाऱ्हाणें आहे, अगर काटकसरीकरतां सुचविली आहे, अगर अविश्वासाची आहे, हे कंसांत (Token Cut) अगर (Recovery Cut) अगर (Refusal of Supplies) जें असेल तें लिहावें लागतें; असें लिहिलेलें असलें म्हणजे त्या खात्याचा मंत्री त्या दृष्टीने माहिती देतो व उत्तराची तयारी करतो.

रेल्वे बजेटाची सामान्य चर्चा एक दिवस चालते, व त्यांत सर्व सामान्य धोरणावर टीका होते. रेल्वेची मालकी, हिंदीकरण, इंजिनांची य. देशांत निपज, कारभारांतील उधळपट्टी वगैरे मुद्यांवर चर्चा सालोसाल होते. निरनिराळ्या पक्षांतील लोक बोलतात; व शेवटीं रेल्वेमंत्री उत्तर देतो. पुढें दोन दिवस मागणी रकमांवर चर्चा होते. बजेटांत खातेवार रकमा किती लागतील, त्या नंबरवार दिल्या असतात व नंबरवार त्यांची मागणी मान्य करावी म्हणून, रेल्वेमंत्री सभागृहाकडे मागणी करतो. दोन दिवसांत सर्व कपातींच्या सूचनांचा निकाल लागलाच पाहिजे. महत्त्वाच्या बाबींवर वादविवाद व्हावा म्हणून दरसाल रेल्वेमंत्र्याचें पहिलें भाषण झाल्याबरोबर पक्षनेते अध्यक्षांचे कचेरींत जमतात; व दोन दिवसाचे ७॥ तास, पक्षांचे संख्येच्या मानानें वांटून घेतात. पक्षाला मिळालेल्या वेळांत पक्षातर्फे ज्या कपाती मांडावयाच्या असतील त्या मांडल्या जातात. ज्या मागणीवर पक्षानें कपात दिली असेल, व जिची चर्चा हवी असेल, ती मागणी रेल्वेमंत्री सभेपुढें मांडतो; व नंतर कपात सुचविली जाते,वादविवाद होतो, व नंतर मतनोंदणी होते, याप्रमाणें दोन दिवस चालतें; दुसरे दिवशीं पांच वाजतांच आपोआप सर्व वादविवाद बंद होतो. नंबराप्रमाणें प्रत्येक मागणी रेल्वेमंत्री सभेपुढें मांडतो. मागितल्यास मतनोंदणी होते.

पण वादविवाद नाहीं, चर्चा नाहीं,या प्रकाराला 'कत्तल' (Guillotine) म्हणतात. बादविवाद कोठेंतरी थांबला पाहिजे व राज्यकारभाराचा गाडा अडूं नये म्हणून ही योजना असते. दरसाल या कपाती बहुतेक त्याच त्या स्वरूपाच्या असतात. तिसऱ्या वर्गाच्या उतारूंचे हाल, देशांत इंजिनें तयार करण्याबाबत व्यवस्था, वाहतुकीच्या दरांतील अन्याय, रेल्वे कामगारांची गाऱ्हाणीं,जातिविषयक नोकऱ्या, वगैरे; सरकारी उत्तरें व दृष्टिकोण सालोसाल तोच असतो. बदल होत नाहीं असें नाहीं, पण इतका हळूं व प्रक्षोभक कीं, सभागृहांत तरी त्याचा स्फोट सालोसाल होत असतो.

पक्षांतील सभासद अनेक उपसूचना देऊन ठेवितात हें पूर्वीच आलें आहे. पक्षाचे वांटणीस आलेल्या वेळांत कोणत्या कपाती चचावयाच्या हें ठरवावें लागतें. सामान्यपणें पक्षाची भूमिका असेल त्याप्रमाणेंच हें होतें. कॉंग्रेसपक्ष, उतारूंचे हाल, कामगारांचे हाल, रेल्वेची सामुग्री देशांत व्हावी म्हणून मागणी, याबाबत मुख्यत्वें कपाती सुचवी, स्वतंत्रपक्ष किंवा मुसलमान पक्ष, जातिविषयक नोकरींतील प्रमाण, युरोपियन ग्रूप, वाहतुकीचे दराबाबत, बाकीचे पक्ष व सभासद साधारणपणें संकीर्ण बाबीवर कपाती सुचवीत.अत्यंत संघटित व पद्धतशीर रीतीनें काम करणारा पक्ष म्हणजे युरोपियन गट. पक्षाची कचेरी नमुनेदार व अत्यंत कार्यक्षम. सरकारी सभासदांना जितकी माहिती तितकी अगर प्रसंगीं जास्त या कचेरीला असते. वर्षभर कचेरीचें काम, सरकार दिल्लीस असेल तर दिल्लीस, सिमल्यांत असेल तर सिमल्यांत चालतें. युरोपियन सभासद म्हणजे इंग्रज व्यापाऱ्यांचे प्रतिनिधी व ते त्या दृष्टीनें आपले हितास जपतात. एवढेंच नव्हे तर सरकारला आपल्या इच्छेप्रमाणें करण्यास भाग पाडतात. इंग्रजी सत्तेची इंग्रजी व्यापार ही दुसरी तटबंदी खरी, पण पहिलीला इच्छेप्रमाणें कवाईत करण्यास लावते. त्याजबरोबर हेंही सांगितलें पाहिजे कीं, निवडून आलेले इंग्रज सभासद अभ्यासू, आपल्या विषयाबाहेर न बोलणारे, नेमून दिलेल्या विषयांत संपूर्ण माहिती घेऊन न चिडतां बोलतात, वडजोड केव्हां करावी हें चांगलें जाणतात. साधारणपणें 'स्वकार्यं साधयेत्प्राज्ञः' या न्यायानें वागतात. साधनापेक्षां साध्याकडेच किंबहुना त्याचेकडे लक्ष ठेवतात. कॉं. नॅ. पक्ष हा खरोखर श्री. अणे यांचा बोजा होता. जातिनिवाड्याला विरोध ह्या एकाच सूत्रानें तो एकत्रित होता. घटनात्मक प्रश्न संपल्यानंतर बहुतेक अन्य प्रश्नांबाबत, त्यांच्यातील सभासदांत मतभेद असे. भाई परमानंद, श्री. लालचंद नवलराय हे सामान्यपणें हिंदूंचें हित त्यांना जास्त नोकऱ्या मिळाल्यानें साध्य होणार आहे या

दृष्टीनें विचार करणारे व सावकार व संचितवाले यांचे अभिमानी होते. बंगाली सभासद, मुख्यी मध्यमवर्गीतील असल्यामुळें त्यांचा दृष्टिकोण आर्थिक बाबतींत काय असणार हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. प्रांतीय अभिमान त्यांचेठायीं सर्वांत जास्त होता असें म्हटलें तर, त्यांचेवर अन्याय होणार नाहीं. याही गोष्टीचा त्यांचे मतदानावर परिणाम होई. खुद्द असे, राजकीय बाबतींत काँग्रेसपक्षाशीं, एखाद अपवाद सोडल्यास संपूर्ण सहमत असत. त्यांचा सल्ला हरएक बाबींत काँग्रेसपक्ष घेत असे. पण आर्थिक प्रश्नासंबंधीं त्यांच्या मनाचा काटा बहुतेक प्रसंगीं भांडवलशाही पद्धतीकडे झुके याचा अर्थ असा नव्हे की, त्यातील अन्यायाविरुद्ध ते बोलत नसत अगर मत देत नसत. तथापि अनेकवेळा त्यांचे पक्षांत एकमत होत नसे, व नेता तटस्थ व अनुयायी काहीं इकडे, कांहीं तिकडे, जातांना दिसत.

स्वतंत्रपक्ष सर्व दृष्टीनें स्वतंत्र होता. निवडणुकीनंतर अस्तित्वांत आलेला, केवळ जिनांना पक्ष पाहिजे म्हणून, कांहीं मुसलमान सभासदांनीं उभवून उभारलेला! पक्षाचा असा निर्णय क्वचित्; बहुतेक सभासद मत देण्यास मोकळे असत एकानें या पक्षाचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें होतें. स्वतंत्रपक्ष म्हणजे ज्यांतील सभासद एकमेकांपासून स्वतंत्र आहेत व ज्याचा नेता अनुयायांपासून स्वतंत्र आहे. (The Independent Party consists of Members who are independent of each other and of Leader who is independent of his followers.) या पक्षात मुसलमानांशिवाय सर कावसजी व सर होमी मोदी हे कांहीं काळ होते व कांहीं काळ श्री. लाहिरी चौधरीही होते. १९३७नंतर स्वहिताचा अभिप्राय घेऊन हे दोघे पारशी 'सरदार' त्यांच्या पूर्वजांप्रमाणें इस्लामी वर्चस्वाला कंटाळून सरकारी सभासदांच्या जवळील किनाऱ्यावर उतरले, व तेथें त्यांना आश्रय मिळाला. सर होमी मोदी यानीं मात्र आणखी उजवीकडे प्रगति करून सत्तेच्या उपासनाचें फळही हस्तगत केलें होते थोड्या काळानें १९४३मध्यें,यांनीं त्यागही केला। श्री.लाहिरी चौधरी यांना जमीनदारांताल मुसलमान किसानांचा त्रास स्वतंत्रपक्षांत गेल्य नें कमी होईल अशी जी आशा वाटत होती,ती नष्ट झाल्यामुळें कीं काय,त्यांनींही तो पक्ष पुढें सोडला.श्री.निर्मल चंदर हे जस 'अणे पक्षांतून' काँग्रेसपक्षांत आले त्याचप्रमाणें लाहिरी यानींही आपली पथरी काँग्रेसपक्षांत टाकली. तीच गोष्ट सरदार मंगलसिंग यानीं याच सुमारास केली. स्वतंत्रपक्ष म्हणजे सरकारापासून कसाही असला तरी शेवटीं मुस्लीम गट झाला मौलाना जफरअल्ली, पूर्णिमी में हिंदू पण नियम पान मुसलमान गौवा, मद्रासी मुसलमान सय्यद-

मूर्तझा साहेब, हाजी अबदुल सत्तार व जे संस्कृत पंडित होतें हे राष्ट्रीयवृत्तीचे होते. मतीन चौधरीही त्याचप्रमाणे.फजलुल हक,शौकतअली यांचीही वृत्ति त्यावेळीं तशीच होती. साधारणतः १८ पैकीं या पक्षांतील निम्यावर मुसलमान, राजकीय बाबतींत कॉंग्रेसपक्षाला साथ देत व जिनाही तेंच करीत. १९३७ नंतर सर्वच बदल झाला. त्याचा उल्लेख पुढें येईलच. यावेळीं कामकाजाचे दृष्टीनें हा पक्ष संघटित नव्हता. वादविवादांत सुद्धां चमक दाखविणारें, अगर अभ्यासू भाषण क्वचितच दिसे. डॉ. झिआउद्दीन हे रँग्लर होते,गणिती होते, पण फार लांबलचक बोलत,कटकटी आणीत, तोंडांतले तोंडांत बोलत,व अनेकवेळां भांडत व रागावत.एका प्रसंगीं "का उगाच रागावता" म्हणून विचारलें असतां श्रीप्रकाश यांनीं नेहमींच्या विनोदानें सांगतलें कीं "बा ते भांडकुदळच आहेत (Well, he is a Wrangler)" रँग्लर म्हणजे गणिताचद्दलची पदवी अगर भांडकुदळ (विंडवादी) असा अर्थ आहे. सरकारला टाकून बोलण्यांत निष्णात क्रिकेटपटु शौकतमिया, प्रसंगीं अनेक चौकार मारीत. आर्थिक बाबतींत मुसलमान सामान्यतः गरिब कडे पाहणारे. त्याच्यातही भाडवल-वाले नव्हते असें नव्हे. मताचे वेळीं सर्वांना मोकळीक होती. पक्ष म्हणजे आग-गाडींतील मैत्री होती. वाटेल त्यानें वाटेल त्या स्टेशनावर उतरावें हीच व्यवस्था होती. तसें करण्यास सभासदांना पूर्ण मोकळीक होती व तशी देण्यांतच नेत्याचें नेतृत्व गाजलें !!

सख्येनें सर्वांत जास्त व विधिमंडळांतील संकेताप्रमाणें "विरोधी पक्ष" (Opposition) म्हणून ओळखला जाणारा पक्ष म्हणजे कॉंग्रेस पक्ष होय. अधिकारारूढपक्ष याला "सरकारपक्ष" म्हणतात व त्याचेपेक्षां संख्येनें कमी, पण अन्य पक्षापेक्षा अगर गटांपेक्षा संख्येनें जास्त अशा पक्षास "विरोधपक्ष" असें म्हणण्याचा सांप्रदाय आहे, विरोधीपक्षानें सभागृहांत बहुसंख्या केली, अगर आम-निवडणुकींत (General Election) तो बहुसंख्य निवडून आला, तर लोकशाही घटनेप्रमाणें त्या पक्षाचें सरकार होते व तो अधिकारारूढ होतो. जोपर्यंत सभा-गृहांत बहुसंख्या बहुमत सरकारपक्षाचें बाजूस असेल, तोपर्यंतच त्यानें अधिकार चालवावा. एखाद्या महत्त्वाचे बिलावर अगर महत्त्वाचे ठरावावर अगर मंडळ अवि-श्वासाचे ठरावावर जर बहुमत त्याचे विरुद्ध असेल तर त्या पक्षानें राजीनामा द्यावा असा संकेत असतो. राजीनामा सदरहू पक्षानें दिल्यानंतर बहुसंख्य ठरलेल्या विरोधी पक्षांनें राजा नें अगर अध्यक्षानें, जशी घटना असेल त्याप्रमाणें बोलवावें, व त्यास

मंत्रिमंडळ बनविण्यास सांगावें. सरकार पक्षाविरुद्ध झालेलें बहुमत हें तात्कालिक आहे, वरवरचें आहे; आमजनता अद्यापि सरकारपक्षाचे बाजूची आहे, असें जर सरकारपक्षास वाटत असेल तर त्यानें आमनिवडणुकीचा (General Election) सल्ला द्यावा व त्याप्रमाणें राजा अगर अध्यक्ष करीत असतो. जबाबदार राज्यपद्धति म्हणजे हीच. प्रधानमंडळ लोकमताची—बहुसंख्य लोकमताची—सनद जोंपर्यंत आहे तोंपर्यंत अधिकारपदीं, नाहीं तर अधिकारच्युत. लोकमत मोजण्याचा गज अगर तोलण्याचा कांटा म्हणजे निवडणूक होय. दोन बलिष्ठ पक्षांत या परिस्थितींत नेहमीं स्पर्धा असते व आपल्या कार्यक्रमानें, आपल्या प्रचारानें व कृतीनें दोन्हीही लोकांच्या हितासाठीं खटपट करीत असतात, निदान कागदोपत्रीं तसें दिसतें. लोकमत हें अखेरीस प्रभावी म्हणून जनता हीच अखेरीस राजसत्तेची मालक असें तत्त्वतः तरी मानण्यांत येतें. दोन्ही पक्ष लोकमतावर बारसा सांगतात, त्याला आळवतात, ज्याला त्याचा कौल मिळेल त्याला आज सत्ता; ज्याला तो कौल मिळणार नाहीं, त्याला उद्यांच्या सत्तेची आशा. याप्रमाणें पक्षापक्षांतील सत्तेच्या पोहऱ्यांचें रहाटगाडगें चालू असतें; म्हणून विरोधी पक्षाकडे विद्यमान सरकारचा बारस, युवराज म्हणून पाहाण्यांत येतें. अन्य बारस अगर युवराज मृत्यु घडवून आणीत नाहीं, वाट पाहतो, चिंिततोही !! येथें मात्र क्षणाक्षणाला हा बारस मृत्यु घडवून आणण्याची खटपट करीत असतो, व तेंही एका दृष्टीनें योग्यच आहे. कारण ‘जातस्यहि ध्रुवो मृत्युः’ याचबरोबर ‘ध्रुवं जन्म मृतस्यच’ हेंही तितकेंच खरें. राजकारणांत पुनर्जन्म असल्यामुळें मृत्यु चिंतिण्यांत अगर घडवून आणण्यांत पाप उरतच नाहीं, पुण्यच लागतें ! कारण ती लोकसेवा होते !!

कॉंग्रेस पक्षांस, वर लिहिल्याप्रमाणें, त्यांच्यावर असलेली महत्त्वाची जाणीव होती. अनेक वेळां सरकारचा पराभव मत नोंदणीचे निकालाप्रमाणें जाहीर होई त्यावेळीं आमच्यापैकीं बहुतेक “राजीनामे द्या” (Resign), “चालते व्हा” (Walk out)” असें ओरडूं; पण यापैकीं कांहींही होत नसे, व लोकशाहीच्या नांवावर चाललेला सरकारी कारभार, केवळ सुलतानशाही आहे, केवळ अनियंत्रित सत्तेचे जोरावर हें राज्य चालूं आहे, त्याला लोकमताचा नैतिक पाठिंबा नाहीं हें नागवें सत्य अगास आम्हीं दाखवीत असूं. नव्या दिल्लींतील सेक्रेटरीएटचें (मुख्य कचेरी) प्रवेश दरवाजावर नागव्या बागनेटवाल्या सैनिकांचा पहारा असतो, व बागनेटचें टोंक प्रवेश द्वारांवरील वाक्याकडे प्रेक्षकांचे डोळे खेंचित असतें. तें खोदलेलें वाक्य असें आहे.

"स्वातंत्र्य कोठल्याही राष्ट्राला देणगी म्हणून मिळत नाही तें मिळवावें लागतें." (Liberty does not descend on a Nation as a boon; it has to be earned )" हें आव्हान, हें नागवें सत्य, कोरलेलें पाहिल्यानंतर आमचा प्रचार सरकारचे मतावर कांहीं परिणाम करील ही आशा व्यर्थ होती; तथापि आम्ही प्रयत्नवादी, निष्ठेनें ६ वर्षे तेंच तें काम, तीच ती आशा बाळगून, करीत होतों!! संघटनेचें महत्त्व जाणून, भावी जबाबदारी ओळखून, कॉंग्रेसपक्ष वागण्याची शिकस्त करीत असे. विषयवार सभासद मुकर करण्यांत आले होते. दोन चिटणीस नीलकंठदास व सत्यमूर्ति हे कामकाजासंबंधीं माहिती घेत, ती गोळा करीत आणि सभागृहांत सदैव जागृत असत. विशेषतः सत्यमूर्ति या कामीं दक्ष असत. सभा चालू असतां सत्यमूर्ति एकक्षण सुद्धां लॉबींत जात नसत. रीतिरिवाज, नियमादि सभाविषयक बाबी, त्यांच्या करतलमलवत् होत्या. नेता, उपनेता, यांचे गैरहजेरींत ते सेनापत्य करीत. पक्षाचे धोरणाप्रमाणें, निर्णयाप्रमाणें, सर्व घडून येतें कीं नाहीं, हें चिटणीसानांच पहावें लागतें. ही जबाबदारी ते ओळखत. पण आपण बोलल्याशिवाय कोणतीही चर्चा पुरी होणार नाहीं, पूर्ण प्रकाश त्यावर पडणार नाहीं, असें त्यांना प्रामाणिकपणें वाटे, व त्यामुळें ते सारखें बोलत. या बाबतींत त्यांच्याशीं पक्षांतील अनेक सभासदांचा मतभेद होता. मद्रासी सभासद नेहमीं कुरकुरत. कांहीं वेळां त्यांत प्रांतीय राजकारणही असे. "मी मेहनत करतों, कायम हजर राहतों, परमेश्वरानें मला वक्तृत्व दिलें आहे, व पक्षाचें लौकिकासाठींच मी बोलतों, लोकांनीं तक्रार करूं नये." असें त्यांना वाटे, व ते एकदां मजजवळ तसें बोललेही. प्रथम प्रथम, विरुद्ध पक्षाचे लोक त्याचीं भाषणं आस्थेनें ऐकत. पण पुढें पुढें ही आस्था अस्तंगत झालेली दिसे. मर्यादेंत असला तर तो सद्गुण म्हणतात, हें कांहीं खोटें नाहीं. तथापि ही मर्यादा ओळखणें किती अवघड आहे, हें फारच थोडे जाणतात!! नीलकंठदास हे ओरिसा प्रांतांतील चांगले कार्यकर्ते, पूर्वी असेंब्लींत स्वराज्यपक्षांत होते. त्यांची मीं ऐकलेली कीर्ति व प्रत्यक्ष पाहिलेली कृति यांच्यांत बिलकुल मेळ नव्हता हें सांगण्याशिवाय गत्यंतर नाहीं. तें एक जोड-चिटणीस होते पण बहुतेक काम सत्यमूर्ति यांचेवरच पडे; हे खूप वाचन व मेहनत करीत, पण भाषणाचे वेळीं तीं सर्व बेकार होई; ते बरेच वेळां बोलत, आविर्भावावरच वक्तृत्व ठरवावयाचें असेल तर, त्यांचा नंबर बराच वर लागेल. बोलतांना बिलक्षण हेल काढतात; लांब दाढी ज्यांत पांढऱ्या केसांनीं बहुमत प्रस्थापित केलें

होतें, त्यांतून आवाज बाहेर पडण्यास अधिक उशीर लागलासा वाटे. टेबलावर प्रचंड पुस्तकांचा ढीग, पण नेमकें पुस्तक त्यांचे हातीं लागे असे मात्र नाहीं. रेल्वेचे बाबतींत आपण तज्ज्ञ आहों असें त्याना वाटे; बरीच माहिती त्यांना होती, हें खरें. पण त्यांची स्मृति भाषणाचे वेळीं कजाग गृहिणीप्रमाणें, स्वयंपाकच करीत नसल्यामुळें, माहितीचा परिपाक श्रोत्यांना मिळत नसे. त्यांचा बहुतेक वेळ खाजगी भानगडी व मतदारसंघांतील खाजगी व्यक्तींच्या तक्रारी अधिकाऱ्यांकडे मांडण्यांत जाई. जेव्हां पहावे तेव्हां घाईत. डोकें उघडें ठेवून इकडून तिकडे जातांना दिसत. त्यांच्या लांब दाढीवरून त्यांना कांहीं लोक विनोदानें साक्रेटस (Socr etas) म्हणत व कांहीं सभासद दोघांच्या डोक्यांतील फरक दाखविण्याचा उद्धटपणाही करीत!! १९३७ पर्यंत ते चिटणीस होते, त्यांची इच्छा प्रांतिक कायदेमंडळांत जाऊन मुख्य प्रधानपद घेण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती, त्यामुळें ते दिल्लींतील कामांत विशेष लक्ष घालीत नसत. जें होतें तें दुर्लक्षिलें; जे पाहिजे होतें तें मिळालें नाहीं यामुळें पुढें पुढें ते फार त्रागा करीत; तथापि पक्षाची शिस्त त्यांनीं कधींही मोडली नाहीं.

पक्षाचे घटनेप्रमाणें, नेते, हे असेच मुख्य होते. भुलाभाई हे नेते निवड-ल्यानंतर त्यांच्या बद्दल ज्या कोणाचे मनांत विरोध अगर शंका होती, ती त्यांचे पहिल्या भाषणानंतर शिल्लक राहिली नाहीं. याचा अर्थ असा नव्हे कीं, त्यांच्याशीं सर्व बाबतींत सर्व सहमत होते. पुढें अनेक मतभेदाचे प्रसंग येतीलच. पण भुलाभाई म्हणजे सरळबुद्धि: वांकडे तिकडे डावपेंच हे त्यांना कळत असले तरी, त्याचा अवलंब कधींच त्यांनीं केला नाहीं. विरुद्धपक्ष कुटिल नीतीचा मार्ग स्वीकारी तरी सुद्धां, आपण आपलें धोरण वाममार्गानें अंमलांत आणावयाचें नाहीं, हें त्यांचें मत कायम असे. अनुयायांशीं ते स्नेहानें व बरोबरीच्या नात्यानें वागत. त्यांची योग्यता, विद्वत्ता, अनुयायी जाणत. स्वतः त्यांना याची जाणीव होती; पण कडवटपणें अगर भडकपणें त्यांचा आविर्भाव त्यांनीं कधींच केला नाहीं. पंडित मोतीलाल यांच्या गादीवर ते आहेत, या जबाबदारीची जाणीव व नवीन परिस्थितीचीही जाणीव त्यांना होती. पंडित मोतीलाल आणि त्यांचे अनुयायी यांचे संबंध उत्कट असले तरी दोघांत मैत्रीभाव (Comradeship) नसे असें त्यांचे टीकाकार म्हणत. त्यांच्याजवळ मनमोकळें बोलणें बहुतेक अनुयायांना शक्य नसे. याचे उलट भुलाभाईंची स्थिति होती. आपल्याशीं असंदीं वडील भावाप्रमाणे प्रेमानें

वागत, रागावत, पण क्षणिक. नेहरूजी अनुयायांना उत्तेजन देत, व प्रसंगीं केलेला हुल्लडपणा सांवरून घेत. भुलाभाई हुल्लडपणाबद्दल रागावत, अनुयायाना उत्तेजन देण्याचे कामीं जरा हात राखत. सबंध ६ वर्षांत शेवटचे भाषणाचे वेळीं त्यांनीं माझें अभिनंदन केलें !! तथापि माझे पश्चात्, माझ्याबद्दल अनेक ठिकाणीं व अनेकांजवळ गौरवपर उद्गार काढले, हेही कृतज्ञतापूर्वक नमूद करणें जरूर आहे. श्री. नेहरूंमध्यें कडकपणा जास्त व तडजोडवृत्ति कमी, असा त्यांचा लौकिक सांगतात. भुलाभाई शक्य तेथें तडजोड व जरूर तेथें कडकपणा. माझी तक्रार ज्या प्रसंगीं जेवढ्या प्रमाणांत कडकपणा दाखविणें जरूर होतें तेवढ्या प्रमाणांत ते दाखवीत नसत. त्यांची आर्थिक बाबतींतील दृष्टि भांडवलशाही दृष्टीशीं जुळे; त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे योग्य प्रमाणांत भांडवलशाही (Mitigated Capitalism) असावी, असें त्यांचें मत होतें. त्यांच्या या मतप्रणालीचा विपर्यास सरकारपक्ष व अन्य कांहीं सभासद करीत. सर जेम्स ग्रिग-अर्थमंत्री—हा त्यांना मुंबईतील प्रचंड भांडवलवाले (Big Bombay Business) यांचा संरक्षणकर्ता म्हणे. तीच गोष्ट इंग्लंडमधील भांडवलवाल्यांचे बाबतींत सूक्ष्म सूक्ष्म मार्गानें हा टीकाकार करी, व आपल्या सत्तेचा दुरुपयोग करण्यास मागेंपुढें पाहात नसे.

भुलाभाईंची दृष्टि कशीही असली तरी पक्षाचा निर्णय जो होईल त्याप्रमाणें ते वागत व बहुमताचा निर्णय याचा अर्थ निव्वळ मत मोजून ठरलेला निर्णय न मानतां सामुदायिक व एकत्रित झालेल्या शहाणपणाचा व सद्बुद्धीचा तो निदर्शक आहे असें समजतात. "I look upon the decision not merely of the majoritv but I interpret it as indicative of pooled wisdom and goodwill." हे त्यांचे एका प्रसंगीं त्यांचे मताविरुद्ध बहुमत झालें असतांना उच्चारलेले शब्द चिरस्मरणीय आहेत. वादविवादांत शाब्दिक कोटी करून फायदा घेणें, अगर एखाद्या तांत्रिक चुकीचा फायदा घेणें, ही गोष्ट साहजिकच ते कमी प्रतीची समजत व यांतच त्यांचा नैतिक दर्जा उंचावलेला दिसे. पक्षसंघटनेबाबत अवश्य लागणारा दीर्घसूत्रीपणा, तितक्या प्रमाणांत त्यांच्यांत नाहीं. सर्वांना खूष ठेवण्याचा प्रयत्न ते करीत, पण त्याचाच परिणाम म्हणून कांहीं सभासद कायम रागावलेले असत. तथापि त्यांचें नेतृत्व सर्वांना वंद्य होतें, मान्य होतें; व सभागृहांतील कॉंग्रेसपक्ष एकजुटीनें त्यांच्यामागे, सहमत असो अगर नसो, नेहमीं उभा असे. सामान्य

सभा, नेहमीं बोलविल्या जात. वादविवाद होई, व शेवटीं अनेक बाबींचा अखेर निर्णय नेत्यावर सोंपविला जाई. शक्य तितकें काम एकमतानें करण्याचा प्रघात असे. जेथें तें शक्य नाहीं तेथें वादविवाद करून, दोन्ही बाजू बऱ्याच जड असल्या तर, नेत्यावर सर्व सोंपविलें जाई.: जोंपर्यंत पंडित पंत होते तोंपर्यंत त्यांच्या सल्ल्याशिवाय भुलाभाई अखेरचा निर्णय कधींच घेत नसत. १९३७ नंतर म्हणजे पंतजी प्रांतिक कायदेमंडळांत गेले त्यानंतर, उपनेते सत्यमूर्ति यांचाही सल्ला ते घेत; पण पूर्वीच्या मानानें कमी. एक तर अनुभवानें त्यांचा विश्वास वाढला होता. पक्षाची निष्ठा पूर्वीप्रमाणें कायम होती व त्यांच्यांत व पंडितजींत अंतर फारसें नव्हतें. पण त्यांच्यांत व सत्यमूर्तींत असलेलें अंतर, याची जाणीव त्या दोघांप्रमाणें सर्वांना होती, हेंही एक कारण असू शकेल! बरेंच बाबतींत मी चिटणीस झाल्यानंतर माझें म्हणणें विचारीत; पण पहिलें वर्ष तरी, माझ्या पहिल्या भाषणांतील पहिल्या वाक्यामुळें मजबद्दलच्या गैरसमजांतच गेलें असें मला वाटे; व त्यामुळें प्रसंगाशिवाय आपण कांहीं सांगावयाचें नाहीं, असेंच मी करीत असे. तथापि प्रतोद म्हणून संघटनेचें व सभासदांतील तत्संबंधींचें काम मलाच सांगत व विश्वासानें सांगत. साधारण सभा जेव्हां भरविणें शक्य नसेल तेव्हां, कार्यकारी मंडळाची सभा अगर तेही शक्य नसेल तर, सभासदांत अगर लॉबींत नेतृवर्गाची ( High Commany ) सभा भरे. नेता, उपनेता, दोन चिटणीस व प्रतोद हे नेहमीं सभासदांत जुळून बसत, व त्यामुळें नेतृवर्गाची सभा वाटेल तेव्हां होऊं शके. त्यामुळें आमच्या पक्षाचा निर्णय निव्वळ हटवादीपणाचा अगर हेकटपणाचा आहे, असा आरोप करण्यास जागा नव्हती. सभागृहांतील वादविवाद लक्षांत घेऊन, व उत्पन्न झालेली परिस्थिति लक्षांत घेऊन पक्षाच्या ध्येयाचे दृष्टीनें निर्णय घेतला जाई, व त्यांत तिरकसबुद्धि (Perversitv) कधींच नसे. कोठल्याही क्षणीं घेतलेला निर्णय, पक्ष एकजुटीनें पाळी. नेता एकीकडे, अनुयायी कांहीं तटस्थ, कांहीं इकडे, कांहीं तिकडे, हें दृश्य काँग्रेसपक्षांत दिसावे म्हणून टपून बसलेले लोक, नेहमीं निराश होत. वादविवादाचे वेळीं प्रसंगीं विरोधि सूर पक्षांतील सभासदांत दिसला तरी, मतदानाचे कामीं एकजूट कायम असे. यांत आमच्या देशी व परदेशी विरोधकांना बौद्धिक गुलामगिरी दिसे. मित्रांना व राजकारणपटूंना शिस्त व व्यक्तिस्वातंत्र्य यांचा सुंदर मिलाफ दिसे. सर जेम्स ग्रिग, काँग्रेसपक्षाचे सभासद एकामागून एक मतदानाकरितां जाऊं लागले म्हणजे "पक्षाचा जुलूम" ( "Tyrany of the Party" ) असें बोलत. कारण यामुळें

त्यांचा पराभव होई. बजेट फेंकलें जाई, पण असे शिस्तप्रिय अनुयायी नाहींत म्हणून त्यांना मत्सर वाटे, हें त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलें असतां सहज समजून येई !!

पक्षांतील सभासद शिस्तींत वागत हें तर खरेंच, पण त्यांच्यांत विविधता नव्हती व्यक्तिमत्त्व नव्हतें असें मात्र नव्हे. उपनेता पंडितजी यांचें थोडेसें वर्णन मागे आलेंच आहे. ते स्वतः मेहनत करीत व अनेकांना करण्यास लावीत. त्यांच्या तावडींत सांपडलेला मी एक अभागी, पण भाग्यवान् होतों. त्यांचे जामात डॉ.पांडे जे अर्थशास्त्रात पारंगत व इंग्लंड व फ्रान्समध्यें पदवी घेतलेले, हे त्यांच्या चिटणिसीचें काम करीत. तथापि माझ्या मागें पण त्यांचा लकडा असे. Standing Finance Committee मध्यें, ते व मीही पण होतों. त्या ठिकाणीं मला त्याचे करितां पुष्कळ टिपणें करावीं लागत. त्यांनीं घालून दिलेली शिस्त, दाखवलेली कामाची पद्धत, यामुळें माझी पुष्कळ प्रगति झाली म्हणून, मी आपणांस धन्य समजतों. तथापि काम फार करावें लागें म्हणून मी थोडा नाखूषही असें. त्यांची वादविवाद कुशलता व प्रभावी व्यक्तित्व, कमिटयांतून विशेष दिसे. स्थायी फडणीशी कमिटींत ते अर्थमंत्री सर जेम्स् ग्रिगला लीलेनें खेळवीत. आमचें बहुमत असें, त्यामुळें व पंडितजींचें ज्ञान व व्यासंग याचा प्रभाव म्हणून अर्थमंत्री स्वभावाने रगेल असून सुद्धां, नम्रतेनें व तडजोड वृत्तीनें वागे. एकदा सदरहू कमिटींत सर जेम्स महाशय थोडेसे टाकून बोलले त्याबरोबर आम्हीं रागावलों. श्रीकृष्णसिंह जे पुढें बिहारमध्यें पंतप्रधान झाले, ते जाण्यास उठले. पंतजींना पण आपण सर्वांनीं निघून जावें असे मीं सुचविलें. तथापि मला ते कांहीं बोलले नाहींत, पण खुर्चींत एकदम ताठ बसले; त्यांची उंची, त्यांचा भव्य चेहरा, त्यांची गंभीर मुद्रा, व शांतपणें उच्चारलेलें त्यांचें पुढील वाक्य "सर जेम्स् तुम्ही अतिरेक केलात, (Now Sir James you have out-done, yourself)" संपतें न संपतें तोंच ग्रिग महाशय एकदम बोलले "पंत मी माफी मागतों." ("Mr, Pant. I apologise)." आम्ही पुन्हां बसलों,काम पुढें सुरू झालें. तात्पर्य पंतजी असेंपर्यंत पक्षाची प्रतिष्ठा फारच होती. पुढें ती कमी झाली असें नव्हे, पण त्यांची जागा भरून मात्र निघाली नाहीं. त्यांच्या जागीं आलेले अगर त्यांचें कार्य चालविणारे शरिराप्रमाणें, व योग्यतेनेंही, लहानच वाटत.

मद्रासी सभासदांपैकीं डॉ. राजन् हे एक प्रमुख होते. स्वभावानें फारच गोड, आणि विनोदी होते एखादे वेळेस बोलत, वैद्यकीय विषयावरच बोलत व व्यवस्थित बोलत. श्री. गिरी हे कामगार जगांत प्रसिद्ध होते. त्यांचे वडील श्री. जोगिया,

पूर्वी सभागृहाच सभासद होते, याचा फायदा जास्त सहानुभूतीच्या दृष्टीनें त्यांना मिळ. कामगार प्रश्न संबंधींच ते बोलत. थोडक्यांत बोलत, पण मुद्देसूद बोलत. पाश्चात्य देशात शिक्षण घेतलेले, पण राहणी अगदी साधी, व माझ्याशीं तर तफारच प्रेमळपणानें वागत. ते, मी व श्री. नारायणराव जोशी, हे कामगार प्रश्नांसंबंधीं विशेष लक्ष घालीत असूं, त्यामुळें आमची मैत्री जमली. श्री. गिरी व डॉ. राजन् पुढें मद्रासेंत मंत्री झाले. प्रो. रंगा ही एक विलक्षण व्यक्ति आहे. मद्रासी सभासद प्रामुख्यानें "शेटजी व भटजी" होते; म्हणजे चेट्टीयर—व्यापारी,—व आय्यर आयंगार वगैरे ब्राह्मण वर्गाचे, बौद्धिक वर्गातील होते. प्रो. रंगा हे शेतकरी वर्गात जन्मलेले; पण ऑक्सफोर्ड विश्वविद्यालयाचे अर्थशास्त्रांतील पदवीधर आहेत. कांहीं काळ प्राध्यापकही होते; कांहीं काळ सरकारी संशोधन खात्यांत होते. १९३० सालीं स्वराज्यपक्षीयांनीं राजीनामे दिले, तेव्हां निवडणुकांवर बहिष्कार होता, त्यावेळीं हे बिनविरोध निवडून आले. पुढें १९३० सालीं आमनिवडणुकींत उभे होते पण पडले. नंतर १९३१ चे सुरुवातीस ते कांग्रेस चळवळींत आले. मद्रास इलाख्यांतील ती चळवळ कशी होती, हें सांगण्याचें कारण नाहीं. १९३१ मध्यें कॉंग्रेस राजकारणांत ते आपल्या प्रांतांत जोरानें वागू लागले. १९३२-३३चे चळवळीनंतर "समाज सत्तावादी" राजकारणांत उतरले, पण पक्षानें निवडणुकींत भाग घेऊं नये असें ठरविल्यामुळें अधिकृत कॉंग्रेस राजकारण पत्करून निवडून आले. शेतकऱ्यांबद्दल त्यांची तळमळ विशेष आहे; कामगार प्रश्नासंबंधीं पण ते नेहमीं उत्सुक असत. बोलण्याचे हौसेबाबत सत्यमूर्तींशीं स्पर्धा करीत. बोलतांना अस्खलित बोलत, पण त्यांत काय येईल याचा भरंवसा नसे. बोलतांना पक्षाचा निर्णय अगर धोरण डोळ्यांपुढें ठेवणें त्यांना मानवत नसे; पण मत मात्र पक्षाचे निर्णयाप्रमाणें देत. सरकारी सभासदांत नेहमीं मिसळत, व रंगांचा स्वभाव पाहून सदरहू बेरकी सभासद त्यांना पक्षाविरुद्ध भडकावीत. त्यांना शांत करण्याची, त्यांचा राग काढण्याची कामगिरी मलाच करावी लागे. स्वभावानें ते भडभडे असत, माझ्याशीं मोकळेपणानें वागत, प्रसिद्धीची हांव भयंकर, व बातमीदार वर्ग बराच मद्रासी असल्यामुळें, त्यांना व अन्य मद्रासी सभासदांना प्रसिद्धी अधिक मिळे. अन्य मद्रासी सभासद मात्र रंगा यांस सरळ स्वभावाचे मानण्यास तयार नसत. कदाचित् त्यांचा अनुभव तसा असेल, व रंगांना जास्त प्रसिद्धी मिळते म्हणून कुरकुरत. किंबहुना प्रत्येक मद्रासी सभासद, दुसऱ्या मद्रासी सभासदांना जास्त प्रसिद्धी मिळते म्हणून कुरकुरे !!

श्री. अनंतशयनम् आयंगार चांगले वकील होते. ते अनंत उपसूचना आणीत. बोलतांना त्यांचा वेग सर्वांत जास्त. मोटार कायद्याचें चर्चेचे वेळीं मोटारींचा वेग नियंत्रित असावा असें कलम ज्यांत आहे, त्यावर बोलतांना इतके भरभर बोलत होते कीं, एकानें सभागृहाचें नियमांत बोलण्याचें वेगावर नियंत्रण असावें म्हणून, गंभीरपणे सुचविलें !! मात्र त्यापासून अपघात टळतीलच असें मात्र सांगितलें नाहीं!! सनातनी वागणूक, व सुधारक विचार, त्यांचे असल्यामुळें नेहमीं घोटाळें उडत, पण स्वभावानें गोड व प्रेमळ असल्यामुळें, पक्षांत लोकप्रिय होते. सामी व्यंकटाचलम् चेट्टी हें सर षण्मुखम् चेट्टींचा पराभव करून आल्यामुळें त्यांना महत्त्व प्राप्त झालें होतें. त्यांची दृष्टि व्यापारी होती. सनदशीर राजकारण कॉंग्रेसचें असेल त्यावेळीं कॉंग्रेस बरोबर, एरवीं दूर, पण विरोधी नाहीं असें वागत. श्री. मधुलिंगम् मुदलीयार हे वृद्ध गृहस्थ, गांधी वाक्य प्रमाण मानणारे होते. बैठकींत एकदांच बोलत, पण प्रश्न आणि ते अगदीं महत्त्वाचे विचारावयाचें, असें त्यांचें वर्तन असे. त्यांना आम्हीं आजोबा (Grand Papa) म्हणत असूं. नांव अविनाश लिंगम् पण ब्रह्मचारी अशी एक मुलगेवजा मूर्ति मद्रासी सभासदांत होती. श्रीमान् व्यापारी पण स्वतः आश्रम काढून राहतात. फडणिसी व्यवहारांवर तामीलमध्यें त्यांनीं ग्रंथ लिहिले आहेत. उपप्रश्न विचारण्यांत सत्यमूर्तींशीं स्पर्धा, बोलण्याची तीव्र इच्छा पण जमत नसे. रामकृष्ण परमहंसाचे उपासक म्हणून त्यांचा सर नृपेंद्र सरकार यांच्याशीं स्नेह असे. कांहींतरी करावें असें नेहमीं त्यांना वाटे, पण होत मात्र नसे. टीका,टिपणी करण्यास कचरत नसत, पण गुणग्राहकताही त्यांचें अंगीं होती. प्रांतिक राजकारणांत त्यांचें महत्त्व फार होतें यामुळें मद्रासी सभासदांत त्यांचें विशेष वजन असे.श्री. नागेश्वरराव, श्री. सॅम्युएल एरन्, कुमारस्वामी राजा, ही सर्वमंडळी निष्ठावंत अनुयायी होती. १९३७ मध्यें श्री. संतानम् हे आले. संतानम् फार मेहनती, अभ्यासू व उपयुक्त सभासद ठरले. मद्रासी सभासदांमध्यें राजाजीबद्दल असामान्य आदर होता. राजाजींनीं आपल्या वक्तृत्वानें व वजनानें सर्व जागा कॉंग्रेसपक्षास मिळवून दिल्या होत्या याचा विसर कोणासही पडणें शक्य नव्हतें.

श्री.सिद्दप्पा होसमनी, हे कर्नाटकांतील कॉंग्रेसपक्षीय सभासद आमचे बरोबर पहिली दोन वर्षें राहत असत. प्रत्यक्ष वयापेक्षां जास्त वृद्ध दिसत, व बयाचे व्यस्त प्रमाणांत त्यांची तडफ व लगबग असे. कोणी सरकारी सभासद, अगर अन्यपक्षीय सभासद,कॉंग्रेसविरुद्ध बोलला कीं,आधींच मोठा असलेला त्यांचा कर्नाटकी आवाज,

आणखी जोरानें चढे. नांव होसमनी असल्यामुळें पहिलें वर्षी अनेक मुसलमान संस्थांचीं आमंत्रणें त्यांना मुसलमान समजून येत! हाच समज खुद्द सभासदांत सुद्धां कित्येक दिवस होता. बैठकींत हजेरी सहाही वर्षांत एकदांही चुकली नाहीं, व सहाही वर्षांत चुकून एकदांसुद्धां सभागृहांत ते बोलले नाहींत.तथापि आप्पा–आम्ही त्यांना आप्पा म्हणत असूं–व आणखी तीन चार कॉंग्रेसपक्षीय सभासद,शेवटच्या रांगेंत बसत,व तेथून मध्येंच ओरडून व कांहींतरी प्रश्न विचारून विरुद्ध पक्षांतील बोलणाऱ्या सभासदांवर गोळ्या झाडत,म्हणून त्यानां आम्ही "सरहद्दीवरच्या टोळ्यांतील बाटमारे" ("Snipers of the Frontier Tribes") म्हणत असूं!! पुढें १९३७ नंतर मि. अबदुल कयूम हे डॉ.खानसाहेब यांचेजागीं निवडून आले; तेव्हांपासून या टोळीला चांगलाच पुढारी मिळाला. कारण मि. कयूम हें बरें बोलत व त्यांचा आकार मौ. शौकतअल्लीशीं स्पर्धा करीत असल्यामुळें, त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करणें सोपी गोष्ट नव्हती !! डॉ. देशमुख हे मुंबईचे कॉंग्रेस प्रतिनिधि होते. कोठल्याही महत्त्वाच्या विषयांवर बोलण्याची त्यांना हौस. राजकारण ही कायदेपंडितांची मिरास,ही परिस्थिति अनेक देशांप्रमाणें हिंदुस्थानांतही एकेकाळीं होती. गांधी युगांत राजकारण हें सामान्यजनानीं सुद्धां करावें इतकें साधें झालें असें सर्व मानूं लागले. तथापि विधि-मंडळांतील राजकारणांत थोडीशीं कायदेपंडितगिरी लागते; कायदे विषयक शास्त्राचा अभ्यास करावा लागतो, असें म्हटल्यानें व हें ज्यांचेजवळ नाहीं अशांना तेथें वावच नाहीं, असें नव्हे. प्रत्येक गोष्ट प्रयत्न साध्य आहे;अभ्यासानें ती हस्तगत होते. डॉ. देशमुखांना अभ्यासाची आवश्यकता फारशी वाटली नाहीं. जोरांत बोलावयाचें म्हणजे आशयांतील कमतरता आवाजानें भरून निघते असेंच त्यांना वाटत असलें पाहिजे. तथापि ज्यावेळेस ते खरोखरच माहिती घेऊन, आणि टांचणें करून बोलत, त्यावेळीं त्यांचें बोलणें परिणामकारक होई; हा अनुभव घटस्फोट बिलाचे वेळीं त्यांनाहि आला आहे. उलट घाईघाईनें स्त्रीला वारसा मिळावा म्हणून आणलेल्या बिलाचा, कायदा झाल्यानंतर काय घोटाळे झाले याची जाणीव त्यांना असलीच पाहिजे; निदान सदरहू कायद्याचा अनुभव ज्यांना आला त्यांना तरी,ती जाणीव आहे.पुढें दुरुस्ती आणून त्या कायद्यांत बदल करावा लागला. डॉ. देशमुख ठोसे देण्यांत व घेण्यांत मागें घेत नसत. परंतु प्रसंग संपल्यानंतर त्यांनीं मनांत कांहीं ठेवलें, असें कधींच दिसून आलें नाहीं. त्यांच्या स्वभावाला कडक पक्षशिस्त हें न झेपणारें पथ्य होतें. एखादे दिवस यावें,भाषण करावें व पुन्हां मुंबईस जावें, अशी त्यांची फार इच्छा दिसे. नेहमीं 'जोडी लावा'

(Pair off) म्हणून त्यांची प्रतोदाकडे मागणी असे. एखाद्या सभासदाला महत्त्वाचें कामानिमित्त बाहेर जाणें भाग आहे, अशावेळीं त्या सभासदाच्या पक्षाचा प्रतोद, विरुद्धपक्षाचे प्रतोदाकडे जातो,व तशीच स्थिति असलेला त्याचा सभासद असल्यास दोघांची जोडी लावण्यांत येते, व दोघेही ठरलेल्या वेळां अगर ठरलेले दिवस गैरहजर राहतात. याला जोडी लावणें (Pair off) म्हणतात.हा करार लेखी असतो व करार मोडून एकानें हजर राहून मत दिल्यास सभापति तें मान्य करीत नाहीं. यामुळें,उभय-पक्षांतील मतांचें प्रमाण सहसा बदलत नाहीं.दोन्हीपक्षांतील मतें सारखे संख्येनें कमी होतात. असें जोडी लावणें, तासांकरितां, दिवसांकरितां, नेहमीं चालतें. प्रश्न एवढाच असतो कीं, खरोखरच सभा सोडून जाणें अपरिहार्य आहे कीं नाहीं, हें ठरविणें; यामुळें प्रतोदाला नेहमीं सभासदांची नाराजी पत्करावी लागतें. सभासद जास्तींत जास्त संख्येनें वेळेवर हजर ठेवावयाचे तर, जोडी लावणें शक्य तेवढें कमी करणें त्याला भाग पडे. सुरुवातीपासून अखेरपर्यंत निष्ठेनें हजर राहणारावर नेहमींच अन्याय होई. त्यांचेंहि धंद्याचे दृष्टीनें नुकसान होई, पण हें पत्करून ते निवडणुकीस उभे राहिले होते. मतदार संघाशीं व पक्षांशीं संपूर्णतया निष्ठेनें रहावयाचें म्हणजे "पॅरोल-वर" घरीं जावयाचें नाहीं. तथापि आमचे पक्षांत "जोडी लावा" म्हणून निकड लावणारी थोडी मंडळी होती; पण त्यांत डॉ.मजकुरांचा पहिला नंबर असे. त्यानां ही सवलत व येतील तेव्हां बोलण्याची संधि मोठ्याप्रमाणांत मिळे व याचें कारण मीं आहें असें समजून कांहीं सभासदांचा मजवर रागही होई. शिस्तीचे बाजूनें जेव्हां मी त्यांच्याशीं बोलें, त्यावेळेस त्यांचें नेहमींचें उत्तर म्हणजे "तुला पुढारी व्हावयाचें आहे—मला नाहीं; तूं वागतोस तसेंच वागलें पाहिजे." व्यक्तिशः डॉ. मजकूर सभासदांत अतिशय लोकप्रिय होते.

महाराष्ट्रातर्फें निवडून आलेले कॉंग्रेसपक्षीय सभासद मी व केशवराव यांचा उल्लेख आमचे पक्षांत "अभेद्य जोडी, जुळे भाऊ" (The inseparables; Twins,) असाच होई. पुढें पुढें अन्य सभासदही असाच उल्लेख करूं लागले. आम्ही एकत्र राहत असूं, यावर एका वृद्ध महाराष्ट्रीय सभासदानें बजाविलें कीं, यांतून क्षुल्लक गोष्टीवर भांडणें निघतात असा अनुभव आहे. मी त्यांना उत्तर दिलें कीं, "भांडणास दोन माणसें लागतात. आमच्यापैकीं कोणीही त्यांतील एकसुद्धां होण्यास तयार नाहीं," व ही गोष्ट सत्य असल्याची खात्री, पुढें त्यांनाही पटली. केशवराव अनेक प्रश्न विचारून विविध माहिती सरकारकडून काढीत. जेव्हां बोलत तेव्हां थोड-

क्यांत व व्यवस्थित आणि शिस्तीचे बाबतींत त्यांचें वर्तन नमुनेदार. आपली जागा सोडून कोठेंही जावयाचे नाहींत. कांहीं सभासदांना कार्यकारी मंडळांतील सभासदांबरोबर बोलावें, मिसळावें असें वाटे व त्याप्रमाणें ते करीत. मर्यादेंत तसें वागणें अयोग्य नव्हतें. तथापि सरकारी सभासद फार जागृत, गोड बोलून माहिती काढण्यांत, स्तुती करून दुहीचें बीज पेरण्यांत पटाईत. स्वराज्य पार्टीचें वेळेचा त्यांचा अनुभव त्यांना मार्गदर्शक होताच. कॉंग्रेसपक्षाची शिस्त फार तर एक वर्ष टिकेल, पुढें स्पर्धा उत्पन्न होईल, भांडणें लागतील, गैरहजेरी वाढेल, असें भविष्य एका सरकारनियुक्त पण मुरलेल्या सभासदानें मजजवळ केलें होतें. त्याला मी उत्तर दिलें तें असें. "स्वराज्यपक्ष कॉंग्रेसचे कडक शिस्तीस बांधला गेलेला नव्हता; सदरहू पक्षांत तुरुंगांतील अनुभव घेतलेल्या सभासदांची संख्या फार नव्हती. या खेपेस पक्षांतील दोन-चार व्यक्ति सोडल्या तर प्रत्येक इसम अनेक वेळां तुरुंगांत जाऊन आलेला ! तुरुंगांत राजबंदी भांडतात पण तुरुंगाचे अधिकाऱ्याविरुद्ध एकजूट राहतात हा त्यांचा प्रकृतिविशेष,येथें विधिमंडळांत नेहमींच उपयोगी पडणार हें उघड होतें. तसेंच यापुढील विधिमंडळांत राजकारण कॉंग्रेसपक्षातर्फेंच चालणार व हा बहुसंख्य पक्ष या परिस्थितींत स्वहिताचे दृष्टीनेंसुद्धां शिस्त सोडून वागेल असा संभव थोडा. बलवान पक्ष, प्रभावी शासन तंत्र, व वाढलेली शिस्तप्रियता लक्षांत घेतां कॉंग्रेसपक्ष अखेरपर्यंत बलवानच राहील." माझें म्हणणें खरें ठरलें. राजाजींनीं पाटणा येथें १९३४सालीं हें निवडणुकीचें कार्य–कॉंग्रेसकार्य–करून जी मुत्सद्देगिरी व दूरदृष्टि दाखविली तिचेंच हें फळ आहे. सरकारी सभासद, कॉंग्रेसपक्षांतील सभासदांकडे चुकूनसुद्धां मत याचना करीत नसत. इतका कॉंग्रेसपक्षाचा वचक बसला होता. गप्पा मारण्यास सरकारी सभासद नेहमीं तयार,पण केशवराव त्याही मारण्यास नाखूष असत. १९३६ मध्यें मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड ब्रेबन हे दिल्लीस अधिवेशनाचे वेळेस आले होते. मुंबई प्रांतांतील सभासदांना भेटावें म्हणून त्यांनीं सरकारी प्रतोद यांना आपली इच्छा कळविली. सदरहू प्रतोद सर मुकर्जींनीं त्याप्रमाणें सभासदांना कळविलें. त्याप्रमाणें कांहीं सभासद लॉर्ड ब्रेबन, जे व्हाइसरॉयचे गॅलरींत बसले होते, त्यांना भेटले. केशवरावांना "तुम्हांस गव्हर्नर भेटूं इच्छितात," असें जेव्हां सदरहू प्रतोदानें सांगितलें त्या वेळेस त्यांनीं खालील प्रमाणें उत्तर दिल्याची तक्रार मुकर्जी यांनी मजजवळ केली. "मला गव्हर्नरसाहेब यांचेकडे कांही मागावयाचें नाहीं. कोणाही पुतण्याला नोकरी मागावयाची नाहीं. तेव्हां भेटण्याचें कांहीं कारण नाहीं."

या एका वाक्यांत माझे मतें त्यांचा तेजस्वी स्वभाव प्रतिबिंबित झाला आहे. ग्रंथालयांत जेव्हां सदरहू गव्हर्नर महाशय आले तेव्हां मी तेथें कांहीं उतारे घेत होतों. सर मुकर्जी त्यांचे बरोबर होते. त्यानीं माझी ओळख करून दिली. थोडा वेळ कॉमन्स सभेमधील आपला अनुभव त्यानीं सांगितला व ग्रंथालयांतील भिंतीवरील गव्हर्नर जनरलच्या तसबिरा मोजून व रिकाम्या राहिलेल्या ५ जागांकडे बोट दाखवून ते स्मित हास्य करून ह्मणाले "आणखीं पंचवीस वर्षें आमचें राज्य—( कारण प्रत्येक व्हाइसरॉय ५ वर्षें असतो)-"(Twenty five years more of our rule);" मीही हंसत हंसत उत्तर दिलें कीं "आम्ही त्या पूर्वींच तें खलास करूं!" (" We will end it sooner )." या आमच्या हास्यविनोदाचें मर्म न समजल्यामुळें त्यांचा लष्करी ए. डी. सी. मजकडे रागानें पाहूं लागला. पण किंचित् थांबून, शांतपणें लॉर्ड ब्रेबन म्हणाले, " तसें झालें तर; तुमच्या मंडळींच्या तसबिरी दिसतील." (" In that case your pictures will appear.") उत्तरांतील चाणाक्षपणा व सभ्यता मी कधींही विसरणार नाही. लॉर्ड ब्रेबन जगले असते तर खास गव्हर्नर जनरल झाले असते.

शेट गोविंददास, श्री. घनश्यामसिंग गुप्ता, व डॉ. खरे हे मध्यप्रांतीय कॉंग्रेसपक्षीय सभासद होते, व त्यांत विशेष भर श्री. डागाजींची होती. श्री. डागाजी मोठे जमिनदार व व्यापारी होते व याला अनुसरून त्यांची दृष्टि होती. पण जें कॉंग्रेस ठरवील, तें शिरसामान्य करणारे एकनिष्ठ सभासद होते. ते व मीरतचे श्री. चौधरी रघुवीरसिंग यांची जागा ह्मणजे सभा चालू असतां गनिमीकाव्यानें पानपट्टी खाण्याची जागा होती, व त्यांचा आतिथिधर्म पक्षातीत असल्यामुळें, अनेक विरोधी सभासद आमचेवर तोंडसुख घेतल्यानंतर, श्रमाचा परिहार करण्याकरितां तांबूलभक्षणार्थ, या सदावर्तांत येत. शेट गोविंददास फार पोक्तपणें वागण्याचा आव आणीत. नेहरु कारकीर्दींतील कथा सांगत; परंतु असामान्य असें कांहीं त्यांच्यांत दिसलें नाहीं. त्यांचा बराच वेळ अन्य भानगडींत जाई. चित्रपट कथालेखन, व्यापार वगैरे व्यवसाय त्यांचे मागें 'धुवांधार' प्रमाणें असत. श्री. गुप्ताजी म्हणजे आर्यसमाज संस्कृतीचा आदर्श होय. मितभाषी, मृदुभाषी पण दृढनिश्चयी, शुद्धचारित्र्य, कठोर शिस्त—या सर्व गोष्टी त्यांचे ठायीं होत्या. " मी अमुक विषयाबर बोलूं इच्छितों" असें मला—प्रतोदला—सांगत,जुळल्यास पहा; नाहीं जमलें तर रागवत नसत. त्यांची मुख्य कामगिरी म्हणजे आर्यविवाह कायदा (Arya Marriage Validity

Act) याचा उल्लेख पुढें येईलच. १९३७नंतर ते मध्यप्रांतांत कायदेमंडळाचे अध्यक्ष झाले. डॉ. खरे पूर्वी पिळदार मिशा ठेवीत. लाहोर कॉंग्रेसचे वेळीं परत येतांना, ते, मी, तात्यासाहेब केळकर, व बॅ. मोरोपंत अभ्यंकर, असे एका डब्यांत होतों. एका गोऱ्या अधिकाऱ्याशीं त्यांचें झालेलें भांडण व डब्यांतून त्यांचें बहिर्गमन–ती एक त्यांच्या बाबतींतील माझी मनोरंजक आठवण होती. येथें आले त्यावेळीं पिळदार मिशा नव्हत्या. १९३०–३४ मधील अहिंसात्मक सत्याग्रहांत मिशांचें बलिदान झालेलें दिसत होतें. पण मिशांतील पीळ मनांत दुपटीनें वाढला हें लवकरच दिसून आलें! डॉ. खरे नागपुरी डावपेंचांत प्रवीण. पण येथें त्या रसायनाचा उपयोग नव्हता. सत्तधारी पक्ष असला म्हणजे हें व तत्सम अन्य रसायनें, पक्षाची प्रकृति चांगली ठेवण्याकरितां जरूर असतात, असा कांहींसा अनुभव आहे. येथें विरोधी पक्षाचें कार्य करावयाचें होतें. प्रचलित घटनेंत बहुमत करून सुद्धां सत्ता मिळ-ण्याचा कधींही संभव नसल्यामुळें,विधायक भूमिका ठेवण्याची गरज नव्हती. कायम विरोध ठेवल्यानेंही सत्तेचा पार ढासळणार नव्हता. लोकमत विन्मुख होऊं नये, एवढीच काळजी आमचे पक्षास घेणें वास्तवीक जरूर होतें. या दृष्टीनें विशेष जबा-बदारी ठेवून, बोलण्याचेंहि कारण नसे; व ही गोष्ट डॉ. मजकुर यांनीं चांगलीच जाणली होती. त्यांच्या कोट्या बऱ्याच सामान्य असत, पण कांहीं चमकदार असत. राष्ट्रसंघाचा(League of Nations) उल्लेख करतांना त्यांनीं कल्पनासंघ (League of Notions)असा त्याचा उल्लेख करून एका शब्दांत केवढा अर्थ समाविष्ट केला, याची पूर्ण कल्पना त्यांनाहि नसेल! सदरहू संघाचें वैयर्थ्य स्पष्टपणें नजरेस आणलें. त्यांची वृत्ती त्यावेळीं थोडीशी हट्टी होती; रागाच्या भरांत ते थोडे घाईनें वागत. पण त्याचबरोबर, माझा अनुभव त्यांचें अंतःकरण निर्मळ आहे असाच होता, व तेंच माझें मत अद्याप कायम आहे. मध्यप्रांतांतील राजकारणांत पुढें झालेल्या घटना लक्षांत घेतां, ते जर दिल्लीच्या कायदेमंडळांत राहते तर बरें झालें असतें. प्रयो-गाचे सोयीसाठीं म्हणून त्यांना प्रांतीय राजकारणानें महत्त्व दिलें, व तें घेऊन ते सोईस्कर प्रयोग करूं लागल्याबरोबर स्फोट झाला, याचा दोष न्यायतः सर्वांवर आहे. त्यांची खाजगी वागणूक इतकी अकृत्रिम व इतकी प्रेमळ, इतकी आपुल-कीची कीं, तिची आठवण बुजणें शक्य नाहीं.

संयुक्तप्रांतांतील सभासदांत डॉ. भगवानदास खरोखर ऋषितुल्य होते. त्यांचा प्रशांत चेहरा,त्यांचा साधाच पण अभिरुचिपूर्ण पोषाख,वागण्यांतील अभिजात नम्रता,

या गोष्टी पाहिल्या व त्यांचा गाढ व्यासंग व सखोल विद्वत्ता यांची जाणीव झाल्याबरोबर समुद्राकडे ज्या आदरानें व ज्या भावनेनें आपण पाहतों,तीच भावना मनांत येई. ३ वर्षें ते सभासद होते.त्यांना आम्हीं बळेंच ठेवून घेतलें होतें. आपणांस कांहीं ग्रंथ पुरे करावयाचे आहेत, ॲसेंब्ली हें आपलें कार्यक्षेत्र नव्हे म्हणून मला सोडा, असा आग्रह पहिलें अधिवेशन झाल्यापासून, ते करीत होते व शेवटीं पक्षानें त्यांना तशी परवानगी दिली. त्यांना बळेंच एकदां आग्रह करून बोलण्यास लाविलें, व त्यांनीं मोठा पण विद्वत्तापूर्ण निबंधच वाचला! त्यांचे चिरंजीव श्रीप्रकाश हेही सभासद होते. इतिहास, गणित, भाषा, या तिन्हींत त्यांनीं इंग्लंडमध्यें पदव्या मिळवून विधिविशारद म्हणजे बॅरिस्टर होऊन ते परत आले होते. वडिलांप्रमाणें त्यांचें ज्ञान स्थिर नव्हतें, तें गतिमान् असून मुखाबाहेर पडण्याची नेहमीं धडपड करीत असे. वडील स्थितप्रज्ञाप्रमाणें दिसत, तर चिरंजिवांची खळबळ फार; वडिलांचे मानानें यांची विद्वत्ता उथळ दिसे, पण तसें नव्हतें. विषयाचा ते अभ्यास करीत; माहितीपूर्णबोलत, तथापि दूरान्वित बोलत. कोट्यांचे आहारीं जात असल्यामुळें,अनेक वेळां कंटाळवाणें वाटे. त्यांचा विनोद, व मधुन मधून सुटणारे प्रश्नवजा बाण, मर्मघातक असत, त्याचे नमुने प्रसंगीं पुढें येतीलच.सामाजिक बाबतींतील रीतिरिवाज(Social etiquette) काटेकोरपणें पाळीत. चहापान असो, जेवण असो, अगदीं रीतिरिवाजाप्रमाणें नियमित, पद्धतशीर असे. पत्रव्यवहारांत फार दक्ष, नियमितपणा हा त्यांचा विशेष गुण होता. सुरुवातीची साम्यवादाची त्यांची दृष्टि व कळकळ, १९३७ नंतर संयुक्तप्रांतांत झालेल्या कुळकायद्यानें थोडी मंदावली! ते मोठे जमिनदार, धनवान् होते. संपत्तीची विषमता कमी न व्हावी असेंच वाटे. तथापि त्या बाबतींत झालेला कोठे लाही प्रयत्न त्यांना अयोग्य वाटे!! पंतांचे प्रधानमंडळावर ते नाराज होते. संयुक्तप्रांतांतलि काँग्रेस राजवट म्हणजे " ठाकोर और चौधरी का राज्य देहातों में हो गया," "ब्राह्मण व शेतकरी यांचें राज्य खेडेगांवांत झालें," असें ते म्हणत. बनियाचें वर्चस्व कमी झालें हा त्याचा अर्थ होता. ते जातीनें वैश्य अगर बनिया होते, पण वृत्तीनें नव्हते. तथापि वर्गवृत्तीचा दृष्टिकोण, काम केल्यावांचून राहत नाहीं, हें खरेंच आहे. सैनिकचे संपादक श्री. कृष्णदत्त पालीवाल हे श्री. कुंझरूंचा पराभव करून निवडून आलें होते. साम्यवादी, थोडें बोलणारे, पण फार खोडकर, बसल्या बसल्या काड्या पेटवून टाकीत, व पेट घेतल्यानंतर काड्यांनीं हें करणें बरोबर नाहीं, असा वेदान्त शांतपणें सांगत. शेरवाणी हे मुसलमान सभासद एक

प्रसिद्ध व्यक्ति होती, पण १९३५ चे मार्चांत ते वारले. त्यांचें वर्णन पूर्वीच येऊन गेलें आहे. मि. काझमी हे दुसरे मुसलमान गृहस्थ, निवडणुकीनंतर पक्षास मिळाले होते. स्वभावानें चांगले व पक्षाची शिस्त मानीत. पक्षानें असेंब्लींतून अंग काढ-ल्यानंतर ते मागें राहिले; तसा त्यानां पूर्ण अधिकार होता, कारण ते पक्षाचें तिकिटा-वर निवडून आले नव्हते. त्यांची वृत्ति राष्ट्रीय असून कडवेपणा त्यांच्यांत तिळमात्र नव्हता. श्री. मोहनलाल सक्सेना, हे लखनौ डिव्हिजनचे प्रतिनिधि जवाहरलालचे दोस्त, त्यांच्या पद्धतीनें बोलत व अनुकरणानें आपली मैत्री ठळकपणें दाखवीत. गुप्त माहिती काढणें, गुप्त शोध घेणें यांत त्यांचा हातखंडा होता. सर हेन्री क्रेक गृहमंत्री यांच्याशीं त्यांचा नेहमीं खटका उडे. शेवटपर्यंत क्रेक साहेबांना, मोहन-लालना, कोठून माहिती मिळे हें कळलें नाहीं. सरदार जोगेंद्रसिंग हे शीख तरूण संयुक्तप्रांतांतून पक्ष तिकिटावर निवडून आले होते. खूप श्रीमंत, तुरुंगांत सुद्धां सर्व गोष्टी मनाप्रमाणें घडवून आणण्याची कला व साधनें त्यांचे जवळ होतीं-असा त्यांचा लौकिक. स्वभावानें गोड, चेष्टेखोर; दुय्यम प्रतोद म्हणून पुढें काम करूं लागले. नंतर मी चिटणीस झाल्यानंतर ते प्रतोदाचें काम करूं लागले; व हें सर्व काम त्यांनीं चांगलें केलें. ख्याली खुशालींत राहण्याचा त्यांचा स्वभाव असले, मुळें कांहीं सभासदांची व त्यांची विशेष गट्टी होती. सर्व पक्षांस प्रिय व सर्वत्र त्यांना प्रवेश होता. त्यांना दिल्ली इतकी प्रिय होती कीं, १९३७ सालीं पंजाब प्रांतिक मंडळांत निवडून आले, पण तिकडे राजीनामा दिला. पंजाबांत निवडणूक म्हणजे फारच खर्चाची बाब, परंतु आमच्या ' जोगी 'ला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. दिल्ली सिमल्यांतील जीवनांतील गोडीमुळें सर्व व्यर्थ वाटे.

बिहारी सभासदांत श्रीकृष्णसिंह, अनुग्रह बाबू, रामनारायण, दीपनारायण, सत्यनारायणसिंह, कैलासबिहारीलाल, ही प्रमुख मंडळी होती. बाबू दीपनारायण पहिल्याच वर्षी वारले. ते एक सभ्यतेचा नमुना होते. त्यांचें दातृत्व प्रसिद्ध आहे. त्यांनीं एकच भाषण केलें पण चांगलें केलें. त्यांची समतोलबुद्धि त्यांच्या मृत्युमुळें पक्षाचे उपयोगी पडली नाहीं. श्रीकृष्णसिंह, अनुग्रहसिंह, मध्यवर्ती असेंब्लींत चमकले नाहींत पण अत्यंत सज्जन, पक्षाशीं निष्ठावंत, असे होते. सत्यनारायणसिंह हे तरुण व रंगेल सभासद आहेत, पुढें हे दुय्यम प्रतोद झाले. कैलासबिहारी, " नेहमीं बिहारला मागें टाकण्यांत येतें. " हीच तक्रार गात. कमी नोकऱ्या, कमी मदत मध्यवर्ती सरकारकडून बिहारला मिळते, हें त्यांचें नेहमींचें रडगाणें होतें.

कॉंग्रेसनें प्रांतीयदृष्टीनें विचार करूं नये, असा पोक्त विचार मद्रासी सभासद नेहमीं सांगत !! आंकडे खात्यांत ( Statestical Department ) जेव्हां ५-७ मराठी मंडळी आली ( ती सर्व पाश्चात्य पदवी विभूषित व कार्यक्षम होती, ) त्याबरोबर मद्रासी सभासदांत कुरकुर सुरू झाली. पक्षांत बिहार व मद्रासी सभासदांत एक-दोनदां वाद झाला, पक्षानें हें राजकारण व ही दृष्टि नापसंत केली, त्यामुळें कैलास-बाबू बरेच रागावले होते. अनेक वेळां बोलण्याची संधि देऊन त्यांचा राग कांहींसा घालविण्यांत आला. मध्यवर्ती सरकारांत हिंदू नेमावयाचा म्हणजे बहुतेक मद्राशाची वर्णी लागे. मुसलमान नेमावयाचा म्हणजे पंजाबी मुसलमानाची वर्णी लागे. राज-धानी दिल्लीस येण्यापूर्वी, बंगाली वर्चस्व या सरकारी कचेऱ्यांतून होतें. त्याऐवजीं आतां वर लिहिल्याप्रमाणें झाल्यानें पुष्कळ प्रांत नाखूष असतात. दिल्ली सिमल्यांत मद्रासी वसाहती असून, पद्धतशीर आक्रमणाचे धोरण चालू असतें. दिल्लींत एकाचे ऐवजीं दोन महाराष्ट्र मंडळें झाली आहेत, व गणपत्युत्सव नव्यापंचांगाप्रमाणें करावा कां जुन्या, या व अशाच प्रश्नाचे पुणेरी वादविवाद तेथें चालतात ! कालीबारींतून ( कालीमंदिर ), दिल्ली सिमल्यांत बंगाली तरुणांना पुढें ढकलण्याचें काम चालतें. सर्वजण प्रांतपरत्वें खटपट करीत असतात. शुष्क वादविवाद व अविवेकी निःस्पृहत्त्व, ही महाराष्ट्रीय समाजाची पौत्रिक ( वडिलोपार्जित ) संपत्ति येथेंही विपूल आहे !! कैलासबाबूंच्या तक्रारींचा पुढें पुढें उपयोगही होऊं लागला. त्यांच्या गाऱ्हाण्यां-तील अन्याय उघड असे, तथापि कॉंग्रेस पक्षानें प्रांतवार प्रमाणानें नेमणुका व्हाव्यात हें तत्त्व झिडकारलें, व आपली तात्त्विक शुद्धता कायम ठेवली राम-नारायणसिंह वयानें फारसे नव्हते, पण त्यांची दाढी संपूर्णतया शुभ्र झाली होती; सदा नाखूष असत. पक्षांतील कोणतीच गोष्ट त्यांना पसंत नसे. बिहार प्रांतिक राजकारणांत जाण्याचा त्यांचा विचार सफल झाला नाहीं; यामुळें पुढें पुढें ते चिडलेले दिसत. बोलतांना शेलक्या शिवराळ शब्दांचा अहेर प्रतिपक्षाला करीत व अशा रीतीनें अस्पृश्य, व अवंद्य शब्दांना सभा मंदिरांत प्रवेश होई. गरिबांची तळमळ त्यांना फार असे. त्यांना नेतृत्व हवें, असें एकंदर त्यांच्या वागण्यावरून दिसे.

सुरुवातीस कॉंग्रेसपक्षांत एकच बंगाली सभासद होता व तेही मि. बाकी हे मुसलमान सद्गृहस्थ होत. निवडणुकीच्या भाऊ गर्दींत बंगालमध्यें केवळ जाति-निवाड्याविरुद्ध उत्पन्न झालेल्या विरोधामुळें, कॉंग्रेस उमेदवारांची कत्तल झाली होती. मि.बाकींची निवडणूक झाली; पण त्याविरुद्ध अर्ज होऊन तीही रद्द झाली, व त्यांचें

जागीं 'विक्षिप्त' म्हणून प्रसिद्ध असलेले मि. कबीर उद्दीन निवडून आले. पंजाबमध्यें कॉंग्रेसपक्षाला एक जागा मिळाली,व त्या जागीं श्री. लाला शामलाल निवडून आले होते. हे फार विनोदी गृहस्थ होते व गोष्टी सांगून सभागृहाची करमणूक करीत. दुसरें वर्षी श्री. रायजादा हंसराज निवडून आले. मोठी चुरशीची निवडणूक झाली व थोडे दिवस कॉं.नॅ. पक्ष व कॉंग्रेसपक्ष यांत त्यामुळें तेढ उत्पन्न झाली होती. रायजादा म्हणजे श्रीमान् जमिनदार, दिसण्यांत उमदे, वयाचा परिणाम शरिरावर दिसत नसे, निःशब्द सभासद म्हणून त्यांचें वर्णन करीत. एका प्रसंगीं त्यांच्या मित्रांनीं, (हे सर्व सभागृहांत होते,) कट करून त्यांचें नांव अध्यक्षांकडून उच्चारविलें. त्यांना आश्चर्य वाटलें. ते उभें राहिलें, व " मी ठरावाला दुजोरा देतों " असें म्हणून बसलें !! ६ वर्षांत तीन शब्द बोलून सर्वांना त्यांनीं खूष केलें. ते फार लोकप्रिय होते. दिल्लीचा मतदारसंघ, संयुक्त मतदारसंघ आहे व हिंदु-मुसलमानांनीं निवडून दिलेलें तेथील प्रतिनिधि बॅ. असफअली हे कॉंग्रेसपक्षातर्फे निवडून आले होते. आम्ही दोघे जोडीनें पक्षाचे प्रतोद व पुढें जोडीनें चिटणीस होतों. बॅ. असफअली शहरांत लोकप्रिय होते. त्यांचें वर्णन कॉंग्रेसपक्षांतील उत्तम पोषाख केलेलें गृहस्थ (Best dressed man in the Congress Party) असें केलें जाई. बोलतांना जिनांचा आविर्भाव व तसेंच हातवारेही करीत. पण जिनांचा आवाज लहान; असफअलींचा मोठा होता. नेहमीं समोरील स्त्रियांचें गॅलरींत श्रीमती असफअली असल्यामुळें कदाचित् ते मोठ्यानें बोलत असावेत, असा वात्रट तर्क आमच्यांतील कांहीं मंडळी करीत ! एवढें मात्र खरें कीं, सौ.अरुणाबाई गॅलरींत असत तोंपर्यंत आपलें भाषण झालें पाहिजे याबद्दल ते दक्षता घेत. चांगलें बोलत, प्रसंगीं उत्कृष्ट बोलत. प्रतोद व चिटणीस दोन्हीं कामें मन लावून करीत. कांहीं वेळां सभासदांशीं भांडत. एका प्रसंगीं डॉ. देशमुख व त्यांचें अगदीं सभागृहांत सभा सुरू होण्यापूर्वी १–२ मिनिटें अगदीं पानपतचें युद्ध होण्याची वेळ आली होती; व असफअली रागानें म्हणाले, " डॉक्टर, मी असफअली आहे." " (Doctor, I am Asafalli.)." डॉ. देशमुख यांनीं प्रतियोगी सहकारिता करून म्हटलें " मी डॉ.देशमुख आहे." " (I am Dr. Deshmukh.)" प्रसंग कठीण होता, ११ चे ठोके घड्याळांत वाजूं लागले होते. मी मध्यें पडून शांतपणें म्हटलें, " मी गाडगीळ आहें, तुमचा नम्र प्रतोद आहें, लॉबींत जा." ( I am Gadgil, your humble Whip, please go to Lobby ) दोघेही हंसले—प्रसंग टळला. नंतर कोणीही मनांत

ठेविलें नाहीं. ते राष्ट्रीय मुसलमानांची बाजू योग्य रीतीनें मांडीत. स्थानिक असलेमुळें सरकारी वर्तुळांत त्यांना प्रवेश असे व यामुळें त्यांचे बाबत अकारण गैरसमजही पसरत. सरहद्दीवरील कॉंग्रेस पक्षाचा पहारेकरी डॉ. खान हे होते. प्रामाणिक, धोपटमार्गी, कुदळीला खणण्याचें यंत्र न म्हणतां कुदळच म्हणणारा, शब्दांतील लबाडीचा कधींही आश्रय न घेणारा हा पठाण सद्गृहस्थ, सर्वांना आवडे. सरहद्दीबाबत कोठलाही प्रश्न आला व डॉ. खान साहेब बोलूं लागले म्हणजे सरकारी पक्ष चुप्प बसे. एरवीं न हांसतां सर्वांची टिंगल करणारा परराष्ट्रीय खात्याचा चिटणीस सर ऑबरी मेटकाफ खानसाहेबांना उत्तर देतांना बेतानें व आदरानें बोले. एकदां सरहद्दीवरील पळवापळवी बाबत बोलतांना डॉ. मजकूर समोरील गॅलरींत असलेल्या आपल्या इंग्रज पत्नीकडे पाहून, म्हणाले, " जोंपर्यंत तरुण आणि तरुणी या तरुण आणि तरुणी आहेत, तोंपर्यंत असेंच चालावयाचें " "(So long boys are boys and girls are girls, such things are bound to happen )." यावेळीं सभागृहांत मोठा हंशा पिकला. या गोष्टीचा विपर्यास करून, पुढें १९३७ सालीं वीर सावरकरांनीं " कॉंग्रेस पक्ष हंसला, गप्प बसला म्हणून त्याला 'षंढ' म्हटलें ! त्यावेळीं सर्व सभागृह हंसलें. भाई परमानंद पण हंसले, वस्तुस्थिति मी त्यांना कळविली, पण चूक झाली हें कबूल करण्याचें सौजन्य अगर मनोधैर्य दाखविलें नाहीं !" हिंदु राष्ट्रपति हा नेहमींच बिनचूक बोलतो, हें प्रस्थापित करण्याची ती प्रस्तावना असावी ! कारण त्यानंतर लवकरच ते हिंदु महासभेचे अध्यक्ष झाले !! पुढें मीं "नवाकाळ" व "लोकमतांत" २।३ लेख लिहून सरहद्द प्रांतांत झालेल्या अत्याचारांत जातिविचार नसून, पैशाचा लोभ हें मुख्य सूत्र होतें, हें आंकडेवार दाखविलें. श्रीमंत हिंदु व मुसलमान, यांचे विरुद्ध विशेषत: हे अत्याचार होत हें उघड होतें. डॉ.खानसाहेब यांचेंही हेच मत होतें, स्थिति तशी होती. डॉ. खान यांनीं सरहद्द प्रांतांत होणाऱ्या अतिरेकांना व अत्याचारांना सभागृहांत, वाचा फोडली, हेंच काम पुढें मि. अबदुल कयूम यांनीं केलें.

वर दिलेल्या माहितीवरून कॉंग्रेस सभासदांत विविधता नव्हती अगर व्यक्तिमत्व नव्हतें हें म्हणणें खोटें आहे हें दिसून येईल. त्याचप्रमाणें ते अगदीं मुसक्या बांधलेली 'मुकीं बिचारीं कोणी हांका,' अशी जनता नव्हती. पक्षांत संचितवाले, भांडवलशाहीचे पक्षपाती होते. त्याचप्रमाणें तीव्रवृत्तीचे साम्यवादी होते. कॉंग्रेसचा पिंड आजच्या घटकेस साम्यवादी नाहीं हें खरें, तथापि जुन्या आर्थिक

जमान्याशी तिचें पटतही नाहीं. कराची कॉंग्रेसच्या प्रसिद्ध आर्थिक बाबींतील ठरावानंतर तिच्या प्रगतीची दिशा निश्चित झाली होती. प्रगतीचा वेग किती असावा, हाच वादाचा विषय असे. भांडवलवाल्यांची पकड एकंदर हिंदी राजकारणांत ढिलीच होत आहे. पक्षांत दोन्ही वृत्तींची तडजोड करणें भाग पडे, तीच गोष्ट सामाजिक बाबतींत होती. त्रिपुंड लावून त्रिकाळ संध्या करणारे सनातनी, व हिंदुसमाजरचना आहे तशीच रहावी, फक्त स्वातंत्र्य मिळावें, अशी विचारसरणी असणारेही लोक होते; तर जातिनिर्मूल न व्हावें, बिनशर्त घटस्फोट मिळावा, धर्म ही अफूची गोळी आहे, असें कैफ चढल्यासारखें बोलणारेही कांहीं आधुनिक व पुरोगामी होते !! याही बाबतींत पुन्हां तडजोडीनेंच पक्षांत निर्णय घेतले जात. राजकीय, आर्थिक, सामाजिक, हरएक बाबतींत पक्ष निर्णय असणें जरूर आहे. कोठेंही एकदां मत स्वातंत्र्य दिलें कीं, त्याचा व्याप वाढतां व शेवटीं संघटना ढिली होत जाते; पक्ष म्हणजे सैन्य, वाटेल त्यानें वाटेल तो निर्णय द्यावा, अगर पक्षाचा निर्णय वांटल्यास मानावा; असें झालें तर बेशिस्त सैन्याप्रमाणेंच त्याचें भवितव्य—म्हणजे पराभव व मृत्यु हें ठरलेलेंच. म्हणून प्रगति थोडी झाली तरी शिस्तीनें झाल्यास ती टिकते, पुढील प्रगतीचा टप्पा साधण्यास उपयोगी पडते. माघार जरी घेणें झालें, व ती शिस्तींत घेतली तर, पराभवाचा व्याप कमी कमी होतो, तीव्रता कमी होते. धैर्य व दील ( Morale ) कचरत नाहीं. कॉंग्रेस पक्षानें पक्ष म्हणून प्रत्येक बाबतींत निर्णय घेण्याचें जें तंत्र स्वीकारलें होतें, तीच त्यांची शक्ति होती, प्रचंड सामर्थ्य होतें. पक्षाच्या निर्णयानें मिळणारी प्रतिष्ठा अगर दुर्लौकिक सामुदायिक होता. जथी मथी आम्ही एकमेकांच्या कृत्यांबद्दल जबाबदार होतों, व सर्व जण मिळून, पक्षामार्फत जनतेला दिलेलीं वचनें पाळूं म्हणून जामीन होतों. सरकार व कॉंग्रेस पक्ष यांवर देशभर टीका होई, यांतील रहस्य आम्ही जाणून होतों. सर्व जबाबदार टीकांचा विचार होई, चूक कबूल करून धोरण बदलणें यांत कमीपणा आहे, अगर तो दुर्गुण आहे, असें मानण्याचें अलौकिकत्व आमच्या पक्षांत सुदैवानें नव्हतें !! त्याचबरोबर सुसंगत वागणूक फक्त गाढवालाच शक्य आहे, त्याचाच तो गुण, असें मानण्याचीही प्रवृत्ति नव्हती. कॉंग्रेसच्या नीतिनुसार राष्ट्रहित साधणें, व ध्येयाचे मार्गावर पुढें पाऊल पडेल अशी चाल चालणें, याच एका दृष्टीनें विचार केला जाई. व्यक्तीचा मानापमान, त्याची सोय, हें सर्व विचार अप्रस्तुत म्हणून अनाद-

रलें जात, क्वचितच् कोणी त्यांना वाचा फोडी. कॉंग्रेसपक्षाचे निर्णयांवर वैयक्तिक स्वार्थाचा आरोप कोणींही केला नाहीं.

पक्षाचें ध्येय, मनोरचना कार्यपद्धति, व्यक्तिगत विविधता, सामुदायिक शिस्त, यांची थोडी कल्पना येथपर्यंत वर्णन केल्यानंतर, बजेटाबाबत पहिलें वर्षी व सालोसाल घेतलेले निर्णय यथार्थ रीतीनें समजण्यास सोपें जाईल. १९३५मध्यें रेल्वे बजेट, सर जोसेफ भोर यांनीं मांडले. सर जोसेफ हे दक्षिणी ख्रिश्चन, आय्. सी. एस्. नाणावलेले अधिकारी होते. बजेटाचे चर्चेत, व कपातीचे वादविवादांत ते धैर्यानें सरकारची बाजू मांडीत. पण निवडून आलेल्या सभासदांचीं विरुद्ध मतें पाहून नवीनच आलेल्या अनुभवानें बिचकलेले दिसले. एकच अधिवेशन ते होते, नंतर सेवानिवृत्त झाले.जुन्या जमान्यांतील अधिकारीवर्गाप्रमाणें स्वाधिकाराची जाणीव नेहमीं त्यांना असावी असें दिसे. जे एक दोन प्रसंग त्यांच्याशीं लॉबींत बोलण्याचे आले तेव्हां मी मराठींत बोलें पण तें उत्तरें इंग्रजींत देत. जो मोकळेपणा सर नृपेंद्र सरकार अगर सर महमद झाफरउल्ला यांच्याशीं बोलतांना नजरेस येई तो येथें नसे. इंग्रज आय्. सी. एस्. अधिकारी विशिष्ट बाबी सोडून मोकळेपणानें गप्पा मारतात, तितक्या संख्येनें व तितक्या प्रमाणांत हिंदी आय्. सी. एस्. मारीत नाहींत, असा बहुतेकांचा येथें अनुभव होता. तथापि तरुण हिंदी आय्. सी. एस्. यांच्या बाबतींतील अनुभव मात्र निराळा येई. रेल्वे बजेटांतील कपातीबाबत सरकारचे अनेक पराभव झाले. सरकारी प्रतोदांना यश न आल्यामुळें सर्वसाधारण बजेटाबाबत सरकारी गोटांत धाकधुकीचें वातावरण निर्माण झालें. सर जोसेफ भोरना जें जमलें नाहीं, तें आपण करूं व बजेट व फडणिसीयोजना बिल ( Finance Bill ) ॲसेंब्लींत पास करवून घेऊं अशी घमेंड अर्थमंत्री सर जेम्स ग्रिग यांची होती. ग्रिग हे इंग्लंडमधील सिव्हिल सर्व्हिसमध्यें होते. तेथील फडणिसी खात्यांत काम करीत असतां त्यांची योग्यता जाणून त्यांना १९३४चे मे महिन्यांत हिंदी फडणीस ( Finance Member ) या जागेवर नेमलें होतें. या खात्यांत ते पारंगत असले तरी विधिमंडळांतील कामाचा अनुभव त्यांना नव्हता. बजेट म्हणजे नुसती त्याची तयारी व अम्मलबजावणी ( Preparation and execution ) एवढाच अर्थ लोकशाही घटनेंत नसतो. मान्यता (Sanction or Authorisation) ही महत्त्वाची बाब असते.ही मान्यता घटनेप्रमाणें कायदेमंडळ अथवा विधिमंडळाकडून घ्यावयाची असते. त्याचा एक विधि असतो. बजेट मांडून, फायनान्स बिल मांडून,

सभासदांची खात्री खर्चाचे आवश्यकतेबद्दल व नंतर करांच्या अपरिहार्यतेबद्दल फडणिसाला करावी लागते. सभासद कांहीं फडणिसी खात्यांतील कारकून नव्हत, फडणिसा इतकेंच प्रतिष्ठित, तितकेंच अगर जास्त अनुभवीही पण कांही असतात. कांहीं, पूर्वी फडणिसी केलेले म्हणून अनुभवी व अभ्यासू, कांहीं भावी काळांत होणारे म्हणून उत्साही व आशावादी, या सर्वांची खात्री, माहिती देऊन,कारणें सांगून, मन वळवून करावी लागते. जेथें जबाबदार राज्यपद्धति आहे. तेथें या बाबतींत विरुद्ध बहुमत झाल्यास मंत्रिमंडळ गडगडतें अशी स्थिति असल्यामुळें हा प्रसंग फारच महत्त्वाचा व फडणीस म्हणजे " सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः " या न्यायानें विशेष महत्त्वाचा मंत्री मानला जातो. राज्यकारभाराची सर्व सोंगें पैशाशिवाय व्यर्थ आहेत. जनतेचे प्रतिनिधींनीं पैसा उभा करण्याच्या कर अगर कर्ज योजनेस मान्यता दिली तरच कारभार चालणार. ही मान्यता मिळविणें, बहुमताचे जोरावर पक्षसंघटित राजकारणांत सोपें वाटत असलें तरी, वस्तुत: तें तितकें सोपेंही नसतें. नम्रता व स्पष्टवक्तेपणा, निष्ठुर न्यायबुद्धि व सहानुभूति, आजची निकड व उद्यांची गरज, अशा विविध व विरोधी गोष्टींचा योग्य समन्वय करण्याची बौद्धिक पात्रता व सौजन्य फडणिसाला आवश्यक असतें. पात्रतेबरोबर विधिमंडळींन स्वभावही (Parliamentary Temper) असावा लागतो. निदान त्या दृष्टीनें, तडजोड वृत्तीनें, गोड शब्दानें सभागृहांत वागावें लागतें, किंवा बोलावें लागतें. हिंदुस्थान सरकार जबाबदार सरकार नव्हतें. बहुमत विरुद्ध झाल्यास गडगडणार नव्हतें, मंत्री बेकार होणार नव्हतें हें खरें. तथापि घटनेनें, कायद्यानें हें होणार नसलें तरी, नैतिकदृष्ट्या लोकमताचे दृष्टीनें सरकारचा पराभव बजेटासारख्या बाबतींत झाल्यास, शब्दानें ती नाचक्की होती. लोकमताविरुद्ध सरकार राहणें याचा अर्थ निव्वळ पाशवी सत्तेचे जोरावर राहणें, असा होता; व या जाणिवेचा चटका जोंपर्यंत सरकारी मताला वाटे, तोंपर्यंत बजेट फेंटाळण्याचें महत्त्व होतें. ज्या वेळीं हें मन निगरगट्ट बनते, त्या वेळीं ही गोष्ट तितक्या महत्त्वाची रहात नाहीं. रोग्याला जास्त जालीम औषधाची अगर शस्त्रक्रियेची जरूर आहे हें उघड झालें. फडणिसाला अवश्य लागणारें गुण जरूर त्या प्रमाणांत ग्रिग यांचेंजवळ नव्हतें. टाकून बोलणें हा त्यांचा स्वभावच होता. लीनतेचें त्यांना वावडें होतें. हिंदुस्थानांत कोणाला कांहीं विशेष कळतें हें मानावयास ते तयार नव्हतें. हिंदुस्थानाबाबतची माहिती बहुतकरून हिंदुनिंदक इंग्लिश राजकवी किपलिंगची पुस्तकें वाचून त्यांनीं घेतली असावी. "सुवेझचे पूर्वेस शिष्टा-

चार सोडून वागणें हा एक सामाजिक गुन्हा आहे (East of Suez bad manners are a Social crime)"हें लॉर्ड मोर्ले यांचें मत त्यांना मान्य नसावें असें दिसे. योजनापूर्ण व्यवहाराचें दृष्टीनें(Economic Planning)कांहीं पाऊल पुढें टाकण्याकरितां एखादें मंडळ ( Economic Council ) नेमावें असें एकदां खाजगी भाषणांत मी त्यांना म्हटलें; त्याबरोबर " योग्य अशा २।३ माणसांचीं नांवें तर सांगा " असें त्यांनीं हंसत विचारलें; व जी नांवें मीं घेतलीं असतीं तींच घेऊन त्यांना फारसें कळतें हें मानावयास आपण तयार नाहीं, असेंही लागलीच सांगून टाकलें !! सभागृहांत सर्वांशीं बरोबरीनें वागणें त्यांना कधींच जमलें नाहीं. खुद्द युरोपियन गटांतील सभासदांशीं सुद्धां प्रसंगीं असेंच वागत. अनेक वेळां सभासदांच्या विरोधामुळें, पराभवामुळें, उच्चपदप्राप्तीनें फिरलेले डोकें, सरळ झाल्याचें दिसे, पण तेवढ्या पुरतेंच; पूर्वस्थळीं लागलीच येई; इतकी ती क्रिया स्वाभाविक झाली होती !! बजेट मांडण्यापूर्वीं करावी लागणारी तयारी फडणिसी खात्याकडून होते; अर्थात् या कामीं त्यांचा इंग्लंडमधील अनुभव, त्यांना उपयोगी पडे. पण बजेटाला मान्यता घेण्याचा प्रश्न त्यांना कधींच सोडवितां आला नाहीं. बजेटाची मांडणी व मान्यता यांचा एक विधि असतो, हे वर सांगितलें आहे. एप्रिल पहिलीपासून फडणिसी वर्ष सुरू होते, तें पुढील ३१ मार्चला संपतें. जें बजेट मांडावें लागतें त्यांत संपणाऱ्या वर्षाचें दुरुस्त अंदाज, संपून गेलेल्या वर्षाचे पक्के हिशेब, व पुढील वर्षाचे अंदाज, जमा व खर्चाचे बाबतींत, द्यावे लागतात. सर्व सामान्य बजेट हे नेहमीं फेब्रुवारीचे शेवटले दिवशीं संध्याकाळीं ५ वाजतां मांडतात. त्या दिवशीं सभागृहाचें काम दुपारीं सुरू न होतां पांच वाजतां सुरू होतें. कोणते कर कमी होणार कोणते वाढणार, कोणती जकात कमी होणार, कोणती वाढणार, याबद्दल बजेट मांडण्यापूर्वीं तर्ककुतर्क बाजारांतून चालू असतात. शेअर बाजार व इतर बाजारांतून सट्टेबाजी, सकाळीं मांडल्यास जास्त होण्याचा संभव म्हणून, त्या दिवशींचे बाजार बंद झाल्यानंतर बजेट व फायनान्स बिल मांडण्यांत येतें. अन्य देशांत विधिमंडळाचें काम, दुपार संपल्यानंतर सुरू होतें. ब्रिटिश पार्लमेंटचें काम दुपारीं ४ ला सुरू होतें. येथें ११ वाजतां ॲसेंब्ली सुरू होते म्हणून, या दिवसापुरती सदरहू सभा ५ वाजतां सुरू करतात. आगाऊ माहिती, खास माहिती मिळविण्यासाठीं, सटोडियांचे प्रयत्न सर्व देशांप्रमाणें येथेंही चालू असतात. राज्यकारभाराला लागणारा खर्च निश्चित केल्यानंतर त्याला अवश्य लागणारी रक्कम नेहमींच्या करयोजनेपासून पुरी होत नसेल तर, नवीन कर, अगर

जुने वाढविणें अगर कर्ज काढणें यांपैकीं कांहीं तरी करावें लागतें. ही योजना अर्थमंत्री मंत्रिमंडळापुढें ठेवतो; व ती मान्य झाली म्हणजे फिनान्स बिलांत तिचा समावेश होतो. दरसाल हें करयोजनेचें बिल मांडण्याचा राजकीय उद्देश, प्रजेची मान्यता मिळवावी व प्रजेचा सरकारावर, मंत्रिमंडळावर विश्वास आहे हें ठरवून घ्यावें हा आहे. त्याचबरोबर प्रजेचीं गाऱ्हाणीं असलीं व तीं समाधानकारक रीतीनें दूर झालीं नसलीं तर, प्रजेचे प्रतिनिधि करयोजना मान्य करणार नाहींत, प्रधानमंडळ जाईल, दुसरें येईल, हेंही होऊं शकतें. येथें फक्त मुबलक टीका करण्याचा, लोकमत प्रदर्शित करण्याचाच अधिकार आहे; तथापि ही संधि मिळावी म्हणून हें बिल मांडण्यांत येतें. 'अडचणी करा दूर, मिळेल पैसा भरपूर ', "(Redress of grievances before supply)" असें इंग्लंडमधील प्रजेचें धोरण, जुलमी राजांविरुद्ध असें त्यांचाच हा तेथें खरा, व येथें नकली अनुवाद आहे.

ता. २८ फेब्रुवारीला बरोबर ५ वाजतां सर ग्रिग साहेबांनीं आपलें पहिलें बजेट मांडलें. सामान्यप्रेक्षक यावेळीं थोडे असतात पण व्यापारी, धंदेवाले, सरकारी अधिकारी फार, प्रेस गॅलरी तर चिक्कार भरलेली असते. बजेट मांडणें म्हणजे अर्थमंत्री आपलें भाषण जें छापलेलें असतें तें वाचून दाखवितो. त्यांत संपलेल्या वर्षाचें, संपत आलेल्या वर्षाचें, फडणिसीदृष्टीनें समालोचन असतें. पुढील वर्षासंबंधीं आपला दृष्टिकोण तो मांडत असतो, अंदाजापेक्षां जमा अगर खर्च कमी अगर जास्त कां झाला याचीं कारणें देतो, आलेला अनुभव लक्षांत घेऊन राष्ट्राची व राज्यकारभाराची निकड लक्षांत घेऊन, पुढील वर्षांचे जमेचे व खर्चाचे अंदाज देत असतो. शिल्लक उरेल असें असेल तर कोठें ती खर्चणार, अगर कोणते कर कमी करणार, हें सांगतो. तूट येत असेल तर, ती भरून काढण्याकरिता गंगाजळीवर विसंबणार कां कर्ज काढणार, कां कर वाढविणार, हें सांगतो; व जें ठरविलें असेल ती योजना असलेलें 'फडणिसी–व्यवस्था–बिल' भाषण संपल्याबरोबर मांडतो. भाषण सुरू झाल्याबरोबर प्रत्येक सभासदाला बजेटपेपर्स म्हणजे बजेटाबाबतींतील कागदपत्र देण्यांत येतात. रेल्वे बजेटाचे वेळीं, जमाखर्चाचा तक्ता, प्रत्येक रेल्वेचा वार्षिक रिपोर्ट, व सामान्य माहिती असलेला साधारण रिपोर्ट, साधारणपणें १००० पानें भरतील इतकी सामुग्री असते. यावेळीं त्याचे तिपटीनें कागद असतात. पोष्टखात्याचा रिपोर्ट, संरक्षणखात्याच्या जमाखर्चाचा रिपोर्ट, अन्य खात्यांचा एक मोठा ग्रंथ, अर्थमंत्री यांचे भाषणाची प्रत, संकलित

जमाखर्चाचा तक्ता, व फायनान्स बिल, याप्रमाणें सामुग्रीचा मोठा गठ्ठा देण्यांत येतो. पहिलीं २–३ वर्षे छापलेल्या भाषणांत पुढील वर्षाच्या करयोजनेचा उल्लेख असे. नंतर सर जेम्स ग्रिग यांनीं आपलें तंत्र बदललें. छापील भाषणांत समालोचन व प्रत्यक्ष करयोजनेबद्दलचें भाषण टंकयंत्रावर काढलेलें, व त्याचप्रमाणें काढलेलें फायनान्स बिल, हे कागद भाषण संपल्यानंतर सभासदांना व वर्तमानपत्रांना वाटण्यांत येतात. इतकें करूनही १९३८ सालीं बजेटांतील करयोजनेची बातमी फुटल्याबद्दल गवगवा झाला, खटले झाले !! इंग्लंडमध्यें असें होत नाहीं असें थोडेंच, पण हिंदुस्थानांत झालें म्हणून या देशाला कमी लेखण्याकडे इंग्रजांची प्रवृत्ति असते. सर जेम्स ग्रिग यानें १९३३–३४चे पक्के हिशोब दिले. १९३४-३५ चे दुरुस्त अंदाज देऊन १९३५-३६ सालचे अंदाजी जमाखर्चाचे आंकडे देऊन सरकारी नोकरांची पगार कपात रद्द करण्यांत आणि प्राप्तीकरांवरील अधिक कर ( Surcharge ) कमी करण्यांत येतील असें सांगितलें. त्याचबरोबर ग्रामसुधारणेकरिता १ कोटी रुपये खर्च करण्यांत येतील असें सांगितलें. हिंदुस्थानला बरे दिवस येणार आहेत असें सांगून भाषण संपविलें व बिलाचा सरनामा वाचून दाखवून " अध्यक्षमहाराज, हें बिल मांडण्याकरिता मी सभेची परवानगी मागतों " (" Sir, I beg leave of the House to introduce the Bill " ) हा मंत्र म्हटला; सभेनें हरकत न घेतल्यानें, " महाराज, मी बिल मांडतों " (" Sir, I introduce the Bill") असें म्हणून खाली बसले. सभा संपली व कागदांचे गठ्ठे घेऊन आम्ही सभागृहाबाहेर पडलों. नेहमींप्रमाणें मुरब्बी व महत्त्वाच्या सभासदांकडे बातमीदारांनीं बजेटाबद्दल मुलाखती मागितल्या,कांहींनीं आपण होऊन त्यांना गळ घालून त्या दिल्या; कांहींना आपल्या मुलाखती घ्याव्यात असें वाटे व आपल्या ज्ञानाची व महत्त्वाची त्यांना जरी जाणीव होती, पण त्यांच्या मुलाखती कोणी घेतल्या नाहींत व घ्याव्यात म्हणून गळ घालण्याची लकब, अगर बातमीदारांना गटविण्याची कला व साधनें त्यांच्यांत नव्हतीं ! यामुळें कित्येकांचीं विचाररत्नें व मौक्तिकें यांना जग मुकलें !! हें असें नेहमीं होतें. हें सार्वजनिक नुकसान होय, असें कित्येकांना प्रामाणिकपणें वाटलें !! मलासुद्धां प्रसंगीं तसें वाटे !!!

बजेट मांडल्यानंतर तत्संबंधींचे कागद वाचण्याकरिता वेळ मिळावा म्हणून ३-४ दिवस सुट्टी असते. कांहीं कर्तव्यदक्ष सभासद याचा फायदा घेऊन आपापल्या गांवींही जाऊन येतात !! मद्रास, मुंबईकडील सभासदांना हें अशक्य अस-

त्यामुळें, वेळ जावा म्हणून त्यांतील कांहीं कागदपत्र नजरेखालीं घालणें जमतें. कांहीं सभासद खरोखरच अभ्यासू असतात. त्यांच्या नजरेंतून कांहींही सुटत नाहीं. पुन्हां बैठक सुरू झाली म्हणजे दोन दिवस सर्वसामान्य चर्चेला दिले जातात, व पांच दिवस खर्चाच्या मागणीबाबत चर्चेकरिता देण्यांत येतात. दोन दिवसांतील चर्चेला, व पुढील विषयवार चर्चेलासुद्धां, वक्त्यानें १५ मिनिटांपेक्षां जास्त बोलूं नये असें ठरलेलें असतें. मागें सांगितल्याप्रमाणें कपाती सुचविल्या जातात, व प्रत्येक पक्षाला वेळ वांटून दिला जातो. कोणत्या कपाती सुचवावयाच्या हें प्रत्येक पक्ष सुचवीत असतो, व त्या बाबतींतील तंत्र अंमलांत आणीत असतो. सामान्यचर्चेला सुरुवात करण्याचा मान साधारणपणें विरोधी पक्षाचा असतो. या चर्चेंत साधारण-पणें, ढोबळ मानानें टीका होते. उधळपट्टी, जकातीचें धोरण, लष्ठ पगार, चुकीची करयोजना वगैरे प्रश्न उल्लेखिले जातात. अर्थमंत्र्याला कोणी नालायक म्हणतात, कोणी घाबरट म्हणतात, कोणी पक्षपाती म्हणतात; याप्रमाणें विशेषणांचा सदुप-योग होत असतो !! लोकशाहींत मुरलेला मंत्री शान्तपणें ऐकून घेतो, कोटीला कोटी करून उत्तर देतो; सर जेम्स ग्रिग पहिल्या वर्षांच्या या चर्चेंत रागावलेले दिसत. सामान्यचर्चेंत पक्षनेते अगर महत्त्वाचे सभासद, साधारणपणें भाग घेतात. सर होमी मोदी हे गिरणीवाल्यांचे प्रतिनिधि होते. ते नेहमीं बोलत, त्यांचें भाषण चांगलें होई; व्यापारविषयक दक्षता त्यांत असे, व तें विनोदमिश्रित असल्यानें सर्व सभा-गृह ऐके. सर होमी मार्मिक टीका करीत, पण सरकारशीं नेहमीं जुळतें घेत. भांड-वलवाले व व्यापारी हे सामान्यपणें, नृपति व जनपदांना दोघानांही खूष ठेवण्याचा प्रयत्न करतात. दोघांचेंही कार्य करणारे दुर्लभ, नृपतिविरोध पत्करून जनपदाचें हित करणारे विरळा, आणि व्यापारी वर्गांत व भांडवलवाल्यांत तर त्याहूनही विरळा. या परिस्थितींत एकटे मोदी यांना दोष देणें रास्त नाहीं. हिंदी व्यापारवृद्धिबाबत ते दक्ष असत पण, नरमाईनें घेण्याकडे त्यांची प्रवृत्ती होती, व परंपराही होती, असें म्हणणें योग्य होईल. स्वार्थ व स्वाभिमान यांचा विरोध आल्यास, तो पेंचप्रसंग सर्वंच साररूया रीतीनें सोडवूं शकत नाहींत; अर्थात् वैयक्तिक स्वार्थाचा प्रश्नच नव्हता, व त्या दृष्टीनें ते वागले नाहींत. " लीज-मोदी करार " करून हिंदी कापडाचे धंद्याबाबत, प्रबळ सत्ता विरोधी असतां, जें तडजोड वृत्तीनें शक्य होतें, तें त्यांनीं केलें. त्याबद्दल दुमत अर्थात होतें सभागृहांतील रणमैदानांवर ते फारसे विसंबत नसत. सरकारी अधिकाऱ्यांच्या खाजगी भेटी घेऊन, चर्चा करून, आपल्या धंद्या-

त्या दृष्टीनें, ते कामगिरी करीत. कार्यक्षम व्यवस्थापक, दूरदृष्टीचा व्यापारी, उत्कृष्ट वक्ता, विनोदी संभाषक म्हणून त्यांचा लौकीक होता. सरकार दरबारीं त्यांचें वजन होतें हें सांगण्याचें कारण नाहीं. सर कावसजी जहांगीर हेही बजेटाच्या चर्चेंत नेहमीं भाग घेत. सर कावसजी सावकाश बोलत, पण मध्येंच मोठ्यानें बोलत. त्यांचे उच्चार, त्याचें शिक्षण इंग्लंडमध्यें झाल्याची ग्वाही देई. एखादे वेळीं ते सरकारवर रागावत, बरेच वेळां आमचेवर. श्रीमंत असून त्यांना संपत्तीचा अभिमान असलेला कोणी पाहिला नाहीं. योग्य तऱ्हेनें खर्च होत असेल तर 'अधिक कर श्रीमंतांवर बसवा' असें नेहमीं त्यांचें प्रतिपादन असे. ते प्रागतिक पक्षाचे असून त्यांचीं बरींच तत्त्वें त्यांच्या आचरणांत दिसत, हें त्यांच्यांतील विशेष होय. सरकारविरुद्ध प्रसंगीं मत नोंदविण्याचा धोकाही ते पतकरीत. खाजगी वागणुकींत गोड. त्यांच्या आतिथ्याचा वांटा मला नेहमीं येई. कोणीही आपल्या शब्दानें दुखविलें असें कळल्यास ते त्याची क्षमा मागत. पण असें क्वचितच घडे. शिष्टाचार व सद्‌भिरुची त्यांच्या स्वभावांतच होती, व त्याचें प्रतिबिंब त्यांच्या भाषणांत पडे.

डॉ. बानर्जी, डॉ. झिआउद्दीन हे नेहमींच बजेटाच्या साधारण चर्चेंत भाग घेत. कॉंग्रेस पक्षांतील सभासदांपैकीं बरेच कपातीवर व फायनान्स बिलावर बोलत. साधारणचर्चेंत श्री. बी. दास, सत्यमूर्ति, श्रीप्रकाश, प्रसंगीं मी, भाग घेत असूं. बी. दास बोबडे बोलत, ते १९२३ पासून सारखे सभासद होते. १९३०-३४ मध्यें कॉंग्रेसची बाजू आपल्या परीनें तें मांडीत. कॉंग्रेसतर्फे निवडून आले म्हणून टोपी पालटली, असा आक्षेप सरकारी सभासद त्यांचेवर करीत, संधिसाधू म्हणून हिणवीत. पण तशी वस्तुस्थिति नव्हती. ते पूर्ण राष्ट्रीयवृत्तीचे होते. कॉंग्रेसपक्ष आल्यापासून त्यांचें विशेष काम असें राहिलें नव्हतें. तथापि त्यांची व वार्ताहरांची गट्टी फार, त्यामुळें त्यांचा जम नीट असे. शिवाय 'रॉयज विकली' या दिल्लीच्या साप्ताहिकांत ते टोपणनांवानें लिहीत. कॉंग्रेसपक्षाचे शिस्तमुळें चहापार्ट्या, जेवणाचे प्रसंग, वगैरे सामाजिक बाबतींत दक्ष असल्यानें त्यांना विशेष अडचण येत असे, तथापि यांतूनही ते मार्ग काढीत असत!! बरेच दिवस सभासद असल्यानें माहितीपूर्ण बोलत—बेतानेंही बोलत. डॉ. डिसोझा हे सरकारनियुक्त, सेवानिवृत्त, आय. सी. एस. होते. धर्मानें ख्रिस्ती म्हणजे अल्पसंख्यांक जमातीचे पण जातीय दृष्टीनें कधींही त्यांनीं विचार केला नाहीं. त्यांचें भाषण नेहमी समतोल होई.

सर हालीम गझनवी ही एक व्यक्ति होती. १९०८च्या चळवळींत ते जहाल होते.

(त्यावेळचे बंगालचे गव्हर्नरांनी त्यांचा (Wrong Gazanavi–चुकलेला गझनवी) म्हणून एकदां उल्लेख केला, त्यांचे बंधू सरकारचे बाजूचे म्हणून (Right Gaza navi–योग्य गझनवी–)म्हणून उल्लेख केला होता.) नंतर सर होण्यापर्यंत प्रगति झाली ! हंसत बोलत, जरा कोणीं अडविलें कीं रागावत, दटावणी देत, पण धोरणानें मत नोंदवीत. विषयाला धरून काय बोलावें याबद्दल त्यांची कल्पना उदार व व्यापक होती ! ! एकदां एका सभासदानें, दुसरा सभासद विषयास सोडून बोलत असतां खालील उद्गार काढले. "महाराज, गझनवींच्या कसोटीनें सुद्धां हें चाललें आहे तें विषयाला धरून नाहीं." (" Sir, even according to Gazanavi's standard of relevancy, this is not relevant") कलकत्त्यातील धंदेवाले व मोठे व्यापारी यांच्याशीं त्यांचें रहस्य दिसे व जीं बिलें, जे ठराव, ते आणीत त्यावरून जणूं कांहीं हे त्यांचे वकीलच आहेत असें वाटे. सर गझनवी मुसलमान पण जिनांशीं विरोध दिसे. पक्षबदल त्यांनीं केला, पक्ष पण स्थापिले, शेवटीं स्वतंत्र राहण्यानें, (त्यांच्या दृष्टीनें) कार्यक्षमता वाढते व श्रमांचें फळही मिळतें, असा अनुभव त्यांना आलेला दिसे. बजेटाच्या चर्चेंत या एकंदर पार्श्वभूमीशीं जुळेल असें बोलत. भारतसेवक श्री. नारायणराव जोशी हे असेंब्लीच्या स्थापनेपासून म्हणजे १९२१ पासून सरकारनियुक्त सभासद होते. त्यांच्यापेक्षां जास्त जुने मध्यवर्ती कायदे मंडळाचे सभासद म्हणजे जिना हे होत. ते १९०९ मध्यें म्हणजे मोर्लें-मिंटो सुधारणेनंतर, व्यापक झालेल्या कायदेमंडळांत, प्रथम निवडून आले. १९३०–३४ चा काळ सोडल्यास, ते सारखे मध्यवर्ति कायदेमंडळाचे सभासद होते. जोशी हे या दृष्टीनें सर्वांत अनुभवी होते. भारतसेवक म्हणून त्यांना प्रतिष्ठा होती. कामगार वर्गाचे हितास फार जपत म्हणून त्याही दृष्टीनें प्रसिद्ध होते. राष्ट्रसंघाचे मजूर शाखेंतील संघटनेंत त्यांना महत्त्वाचें स्थान होतें. सालोसाल ते जिनोव्हाला जात. यामुळें कित्येक त्यांना मि. 'जिनोव्हा' जोशी असेंही म्हणत !! अभ्यास करून बोलणें, मुद्देसूद बोलणें, समतोलवृत्तीनें बोलणें, ही भारतसेवकभूषण गोखले यांची परंपरा वारसानें त्यांच्याकडे आली होती. बऱ्याच प्रमाणांत ती त्यांनीं राखली. बदलणाऱ्या जगाप्रमाणें त्यांच्या वृत्तींत फरक होणें अपरिहार्य होतें. साम्यवादी लोकांच्या वक्तृत्वांत असलेली तीव्रता व कटुता यांचे पाश, पुढें पुढें त्यांच्यावर पडलेले दिसत. सभाविषयक तंत्रांत प्रवीण होते. कॉंग्रेसपक्षावर त्यांचा विशेष लोभ नव्हता, पण कांहीं सभासदांशीं त्यांचा विशेष स्नेह होता. सरकारनियुक्त

पण सरकारी प्रतोदाची ‘ सरकारचे बाजूनें मत द्या ’ असें त्यांना सांगण्याची छाती नसे. अपवाद प्रसंग सोडून दिल्यास ते नेहमीं आमचेबरोबर असत. त्यांचे विषय म्हणजे कामगारविषयक प्रश्न हे होत. तथापि प्रत्येक महत्त्वाचे विषयांवर बोलत. बेकारभत्ता, कामाचे तास, अपघात-विमा, आजारीपणांत वेतन, वगैरे बाबी त्यांच्या टोंचणीमुळें पुढें येत, व तेही आणीत. त्यांच्या भाषणाशिवाय बजेटाची चर्चा अगर फायनान्स बिलाची चर्चा पुरी झाली असें त्यांनाही वाटत नसे! अनेक खात्यांतील खालच्या दर्जाचे सरकारी नोकर त्यांच्याकडे आपला ‘वाली’ म्हणून पहात व तें सहाजिक होतें.

दोन दिवस सामान्यचर्चा झाली म्हणजे, मागण्यावरील चर्चेला सुरुवात होई. कॉंग्रेसपक्षाच्या वांट्यास साधारणपणें दोन दिवस म्हणजे ७॥ तास येत. या वेळांत सदरहु पक्ष आपल्या कपाती सुचवी. आमच्या कपातींचें स्वरूप ठरलेलें असे. तक्रार कपात व इन्कार कपात, ( Refusal of Supplies ) कार्यकारी मंडळांतील खर्चाबाबतचे मागणीलाहि उपसूचना दिलेली असे. हिंदुस्थान सरकारचे बजेटांत कांहीं बाबींवर सभागृहाचे मताची अगर मान्यतेची जरूर नसे. या बाबींना बिनमान्यतेच्या बाबी ( Non-Votable Grants ) म्हणतात. यांत संरक्षक खात्याचा खर्च व बहुतेक मुलकी अधिकाऱ्यांचे पगार येतात. राज्यकारभारांतील महत्त्वाच्या व आवश्यक बाबी कीं, ज्यावर राज्यकारभार अवलंबून आहे त्यांचा खर्च, या बिनमान्यतेच्या बाबीं असतात. कायम कारभाराचें यंत्र निराळें व तें चालविणारे, त्याचें धोरण ठरविणारें प्रधानमंडळ निराळें, हा भेद लक्षांत घेतां वरील व्यवस्था योग्य आहे. गाडीवाला बदलावयाचा हक्क आहे, तथापि कोणीहि गाडीवाला आला तरी बैलांना चारा व चाकाला ओंगण हें घातलेंच पाहिजे. म्हणून त्यावरील खर्च वादविवादातीत पाहिजे. निदान दरसाल त्याबाबत धाकधूक असतां कामा नये हें रास्त आहे. लोकशाही राष्ट्रांतून अशी विभागणी असते. प्रधानमंडळ बजेटानें गडगडलें तर दुसरें येऊन त्याचें बजेट पास होईपर्यंत राज्यकारभार चालावा म्हणून अशी किंवा तत्सम व्यवस्था घटनेंत असते. येथें वर लिहिल्याप्रमाणें व्यवस्था आहे. ज्या बाबी मान्यतेच्या ( Votable ) त्यांच्या खर्चाच्या मागणीबाबत कपातीच्या उपसूचना देतां येतात. कार्यकारीमंडळाच्या ऑफीसचा खर्च ही एक महत्त्वाची बाब असते, म्हणून, अविश्वास कपात अगर इन्कार कपात, या बाबीच्या मागणीला महत्त्व देण्यात येतें.

१९३५ सालीं हिरिरीनें वादविवाद झाला, सरकारने विरोध केला, ज्या ज्या खात्यांवर टीका झाली त्या त्या खात्यांच्या अधिकाऱ्यांनीं उत्तरें दिलीं. मतांसाठीं प्राण टाकले, पण सरकारचा पराभव झाला ! स्वतंत्रपक्षाला साधारणपणें एक दिवस मिळे, त्यांत तो पक्ष लष्कराचें हिंदीकरणाबाबत अगर नोकऱ्यांतील जातिविषयक प्रमाणाबाबत कपाती सुचवी. कॉं. नॅ. पक्ष सरकारी दमननीति, सामान्य राज्यकारभार यांवर भर देई. युरोपियन गट व्यापाराविषय धोरण यांवर भर देई. बिनपक्ष सभासद ज्यांना एक दिवस मिळें, त्यांत ते ज्याला जो विषय प्रिय वाटे त्याप्रमाणें कपाती सुचवीत. दहा दिवसांत जी काय चर्चा होईल ती होई. या सालच्या मागणीच्या कपातीबाबत सरकारचा प्रत्येक मतनोंदणीच्या वेळीं पराभव झाला.पांचवें दिवशीं कत्तल सुरू झाली. मागणी मागून मागणी अर्थ मंत्र्यानें मांडावी व ती नापास व्हावी, व प्रत्येक वेळेस मतदानांच्या खोलींत जावें लागे. याप्रमाणें दोन तास कवायत झाली. वास्तविक, बहुमत आवाजानें अर्थ-मंत्र्याविरुद्ध होतें. एक दोन वेळां मतनोंदणी केल्यानंतर दर वेळेस मतनोंदणी मागण्यास नको होती. पण सर जेम्स ग्रिग येवढे चिडले होते कीं, दर वेळेला मतनोंदणी मागत व पायपिटी करवीत. बजेटावरील मतनोंदणी संपली त्यावेळेस बाहेर अंधार होता, सभागृहांत दिवे लागले होते. अर्थमंत्र्यांच्या मनांतील आशाज्योत मावळली होती. बजेटाचें भाषणाचें वेळी निळया रंगाचें फूल, जें इंग्रजांमध्यें भाग्याचें लक्षण समजतात, तें कोटाला लावून ही स्वारी आली होती, तें काळवंडलें, अपयशी ठरलें. पुन्हां फायनान्स बिलाचें सुरुवातीस तें तेथें दिसलें नाहीं. रात्रीं ८ वाजतां आम्ही घरीं परतलों, उत्साहित होतों व मतनोंदणीच्या श्रमानें बुभुक्षितही पण होतों !!

बजेटांतील खर्चाची बाजू वरीलप्रमाणें सालमजकूरची निकाली लागली होती. आतां जमेचे बाजूसंबंधीं--म्हणजे फडणिशी व्यवस्था बिलासंबंधीं--विचार व्हावयाचा होता. मंत्रिमंडळानें जी खर्चाची योजना ठरविली असेल, त्यांत वाढ सुचवितां येत नाहीं, कपाती सुचवितां येतात. त्याचप्रमाणें जमेची जी योजना असेल, जे करांचे दर फायनान्स बिलांत असतील त्यांत वाढ सुचवितां येत नाही, कमी दर करावेत असें सुचवितां येतें. अर्थात् मंत्रिमंडळानें एखादी गोष्ट मान्य केली म्हणजे ती सरकारी योजनाच होते. पण पूर्ण विचार करून कोठलेंही मंत्रिमंडळ करयोजना ठरवीत असतें. सभागृहाला कर कमी दरानें घ्यावेत अगर एखादा कर अजिबात रद्द करावा अशीच फक्त मागणी करतां येते. हिंदुस्थान सरकारच्या बाबतींत हीच

व्यवस्था होती. कर वाढविणें म्हणून उपसूचना बिलास देणें झाल्यास गव्हर्नर जनरलची परवानगी लागे. किंबहुना ज्या कांहीं बाबींत जनतेवर पैशाचा बोजा बसण्याचा संभव आहे, अगर एकंदर बोजा न वाढतां सरकारी योजनेंत कांहीं कर वाढणार असले असें जरी असलें तरी, त्या सर्व सूचनांना गव्हर्नर जनरलची पूर्वपरवानगी लागते. वरील मर्यादा लक्षांत घेऊनच फायनान्स बिलाला उपसूचना द्याव्या लागतात, व त्या दृष्टीनें अनेक उपसूचना सदरहू बिलाला दिल्या गेल्या. खर्चाच्या मागणीचा निकाल लागल्यानंतर दुसरे दिवशीं अर्थमंत्री सर जेम्स ग्रिग यांनीं फायनान्स बिल—फडणिशी व्यवस्था बिल—विचारांत घ्यावें म्हणून सभेपुढें सुचना ( Motion ) केली !!!

सभागृहांत, बिल येण्यापूर्वी, आल्यानंतर, व तें पास झाल्यानंतरही नियमाप्रमाणें सर्व संस्कार व्हावें लागतात. बिलांत नियमाप्रमाणें सरनामा, अंमलांत केव्हां येणार म्हणून मुहूर्त, क्षेत्र, व्याख्या, मुख्य बाबी, परिशिष्टें ( Title, time when it will become operative, Jurisdiction, definitions, main clauses, and Schedules) यांचा समावेश विषयपरत्वें असावा लागतो. नियमाप्रमाणें बिल तयार करून नोटीस ऑफिसमध्यें त्याची एक प्रत सभासदानें द्यावी लागते. खासगी सभासदांचीं बिलें, खासगी कामासाठीं नेमलेल्या दिवशींच फक्त चर्चेला निघतात. खाजगी बिलांचे क्रम चिठ्ठया टाकून ( Ballot ) ठरविले जातात. तीच गोष्ट ठरावांबाबत असते. ठरावाची नोटीस द्यावी लागते व खासगी ठरावांचा क्रम बॅलटनें ठरविला जातो. खासगी ठरावांना जे दिवस नेमिले असतील त्या दिवशीं त्यांची चर्चा होते. ठराव सुद्धां नियमाप्रमाणें सभ्य भाषेंत, सभागृहाला अधिकार असलेल्या विषयांबाबतचा असला पाहिजे; कांहीं बाबतींत बिल अगर ठराव यांना गव्हर्नर जनरलची पूर्ण संमती लागते. ती मिळाल्याशिवाय त्यांवर चर्चाच होऊं शकत नाहीं. ते सर्व नियमबाह्य म्हणून काढून टाकण्यांत येतात. नियमाप्रमाणें बिलाची नोटीस दिल्यानंतर कार्यक्रम पत्रिकेंत ज्या दिवशीं तें असेल,त्याच्या आधीं बिलाच्या छापील प्रती काढून, चर्चेच्या दिवशीं सभासदांच्या टेबलांवर ठेवण्यांत येतात.बिलाच्या बाबतींतील सभागृहांतील पहिला संस्कार म्हणजे मांडणाऱ्या सभासदानें "सभागृहानें अमूक बिल मांडण्याची परवानगी द्यावी" अशी चालना करावयाची ( Sir, I beg leave of the House to introduce a Bill to...) ही परवानगी नाकारतां येते, पण सभागृहाचा संकेत न नाकारण्याचा

असतो. कारण, चालकाचें म्हणणें ऐकून घेतल्याशिवाय बिलाचा निकाल लावणें योग्य समजलें जात नाहीं. अध्यक्ष प्रश्न विचारतात कीं, 'प्रश्न असा आहे कीं, अमूक बिल मांडण्याची परवानगी द्यावी' ("Question is that leave be granted to introduce a Bill etc,") सभागृहानें परवानगी दिली कीं सदरहू सभासद पुन्हां उभा रहातो व "मी बिल मांडतो" ("Sir, I introduce the Bill") अशी चालना करतो. नंतर त्या दिवशीं सदरहू बिलाबाबत कांहींही होत नाहीं. हा पहिला संस्कार झाल्यानंतर ज्या दिवशीं पुन्हां हें बिल कार्यक्रम पत्रिकेवर असेल त्या दिवशीं सदरहू सभासद "हें बिल विचारांत घ्यावें" ("That the Bill be taken into consideration") अशी चालना करतो, अगर हें बिल खालील गृहस्थांचे निवडक कमिटीकडे सोंपवावें व अमूक काळांत सदरहू कमिटीनें रिपोर्ट करावा. (That the Bill be referred to a Select Committee consisting of....and that report be submitted before such and such a date.) अशी चालना करतो. अन्य सभासद 'पहिल्या सूचनेला निवडक कमिटी नेमावी' अशा उपसूचना नियमाला धरून आणूं शकतात. पुष्कळ वेळां खुद्द बिल मांडणारा सभासद अगर अन्य सभासद, 'लोकमताचा अंदाज घेण्याकरितां सदरहू बिल जनतेंत विशिष्ट काळ फिरवावें' ("That the Bill be circulated to elicit Public opinion till such and such date) अशीही सुचना करतात. अनेक वेळां या सूचनेन कालहरण करण्याचा उद्देश असतो. पुष्कळ वेळां लोकमत अनेक प्रश्नांवर अजमाविणें इष्ट असतें. ही सूचना पास झाल्यास सरकार देशभर निरनिराळे जिल्हाधिकारी, प्रांतिक सरकारें, प्रमुख संस्था व व्यक्ति यांच्याकडे सदरहू बिल पाठवितें व त्यावर आलेले अभिप्राय सरकार छापून सभासदांकडे पाठवितें. मुदत संपल्यानंतर कार्यक्रम पत्रिकेंत सदरहू बिल आलें म्हणजे पुन्हां तें विचारांत घ्यावें अगर निवडक कमिटीकडे सोंपवावें यापैकीं एक चालना बिलाचे सभासदांस करावी लागते.

निवडक कमिटीकडे बिल सोंपवावयाचें झाल्यास सभासदांचीं नांवें मुक्रर करावीं लागतात. साधारणपणें येथें १२-१४ पर्यंत सभासद निवडक कमिटींत घालतात, व या कमिटीचा अध्यक्ष कार्यकारी मंडळातील कायदे मंत्री हा पदसिद्ध (अधिकार पदानें) असतोच. बिलाचा विषय असेल त्या दृष्टीनें सर्व पक्षांची संख्या लक्षांत घेऊन, पक्षप्रतोद आपापल्या पक्षांतील सभासदांचीं नावें देतो. पक्षसंघटनेच्या दृष्टीनें अनेक वेळां भलतींच माणसें प्रतोदाला घालावीं लागतात. रुसलेले, फुगलेले

सभासद असतात त्यांचें समाधान करावें लागतें. ॲसेंब्ली चालू असतां निवडक कमिटीच्या बैठका साधारणपणें होतात; पण अनेक वेळां अधिवेशन सुरू होण्यापूर्वी अगर बरखास्त झाल्यानंतरही होतात. अशा वेळीं साहजिकच सभासदांना भत्ता व भाडें जास्त मिळतें. याही दृष्टीनें विचार करून त्यांत शिरण्याचा प्रयत्न करणारे, प्रतोदाकडे लकडा लावणारे अनेक सभासद सर्व पक्षांतून असतात. निवडक कमिटीकडे सभागृहानें बिल सोपविलें, याचा अर्थ सदरहू बिलाचीं सर्वसामान्य तत्त्वें सभागृहास मान्य आहेत असें मानतात, निदान असा संकेत आहे. निवडक कमिटींत बिलाबर चर्चा होऊन व दुरुस्त होऊन, रिपोर्ट तयार होतो. कमिटीच्या बैठकीला सरकारी कायदे पंडित, कमिटीचे निर्णय कायदेशीर भाषेत बसविण्याच्या कामीं, मदत करण्यास हजर असतात. रिपोर्ट तयार झाला व मूळ बिलांत व दुरुस्त बिलांत फारसा फरक नसेल तर सदरहू कमिटी, सदरहू बिल पुन्हां प्रसिद्ध करावें, इतकें दुरुस्त झालें नाहीं, असा शेरा मारून तें सभागृहाकडे धाडते. आमूलाग्र फरक असेल तर दुरुस्त बिल पुन्हां प्रसिद्ध करावें असा शेरा मारून धाडते. प्रत्येक बिल सभागृहांत मांडल्याबरोबर सरकारी गॅझेटांत छापतात, यालाच तें 'प्रसिद्ध करणें' असें म्हणतात. सभागृहांत रिपोर्ट आल्यानंतर जर प्रसिद्ध करावें असा शेरा असेल तर, त्याप्रमाणें बिलाचा सभासद सूचना मांडतो, व त्याप्रमाणें होतें. तसे नसेल तर सभासद 'दुरुस्त बिल विचारांत घ्यावें' अशी चालना करतो. (That the Bill as amended/reported by the Select Committee be taken into consideration.)

बिल विचारांत घ्यावें अगर निवडक कमिटीकडे धाडावें, अगर लोकमत अंदाजण्याकरितां धाडावें, यापैकीं कोणतीही सूचना सभागृहापुढें आली असतां होणारी चर्चा सर्वसामान्य स्वरुपाची असते. बिलाला आधारभूत असलेलीं तत्त्वे, यांवरच चर्चा होते. कलमवार अगर तपशिलवार चर्चा साधारणपणें होत नाहीं. ठराव अगर कपातीवर बोलण्याला कालमर्यादा आहे. पण बिलाचे बाबतींत कोठल्याही अवस्थेंत तें बिल असो, भाषणावर कालमर्यादा नाहीं. जेव्हां एखादी बाब योग्यरीतीनें चर्चिली गेली असें अध्यक्षाला वाटेल, त्याबेळेसच तो वादविवादबंदीची ( Closure ) सूचना सभागृहांत मतासाठीं मांडतो, एरवीं नाहीं. त्याचप्रमाणें एखादा सभासद केवळ कामांत व्यत्यय आणावा एवढयाच हेतूनें भाषणबाजी करीत असेल असें अध्यक्षांना खात्रीनें वाटेल, त्यावेळीं त्यांना सभासदाचें भाषण बंद करण्याचा अधिकार आहे. सभेचा नायक

किंवा नियंत्रक म्हणून हे अधिकार असणें इष्ट आहे.सर्व देशांतील कायदेमंडळांच्या अध्यक्षांस हे अधिकार आहेत. निःपक्षपातीपणानें त्याचा उपयोग व्हावा अशीच सर्वांची इच्छा असते. ६ वर्षांत या अधिकाराचा दुरुपयोग झाला असें कोणीही म्हटलें नाहीं. योग्य चर्चा झाल्यानंतर, कोणीही बोलणारा सभासद नसेल, अगर वादविवादबंदीची सूचना आल्यावर व ती पास झाल्यावर, अध्यक्ष " प्रश्न असा आहे कीं, बिल विचारांत घ्यावें. (Question is that the Bill be taken into consideration ) " असें म्हणून सभागृहाचें मत घेतात. निवडक कमिटीकडे सोपवावें, अगर लोकमत अंदाजावें, अशी उपसूचना आल्यास ती प्रथम मतास घालण्यांत येते. तीं पास झाल्यास त्या बिलाचे त्या अवस्थेंतील संस्कार संपले. तशी उपसूचना नसल्यास अगर नापास झाल्यास वरील प्रश्नावर अध्यक्ष मत घेतात. 'विचारांत घ्यावें' ही सूचना नापास झाल्यास बिलाचा अंत्यविधि झाला असें होतें; बिल संपतें. सभागृहानें तें फेटाळलें, असा सरळ अर्थ होतो. कांहीं काळ तेंच बिल अगर त्याच विषयासंबंधीं बिल पुन्हां सभागृहापुढें येत नाहीं. 'विचारांत घ्यावें' ही सूचना पास झाल्यास बिलांतील कलमांचा विचार सुरू होतो. प्रथम कलमें, त्यावरील अनंत उपसूचना, नंतर परिशिष्टें त्यांवरील उपसूचना, नंतर सरनामा, यांवरील पण उपसूचना, याप्रमाणें चर्चा होते. मतनोंदणी होते. अध्यक्ष, प्रत्यक्ष कलम आहे तसें अगर दुरुस्त झालें असेल तें, "प्रश्न असा आहे कीं कलम अमुक हें बिलाचा भाग असावा" ( " Question is that Clause No....do stand as part of the Bill " ) याप्रमाणें मंत्र म्हणतो व मतें घेतो. तसाच मंत्र परिशिष्टाबाबत व शेवटीं सरनाम्याबाबत. याप्रमाणें सर्व कलमें परिशिष्टें व सरनामा सभागृहानें मूळप्रमाणें अगर दुरुस्त, पास केल्यानंतर बिलाची दुसरी अवस्था संपते.

बिलाचा सभासद याला दुरुस्त झालेलें बिल पसंत असेल तर, तो सदरहू बिल " पास करावें (That the Bill be passed) " अशी चालना करतो. "विचारांत घ्यावें" या सूचनेवरील वादविवादाला पहिलें वाचन म्हणतात. कलमवार चर्चेला दुसरें वाचन, "पास करावें" या सूचनेवरील चर्चेला बिलाचें तिसरें वाचन म्हणतात.दुरुस्त बिल पसंत नसेल तर, सभासद बिल पास व्हावें ही सूचना मांडण्याचें नाकारतो व तसें झालें म्हणजे बिलाचा त्या स्थितींत अंत झाला असें समजतात व तसलें अगर त्या विषयावरील बिल ठराविक काळ, सभागृहांत मांडतां येत नाहीं. पास करावें अशी चालना झाली म्हणजे सभागृहांत पुन्हां चर्चा होते, पण तिचें स्वरूप आता

निराळें असतें. तपशीलवार अगर कलमवार चर्चा करीत नाहींत व करतांही येत नाहीं. सामान्य तत्त्वें जीं आतां दुरुस्त बिलांत मान्यता पावलीं असतील त्यावरच चर्चा होतें. एकाद्या बिलानें—तीव्र विरोधक बिल पास झाल्यानें—राष्ट्रांत बेबंदशाही माजेल, अत्याचार वाढतील, स्वातंत्र्य नष्ट होईल, सामाजिक गुन्हे वाढतील, स्वैराचार वाढेल, वगैरे विषयाला प्रस्तुत, प्रसंगीं अप्रस्तुतसुद्धां, भीतिदायक चित्रें उभीं करतात. उलट बिल पास झाल्यानें सामाजिक प्रगति सोपी होईल, देशाचा लौकिक वाढेल, संयमानें स्वातंत्र्य संरक्षिलें जाईल, विषमता कमी होईल, देशभर सुखसंचारक न्यायबुद्धी होईल वगैरे भविष्य, विषय असेल तसा, व नसेल तरीसुद्धां, बिलाच्या बाजूचे लोक वर्तवितात. बिल आणणाराचें अभिनंदन होतें, कोणी टीका करतात. विरोधकांचा दम उखडलेला असतो, सदनशीर प्रयत्नांची सीमा त्यांनीं गांठलेली असते; शाप व अभद्र भविष्य—जीं हत्यारें त्यांना शिल्लक असतात त्यांचाही उपयोग प्रसंगीं केला जातो. देशाचें राजकारण सनदशीर मार्गानेंच चाल-वावयाचें हें जेथें सर्वांचें, सर्व पक्षांचें ठरलेलें असतें; अगर राजकारणाचा हा मौलिक व मुख्य सिद्धांत जेथें मानला जातो, त्या देशांत बिल पास झालें म्हणजे विरोध थंडावतो. किंबहुना सभागृहानें याप्रमाणें दिलेला बहुमताचा निर्णय म्हणजे सर्व सभेचा, सर्व देशाचा निर्णय म्हणून सर्वांनीं यानंतर तो मानला पाहिजे अशी योग्य व अभिमानी परंपरा मानण्याचा प्रघात अनेक लोकशाही देशांत आहे. प्रत्येक अल्पमतवाल्या विरोधी पक्षानें, सभागृहांत पराभव झाल्यानंतर विद्यमान प्रधान-मंडळाविरुद्ध सशस्त्र प्रतिकार सुरू केल्यास लोकशाही नष्ट होईल हें उघड आहे. पराभूतपक्षानें लोकमत आपल्या बाजूस वळवावें, बहुमत करावें, आमनिवड-णुकींत जिंकून अधिकारावर यावें व योग्य ते बदल करून घ्यावेत, हा खरा लोकशाहीचा मार्ग आहे, व खऱ्या लोकशाहींतच तो शक्य आहे. निवडणुकीचें यंत्र (Election Apparatus) जर लोकमत खऱ्या प्रमाणांत दाखविणारें नसेल, बहुमत होऊनसुद्धां प्रधान-मंडळ जबाबदार नसेल म्हणून न जाणारें व अढळ असेल (Irremoveable) अगर आजचे बहुमतवाले उद्यां अल्पमतवाले झाल्यानंतर सनदशीर नीतीचा अव-लंब करणार नसतील तर, निव्वळ सनदशीर विरोध करून, पराभव झाल्यानंतर सभागृहाचा अगर बहुमताचा निर्णय सर्व सभागृहाचा, सर्व राष्ट्राचा आहे, असें मौलिक व महत्त्वाच्या बाबतींत मानणें, आत्मघातकी ठरेल. सदरहू निर्णय कसा बदलावा हें देशकाल परिस्थितीवर, विरोधकांच्या संघटनेवर व सामर्थ्यावर अवलंबून

राहील. जेथें लोकमताचें ' दान ' पडल्याबरोबर पक्षाला अधिकाराचा ' कट ' धरतां येतो, तेथलि गोष्ट निराळी; हिंदुस्थानांतील नकली लोकशाहींतील गोष्ट निराळी. १९३५ चें हिंदुस्थानांतील राज्यकारभाराबाबत बिलाचें तिसरें वाचन सुरू झालें त्यावेळीं हल्लींचे इग्लंडचे पंतप्रधान चर्चिल हे म्हणाले, " या बिलांतल्या, प्रत्येक कलमाला, प्रत्येक शब्दाला, मी विरोध केला आहे. आज हें बिल दुरुस्त स्वरूपांत या सभागृहानें मान्य केलें आहे, व ते आतां पास होईल. माझा विरोध आणि प्रत्येकाचा विरोध येथें संपला पाहिजे. हें बिल, हा निर्णय आतां सार्वभौम पार्लमेंटचा निर्णय आहे, एका व्यक्तीचा अगर एका सभासदाचा नव्हे, याप्रमाणें मानण्याची आम्हा इंग्रजांची अभिमानाची परंपरा आहे. " चर्चिलला हें बोलणें योग्य आहे, येथें तें योग्य कसें ठरेल !

अर्थमंत्री सर ग्रिग यांनीं फडणिशी व्यवस्था बिल विचारांत घ्यावें ही सूचना मांडल्यानंतर चर्चेला सुरुवात झाली. अर्थात् या चर्चेला कालमर्यादा नव्हती. राज्यकारभारासंबंधीं वाटेल त्या बाबीवर बोलणें प्रस्तुत होतें. राज्याच्या अठरा कारखान्यांना जर पैशाची जरूर लागते, व तो पैसा हे बिल पास झाल्यानें मिळणार असल्यामुळें त्या सर्वांवर टीका, टिप्पणी होणें रास्त आहे. घटनात्मक प्रश्न पासून तों एखाद्या कामगार संघाला मान्यता देण्याच्या प्रश्नापर्यंत चर्चेचा व्याप दिसत होता. लष्कर व सरहद्दावरील धोरण हें कसं अयोग्य आहे असें कांहींनी सांगितलें. सरकारची चलनविषयक नीति हिंदी उद्योगधंद्यांना विघातक कशी आहे असें कांहींनीं मांडलें. जकातीच्या धोरणावर टीका केली. कामगार विषयक प्रश्न कसे डावलले जातात म्हणून कांहींनीं सरकारला दोष दिला. डोईजड कारभाराचा बोजा कमी व्हावा म्हणून, कांहींनीं मागणी केली. तात्पर्य अनेक खात्यांवर अनेक दृष्टिकोणांतून अनेकांनीं टीका केली. या बिलाच्या चर्चेत याप्रमाणें सालोसाल राज्यकारभाराचे अंगोपांगांवर टीका होत असते. ज्या खात्यावर टीका असल त्याचा प्रमुख उत्तर देतो. बहुशः हा वादविवाद, ही चर्चा ७--८ दिवस चालते व नंतर बिल विचारांत घ्यावें ही सूचना पास होऊन, कलमवार चर्चा सुरू होते. १९३५ सालच्या अधिवेशनांत कांहीं भाषणें या चर्चेत उल्लेखनीय झालीं. हिंदी व्यापाऱ्यांचे मुंबईचे प्रतिनिधी शेट मथुरादास वसनजी यांचे भाषण माहितीपूर्ण झालें. त्यांत सरकारच्या एकंदर आर्थिक नीतीचा आढावा घेऊन उत्कृष्ट समालोचन केलें होतें. शेटजींच्याबरोबर प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ प्रो. के. टी. शहा हे येत. ३ वर्षें शेठ मथुरा-

दास बसनजी सभासद होते. फक्त बजेटाच्या वेळीं व अगदीं व्यापारविषयक बाब असेल त्या वेळींच हे बोलत. मत काँग्रेसपक्षाच्या बाजूनें देत. प्रो. शहांची मदत त्यांना असल्यामुळें, भाषण माहितीपूर्ण होई. प्रो. शहा 'बॉम्बे क्रॉनिकल'चे खास बातमीदार म्हणून हजर असत, व त्यामुळें त्यांना सभागृहाचे काम चांगल्या रीतीनें निरीक्षितां येई. प्रो शहा, पंडित पंतजींच्या भाषणावर फार खूष असत. या वर्षीच्या या बिलावरील त्यांचें भाषण १ तासावर झालें. राज्यकारभाराच्या बाबींबरोबर फडणिशी धोरणाचें त्यांनीं केलेलें विदारक पृथक्करण सर जेम्स ग्रिग यांना चांगलेंच झोंबलें. सर जेम्स ग्रिग यांनीं लांबलचक उत्तर दिलें. त्यांत त्रागा होता, राग होता, आव्हान होतें, अर्धवट माहिती होती, काँग्रेसबद्दल पूर्ण विद्वेष होता, अन्यपक्षीं यांची हेंटाळणी होती; अर्थमंत्र्याच्या भाषणांत जें नको तें सर्व होतें; समतोलबुद्धि, समजूतदारपणा व सौजन्य हे जे त्रिदोष त्यांचे मतें असावेत, ते त्यांनीं टाळले होते, व म्हणून ते नव्हते ! !

कलमबार चर्चेला सुरुवात झाली म्हणजे कर योजनेच्या निरनिराळ्या दरांना दिलेल्या उपसूचनांवर चर्चा होते. उत्पन्नाच्या मुख्य बाबी म्हणजे सरहद्द–जकात ( Custom ), प्राप्ती ( Income ), मीठ, साखर वगैरे पदार्थांवरील अंतर्गत जकात ( Excise ), ह्या होत. त्याचप्रमाणें तार व टपाल खात्याच्या बाबतींतील दर, यांचाही समावेश बिलांत असल्यामुळें, त्याही बाबतींत उपसूचना येतात. काँग्रेसपक्षानें प्राप्तीकराच्या बाबतींत कमी दर करावा अशी उपसूचना कधींही दिली नाहीं. याबाबत उपसूचना युरोपियन गट, धंदेवाले व व्यापारी, बिनपक्षीय सभासद, यांचे-कडून येत; व त्या कधींही पास होत नसत. मुख्य उपसूचना काँग्रेसपक्षाच्या, काँग्रेस नॅ. पक्षाच्या, त्या मीठ, साखर, पोष्टाचे दर यांबाबत असत. जकात हें महत्त्वाचें कलम खरें पण त्यावर यावेळीं भर दिला जात नाही. जकातीचे प्रश्न स्वतंत्र सभे-पुढें येतात, त्यावेळीं त्यांचा विचार होतो. मिठाच्या बाबतींत जो दर बिलांत असेल त्यापेक्षां रुपया, अधेली, पावली कमी अशा अनेक उपसूचना मांडण्यांत येतात. वस्तूंवरील कर गरिबांवर बसतो, प्राप्तीवरील कर चांगला. प्राप्ती झाली तरच द्यावा लागतो. वस्तु घ्यावीच लागते. मीठ ही आवश्यक वस्तु, चैनीची बाब नव्हे. त्यावरील कर कमी केल्यास खप वाढतो हें अनेक वेळां सिद्ध झालेलें, या सर्व दृष्टींनीं मिठाचें करावाबत दिलेल्या उपसूचनेस महत्त्व असतें. पावली, अधेली किंवा रुपया यांपैकीं कोणतीही उपसूचना पास झाली तरी उत्पन्नांत लाखांनी घट

होते; व त्यामुळें सर्व बजेटांतील सरकारी व्यवस्था बिघडते. पण त्याचा दोष लोकपक्षाकडे कसा? लोकपक्ष नुसतीच टीका करील व राज्यकारभाराची धुरा घेण्यास तयार नसेल तर, हें करणें विध्वंसक व विद्वेषी ठरेल. येथें, प्रत्येक क्षणाला राज्यकारभाराची जबाबदारी घेण्यास खराखुरा लोकपक्ष तयार होता. शिवाय गुणदोषांच्या दृष्टीने पाहिलें तरी, गरिबांवर बसणारा कर कमी होणें न्याय्य होतें. पडणारी घट, प्राप्तीवरील करांत वाढ करून, अगर लठ्ठ पगार कमी करून भरून काढतां येण्यासारखी होती. पण येथील सरकार हे इंग्रज भांडवलवाल्यांचें रखवालदार, व त्यांच्या इशाऱ्याप्रमाणें देशी भांडवलवाल्यांना व संचितवाल्यांना शक्य तितकें न दुखवितां वागणारें होतें व आहे. काँग्रेसपक्षाची कोणतीही गोष्ट मानावयाची नाहीं, हा संकल्प सर ग्रिगसाहेबांचा ते जाईपर्यंत होता. मिठावरील कराला आलेली प्रत्येक उपसूचना अर्थमंत्री जोरानें विरोधी. कांहीं पक्ष, कांहीं सभासद, त्यांच्या तर्कटाला बळी पडत. तथापि कोठली तरी एक उपसूचना मिठाच्या कराबाबत पास होई. क्रमाक्रमानें कमी दराची उपसूचना आमचा पक्ष मांडी, व प्रत्येक मतमोजणींत आमची बाजू वाढे, व शेवटीं बहुमत होऊन अर्थमंत्र्याच्या करयोजनेवर घाव पडून तुकडा उडे, व हाच वार बहुतेक घातुक ठरून बिल निकाली लागे. या साली असेंच झालें. उपसूचनेवर चर्चा चालू असतां एकानें प्रश्न केला, "अर्थमत्री हिंदी मीठ वापरतात काय?" ("Does the Finance Member use Indian salt?") दुसऱ्यानें मध्येंच सांगितलें "ते इंग्रजी मीठ वापरतात" ("He takes English Salts"). मी ओरडलों "ते सामरसाल्टस् घेतात (He takes somersaults)." ते कोलांट्या खातात. अर्थात् ही शाब्दिक कोटी होती. पण त्या दिवशीं प्रश्नोत्तराच्या वेळीं ब्रह्मदेश व हिंदुस्थान यांतील आर्थिक देण्याबाबत, दोन परस्परविरोधी विधानें करून, तासाभरानें आपण चुकीचें विधान केलें असें दिलगिरीपूर्वक सभागृहाला सांगितलें होतें. ह्या त्यांच्या कोलांट्या सभासदांच्या मनांत ताज्या होत्या. यामुळें कांहीं मिनिटें सभागृहांत हंशा पिकला, व अध्यक्षही त्यांतून सुटले नाहींत. मत नोंदणीच्या वेळीं सर ग्रिगसाहेबांनीं मजजवळ येऊन फार दुष्ट("Very wicked") म्हणून बोलले, मी म्हणालों "तुम्ही बदला घ्या" ("Reciprocate") व ते मान हलवून मतनोंदणीच्या खोलींत गेले ! उपसूचना पास झाली; पुढें पोष्टाचे, कार्डाचे दर कमी व्हावेत, म्हणून उपसूचना पास झाली. बुकपोष्ट वगैरे बाबतींतहि उपसूचना पास झाल्या. तात्पर्य १९३५ मध्यें पास झालेल्या उपसूचनांचा परिणाम

फडणिशीदृष्टीनें रु. ३ कोटी पर्यंत घट पाडणारा होता. मांडलेलें बिल याप्रमाणें छकलें छकलें उडून शरपंजरीं पडलें होतें. कलमवार चर्चा संपली, सर्व कलमें, परिशिष्टें, सरनामा यांवर चर्चा झाली. बिल पास करावें अशी चालना नियमाप्रमाणें येण्याची वाट आम्ही पहात होतों. कार्यक्रम पत्रिकेवर अर्थमंत्री यांच्या नांवावर हें बिल विचारांत घ्यावें व पास करावें असें होतें. ( The Finance Member to move that the Bill be considered and passed.) बिलाचा विचार झाला होता आणि तो यथासांग झाला होता. मढें झालेलें बिल अर्थमंत्री पुढें ढकलण्याचा प्रयत्न करतात कीं काय हें पहाणें होतें. अध्यक्षांनीं 'नामदार अर्थमंत्री' म्हणून आवाहन दिलें. ("The Hon. The Finance Member )", ही क्रुद्ध देवता उभी राहिली, व "महाराज, पास करावें ही सूचना मला मांडावयाची नाहीं" म्हणून खालीं बसली. (Sir, I do not move, that the Bill be passed) टाळ्यांचा कडकडाट करून त्याला स्टँपिंगची जोड देऊन, घोषणांचे जयध्वनी करीत आम्ही आमच्या छावणींत परतलों. कार्यकारीमंडळ आपल्या देवतेकडे, गव्हर्नर जनरलकडे संकट-निवारणार्थ गेलें !

मागें सांगितल्याप्रमाणें बजेट फेब्रुआरीच्या शेवटल्या तारखेस मांडतात व तें ३१ मार्चपूर्वी ॲसेंब्ली व वरचें कौन्सिल यांमध्यें पास व्हावयास पाहिजे; कारण प्रत्यक्ष बजेटांत जमा व खर्च या दोन्हींची व्यवस्था एक वर्षाकरिता केलेली असते, व सदरहू वर्ष ता. ३१ मार्चला संपतें. म्हणून सदरहू मुदतीपूर्वी पुढील वर्षाचें अंदाजपत्रक मान्य झालें पाहिजे म्हणजे ता. १ एप्रिल रोजीं कर वसूल करणें, अगर खर्च करणें कायदेशीर होतें. तसेंच बजेट व फायनान्स बिल मांडल्याबरोबर नवीन दरानें सदरहू जकात वसुल केली जाते, म्हणजे आयात व निर्यात व्यापारांतील लबाडीला वाव राहात नाहीं. पुढें जर बजेटांतील दरांत कांहीं फरक झाला तर, त्याप्रमाणें व्यापाऱ्यांना वजावट करून सरकार पैसा परत करतें, व याप्रमाणें करण्याचा अधिकार सरकाराला कायद्यानें आहे; सर्व देशांतून कमीजास्त प्रमाणांत ही व्यवस्था आहे. इंग्लंडमध्यें तर अवश्य खर्च करावा असे ठराव कॉमन्स सभा प्रथम पास करते व नंतर ३।४ महिनेपर्यंत प्रसंगीं बजेटावरील चर्चा चालू असते. येथें बजेट वर्षारंभापूर्वीच म्हणजे ता. १ एप्रिल पूर्वी पास झालेंच पाहिजे, नाहीतर पेंच-प्रसंग निर्माण होतो. १९३५ सालीं फडणिशी-व्यवस्था-बिलावरील चर्चा एवढी लांबली कीं, एप्रील उजाडला तरी ती संपली नव्हती. उभा राहिलेला पेंचप्रसंग दूर

करण्याकरिता ३१ मार्चला मध्यरात्रीं व्हाईसरॉयसाहेबांनीं वटहुकूम जारी करून बिल पास होईपर्यंत मागील बजेटाप्रमाणें सर्व व्यवस्था रहावी अशी तजवीज जाहीर केली. नवीन घटना येण्यापूर्वीच जुन्या घटनेचा याप्रमाणें भंग झाला !! १९३५ पर्यंत असें कधींच झालें नव्हतें. १९२४ मध्यें फक्त बजेट फेटाळलें होतें; त्या वेळीं जिनांनीं पंडित मोतीलाल नेहरूंना साथ दिली होती, व ती देतांना उघड उघड सरकार-विरोध न दाखवितां, 'सनदशीर विरोधाचा हा एकच मार्ग आहे व कांहीं गाऱ्हाणीं दूर होत नाहींत' म्हणून निषेधार्थ साथ दिली, व 'त्यांत सरकारची अडवणूक अगर अडचण करण्याची बुद्धि नाहीं' असेंही त्यांनीं ध्वनित केलें होतें. १९३५ सालीं ही भूमिका बरीच बदललेली होती. तसेंच सर्वसामान्यपणें सरकारी दडपणाला भिण्याची वृत्तीही कमी झाली होती. अनेक बिनपक्षीय सभासद, कोणी आशेनें, कोणी निराशेनें, कोणी कॉंग्रेसपक्षावर खूष होऊन, कोणी सरकारवर कांहीं तरी व्यक्तिगत बाबतींतील रागामुळें बजेटावरील व फायनान्स बिलावरील मतनोंदणींत कॉंग्रेस पक्षाशीं सालोसाल साथ देत होते. पंढरपूरच्या यात्रेला भाविक; व उचले व्यापारी व खुशालचेंडू सर्व येतात. नगरपालिकेचें लक्ष येणाऱ्या यात्रेकरूंच्या हेतूकडे नसून त्यांनीं दिलेल्या करांकडे असतें. कराची रक्कम वाढली म्हणजे झालें ! आम्हाला परकी सरकार, लोकमताविरुद्ध अधिकारारूढ असलेलें सरकार नको होतें, व त्यांचाच कायदा घेऊन त्यांचा समाचार घ्यावयाचा होता. तुरीच्या फोकानें तूर झोडावयाची होती देशप्रेमाला आळवून अतःकरणाला आवाहन देऊन, सरकारच्या अन्यायवृत्तीचा पाढा वाचून, व्यक्तिगत अन्यायाशीं सहानुभूति दाखवून, आमचे प्रतोद मतें मिळविण्यांत तरबेज होते, व त्यांची काम करण्याची पद्धत मोठी कलासंपन्नहा होती !! कायद्याप्रमाणें सरकारतर्फें व्हाइसरॉयानें शिफारस केलेलें बिल मांडण्यांत येईल, व सरकारी प्रतोद बहुमत करण्याकरितां आकाशपाताळ एक करतील, हें आम्ही जाणून होतों. ता. ५।४।३५ ला प्रथम मांडलेलें बिल जसेंच्या तसें गव्हर्नर जनरल यांनीं शिफारसपत्र देऊन 'शांतता, सुव्यवस्था व सुराज्य' यांच्या हितार्थ विचारासाठीं व पास करण्यासाठीं असेंब्लीकडे धाडलें व त्याबरोबर संदेशही धाडला. ('Recommended by the Governor General in the interest of peace, order and good Government) या दुर्दैवी देशाच्या हितार्थ वाटेल तें करण्याचा अधिकार कायद्यानें—अर्थात् इंग्रजसरकारच्या कायद्यानें—गव्हर्नर जनरलला दिला

आहे, व देशाचें हित म्हणजे इंग्रज राज्यकर्त्यांचें व त्यांच्या व्यापारीहितसंबंधाचें हित असेंच समीकरण वस्तुस्थितींत असतें. नाकारलेल्या सर्व खर्चांच्या रकमा, रेल्वेबजेटांतील व सर्वसाधारण बजेटांतील मंजूर करणें, नाकारलेलीं बिलें मंजूर करणें, सभाबंदी, बिनचौकशीनें बिनमुदत अटक, वृत्तपत्रबंदी, हें सर्व या देशाच्या भाग्योदयाकरितांच करण्यांत येतें !! देशहितार्थ शिफारसलेलें हें बिल अर्थमंत्री सर जेम्स ग्रिग यांनीं पुन्हां सभागृहापुढें मांडण्याकरितां आणलें, व ६ एप्रिल रोजीं प्रश्नोत्तरें झाल्याबरोबर १२ वाजतां शिफारस केलेल्या बिलाला अनुसरून दुरुस्त कलम २ याची चालना केली; व भाषण न करतां बसले. एकदां सभागृहानें फेटाळलेलें फायनान्स बिल पुन्हां शिफारसलेलें बिल म्हणून पुढें येतें, त्या वेळेस एखादें दुसरें भाषण होतें, व लागलीच मतनोंदणी होते. पहिलें भाषण करण्याचा मान विरोधीपक्षाचे नेते यांचा असतो. त्याप्रमाणें भुलाभाईनीं काँग्रेसपक्षाची, व सर्व विरोधकांची भूमिका मांडली. जगाला, येथील राज्यतंत्र, व घटना काय आहे हें कळणें अवश्य आहे असें त्यांनीं सांगितलें. सत्याची व लोकमताची चाड असलेलें कोठलेंही सरकार झालेल्या लोकमताच्या निदर्शनानंतर, अधिकारावर राहणार नाहीं. उपस्थित झालेल्या परिस्थितींत राहण्याचा सरकारचा नैतिक हक्क तर नाहींच, पण दुसरा कोणताही हक्क नाहीं असें सांगितलें. जिना, अणे यांनीं थोडक्यांत भाषणें केलीं, व मतनोंदणी होऊन ११ वर्षांनीं पुन्हां एकदां फायनान्स बिल फेटाळलें गेलें. सभागृहानें सदरहू बिल विचारांत घेण्याच्या लायकीचें सुद्धां नाहीं असें पहिलेंच दुरुस्त कलम नाकारून जाहीर केलें. एकदां फेंकून दिलेलें पुन्हां घेण्याइतकें, थुंकलेलें पुन्हा गिळण्याइतके, सभासद स्वाभिमानशून्य असतील असा सरकारचा समज असेल तर, सरकार जरूर 'पागल' असलें पाहिजे असे उद्गार एका जाडजूड मुसलमान सभासदानें काढले!! मतनोंदणी झाली, निकाल जाहीर झाला. त्यानंतर सदरहू बिल जें गव्हर्नर जनरलनें शिफारस करून विचारार्थ धाडलें होतें, ते सभागृहानें फेटाळलें असा शेरा अध्यक्षांनीं नियमाप्रमाणें सदरहू बिलावर मारला व हें ' मढें ' वरच्या कौन्सिलाकडे पाठविलें.

वरच्या कौन्सिलचे अधिकार बजेटाबाबत मर्यादित आहेत. त्या कौन्सिलांत सरकारनियुक्त सभासदांची बहुसंख्या कायद्यानें आहे. निवडून आलेले बहुतेक श्रीमान्, धनवान्, जहागिरदार, महाराज असेच असतात. १९३५–३६ व ३६–३७ सालीं काँग्रेसपक्ष असा तेथें नव्हताच. अभिनंदनें व जें कांहीं सरकार करील त्याबद्दल समाधान, एवढेंच काम तेथें होई. सरकार जें इच्छील तें तेथें

होई, विरोध नसेच; तोंडानें विरोध केला तरी मतदानाच्या खोलीपर्यंत जाण्याइतकी त्यांची ताकद नसे. विरोधी भाषण करून सरकारच्या बाजूनें मत द्यावयाचें असे चमत्कार तेथें वारंवार होत. अध्यक्षाची जरब शाळामास्तराप्रमाणे होती. सदरहू सभागृह म्हणजे सरकारला शोभेकरिता उपयोगी पडे. लोकमतानें जें असेंब्लींत केलें असेल त्याला विलंब करण्याकरितां अगर तें विपरीत करण्याकरितांही, त्याचा उपयोग प्रतिगामी लोकांना होई. देशाच्या घटनेंत दोन कायदेमंडळें असावीत असें अनेक घटनापंडितांचें मत आहे. व्यापक अगर सार्वत्रिक मतदानपद्धतींत, निवडून आलेलें सभागृह पुष्कळ वेळां भावनावशतेनें वागतें, परंपरा जुमानीत नाहीं, व्यवहाराची मांड, समाजाची रचना, हळुहळू बदलली पाहिजे यांतील शहाणपण त्याला पटत नाहीं, म्हणून विवेकानें वागणारे, समतोल बुद्धीचे, अनुभवी, तज्ज्ञ, जडूस लोक निवडून यावेत म्हणून, थोड्या सभासदांच्या, शिक्षणाची, अनुभवाची, वयाची, संपत्तीची, जास्त लायकी असलेल्या व त्यामुळे संख्येने लहान असलेल्या मतदारांकडून निवडून आलेलें दुसरें सभागृह अनेक देशांच्या घटनेंत आढळतें. असल्या सभागृहांत होणारी चर्चा वरच्या दर्जाची, जबाबदारीची जाणीव ठेवून होते. कोठलेंही कार्य घाईनें न होतां साधकबाधक चर्चा होऊन होतें. विलंब झाला तरी हानी होणार नाहीं, इतकी खबरदारी घेण्यात येते. कार्यांत जास्त तोल व निर्दोषता येते प्रगतीचा वेग मर्यादित होतो, पण त्याबरोबर तिला विरोध होत नाहीं. एवंगुण विशिष्ट, वरचें कायदेमंडळ अगर सभागृह असेल तर विशेषत: तक्रार कोणी करणार नाहीं; पण हिंदुस्थानातील लोकशाहीची घटना अजब आहे. ही लोकशाही व खरी लोकशाही यांतील साम्य गाढव व घोडा यांच्य इतकें होतें !! असेंब्लीनें नापास केलेल्या बिलाला वरिष्ठ कौन्सिलान मान्यता दिली एवढीच गोष्ट सरकारला जगापुढें टामटम करण्याला उपयोगी होई. काहीं ना काहीं काळ बनवितां येतें, काहींना नेहमींच बनवितां यतें, पण सर्वांना सर्वकाळ बनविणें, मुरलेल्या इंग्रजांनाही शक्य नाहीं. हा अनुभव त्यांनाही यापुढे येऊं लागला सालोसाल बजेट फेंटाळले जाऊं लागले तेव्हां जगाला काय वस्तुस्थिति आहे हें कळून आलें. १९१९च्या कायद्यानें काय परिस्थिति निर्माण होईल याचें भविष्य नामदार शास्त्री यांनीं खालील वाक्यांत केलें होतें. "या लोकशाही नांवाच्या दरवाज्यामागें अनियंत्रित राज्यकारभार पूर्णसत्तेनं चालेल" ("Behind these forms of Democracy, autocracy will rule supreme.") हें त्यांचें भविष्य संपूर्ण-

पणें खरें झालें. आम्ही धिक्कारलेलें, फेंकून दिलेले बिल, वरच्या कौन्सिलनें मान्य केलें, व तें लोकमतानें मान्य झालें; जबाबदार माणसांनीं त्याला मान्यता दिली, असें सांगण्यास सरकारनें कमी केलें नाहीं ! !

अधिवेशनाचें मुख्य काम म्हणजे बजेट, तें याप्रमाणें निकालीं लागलें. गव्हर्नर जनरलनें आपल्या जादा अधिकारांत खर्चाला मान्यता दिली व करयोजनेला मान्यता दिली. वास्तविक जो जादा अधिकार संकटसमयीं, निकडीच्या परिस्थितींत वापरावयाचा असतो, ज्याचा उपयोग म्हणजे केवळ अपवाद, असें असावयाचें, त्याचा उपयोग या अधिवेशनांत व नंतर पुढे ६ वर्षें अगदीं नित्याची बाब झाली. तहकुबीच्या सूचना येऊं न देणें, ठरावाला बंदी करणें, प्रश्नांची गळचेपी करणें, या बाबतींत लॉर्ड विलिंग्डन व नंतरचे व्हाईसरॉय लॉर्ड लिन्लिथगो यांनीं उच्चांक गांठला, असेंच दिसून येईल. सुरवातीस २१४ तहकुबीच्या सूचना पास झाल्या-बरोबर, हें जादा अधिकाराचें शस्त्र काम करूं लागलें. तहकुबीची सूचना पास होणें म्हणजे, सरकारचें धोरण विशिष्ट बाबतींत नापसंत आहे एवढाच त्याचा अर्थ असतो. नामपात्र कपात ( Token cut ), जशी विशिष्ट खात्याच्या धोरणाची नापसंती व्यक्त करण्याकरितां अगर विशिष्ट गाऱ्हाण्याबाबत आणतात, त्यापैकींच हा एक तहकुबीच्या सूचनेचा प्रकार आहे. अविश्वासाचा ठराव हा विद्यमान मंत्रिमंडळ नसावें, तें विश्वासास पात्र नाहीं, सर्व प्रकारें नालायक आहे, हें दाखावण्याकरितां असतो; म्हणून तहकुबीच्या सूचनेबाबत जादा अधिकार गाजवून शांतता, सुव्यवस्था, सुराज्याच्या हितार्थ त्या येऊं न देणें, हें धैर्य नसल्याचें लक्षण होय, हें उघड आहे. यामुळें अन्यायांना वाचा फुटत नाहीं. तहकुबीच्या सूचना कांहीं रोज वाटेल तितक्या चर्चिल्या जाऊं शकत नाहींत. त्याच-प्रमाणें निश्चित व निकडीच्या सार्वजनिक हिताच्या गोष्टी ज्या नुकत्याच घडल्या आहेत (Some definite and urgent matter of Public importance of recent occurance) येवढ्याच बाबतींत, तहकुबीची सूचना देतां येते. दोन अधि-वेशनांच्या दरम्यानच्या काळांत घडलेली, गोष्ट असेल तर, अगदीं पहिल्या दिवशीं त्याबद्दल नोटीस द्यावी लागते. एक दिवस अधिवेशन सुरू होऊन ती दिली तर, अध्यक्ष ती नियबाह्य ठरवितो. अधिवेशन चालू असतां घडेल तर, सभासदाला ज्या दिवशीं कळेल त्यादिवशीं, अगदीं दुसरे दिवशाचीं बैठक सुरू होण्यापूर्वीं, नोटीस दिली पाहिजे, नाहींतर अध्यक्ष ती सूचना घेत नाहीं. निश्चित पाहिजे निकडीची

पाहिजे व वर सांगितल्याप्रमाणें अगदीं 'गरमागरम' पाहिजे, तर ती गोष्ट तहकुबीच्या सूचनेंत येऊं शकते. तात्पर्य ही बाब फार कठीण आहे. आणि त्यांत जादा अधिकाराचा बरवंटा फिरला म्हणजे अधिकच कठीण आहे. बरोबर ११ वाजण्याच्या पूर्वी ज्या तहकुबीच्या सूचनांची नोटीस कचेरींत आली असेल त्यांची दखल अध्यक्ष व सरकारी सभासदांना ताबडतोब देण्यांत येते. दिवसाचीं प्रश्नोत्तरें संपलीं म्हणजे अध्यक्ष सूचना देणारांना ती कां घ्यावी म्हणून कारणें विचारतात. त्यांना तीं पटलीं तर सरकारचा विरोध आहे कां विचारतात. सरकारतर्फे ज्या मंत्र्याच्या खात्याबाबत तिचा संबंध असेल तो उभा राहतो, विरोध करतो अगर तिला तोंड देण्यास तयारी आहे असें सांगतो. सरकारतर्फे झालेलें निवेदन लक्षांत घेऊन, सूचना योग्य आहे असें अध्यक्षांचें मत असेल, व सरकारचा विरोध असेल तर, सूचना येऊं द्यावी असें मत असणाऱ्यांना उभे राहणाऱ्यास सांगतो. निदान २५ सभासद उभे राहिले असतील तर, तहकुबीची सूचना ४ वाजतां निघेल असें जाहीर करतो. सूचना योग्य व सरकारचा विरोध नसेल तर, त्याप्रमाणें ४ वाजतां तिजवर चर्चा होईल असें जाहीर करतो. सरकारच्या विरोधाला न जुमानतां, अध्यक्षानें ती येऊं देण्याचें ठरविलें, आणि सरकाराला ही गोष्ट नको असेल तर, बरोबर ४ च्या पूर्वी गव्हर्नर जनरलनें सदरहू सूचनेवरील चर्चा, आपल्या जादा अधिकारांत बंद केली आहे असा मनाई हुकूम अध्यक्षाकडे येतो. वाटेल त्याची चर्चा याप्रमाणें गव्हर्नर जनरलला बंद करण्याचा अधिकार आहे; फक्त हें करणें, सार्वजनिक हितार्थ आहे असें म्हटलें म्हणजे झालें !! वाटेल त्याची कुरबानी करावी फक्त अल्लाच्या नांवानें, म्हणजे त्यांतील दोष संपला हाच त्याचा अर्थ आहे ! !

वरील सर्व दिव्यांतून बाहेर पडून तहकुबीच्या ३।४ सूचना या अधिवेशनांत अशा पास झाल्या. कराचीचा गोळीबार ही एक बाब महत्त्वाची, पण काँग्रेस पक्षाला सहमत होण्यास नाजूक अशी होती. दंगा करणाऱ्यांना शासन होणें, अगर तो शमविण्यासाठीं जरूर तेवढी शक्ति वापरणें हें योग्यच आहे. पण जर लोकांची मागणी, पोलीसांच्या अगर अधिकाऱ्यांच्या हातून अतिरेक झाला म्हणून चौकशी व्हावी, अशी असेल तर, सरकारनें ती मान्य केली पाहिजे हें रास्त आहे, लोकशाहीला धरून आहे. या दृष्टीने आपण कोणत्या परिस्थितींत पाठिंबा देऊं, हें सूचना आणणारे सभासद गौबा व त्यांचे पुढारी जिना यांना आम्ही कळविलें होतें. गौबा यानीं अगदीं समतोल भाषण केलें. त्यांतील मुख्य मुद्दा सरकारनें

चौकशी करण्याचें नाकारलें हाच होता. सर्व चर्चेंत यालाच महत्त्व दिलें होतें. तहकुबीची सूचना ४ ला चर्चेला निघते. सूचना आणणारा सभासद २० मिनिटें बोलूं शकतो, नंतर अन्य सभासद सरकारतर्फे उत्तर व बरोबर ६ च्या आंत चर्चा संपवून मतनोंदणी व्हावी लागते. ६ वाजले म्हणजे चर्चा आपोआप बंद होते, व याला 'अनिर्णित स्थितींत सूचना चर्चूनच अंत पावली' ( Motion was talked out )असें म्हणतात; म्हणून सभेचें मत पाहिजे असेल तर प्रतोद वक्ते ठरवितात. सर्व पक्षांना न्याय मिळेल, संधि मिळेल असें ठरवितात व बरोबर योग्य वेळीं वाद-विवाद बंदी ( Closure ) मागतात, सरकारतर्फे उत्तराला १५ मिनिटें राहतील व कोणी सरकारी 'पिट्या' क्लोझरवर मतमागणी करील हें लक्षांत घेऊन सर्व व्यवस्था करावी लागते. मतनोंदणी मागितली म्हणजे त्या विधीला सहज ५ मिनिटें तरी लागतात; तेव्हां हीं ५ व उत्तराचीं १५ मिळून २० मिनिटें राहतील, व याच्या-पूर्वीचा वक्ता बरोबर ५–४० ला थांबेल, एवढें तंत्र सांभाळावयाचें असतें. या-शिवाय मते गटवावयाचीं असतात. तहकुबीच्या सूचनेवरील वादविवादांत व मत-नोंदणींत प्रतोदांना फार काम पडतें, व काळजी पण जास्त असते वेळेचें महत्त्व ओळखून, स वेळेवर जमवून आणावें लागतें. सूचना मांडणारानें उत्तर दिलें कीं सरकारतर्फे उत्तर देण्याचा अधिकार प्राप्त होतो, याचीहि दखल घ्यावी लागते. गौबाच्या सूचनेच्या वेळीं सरकारला वाटलें कीं, गौबा उत्तर देतील व प्रतिउत्तरांत १५ मिनिटे गेलीं कीं, वेळ संपेल, पण आमचा बंदोबस्त व डावपेंच बिनतोड होते बरोबर 'चर्चाबंदी' मागितली, मतनोंदणी सूचनेवर झाली, व सरकारचा पराभव झाला सभा तहकूब झाली. 'हिंदुमुसलमानकी जय' म्हणून जयघोष झाला हॅलेट सरक्युलर व लीज-मोदी करार, या दोन्ही गोष्टीबाबत पण तहकु-बीच्या सूचना आणल्या,व त्या पासही झाल्या.लीज–मोदी कराराचें समर्थन करतांना सर मादींची व सरकारी वक्त्यांची दैना उडाली. निवडून आलेल्या व्यापारी सभा-सदांनीच त्यांना विरोध केला. 'बेजबाबदार' व सरकारवर टपलेल्या 'पांढऱ्या टोपी'वाल्यांनीं फक्त सूचनेला पाठिंबा दिला.

खाजगी ठराव व बिलें ठरलेल्या दिवशीं मांडण्यांत आलीं. बिलांच्या बाबतींत व ठरवांच्या बाबतींत पक्षाच्या सभेंत धोरण ठरल्यानंतर कसें वागावें हें ठरे. ठराव कोणते द्यावयाचे, हें पक्षसभा ठरवी, व सदरहू ठराव आम्हीं ४४ सभासद पाठवूं व त्यामुळें बॅलटमध्यें आमचे ठराव येण्याचा संभव नेहमी जास्त असे. ठरावाबर

२० मिनिटांपेक्षां जास्त भाषण करतां येत नाहीं. बॅलटमध्यें आलेल्या ठरावावर कोणी बोलावयाचें दुसऱ्या पक्षातर्फे अगर सभासदातर्फे ठराव आला तर, कशीं मतें द्यावयाचीं व कोणी बोलावयाचें हें सर्व आधीं ठरे; व वक्ते ठरवितांना फार त्रास होई. राग पत्करावा लागे. बोलणारे फार, वेळ थोडा, शिवाय पक्षाच्या दृष्टीनें व्यवस्थित बोलणारे निवडावयाचे व त्यांत कोणास राग न येईल असें घडवून आणायचें म्हणजे कठीण काम होतें. निवडणुकींतील बंदीचा निषेध करणारा ठराव जेधे यांनीं मांडला व थोडक्यांत चांगलें भाषण केलें. पण या साधारण ठरावावर बोलण्याकरितां २० माणसांनीं इच्छा प्रदर्शित केली. कांहीं माणसें मुक्रर पण केलीं. ठराव मांडल्यानंतर सरकारनें विशेष विरोध न केल्यानें, आम्ही एकदम मतनोंदणी मागितली, व सर्व वक्ते जागच्या जागीं थंड झाले. असें नेहमीं होई. महत्त्वाचा ठराव क्रमानें मागें येई, व तो चर्चेस यावा म्हणून, आधींचे ठराव मांडू नयेत अगर लवकर संपावे, असें करणें अवश्य होई. त्यामुळेंही पक्षांत पुष्कळ नाराजी होई. जो ठराव यावा म्हणून आमची खटपट असे, तो येऊं नये म्हणून सरकारची खटपट असे; व त्या दृष्टीनें अनेक वक्ते बिनमहत्त्वाच्या ठरावांवर सरकार उभे करी, व बोलण्यास सांगे. चर्चेस आलाच, तर खूप वक्ते उभे करावयाचे व मतनोंदणी लांबवावयाची याप्रमाणें डावपेंच चालत. तथापि याही अधिवेशनांत ३।४ ठराव सरकारविरुद्ध पास झाले. अनेक खाजगी बिलें फक्त मांडलीं गेलीं. मांडल्यानंतर, पुढील तजवीज होण्यापूर्वी कांहीं काळ जावा लागतो. पक्षानें बिलें मांडण्याची मोकळीक दिली होती, तथापि बिल मांडल्यानंतर त्याला पाठिंबा द्यावयाचा किंवा नाहीं हें मात्र पक्ष ठरवी. पक्षानें विरोधी निर्णय केल्यास, सभासद बिलाचा नाद सोडी. पक्षानें पाठिंबा दिला तरच मतें मिळणार हें उघड होतें.

प्रश्नाबाबत पक्षाचें धोरण सुसंगत असे. प्रश्न विचारावेत अशी मोकळीक होती. प्रश्न लेखी उत्तराचे व तोंडी, असे असत. विचारणारानें त्याप्रमाणें प्रश्नाची नोटीस देतांना लिहावें लागतें. तोंडी उत्तरांच्या प्रश्नास (Starred questions) म्हणतात. तोंडी उत्तर मागण्यांतील फायदा म्हणजे, सभागृहांत प्रश्न विचारावा लागतो, व त्याचें उत्तर खात्याचा सभासद सभेंत देतो, व त्याला दिलेल्या उत्तराबाबत उपप्रश्न विचारतां येतात. प्रश्नांना नेहमी सरळ उत्तरें येतात असें नाहीं. उपप्रश्न विचारून सरकारची बाजू लंगडी आहे, माहिती सरकार देत नाहीं, अगर चुकीची देतें हें दाखवितां येतें. उपप्रश्नाच्या वेळीं अनेक चकमकी उडतात, ठिण-

ग्याही निघतात, हास्यविनोद होतो. सभासद चलाख असेल तर ठीक, नाहीं तर पटकन बार बसतो. कौशल्याला, प्रत्युत्पन्नमतीला वाव असतो. योग्य उपप्रश्न विचारून सार्वजनिक हित साधतां येतें, तर उगाच ठराविक साच्याचे उपप्रश्न विचारून सभेचा वेळ व सार्वजनिक पैशाचा दुरुपयोगही करतां येतो. दुसरा प्रकार बऱ्याच प्रमाणावर होईही. सत्यमूर्ती पाहिल्यांत फार प्रवीण व त्यांच्याशीं नित्य स्पर्धा करणारे कांहीं असत, व ते पुष्कळ वेळां निष्कारण वेळ घालवीत. प्रत्येक प्रश्नाला १० दिवसांची नोटीस द्यावी लागते. त्या त्या खात्याच्या मंत्र्याच्या नांवानें तो विचारावा लागतो. कोणाकडे कोणतीं खातीं आहेत व कोणत्या दिवशीं कोणत्या खात्याचे प्रश्न विचारावेत याबद्दलचें पत्रक ( Circular ) सभा-गृह खातें, अधिवेशन सुरू होण्यापूर्वीं धाडतें. प्रश्न लेखी दिला व तो नियमा-प्रमाणें असला म्हणजे मंजूर होतो. कांहींना गव्हर्नर जनरलची मान्यता लागते. सर्व संस्कार झाले म्हणजे ते प्रश्न छापून सभासदांना वाटले जातात. तोंडी प्रश्न दररोज ११ ते १२ पर्यंत विचारले जातात. वेळ संपतांच दुसऱ्या कामास सुरु-वात होते. प्रश्न या वेळेच्या अगोदरच संपले तरीही दुसरें काम सुरू होतें. सभा-सदांचें नांव अध्यक्ष उच्चारतात. सभासद प्रश्नाचा आंकडा उच्चारतो; उत्तर दिलें जातें, उपप्रश्न होतात. ते संपले अगर अध्यक्षांनीं संपविले कीं, ' दुसरा प्रश्न ' म्हणून अध्यक्ष बोलतात, त्याबरोबर चालू प्रश्नाचा अंत होतो. महत्त्वाच्या व निक-डीच्या बाबतींत अल्पमुदतीच्या (Short Notice) नोटीसीचे प्रश्न, तांतडीचे प्रश्न, विचारता येतात. त्याचीं कारणें विचारणारास द्यावीं लागतात. तीं कारणें अध्य-क्षास मान्य झालीं, व सरकारी सभासदानें उत्तर देण्याची तयारी दर्शविली तर सदरहू प्रश्न नेहमींचे प्रश्न संपल्यानंतर विचारण्याचा प्रघात आहे. सरकारने पूर्ण नोटीस पाहिजे असें म्हटलें कीं, तो गेला; त्याचा क्रम लागेल तेव्हां लागेल. लेखी उत्तरांचे प्रश्न व त्यांचीं उत्तरें ठराविक खात्याच्या दिवशीं त्या त्या खात्याच्या बाब-तींत सभागृहाच्या टेबलावर ठेविलीं जातात.

ठराव, बिलें, तहकुबीच्या सूचना अगर तोंडी उत्तरांचे प्रश्न, जें कांहीं सभागृहांत कामकाजाच्या दृष्टीने बोललें जाई, तीं भाषणें, तीं प्रश्नोत्तरें लघुलेखक ताबडतोब उतरून तयार करून घेतात, व त्याच दिवशीं सभासदांकडे दुरुस्ती-करितां धाडतात हे लघुलेखक फार दक्ष, कार्यक्षम व अनुभवी असेच असतात. फार वर्षांच्या अनुभवानें ते माहितीचे गड्डे बनलेले असतात. दुरुस्त करून ठर-

लेल्या वेळांत आलेलीं भाषणें, व अन्य मजकूर, दुरुस्त करून न धाडली तर, लघु-लेखकांनीं जसें घेतलें असेल तसा मजकूर संपादक खात्याकडे जातो; व सर्व वृत्तांत–दर दिवशींचा–एका रिपोर्टांत छापला जातो. व प्रत्येक दिवसाच्या रिपोर्टांची छापील प्रत साधारणपणें ज्या दिवशीं चर्चा झाली असेल, त्या दिवसांपासून १५ दिवसांनीं प्रत्येक सभासदाकडे धाडण्यांत येते. प्रत्येक अधिवेशनांतील वृत्तांताची सूचि पण धाडण्यांत येते. सिलेक्ट कमिटीचे रिपोर्ट, लोकमताचे रिपोर्ट, निरनिराळ्या खात्यांचे रिपोर्ट, सरकारी गॅझेटाचे अंक, अनेक गढे, सारखे सभासदांकडे येत असतात. अधिवेशन संपून परत जातांना हा ज्ञानाचा बोजा, फुकटांत मिळाला असला तरी, वाहतुकीचा खर्च मात्र माफ नसे, व चांगलेंच हंशील त्याबद्दल द्यावें लागे !!

सभागृह म्हणजे वादविवादमंडळ, लोकशाही राज्यव्यवस्था म्हणजे भाषणबाजीनें राज्य ( Government by talking ) हाकणें असें त्याचें वर्णन इंग्रज विद्वान कार्लाइलनें केलें आहे. तथापि या सर्व शब्दसंभारांत शांततेला, शहाणपणाला, विवेकाला वाव नसतोच असें मात्र नव्हे; खुद्द सभागृहांतील वक्तृत्व अगर भाषण यांची चाल निराळी, निवडक कमिटींतील भाषणांची चाल निराळी. आम-सार्वजनिक–सभेंतील भाषणांची चाल निराळी. तेच शब्द, तेच वक्ते पण आवाज व आविर्भाव निरनिराळा व त्यामुळे परिणाम व परिपाक पण निराळा. कायदेमंडळाच्या सभागृहांतील वक्तृत्व कसें असावें म्हणजे परिणामाच्या दृष्टीनें हें साधारणपणें त्या सभागृहाच्या परंपरेवर व सभासदांच्या भूमिकेवर अवलंबून राहील. लांबलचक भाषणें, मोठमोठे उतारे, कृत्रिम वाटेल इतका अभिनय, सहज न समजेल इतकी जाडजूड शब्दरचना, ह्या सर्व गोष्टी आतां अस्थानीं असून हास्यास्पद ठरतात. भाषणांचे वृत्तांत आतां शेकडों दैनिकांतून येतात व भाषण ऐकणारे प्रत्यक्ष जरी शें दोनशें असले तरी, वाचणारे लाखांनीं असतात ही जाणीव सर्वत्र विधिमंडळांतील लोकांना झालेली आहे. त्याचा परिणाम, सरळ, स्पष्ट व अवडंबररहित बोलण्याकडे झाला आहे. पक्षसंघटित राजकारण सर्वत्र असल्यामुळे सभागृहांत मतपरिवर्तन होत नाही हें सत्य असलें तरी आमजनमतावर चांगल्या, विवेकी व हितप्रद अशा भाषणाचा परिणाम होतो, किंबहुना असल्या भाषणाचा जास्त परिणाम होतो. असल्या भाषणानें सभागृहांत टाळ्या मिळतील, मतें मिळणार नाहींत. ( A good speech will earn cheers but not votes in this House )

अशी तक्रार कॉमन्स सभेच्या बाबत करतात ती साधार आहे. निवडणुकीची दगदग, खर्च त्यासाठीं सर्वत्र जुळवून घेण्याची प्रवृत्ति, सर्वत्र विद्वानांत असते असें नाहीं. त्यामुळे अनेक विद्वान व प्रतिभावान पुरुष अनेक देशांतून या भानगडीपासून अलग राहातात. कांहीं तर, लवकरच कंटाळून अलग होतात. प्रसिद्ध इतिहासकार गिबन वर्ष दोन वर्षें कॉमन्स सभेंत होता, पण एकदांहि बोलला नाहीं, व पुढें सोडून गेला; पण मिळालेला अनुभव मौल्यवान होता असेंच म्हणे!! सभागृहांतील सभासद जो आपली विद्वत्ता व ज्ञान, जनतेला समजेल अशा रीतीनें उपयोगांत आणील; अगदीं त्यांच्या भाषेंत नसेल तरी त्यांना ' लई जड ' वाटणार नाही अशा भाषेंत बोलेल; मनानें व अंतःकरणानें त्यांच्याशीं समरस होईल, अशा सभासदांना लोकशाहींत, यशाचें पीक भरपूर मिळेल व मिळतेंही. सभागृहांतील भाषण एखाद्या शुभ्रशालीप्रमाणें असावें. तींत कोठेंही नक्षीकामाची गर्दी केलेली नसावी. दोन्ही टोकांना तिच्यांतील शुभ्रता व सुंदरवीण उठावदार दिसावी म्हणून एखादी जरीची अगर रेशमी वेलबुट्टी असावी म्हणजे झालें. विचार व भाषा यांची सुंदर,पद्धतशीर, ताणा व बाण्यांत वीण, भाषणाच्या सुरवातीस थोडेसें वक्तृत्व कीं,ज्यामुळें सभेचें चित्त वेधलें जाईल, व शेवटीं त्याचबेतानें वक्तृत्वाची लकेर कीं जिचा परिणाम सभेवर चांगला होईल, एवंगुणविशिष्ट भाषण हें उत्कृष्ट होय. भाषण संपतांच वक्ता " चांगलें बोलला " असें शब्द न निघतां 'योग्य बोलला' असे शब्द निघाले पाहिजेत. अर्थात् असें भाषण करावयाचें म्हणजे अभ्यासानेंच शक्य आहे. ना. गोखले आपलें भाषण तयार करण्याकरितां दिवसदिवस घेत. चर्चिलसाहेब आपलें भाषण तयार करतात इतकेंच नव्हे तर घरीं त्याची अगदीं हावभाव करून रंगीत तालीम करतात असें म्हणतात. ज्यांच्या शब्दावर कोट्यवधी लोकांचें भवितव्य अवलंबून आहे, अगर ज्यांच्या शब्दानें व्यवहारांत अनेक उलटापालटी होणार आहेत, त्यांनी अशीच दक्षता घ्यावयास पाहिजे. यांत कमीपणा नाहीं, तर ही गोष्ट भूषणास्पद आहे. वाटेल त्या विषयावर, वाटेल तेव्हां बोलणारा, वाटेल ते बोलतो, हाच अनुभव असता!! पाश्चात्यदेशांत वक्तृत्व कलेचें शिक्षण देतात, लोक घेतात, येथें आम्हीं कला मानतों पण तिचें शिक्षण घ्यावें, ती संपादावयाची म्हणजे श्रम व उमेदवारी करावी लागते ही गोष्ट आम्हां मानीत नाहीं. हनुमंताप्रमाणें जन्मतांच सूर्य गिळण्याचा प्रयत्न येथें होतो. बहुतेक उडी चुकून पडतात अगर तोंड [illegible]

निवडक कमिटींतील कामकाज व भाषणपद्धति अगदीं निराळी. तेथें यशस्वी होण्याला थोडी निराळी गुणसंपदा लागते इंग्लंडच्या अगर कोणत्याहि देशाच्या पंतप्रधानाच्या आंगीं काय गुण असावेत याचें वर्णन करतांना एक प्रसिद्ध ग्रंथकार म्हणतो "प्रधानमंडळांत काम करतांना त्यानें विवेक व शहाणपणा (Wisdom) दाखविला पाहिजे; सभागृहांत (Parliament) काम करतांना दक्षता (Vigilance) व आमजनतेच्या जाहीर सभांतून तडफ (Vigour) व सर्वत्र कळकळ, श्रद्धा (Conviction) दाखविली पाहिजे. १९।२० सहकाऱ्यांच्या सभेंत वक्तृत्वाला अगर दमपट्टीला पहिलें स्थान नाहीं. अनेकांचे अनेक दृष्टिकोण समजावून घेऊन, त्यांची जुळणी करून सर्वांना पटेल असें अगर कोणी विशेष विरोध करणार नाहीं असा निर्णय घेऊन तो अगदीं आर्जवी अगर आवेशी भाषेंत न सांगता प्रसंगोचित भाषेंत सांगून, काम करावें लागतें. निवडक कमिटींत तींच स्थिति असते. संभाषणात्मक पद्धतीनें काम चालतें. दृष्टिकोण पटवावा लागतो. तडजोड करावी लागते विषय पूर्णपणें आकलन करावा लागतो. विरोधकांइतकी माहिती व तितकाच अभ्यास असेल तर जमतें. कमिटींत जो सभासद माहिती पूर्णपणें घेऊन तयारीनें आला असेल, तोच मानाप्रमाणें घडवून घेतो. (In a Committee one who comes well prepared carries.) पहिल्या अधिवेशनांत प्रत्यक्ष एका निवडक कमिटींत मला काम करण्याची संधि मिळाली. तेथें बरेच अनुभव आले. श्री. नारायणराव जोशी यांची कार्यपद्धति मोठी वाखाणण्यासारखी होती. या अनुभवाचा मला पुढे कॅन्टोन्मेंट बिलाच्या निवडक कमिटींत चांगलाच फायदा झाला पहिल्या अधिवेशनांत ही कमिटी फक्त सभागृहानें नेमली व त्यांत मी काँग्रेस पक्षातर्फे होतों. कायदेमंत्री सर नृपेंद्र हे कायद्याच्या दृष्टीने फार हुषार, पण कामाच्या दृष्टीने तेथें जुळवून घेणें नेहमींच जुळे, असें नाहीं. एक दोन वेळां खटकेही उडाले. पण त्यांचा राग क्षणमात्र राहिला. भुलाभाई या दृष्टीनें सरस होते. त्यांची बुद्धि आकलनप्रवीण आहे. महत्त्वाचें कोणतें व बिनमहत्त्वाचें कोणतें हें ते चटकन ओळखत व त्यादृष्टीनें वागत. निवडक कमिटींतूनसुद्धां पक्ष या दृष्टीनें विचार होत नाही असें नाहीं, पण कांहीं सर्वमान्य गोष्टी असतात म्हणून जुळवून घेण्याकडे प्रवृत्ति साहजिक असते. सभागृह दरसाल निरनिराळ्या स्थायी–कमिट्या निवडी. फडणिसी, शिक्षण, रेल्वे, निर्वासन (Emigration) वगैरे सर्वत्र पक्षसंख्येप्रमाणें सभासद साधारणपणें निवडून येत. क्रमदेय पद्धत (Single Transferable Vote) म्हणून हें होई. आमच्या पक्षां-

तील प्रतोद अगदीं शेवटपर्यंत दक्ष असल्यामुळें, आम्हाला नेहमींच एखादी जागा जास्त मिळे. सर्वत्र या कमिट्यांतून लोक निवडून येत, कामही वर सांगितल्याप्रमाणें होई. तथापि सरकारी सभासदांजवळ माहितीची सामुग्री भरपूर, तयारी जय्यत व मतें मिळविण्याकरितां जरूर असलेली पुरस्काराचीं साधनें (Patronage) भरपूर असल्यामुळें अनेक वेळां ते जरूर त्याप्रमाणें घडवून येत. जेथें, त्यांना विरोध, कळकळीचा, माहितीपूर्ण अभ्यासानें जोड दिलेला, व निस्पृह, आढळे तेथें त्यांना नमावें पण लागे, असेंही घडे. तात्पर्य या कमिट्यांतून काम निराळें, पद्धत निराळी, तंत्रही निराळें असे. जाहीर सभेंतून कसें भाषण पाहिजे हें येथें सांगण्याचें कारण नाहीं. तथापि सभागृह म्हणजे शनवारवाडा नव्हे, व कमिटीची खोली म्हणजे पक्षकचेरींतील साधारण सभा नव्हे, एवढी गोष्ट मात्र सत्य व हें विसरून वागलें म्हणजे कदाचित आतां संतोष लाभेल पण कार्यसिद्धी मात्र होईलच असें मात्र नव्हे !! यस्मिन देशे सदाचारः—ज्या देशांत जो आचार—हा जसा योग्य नियम, त्याचप्रमाणे साहित्यानुरूप वर्तत।-जशी समिती असेल त्याला अनुरूप वागावें—हाच दंडक योग्य होय.

सभागृहाच्या कामासंबंधीं व आनुषंगिक गोष्टीविषयीं सांगितल्यानंतर कांहीं अन्य गोष्टींचा उल्लेख करणें जरूर आहे. राजकीय जीवनाबरोबर सामाजिक जीवनाचेंही थोडें महत्त्व आहे. कॉमन्ससभा म्हणजे एक उत्कृष्ट क्लब (House of Commons is the best club) असें मानतात. तेथें सभेच्या कामाला दुपारीं ४ ला सुरुवात होते; काम रात्रीं ११ वाजतां संपतें. यामुळें संध्याकाळचें चहापाणी; गप्पासप्पा मारण्याला सभासदांना अन्यत्र जातां येत नाहीं. यामुळें तेथील उपाहारगृहांत —व तसें खास उपाहारगृह सभासदांच्या देखरेखीखालीं आहे—सर्व व्यवस्था असते. सभेच्या आगाशींत चहापान चालू असतें. सभागृहांत एकमेकांला शब्दांचे वार करणारे सभासद, एकाच टेबलाभोंवती चहापान अगदीं दिलदारवृत्तीनें करतांना आढळतात. तेथें प्रधानमंडळ व विरोधी पक्ष एकाच राष्ट्रांतील व खो खोच्या खेळाप्रमाणें एक मरतो व दुसरा उठतो, अशी स्थिति असते. आजचें प्रधान मंडळ उद्याचा विरोधी पक्ष, यामुळें प्रतिष्ठेत फरक नसतो. येथें अधिकारी पक्षांत बहुतेक गोरे, तुरळक, डोळ्यांत काजळ असावें, अगर दृष्ट लागूं नये म्हणून लावलेल्या तिटीप्रमाणें काळे मंत्री; राज्यकर्ते निराळे, त्यांची संस्कृति निराळी, वंश निराळा, राहणी, निराळी यामुळें या प्रकाराला येथें नैसर्गिकच मर्यादा दिसतात. शिवाय

कॉंग्रेस पक्षानें सरकारी सामाजिक प्रसंगावर कडक बहिष्कार घातलेला. तथापि इतकें असूनही सभागृहांतील लॉबींत, प्राकारांतील हिरवळीवर, ग्रंथालयांत, विरोधी सभासद एकमेकांबरोबर चहापान करीत व त्यामुळें पुष्कळ खेळीमेळीचें वातावरण असे. चढलेल्या शिरा, तडकलेलीं डोकीं, गरम चहांत थंड होते. वादविवादांत झालेले वार व प्रहारांतील जखमा, आंतील विरोधक एकमेकांच्या पावास लोणी अगर जॅम लावून भरून काढण्याचा प्रयत्न करतांना दिसत !! एवढया कामीं सहकार्य झालेले दिसे !! मतासाठीं विरुद्ध दिशेनें जाणारे यात्रेकरू अन्नपूर्णेच्या ठिकाणीं मात्र एकत्रित होत. सभासद एकमेकांच्या घरींपण चहापान अगर जेवणास एकमेकांना बोलावीत. मित्र या नात्यानें सरकारी सभासदांचा खाजगी पाहुणचार घेणें निषिद्ध मानण्याइतकें कॉंग्रेस सभासद पराकोटीला गेलें नव्हते. तिन्हाइताने दिलेल्या चहापाटर्यांच्या समारंभात सर्व सभासद भाग घेत. तात्पर्य, खास सरकारी अधिकाऱ्यांच्या सन्मानार्थ केलेल्या समारंभावर बहिष्कार होता त्याच कारणांसाठीं व्हाईसरॉयांच्या चहापाटर्या व अनेक अन्य समारंभ यांवर बहिष्कार होता. इंग्लंडांत व अन्य पाश्चात्य देशांत,असल्या सामाजिक प्रसंगीं,अनेक राजकारणें शिजतात, मनसुबे होतात, डावपेच ओळखिले जातात. सत्कार समारंभानें, निमंत्रणाच्या बहुमानानें, त्यांत वाटणाऱ्या प्रतिष्ठेनें, मोठमोठीं माणसें भांबावतात. ज्या देशांत स्वातंत्र्य आहे त्या देशाचा विरोध निराळा जेथें राज्यकर्ते व प्रजा यांच्यात कांहीच समान भूमिका नाहीं, त्या ठिकाणीं असल्या समारंभांना स्थान नाही. ज्यांनीं आमचें स्वातंत्र्य लुबाडलें, त्यांच्याशीं होणाऱ्या सामाजिक समारंभांत मिसळणें, यांत स्वाभिमानी माणसाला लज्जत वाटणार नाहीं, लाचारीच वाटेल. कौरव, श्रीकृष्णाचे आप्तच होते, तथापि श्रीकृष्ण शिष्टाईला गेला तेव्हां त्यांच्याकडे जेवावें कां असा प्रश्न केला असतां विदुरानें सांगितलें, "संकटांत कोठेंही जेवावें, अन्यत्र जेथें आपल्याबद्दल प्रेम आहे तेथेंच जेवावें." यांतील रहस्य राजकारणांत वावरणाऱ्या लोकांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे ! कॉंग्रेसपक्षाच्या या धोरणाबाबत टीका झाली तथापि तें अगदीं योग्य होतें, व त्या पक्षानें जेव्हां योग्य प्रसंग आला त्यावेळीं अपवाद म्हणून तेवढ्यापुरती मुरडही या धोरणाला घातली.

पहिल्या अधिवेशनानिमित्त आलेल्या सभासदांत अनेक महाराष्ट्रीय सभासद होते. अणे, डॉ. खरे, देशमुख, मी, जेधे, जोशी त्याचप्रमाणें पंडित गोविंद वल्लभपंत, हेही महाराष्ट्रीय होते. त्यांचें कुटुंब मूळचें देवगडकडील, माध्यंदिन-

शाखेचें ब्राह्मण कुटुंब, तीन चारशें वर्षांपूर्वी यात्रेनिमित्त कांहीं इकडील कुटुंबें हिमालयाकडे गेलीं. परत येतांना तिकडील राजांनीं आश्रय दिला, तेथेंच राहिलीं. पंत, पांडे, वैद्य, जोशी वगैरे आडनांवांचीं कुटुंबें कुमायून भागांत आहेत. पंतजींना फक्त आपण महाराष्ट्रांतून आलेले आहोंत, एवढेंच माहीत होतें. मराठी येत नाहीं, समजतही नाहीं. सरकारी सभासदांत श्री. बेवूर, पोस्ट व तारखात्यांतील प्रमुख, हे कर्नाटकांतील खरे, पण लग्नानें महाराष्ट्रीय म्हणून, आम्ही त्यांना आमच्चेच समजूं. दर अधिवेशनांत आम्हीं एकदां तरी कोणाकडे तरी चहानिमित्त एकत्र जमत असूं. श्री. भट, श्री. नगरकर, सुखटणकर, भिडे वगैरे सिव्हिल सर्व्हिसमधील मंडळी तात्पुरते सरकारनियुक्त सभासद होऊन गेले. सरकारनियुक्त सभासद जे प्रांतांतून येत, त्यांना तोंड हलविण्याचा प्रसंग चहा व भोजनसमारंभांतच येई ! ! सभागृहांत अंतःकरणाला न पटणारे बोलण्याचा प्रसंग म्हणजे त्यांना संकट वाटणें साहजिक आहे. जे मध्यवर्ती सरकारच्या दिमतीस होते त्यांना बोलावें लागे, व सर्वांना मत मात्र सरकारी प्रतोदांच्या सांगण्याप्रमाणें द्यावें लागें. खाजगी चर्चेंत बोलतांना आमचें सर्वच म्हणणें या मंडळींना मान्य असे असें नव्हे. पगारकाटीचा प्रश्न आला कीं, हे बहुतेक जण विरोध करतांनाच दिसत !! तथापि विरोधी दृष्टिकोणामुळें भोजनांतील अंतर अगर चहांतील गोडी कमी झाली, असें केव्हांच झालें नाहीं ! दिल्लींतील महाराष्ट्रीय मंडळीही मधून मधून समारंभाच्या निमित्तानें बोलावीत. तथापि आम्हा दोघांस एकंदरीनें बिचकत हें खरें, व त्याचें मुख्य कारण आमची सामाजिक मतें हें होय.

असेंब्लींतील पहिल्या भाषणानंतर जो लौकिक झाला त्याचें प्रायश्चित्त म्हणून मला दिल्लींतील अनेक कॉलेजांतून व्याख्यानाचीं आमंत्रणें पत्करावीं लागत. लॉकॉलेज, हिंदू कॉलेज, रामजस कॉलेज, सेंट स्टीफन कॉलेज, याशिवाय मुस्लीम विद्यार्थि संघ, आर्य कुमार सभा, कॉंग्रेस कमिटया यांचीं आमंत्रणें म्हणजे सालोसालची एक बाब झाली. पुढें पुढें तर दिल्ली प्रांतांतील खेड्यांतून, पंजाब हद्दींतील खेड्यांतून, आमची दुक्कल प्रचारानिमित्त जाऊन हिंदींत व्याख्यानें देऊं लागली ! ! खेड्यांतील सभा म्हणजे शेतकऱ्यांच्या सभा, मात्र सभोंवार उंटांवर बसून ऐकणारे अनेक श्रोते असत, पण शहाणपणाचे प्रश्न विचारून कधीं वक्त्यास खंडीत नसत; उंटावर बसून उंटावरचे शहाणे नसत !! सभागृहांत ११ ते ५ बसणें मला प्रतोद म्हणून भाग होतें, किंबहुना थोडें आधींच जावें लागे, व उशीरां

यावें लागे. याशिवाय, पक्षाच्या कार्यकारी मंडळाच्या सभा रोज भरत, पक्षाची साधारण सभा आठवड्यांत एक असेच, य शिवाय वर लिहिलेली व्याख्यानबाजी, यामुळें अधिवेशन केव्हां संपतें असें होई. कित्येक सभासदांना अधिवेशन लांबावें असें वाट, कारण दर दिवशीं रु. २० भत्ता व दिल्लींत राहिल्यास रु ५ व नव्या दिल्लींत राहिल्यास रु. १५ गाडीभाडें मिळे. अधिवेशन सुरू होण्यापूर्वीं ३ दिवस संपल्यानंतर ३ दिवस या काळांत जेवढे दिवस वाढतील तेवढी प्राप्ति वाढणार हें उघडच आहे. जे आपले कबीले आणीत त्यांना परत जाण्याची घाई असण्याचें कारणच नसे!! अधिवेशनांतील ताण व दगदग येवढीच घरीं जाण्याची उत्सुकता वाढविण्याचें कारण नसे! सभागृहांतील ग्रंथालय उत्कृष्ठ आहे, वाचण्याची जागा प्रसन्न आहे, अभ्यासाला पूर्ण वाव आहे, साधनें आहेत परंतु चाललेल्या प्रचंड उद्योगामुळें, मनाजोगें वाचन घडत नाहीं राजकारणांत सुद्धां घसारा असता. औद्योगिक क्षेत्रांत ज्याप्रमाणें उत्पादन संघ कार्यक्षम रहावा म्हणून त्यांत नवें जुनें करावें लागतें, वापरामुळें झालेला घसारा भरून काढ वा लागत , तसेंच राजकारणांत वावरणारांना कराव लागतें. अखंड अभ्यास, अखड चालना करावी लागते.एकांत सेवावा लागतो, उपासना करावी लागते. लोकशाही राजकारण म्हणजे ' समुदायाचा हव्यास, ' म्हणूनच अखंड व सावकाश एकांत सेवावा ही समर्थांची शिकवणूक यथार्थ आहे. घडलेल्या घटनेचें समालोचन करावें लागतें, मूल्यें तपासावीं लागतात, चालू स्थिति परिक्षावी लागते, तेव्हां पुढील कामाची बुद्धि सुचते. हें सगळें अधिवेशन कालांत शक्य नसतें. २।३ तासांपेक्षां जास्त वेळ वाचनाला मिळत नसे, व त्यातील बराच वेळ वर्तमानपत्रांतील मजकूर वाचण्यांत व आपल्याला योग्य तेवढी प्रशस्ती व प्रसिद्धि मिळाली नाहीं म्हणून प्रसंगीं कुरकुर करण्यांतही जाई!! या परिस्थितींत पुण्यास लवकर पळावें म्हणून उत्सुक होतो, व अधिवेशन संपल्याच्या दुसऱ्या दिवशीं आम्ही पुन्हा दक्षिणेकडे उत्तरेकडील दिग्विजय संपवून परतलों. मुंबईस कांहीं तास मुक्काम केला, अनेक स्नेही मंडळींनीं व्यक्तिगत व पक्षाचीही स्तुति केली. श्री. तरुणीमार्नी तर " एका भाषणाने येवढें तुम्हीं केलें आहे कीं, आतां यापुढें कांहींही भाषण केलें नाहीं तरी चालेल " असें उद्गार काढले. तसेंच केलें असतें तर फारसें बिघडलें असतें असें आता वाटत नाहीं !! ता. २२।४।३५ ला पुण्याला परत आलों, व मिळालेल्या विश्रांतीचा कसा उपयोग करावयाचा हें मनानें ठरविलें पण दैवानें अगर कॉंग्रेस राजकारणानें दुसरेंच वेचून ठेवलें होतें. याची दखल लवकरच मिळाली.

## : सिमल्यांत--गार परसांत :

१९३५च्या एप्रिलच्या तिसऱ्या आठवड्यांत जबलपूर येथें अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीची बैठक होती. या बैठकीला हजर राहिलेंच पाहिजे असें होतें. अवघ्या एक दोन दिवसांच्या विश्रांतीनंतर जबलपुरास गेलों. तेथें अ. भा. कॉं. कमिटीचे समासद व अन्य कॉंग्रेस कार्यकर्ते जमले होते. एकंदरीने पाहतां मध्यवर्ती असेंब्लींतील पक्षाच्या कामावर मंडळी खूष होती. हळुहळू विधिमंडळांतील कामाकडे लोकांचें लक्ष अधिकाधिक प्रमाणांत खेचलें जात आहे हें उघड होतें. अधिवेशनांत पार्लमेंटरी बोर्डाची निवड झाली. त्यात मी खूपच मतें मिळवून निवडून आलों. या बोर्डानें कॉंग्रेसच्या विधिमंडळांतील कार्यक्रमाबाबत देखरेख व मार्गदर्शन करावयाचें होतें. या बोर्डाचे अध्यक्ष डॉ. अन्सारी राहिले. कांहीं समासद बोर्डानें नियुक्त ( Co-opt ) करून घेतले, त्यांत जेधे याना घेण्यात आले. बोर्डाचे समासद जरी २५ होते तरी सर्वांवर कामाचा बोजा होता असे नव्हे काम करणाऱ्यांवरच बोजा पडतो. तोच अनुभव येथेंही आला. सदरहू बैठकींत, खाजगी ठराव म्हणून हिंदी संस्थांनाबाबत मी मांडला व तो विशेष चर्चा न होतां पास झाला. संस्थानांतील प्रजेशीं कॉंग्रेसची एकजूट असून, तिनें चालविलेल्या स्वराज्याच्या चळवळीशीं कॉंग्रेसची सहानुभुति व सहकार्य आहे अशा अर्थाचा ठराव पास झाला. पण त्याच भाषेतून अनेक अर्थ दुसऱ्या क्षणापासून निघूं लागले. कॉंग्रेसनें तेथील लढ्याचा बोजा व नेतृत्व प्रत्यक्षपणें पत्करलें पाहिजे. येथपर्यंत त्याचा अर्थ करण्यांत आला. कांहीं संस्थानांतील कार्यकर्ते १९३५ च्या घटना बिलातील संस्थानाविषयक बाबींत भुलाभाईंनीं संस्थानिकांना सल्लामसलत कायदेपंडित या नात्याने दिली म्हणून गरम होते. " बिलांत सार्वभौम सत्ता व संस्थानिक व त्यांची प्रजा " यांमध्यें तह होऊन संयुक्त राज्यघटनेंत ते येतील असे होते. यांपैकीं प्रजेचा उल्लेख नको, ही संस्थानिकांची मागणी मान्य झाली;

व याला कारण त्यांना मिळालेला कायदेपंडितांचा सल्ला, असा समज या संस्थानी कार्यकर्त्यांचा होता. वर्तमानपत्रांतून प्रखर टीकाही झाली होती. धंदेवाइकदृष्ट्या सल्ला देण्यांत गैरकायदा कांहीं नव्हतें. औचित्याच्या दृष्टीनें ही घटना न होती तर श्रेयस्कर झालें असतें. संस्थानिकांना प्रजेची मुस्कुटदाबी करण्याकरितां सल्ल्याची आवश्यकता कधींच नसतें. खुद्द सार्वभौम सत्ताच त्यांना सल्लामसलत देते. तथापि कॉंग्रेस पक्षनेते यांनीं हा सल्ला दिला ही गोष्ट मला पसंत पडली नाहीं. संयुक्त घटनेंत येण्यासाठीं किंमत म्हणून अनेक संस्थानिक कोठल्या तरी तहांचा आधार घेऊन, "अमुक गांवें परत द्या, अमूक बंदर परत द्या, अमुक छावण्या परत द्या" (Retrocession) याप्रमाणें सार्वभौम सत्तेकडे मागणीं करीत होते. या बाबतींत मी अनेक प्रश्न साधे व तांतडीचे विचारले होते, व रहिवाशांच्या संमतीशिवाय कोणताही प्रदेश संस्थानिकांना परत दिला जाणार नाहीं, असेंही आश्वासन जरी मिळालें नाहीं, तरी तेथील लोकमत सरकार अजमावील एवढें आश्वासन मिळविलें होतें. कॉंग्रेसनें संस्थानी प्रजेचा प्रश्न डावलला असा खोटा आक्रोश पुणेरी टीकाकार करीत, स्वत: कधीं चळवळ करण्याचें त्यांचें ध्येयच नाहीं, उलट महाराष्ट्रांत संस्थानिकांचे भाट म्हणून हेच टीकाकार वागतात. पूर्वजांचीं स्मारकें, गौरवस्थानें म्हणून यांना संबोधतात. ज्यांनीं स्वार्थाकरितां मध्यवर्ती मोंगल अगर मराठी राजसत्तेला बेइमान होऊन, इंग्रजी सत्तेला कवटाळिलें, तीं संस्थानें देशभक्तीचीं गौरवाचीं खास स्मारकें नाहींत!! पण उलटच मूल्यमापन करणें,हाच दृष्टिकोण, या टीकाकारांचा होता. हे सगळे 'नरेश' व 'अधिपति' महाराष्ट्रांतील विशिष्ट वर्गाचे सामाजिक जीवनांत आदर्श मानले जातात,व त्यांच्याशिवाय त्यांचे समारंभ,साहित्यापासून शारीरिक खेळापर्यंतचे, पारच पडत नाहीत. खालसा मुलखांत होणाऱ्या सत्कारांच्या जोरावर हेंच संस्थानिक आपल्या टीकाकारांना दाबीत असतात. त्यांच्या रियासतींतील अन्यायांना वाचा फुटणें कठीण जातें. पैसा, वशिला व त्यांहिपेक्षां संचितवाल्या वर्गजुटीनें हें सर्व होत असतें निवडणुकीच्या दौऱ्यांत या प्रश्नाला महत्त्व आलें होतें. बिळाशीच्या परिषदेत मी संस्थानी प्रजेच्या प्रश्नाकडे जरूर लक्ष पुरवीन असें सांगितलें होतें. असेंब्लींतील भाषणांत मीं त्यांची बाजू मांडली होती, व त्याच दृष्टीनें कॉंग्रेसचें धोरण अगदीं स्पष्ट व्हावें म्हणूनच मी ठराव मांडला होता. यामुळें कॉंग्रेस, असेंब्लींतील कॉंग्रेसपक्ष, यांची विचारसरणी काय आहे हें कळून, पूर्वग्रह दूर होतील अशी आशा होती. असेंब्लींत, संस्थानी-

बाबींच्या चर्चेला मज्जाव आहे; तथापि युक्तीमें प्रसंग घडवून आणून कांहीं चर्चा होऊं शकते. या स्थितींत कॉंग्रेसची एतद्विषयक नीति स्पष्ट होणें जरूर होतें. ठरावांत संस्थानी प्रजेनें लढा केला अगर चळवळ केली तर त्यांचा पाठपुरावा कॉंग्रेस करील, मार्गदर्शन करील एवढाच अर्थ होता. प्रत्यक्ष लढा लढणारे हे संस्थानीं प्रजाजनच पाहिजेत, हें स्पष्ट होतें. तथापि अनेकांचे मजबद्दल गैरसमज झाले. सरदार वल्लभभाई तर फारच गरम झाले व त्यांनीं आपली नाराजी मज-जवळ बोलून पण दाखविली! माझी दृष्टि कॉंग्रेस संघटनेनें, कॉंग्रेसपक्षानें आपल्या आघाडीवर कसें वागावें हें वेळोवेळीं ठरवून द्यावें अशी होती व याच दृष्टीनें हा ठराव मांडला होता, व याच दृष्टीनें घटनाबाबत वादविवाद संपल्यानंतर आमचें मुख्य कार्य संपलें, व पुढील मार्ग स्पष्ट करावा म्हणून सुचवून पाहिलें. पण त्या-बाबत कांहीं विचार झाला नाहीं. भुलाभाईना मी माझी विचारसरणी सांगितली पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं!

मतदार व निवडून आलेले सभासद यांच्यांत सहकार्य व जिव्हाळ्याचे संबंध असणें इष्ट असतें. लोकशाहींत प्रत्येक राजकीय पक्षामार्फत निवडणुकी होत असतात. निवडणुकीचा जाहीरनामा मतदारांना माहीत असतो, त्याप्रमाणें घडतें कीं नाहीं हें त्यांनीं पाहावें अशी अपेक्षा असते. पक्षाच्या प्रयत्नानें व प्रतिष्ठेनें निवडून आलेल्या सभासदाला मतदारांना वैयक्तिक वचनें देण्याचा अधिकार नाहीं हें उघड आहे. त्याचप्रमाणें जें झालें अगर जें केलें तें व्यक्तीनें हें म्हणणें पण रास्त ठरत नाहीं. पक्षांत व्यक्ति राहते व विलीन होते. प्रयत्नांची पेरणी व्यक्तीची, कार्यांचें पीक पक्षाचें असें हें गणित आहे. अमुक एका सभासदानें भाषणें केलीं, अमुक एक गप्प राहिला हा व्यक्तिगत दृष्टिकोण वरील परिस्थितींत अप्रस्तुत आहे. कार्याचा उठाव ही सामुदायिक क्रिया. जगन्नाथाचा रथ हजारों ओढतात, हजारांची शक्ति हें रथाच्या गतीचें खरें कारण. अमक्यानें ओढला हें म्हणणें जितकें खरें तितकेंच चुकीचें. चूक असेल तर तीही व्यक्तीची नाहीं, पक्षाचीच चूक. लोकशाहींतील विरोधी पक्ष एकमेकांच्या चुका दाखवीत दाखवीत एकमेकांचें अनुकरण करीत असतात. लोकमत खूष ठेवण्यासाठीं सर्व पक्षांची धड-पड असतें कारण त्याच्याच जोरावर अधिकारप्राप्ती होतें. अधिकारारूढ पक्षानें जें केलें तें वाईट अगर चांगलें असल्यास अधिक चांगलें करण्याकरितां विरोधी पक्षाची तळमळ असते. बाजारांत जर स्पर्धा असेल तर गिऱ्हाइकाला माल चांगला मिळतो

व स्वस्तही मिळतो. तीच स्थिति बहुपक्ष असणाऱ्या लोकशाहींत जनतेची असते. कायदेमंडळांतील स्पर्धा, त्याच कारणाकरितां बाहेर सार्वजनिक ठिकाणीं दिसून येते. मतदारसंघाची जोपासना करणें ( Nursing the Constituency ) ही अवश्य बाब समजली जाते. कायदेमंडळें चालू नसतील तेव्हां सभासद दौरे काढून प्रचार करतात. झालेलें कामकाज लोकांना सभांतून, चर्चेतून विदित करतात. स्वपक्षदोष अपरिहार्य, विरोधी परिस्थितींतसुद्धां केलेलें कार्य, 'त्या मानानें' विशेष, वगैरे चालीवर वक्तृत्व गाजविलें जातें. व्यक्तिगत मतें अगदीं सोज्ज्वल पण पक्षाच्या मर्यादा व राजकारणांतील तंत्र, यामुळें जादा कार्य शक्य नाहीं ही शेवटची भैरवी पण वक्ता लकेरण्यांत सहसा चुकत नाहीं.

कॉंग्रेस पक्षाचा दावा म्हणजे तो खराखुरा लोकांचा पक्ष हा होय. म्हणून पक्षानें अधिवेशनानंतर आमच्या सभासदांनीं आपापल्या मतदारसंघांत हिंडून प्रचार करावा, असा आदेश दिला होता. आमचे विरोधक म्हणजे सरकार हें अढळ, म्हणून त्याला प्रचाराची आवश्यकता नव्हती. आमचें जीवन म्हणजेच जनता. सरकारचें अंदाजपत्रक फेटाळलें, पण आमचें अंदाजपत्रक—आमच्या कार्याचें अंदाजपत्रक—जनतेपुढें मांडावयाचें होतें, व तें कार्य प्रचारानें करावयाचें होतें. जनतेनें तें फेटाळलें तर आम्हीं फेटाळले जाणार होतों, ही जाणीव होती. पक्षाच्या आदेशाप्रमाणें दरम्यानच्या काळांत मी ठिकठिकाणीं व्याख्यानें दिलीं, चर्चा केली, गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न केला. पूर्वी मतदार व उमेदवार यांचा संबंध फक्त निवडणुकीच्याच वेळीं येई. निवडणुकीच्या वेळीं मतदाराच्या दाराशीं हात जोडून 'दासमारुती' झालेला उमेदवार, निवडणुकींत यशस्वी होऊन 'मेंबर' झाला म्हणजे 'वीर मारुती' होई व साधारण मतदाराला दाराशीं उभें करण्याइतका वेळ त्याला नसे असा अनुभव अनेकांचा असे व आहे. निवडणुकीनंतर सभासद पद्धतशीर रीतीनें प्रचार करून मतदारांना झालेलें कार्य समजावून सांगे असें क्वचितच होई. आम्ही दोघांनीं जेधे व मी महाराष्ट्रांत हा पायंडा पाडला असें म्हणण्यांत आत्मगौरव असला तरी, त्यांत सत्य आहे हेंही लक्षांत घेतलें पाहिजे. पक्षाची तरफदारी, पक्षनिष्ठ राजकारणाची आवश्यकता, सामान्य राजकारण, या सर्वांचा उहापोह करणें जरूर पडे. प्रतिनिधि म्हणून मतदारसंघाच्या हितासंबंधीं आम्हीं आमच्या दृष्टीनें मत मांडण्यास मोकळे होतों. प्रतिनिधि हा मतदारांच्या म्हणण्याप्रमाणेंच मत देणारा नुसता मुखत्यार (Delegate) नाहीं हें खरें. पण पक्षनिष्ठ राजकारणानें तो पक्षाच्या निर्णयाप्रमाणें मत देण्यास

बांधला आहे. मतदारांनीं पक्ष निवडला, व्यक्ति नाहीं हें उघड आहे. म्हणून मतभेद पक्षापुढें मांडणें हेंच योग्य ही विचारसरणी मी मांडी. लोकांचा दृष्टिकोण पक्षापुढें मांडून नंतरच त्याचा निर्णय लागणें योग्य. तात्पर्य, पक्ष हा लोकमताचा प्रतिनिधि व विशिष्ट परिस्थितींत मुखत्यार, हा सिद्धांत लोकांना समजावून सांगणें जरूर होतें, व त्याप्रमाणें आम्हीं करीत होतों. मौलिक व मुख्य बाबतींत कोणाही प्रतिनिधीला, मग व्यक्ति असो अगर पक्ष असो, विचार करण्याला जागा नाहीं. त्या बाबतींत जनमत जें असेल तें आदेश व आज्ञा (Mandate) समजूनच मांडलें पाहिजे. घटना फेंटाळण्याचा आदेश जनतेनें आम्हांस दिला, त्याप्रमाणें, आम्हीं वर्तन केलें. १४५ सभासदांत १०६ निवडून आलेले व त्यांत फक्त ४४च कॉंग्रेसपक्षाचे असतांना ४० वर मतनोंदणीचे प्रसंग आले, व त्यांतून १।२प्रसंग खेरीजकरून आम्ही बहुमत केलें, यांतील यश अपूर्व होतें. अनेक पक्षांच्या व व्यक्तींच्या सहकार्यामुळें हें झालें. पण तें मिळविण्यांतील अडचणी सर्वांना थोड्याच ठाउक असणार. शिवाय त्या सार्वजनिक रीतीनें सांगणेंही बरोबर नव्हतें, तथापि लोकांची उत्सुकता तीव्र असे, प्रत्येक गोष्ट त्यांना जाणून घेण्याची इच्छा होती व ती आम्ही धोरणानें पुरवीतही असूं. अनेकांचीं पत्रें येत. अधिवेशन चालू असतां व नंतर त्यांना उत्तरें धाडणें भाग पडें. ६ वर्षांतील अनुभवानें प्रचारखर्च, टपालखातें खर्च, धंद्यांतील नुकसान, वगैरे गोष्टींचा विचार करतां, तुरुंगाभिमुख राजकारणापेक्षां हें मंडळाभिमुख राजकारण महाग पडलें, असें म्हणणें जरूर आहे ! ज्याला धडा घ्यावयाचा असेल त्यानें घ्यावा. मतदार व प्रतिनिधि यांच्यांतील संबंध वाढविणें जरूर असल्यामुळें होणारा खर्च अनाठायीं होता, अगर वेळ व्यर्थ गेला असें कोणीही म्हणणार नाहीं; उलट खेडोपाडीं, शहरांतून झालेल्या प्रचारानें नुसतें मतदारच नव्हे तर आमजनता अधिक जागृत झाली.

कॉंग्रेस कमिट्याही स्वस्थ नसत. महाराष्ट्रांत सत्याग्रह संपल्याबरोबर पुन्हा कॉंग्रेसकार्याला चालना मिळाली होती. महाराष्ट्र प्रां. कॉं. कमिटीची वार्षिक बैठक ठाणें येथें झाली व शेतकरी परिषदा सर्वत्र भरवाव्यात असें ठरलें. विशिष्ट परिस्थितीमुळें मला चिटणीस व्हावें लागलें. १९३५च्या मे, जून महिन्यांत अनेक परिषदा झाल्या. हाही प्रचार जोरानें चालू होता श्री. शंकरराव देव यांनीं १९३५ जूनमध्यें राष्ट्रपति राजेन्द्रबाबू यांचा दौरा महाराष्ट्रांत ठरविला व त्यांना रु. २५ हजारांची थैली नजर करण्याचें ठरविलें. तीही धामधूम चालूच होती. तात्पर्य, [illegible] मिळून तिचा

उपयोग करण्याचा बेत याप्रमाणें निकालीं लागला; व जुलै अखेर पुन्हा अधिवेशन सिमल्यांत ऑगस्टअखेर सुरू होणार म्हणून जाहीर झालें. आज्ञापत्र आलें. पुन्हा नेहमीचीं सर्क्युलर्स येऊं लागलीं. जाण्याच्या तयारीचा उद्योग सुरू झाला. लहानपणीं सन्मित्रसमाज मेळ्यांतील पदांत पुढील चरण ऐकले होते त्यांची आठवण झाली.

सिमल्यांत गार परसांत । मग अशी उसळली बात ॥
जरी अधिक एक वीसांत । मग बसाल पोलिसांत ॥

१९०८ मध्यें सभाबंदीचा कायदा, प्रेस ॲक्ट वगैरे दडपशाहीचे कायदे झाले. त्याला अनुलक्षून हे चरण होते. आणि आतां होणाऱ्या अधिवेशनांत त्याच धर्तीवरील दडपशाहीचें बिल ( Criminal Law Amendment Bill ) येणार होतें, म्हणून जाहीर झालें होतें. यामुळें साहजिक उत्सुकता वाढली. त्यावेळच्या प्रतिनिधींनीं पुरेसा विरोध केला नाहीं, सरकारनें त्यांना बनविलें; आतां आपण, महाधूर्त, शिस्तप्रवीण, सरकाराला नमवूं अशा अभिनिवेशानें मन भरून गेलें !! नेत्याच्या सांगण्याप्रमाणें सर्व सभासदांना वेळेवर हजर राहण्याविषयीं सूचना धाडल्या.

'कालका' स्टेशनवर आमची गाडी पहाटें ५ वाजतां पोहोंचली, पण त्याच्या आधीं २ तासांपासून थांबणाऱ्या प्रत्येक स्टेशनवर पोलीस 'चोरोंसे बचावें' म्हणून मोठ्यानें ओरडत. हा अनुभव नवीन होता. आपण कायदा व शांतता, वित्त व अब्रू सांभाळणाऱ्या सरकाराच्या वसंतऋतूंतील राजधानीस जातों आहोंत, कां कुठल्या फुग्याच्या वाडीस जात आहोंत असा प्रश्न मनांत आला ! पण राजधानीजवळ असें असावयाचेंच, कारण पुण्याजवळ 'फुग्याची वाडी' आहे हें लागलीच ध्यानांत आलें ! ! कालकापर्यंत प्रवासांत भयंकर उष्मा होता, पण उजाडतांच जेव्हां आमची मोटार हिमालयाच्या रांगा चढूं लागली, त्याबरोबर थंडी वाढली व शेवटीं बिस्तारे सोडून ब्लँकेटें काढावीं लागलीं. कालका ते सिमला १८ मैलांचें अंतर सरळ रेषेनें आहे. पण या राजकारणी नगरांत जातांना वळणें घेत, चढउतार करीत, ५८ मैलांचा प्रवास मोटारीला करावा लागला. राजकारण कसें असतें याचें हें प्रात्यक्षिकच आहे ! नगरीच्या प्रवेशद्वारीं ( Barrier ) प्रत्येक इसमाची चौकशी झाली. पांढऱ्या टोप्यावाले म्हणून आमची विशेष, रागावण्यांत अर्थ नव्हता, उशिरा जेवण, एवढाच फायदा झाला असता. नांवगांव, कोठें उतरावयाचें, वगैरे सांगितल्यानंतर धंदा काय म्हणून विचारलें. तेव्हां कायदा सांगणें, कायदा करणें व कायदा मोडणें, ( Lawyer, Law maker, Law breaker )

हें ऐकल्यानंतर मात्र पोलीस अधिकाऱ्यांचा स्वर बदलला. त्यानें लागलीच गाडी जाऊं दिली !! विशिष्ट मर्यादेपुढें वाहनांना बंदी आहे. सिमल्यांतील रस्ते १।२ सोडून अगदीं लहान म्हणून वाहनांना बंदी. फक्त 'दोन लाट' म्हणजे व्हाइसरॉय व सेनापति यांच्या मोटारी जातात. पूर्वी सिमल्याची मालकी पतियाळच्या महाराजांकडे होती म्हणून त्यांची गाडी जाते. माणसांकडून ओढला जाणारा 'रिक्शा' एवढें वाहतुकीचें साधन तेथें आहे. घोडे क्वचित्, खेचरें मात्र पुष्कळ, परंतु माल वाहण्याकडे त्यांचा उपयोग होत असतो; व त्यांच्या रांगाच्या रांगा दूर दूर गांवाहून येत असतात व जात असतात. समुद्रसपाटीपासून ९००० फूट उंचीवर सिमला आहे. सर्व शहर डोंगरावर व टेकाडांवर आहे. सर्वत्र चढउतार. एका आळीच्यावर दुसरी आळी, एका दरींत कांहीं वस्ती, कांहीं दुसऱ्या दरींत, यामुळें सिमल्याची लांबीच पुष्कळ, सहज ४ मैल भरेल. मोटार स्टँडहून आमचें निवासस्थान २ मैल होतें. मजुरांनीं पाठीवर सामान एवढें लादलें कीं, त्यांच्या शक्तीबद्दल शंकाच उत्पन्न झाली, पण ते भराभर टेकड्या चढत व उतरत, त्यांच्या मागें जातां जातां आमचीच धांदल झाली. तीनदां पर्वती चढल्याचा शीण घेऊन आमच्या 'लॉंग वुड रेंज' मधील निवासस्थानीं आम्ही पोंहोचलों. ५ मिनिटांत न्हावी, धोबी, बानिया हजर. सिमल्यांत थकलेंसें वाटत नाहीं, व एक कप, जो उन्मादकारी नाहीं पण उत्साहकारक आहे, असा चहा घेतल्यानंतर आणखी हिंडावेसेंच वाटतें. एकीकडे दऱ्या, दुसरीकडे उंच उंच डोंगर, सर्वत्र देवदार, अन्य उंच व डौलदार झाडें, मधून मधून कड्यांतून झिरपणारें पाणी, रानटी गुलाब, व अन्य शोभिवंत पण बिनवासाचीं फुलें, किंचित् दूर पण नजरेला स्पष्ट दिसणारीं बर्फाच्छादित पर्वतांचीं शिखरें,-ज्यांचें अगदीं रास्त वर्णन श्री. न. चिं. केळकर यांनीं खिचडीवरील खोबऱ्याप्रमाणें केलें आहे-उभे असलेल्या अगर बसलेल्या जागेच्या वर ढग, खालीं दरींत ढग, मांजरीचीं पिलें जशीं इतस्तत: खेळतात त्याप्रमाणें इकडून तिकडे वावरणारे धुक्यांचे पुंज, हें दृश्य तासंतास पाहिलें तरी प्रेक्षकांची तृप्ति होत नाहीं. या रम्य वातावरणांत किचकट वैय्याकरणी, वचनात् प्रवृत्ति, वचनात् निवृत्ति घोकणारा मीमांसकसुद्धां सौंदर्य समीक्षक होऊन काव्यमय होईल; मग साहित्तिकांची व सहृदय प्रेक्षकांची लेखणी व वाणी रसवंती झाली तर नवल काय!

सिमल्यांतील असेंब्ली सभागृह १९२० सालीं बांधलें आहे. सभागृहांत जातांना एका टेंकडीवरून जावें लागतें, खालील कचेऱ्यांतून जातांना दुसऱ्या

टेंकडीवरून जावें लागतें. खालच्या कचेऱ्यांतून वरच्या सभागृहांत जावयाचें म्हणजे उंच जिना चढावा लागतो. येथील सभागृहाला आकार नाहीं. लॉबींतील खिडक्यांतून बाहेर सर्वत्र दऱ्या व डोंगर दिसतात. पक्ष कचेऱ्या, उपाहार-गृह हे सर्व आहेत. पण जागा अगदीं लहान, ग्रंथालयही लहान; बरींच पुस्तकें दिल्ली-सिमला वाऱ्या करीत असतात. प्रेक्षकांच्या गॅलऱ्या लहान, परंतु प्रेक्षकांची गर्दीही कमी. दिल्लींत भगतसिंग बॉंब प्रकरणापासून प्रेक्षकाला प्रवेश तिकिट पाहिजे असल्यास सभासदामार्फत २ दिवस आधी कळवावें लागतें. अर्जांत प्रेक्षकाचें नांव, धंदा, येथील व प्रांतांतील राहण्याचें ठिकाण, शिवाय सभासदाला दोनच पास दर दिवशीं मिळतात. नातेवाईक असेल तर एक दिवसाच्या नोटिशीनें पास मिळतो पण त्याची जबाबदारी सभासदानें लेखी घ्यावी लागते. प्रेक्षकाला पास दाखवावा लागतो. छत्र्या, बुकें, कोणतीही वस्तु जी फेकतां येण्यासारखी आहे ती सर्व बाहेर सार्जंटजवळ ठेवावी लागते. टाळ्या वाजवितां येत नाहींत, बोलावयाचें नाहीं, शिवाय प्रेक्षकांच्यावर नजर ठेवण्याकरितां गुप्त पोलीस. सभागृह, काम सुरू होण्यापूर्वी १ तास व नंतर १ तास फक्त असेंब्ली खात्याच्या ताब्यांत, अन्य वेळीं पोलीस पहारा. ताब्यांत घेतांना वॉच ॲंड वॉर्डचे लोक म्हणजे सभागृह खात्यानें व्यवस्थेसाठीं नेमलेले लोक, प्रत्येक डेस्काखालीं जाऊन टॉर्च लावून पाहतात, न जाणों एकादा 'रसगुल्ला' तेथें ठेवलेला असावयाचा व काम रंगांत आलें कीं सभागृहाचा-रसभंग-भंगच करावयाचा! दिल्लींत पाहुणे व प्रेक्षकांच्या पासांची मागणी फार मोठ्या प्रमाणावर असे तर येथें नाममात्र हाही कांहीं कमी फायदा नव्हता! रिवाजाप्रमाणें कचेरीची जागा ताब्यांत घेतली, कोणीं कोठें बसावयाचें हें सभागृह खात्याला कळविलें. पक्षाची बैठक होऊन तहकुबीच्या सूचना निश्चित झाल्या.

बैठक सुरू होण्यापूर्वीं सात दिवस अगोदर कॅन्टोनमेंट दुरुस्ती बिलाच्या निवडक कमिटीची बैठक होती. निवडक कमिटी दिल्ली अधिवेशनांत नेमली होती. त्यांत कॉंग्रेस पक्षाचे ५ सभासद असून त्यांपैकीं मी एक होतों. प्रत्येक निवडक कमिटींत पक्षांतील सभासदांपैकीं एक प्रमुख म्हणून असे, व त्याच्या तंत्रानें सर्व चालावयाचें. तेथेंही मतें देण्याची वेळ आली तर पक्ष म्हणून शिस्तींत देण्यांत येत. नेता, उपनेता, चिटणीस, प्रतोद, याप्रमाणें कोणीतरी एक कमिटींत असावयाचाच, व त्याच्या तंत्रानें चालावयाचें अशी पक्ष शिस्त होती. कॅन्टोनमेंटमधील कारभाराबाबत दरम्यान मी माहिती करून घेतली होती.

डॉ. उपाध्याय, मगनभाई पटेल, लाहोरचे केदारनाथ यांनीं मला अनेक प्रश्नांवर माहिती पुरवली होती. कॅन्टोनमेंट रहिवाशांची एक अखिल भारतीय सभा होती, याही सभेनें आपला चिटणीस सिमल्यास धाडला होता. हिंदुस्थानांत एकंदर त्या वेळेस ९२ छावण्या होत्या, त्यांतील लोकसंख्या १०लाखांवर होती. निम्म्यावर छावण्यांत एकतंत्री कारभार; सर्वत्र लष्करी अंमलदाराचें हडेलहप्पी धोरण प्रभावी असे. बिलाचा उद्देश तेथील स्थानिक स्वराज्यांत लोकांना अधिक हक्क द्यावेत हा होता. पण कलमांचा परिणाम विरुद्ध व विपरीत होणारा होता. मी, आतांपर्यंत झालेल्या सदर कायदा व त्यांतील दुरुस्त्या, त्याचप्रमाणें प्रचलित बिलाचीं कलमें, या सर्वांची पद्धतशीर छाननी करून बिलाचा राजकीय परिणाम पण हेरून ठेविला होता. कार्लटन कॅसलमध्यें ( सेक्रेटरीएट ) कमिटीची बैठक सुरू झाली. सर नृपेंद्र अध्यक्ष होतें. मि. टाटनहॅम हे संरक्षण खात्याचे चिटणीस असून त्यांनीं बिल मांडलें होतें. बैठक सुरू होतांच मुख्य प्रश्न कॅन्टोनमेंटांतील स्थानिक कारभाराबाबत, कांहीं देखरेख आतांपर्यंत प्रांतिक सरकारें करीत होतीं तो हक्क बिलानें काढून घेतला होता. संरक्षण हा मध्यवर्ती सरकाराचा प्रश्न म्हणून हें होणें योग्य असा खुलासा करण्यांत आला. आमचें म्हणणें, भावी प्रांतिक सरकारें लोकमताला जबाबदार, त्यांच्या हातीं शक्य तितका कमी कारभार देण्याचें जें धोरण आहे त्यांतील हा एक भाग आहे. मि.टॅाटनहॅम हा वागणुकीला सरळ असे, भाषा पण नागमोडी नसे. आमची विचारसरणी योग्य आहे हें त्याला नाकबूल करतां येईना. शिवाय त्या दिवशीं, सरकारी बाजूचे दोन सभासद आले नव्हते. मतें घेतलीं असतीं तर आमचें म्हणणें पास झालें असतें. बिलांतील कलमांना ७० वर दुरुस्त्या होत्या. मुख्य बाबी कोणत्या, यावर मग चर्चा सुरू झाली. शेवटीं असें ठरलें कीं, सर नृपेंद्र यांच्या घरीं मी व मि.टॅाटनहॅम यांनीं जमून कांहीं 'समझोता' करून पहावा; बैठक तहकूब झाली. दुसऱ्या दिवशीं आमची खासगी (Informal) बैठक झाली. मुख्यमुख्य बाबी पुढीलप्रमाणें ठरल्या. सर्वत्र कमिट्या असाव्यात, निम्मे लोकनियुक्त, त्यांचें बहुमत असावें असा फार प्रयत्न मी केला, पण जमेना. म्हणून दुसरी सूचना मी मांडली. छावणींतील बाजारभाग व त्यातील सर्व स्थानिक कारभार, जेवढे लोकनियुक्त सभासद असतील त्यांनीं पहावा, व त्यांचे निर्णय आमकमिटीनें मान्य करावेत. त्या बाजारकमिटीचा अध्यक्ष त्याच्यांतीलच असावा. प्रांतिक सरकारांच्या अधिकारांत बदल होऊं नये. कमिटी

अगर बोर्डाचा अंमलबजावणी करणारा अधिकारी लष्करी नसावा. त्यांच्या नेमणुका, परीक्षा पण मिश्र करून व्हाव्यात. भाडें नियंत्रण व जागा घेणें याबद्दल कांहीं धोरण मिश्रित असावें. याप्रमाणें ठरलें, व दुसऱ्या दिवशीं त्याला अनुसरून सबंध बिल दुरुस्त केलें व यामुळें बिलाचें स्वरूप बदललें; म्हणून पुन्हा प्रसिद्धीसाठीं धाडावें असा शेरा मारण्याचें ठरलें. रिपोर्टाला भिन्न-मतपत्रिका लिहिण्याचें कारण नव्हतें. परंतु कांहींचें म्हणणें तडजोड मान्य, पण पत्रिका जोडावी. डॉ. खान यांनीं इंग्रजाबाबत आपला अनुभव सांगितला. इंग्रज हुषार नाहीं, पण चाणाक्ष आहे, इतर लोक काय म्हणतात हें पाहतो व त्यांतून हळु-हळू घेत असतो. विरोधक जें म्हणतील तें नक्की करावयाचें नाहीं हा त्याचा मौलिक सिद्धांत आहे. स्वतः कांहीं सांगावयाचा नाहीं, बोलणारास खूप बोलूं देईल, उत्ते-जन देईल. त्यांच्या मनाचे कानेकोपरे त्यांच्या बडबडींत स्पष्ट झाले म्हणजे त्यांचे आभार मानील, तुमची विचारसरणी विचाराई आहे, असें सांगेल; पण त्याच-वेळीं मनाशीं नक्की विरुद्ध निर्णय त्यानें घेतलेला असेल. म्हणून डॉ. खान यांचें मत भिन्नमतपत्रिका लिहूं नये; वेळ येईल तेव्हां जें करणें असेल तें करतां येईल. माझें मत निराळ्या कारणांकरिता तसेंच होतें. तडजोडीनें बरेंच मिळालें होतें. सर सेनापती तडजोडीवर नाखूष होते. शिवाय आणखी मिळविण्याच्या दृष्टीनें तड-जोडीला भिन्नपत्रिका न जोडणें इष्ट होतें, पण त्याहीपेक्षां कॅन्टोनमेंटचें लोकप्रति-निधि खूष होते व त्यांची इच्छा कोठल्याही कृत्यानें जें मिळणार होतें तें हातचें जाऊं नये. लष्कर खात्याचा विरोध त्यांना चांगला परिचित होता. पक्षापुढे मी रिपोर्ट दिला. पक्षानें 'पुन्हां बिल प्रसिद्ध व्हावें' या सूचनेला पाठिंबा देण्याचा निर्णय घेतला.

सिमला येथें हिंदुस्थान सरकारचा मुक्काम एप्रिल अखेरपासून ऑक्टोबर मध्या-पर्यंत साधारणपणें असतो. महत्त्वाचीं व मुख्य कामें, कायदेमंडळांतीलही, सामा-न्यतः दिल्ली अधिवेशनांत उरकून घेण्याचा प्रघात आहे. सिमल्यांतील अधिवेशन सरासरी एक महिनाभर असतें. उलट दिल्लींतील अधिवेशन २॥–३ महिने चालतें. विश्रांतीसाठीं, हवेसाठीं आलेलें सरकार, तापदायक व त्रासकारक कामें, लांबण लागणारें काम काढीत नाहीं. सिमल्यांतील वातावरण 'लक्ष्मीधरी' वृत्तीला साजेलसें असतें. घडी, अर्धा घडी काम करणें, व बाकीचा वेळ शिकार, खेळ, गिर्यारोहण, सामाजिक भानगडी करण्यांत खर्च करणें हें प्रतिष्ठित समजलें जातें;

निदान अशी परंपरा होती. तथापि याही वातावरणांत कॉंग्रेसपक्ष निवडून आल्यानें बदल झाला. पूर्वीचे सभासद एखादा दुसरा प्रश्न विचारीत. उपप्रश्न त्याहून विरळा. अनेकवेळां ५ वाजण्यापूर्वीच दिवसाचें कार्यक्रमपत्रिकेवरील काम संपून जाई. कित्येक सूर्यवंशी सभासद काम संपल्यानंतर उपस्थित होत असेही दाखले आहेत!! पण आतां हें सर्व बदललें होतें. शेकडोंनीं प्रश्न प्रत्येक अधिवेशनांत विचारले जाऊं लागले. सभासदांची माहिती मिळविण्याची तृष्णा न भागणारी अशीच दिसूं लागली. प्रश्न म्हणजे त्याचें उत्तर देण्याकरितां अनेक पत्रव्यवहार सरकारला करावे लागतात. 'हुबळी स्टेशनावर अमुक दिवशीं मेल २० मिनिटें लेट झाली व त्यामुळें उतारूंचे हाल झाले ही गोष्ट खरी आहे काय?' असल्या प्रश्नापासून 'संयुक्त घटना केव्हां अमलांत येणार' या प्रश्नापर्यंत विचारणाऱ्यांच्या बुद्धीचा व्याप होता! तेच तेच प्रश्न व उपप्रश्नही अनेक वेळां विचारले जात. उत्तरेंही ठराविक साच्याचीं होत गेलीं, पण या सर्वांमुळें वेळ, पैसा व श्रम खर्ची पडत हेंही तितकेंच खरें. प्रत्येक प्रश्नाचें उत्तर तयार करण्याकरितां रु. ७५ खर्च येतात ही माहिती पण, प्रश्नाला उत्तर म्हणूनच देण्यांत आली!! अनेक ठरावांची नोटीस व ते बॅलट झाले म्हणजे त्याबाबत सरकारी तयारी करावयाची, म्हणजेच अनेक खात्यांचें काम वाढलें. सिमला विश्रांतीसाठीं न ठरतां सर्व खात्यांकडे काम वाढलें, चहापाट्यींत वेळेवर हजर राहणें कठीण झालें. बाकीच्या गोष्टी तर त्याहून दूरच राहिल्या. पूर्वी निवडक कमिटया म्हणजे थोडा वेळ भरत; चर्चाही बेताबातानें व चहा पीत पीत होई. आतां हें सर्व बदललें. सरकारचे विरोधक कणखर, चहापाटर्यांतून रस न घेणारे, जय्यत तयारीनें आलेले, यामुळें सरकारी अधिकाऱ्यांना डोळयाला ताण पडेल असें काम करावें लागे. अधिवेशनें म्हणजे रणप्रसंग, गोडीगोडीनें काम करून घेण्याचे प्रसंग नव्हेत, हें उघड झालें. चिडाचिडी, डावपेंच, धिक्कार, निराशा, क्षणिक आनंद, विफलता, या सर्व छटा वातावरणांत उसळत, व अधिवेशन अंगीं लागण्याऐवजीं अंगाला चाटून जाई असा अनुभव येऊं लागला!!

दिल्लीमधील पहिल्या अधिवेशनांत आलेला अनुभव दोन्ही पक्षांनीं जमेस धरून आपले बेत पक्के केले होते. पहिल्या दिवशीं हस्तांदोलनें, हास्यविनिमय, कुशल समाचार वगैरे शिष्टाचार सभा सुरू होण्यापूर्वी झाले. पहिल्या दिवशींच क्वेटा येथें झालेल्या धरणीकंपाबाबत तहकुबीची सूचना कॉंग्रेसपक्षानें मांडण्याची नोटीस दिली होती, व त्यावर रण माजणार हें उघड होतें. १९३५च्या मे महि-

त्यांत क्वेटयाला फार मोठा भूकंप झाला. हजारों माणसें मेलीं, लाखों रुपयांचें नुकसान झालें. अनेक स्वयंसेवक संस्था, खाजगी संस्था, व कॉंग्रेस संस्थांनीं तेथें जाऊन आपद्ग्रस्तांना मदत करण्याची व त्यांची सेवा करण्याची परवानगी सरकारजवळ मागितली होती. सरकारनें ती नाकारली होती. सरकारचें तेथील वर्तन अयोग्य, माणुसकीला न शोभणारें व निषेधार्ह होतें हें दाखविण्याकरितां व त्या ठिकाणीं सरकारचें वर्तन कसें झालें हें लोकांच्या नजरेस आणण्याकरितां, ही तहकुबीची सूचना दिली होती. सरकारनें जें केलें तें बरोबर होतें, हें दाखविण्याचें सरकारनें ठरवून, आपले सर्व सभासद हजर ठेवून, अधिक मतासाठीं प्रचंड प्रयत्न चालविले होते. आमच्याबरोबर नेहमीं मत देणारे, बिनपक्षीय निवडून आलेले सभासद पहिल्या दिवशीं बरेच गैरहजर होते. आमच्यापैकीं मि. बाकी याचें सभासदत्व रद्द झालें होते. मुनशी ईश्वरशरण, यांचेंही सभासदत्व तक्रार अर्जाच्या निकालानें रद्द झालें होतें. शेरवाणी पैगंबरवासी झालें होतें. दीपनारायणबाबू विलायतेंत आजारी म्हणून गेले होते व तेथेंच त्यांचा अंत झाला होता. स्वतंत्रपक्षाचे पुढारी कायदे अझम जिना हे विलायतेंत होते. त्यांच्या गैरहजेरींत त्यांच्या पक्षांतील मतांवर सरकारी प्रतोदानें मोठाच ' धाडा ' घातला होता. पदवी विभूषित व वोटचेपे सभासद त्यानें धरले होते. तहकुबीची सूचना अध्यक्षांनीं मान्य केली, सामान्यपणें उपहारानंतर दुपारची बैठक अडीचला सुरू होतें, त्या वेळेस गव्हर्नर जनरलचा मनाई हुकूम येतो, या वेळीं तो आला नाहीं, तेव्हांच आम्हाला वाटलें कीं, आज सरकारचें बहुमत होणार ! प्रतोदांची धांवपळ सुरू झाली. बरोबर ४ वाजतां तहकुबीची सूचना मांडली, सुरवातीपासूनच वातावरण गरम झालें. गृहमंत्री सर हेन्री क्रेक अगदीं संतापून बोलले. बिहारमध्यें झालेल्या धरणीकंपाचा फायदा, कॉंग्रेसनें आपल्या राजकारणाकरितां, निवडणुकीकरितां व सरकारला नालायक ठरविण्याकरितां घेतला असा आरोप करून तीच गोष्ट कॉंग्रेसला पुन्हा न करूं देण्याकरितां सरकारनें जें धोरण स्वीकारिलें तें योग्य होतें ! ! सरकारनें लोकांत विश्वास उत्पन्न केला असून सर्व कांहीं व्यवस्थित केलें आहे. चळवळ्या लोकांना आपल्या दुष्ट गोष्टी करण्याला वाव मिळाला नाहीं म्हणून ही सर्व ओरड आहे असें ठासून सांगितलें. बोलतांना त्यांना अनेकांनीं प्रश्न विचारून बेजार केलें. शेम शेम ओरडून संतापविलें, रागानें ते बेभान झालेले दिसत होते. भुलाभाई, पंत, वगैरेंनीं व्यवस्थित उत्तरें दिलीं. लोकांचा विश्वास संपादन करण्याला

सरकारला धरणीकंपाची मदत घ्यावी लागली !! पृथ्वी हादरली व राजसत्ता स्थानांवर बळकट झाली, हा कार्यकारण भाव ऐकून अनेक सभासद चकित झाले. आपत्तींत मदत करण्याबाबतसुद्धां पक्षदृष्टि हें किसळवाणें चित्र, प्रतिष्ठित-पणें दाखविलेलें पाहून, अनेक सरकारी सभासदांनासुद्धां लाज वाटली असावी. प्रेताची उत्तरक्रिया कोणी करावी म्हणून तंटे होतात, कारण करणारा वारस ठरतो अशी समजूत आहे !! लोकप्रेमाचा वारसा अशा रीतीनें मिळविण्याची ही दृष्टि सर्व दृष्टींनीं न शोभण्यासारखी होती; व या रीतीनें सरकारला लोकविश्वास पण मिळाला नाहीं; बुद्धीमत्तेबद्दल लौकिकही वाढला नाहीं; दोन मतें अधिक मिळून सरकारनें ही तहकुबीची सूचना नापास केली. सरकारला मिळालेलें बहुमत सरकारची बाजू न्याय्य आहे असें वाटणाऱ्यांचें होतें, असें म्हणणें म्हणजे सत्ता व संपत्ती-संपन्न परकी सरकारचें राजकारण न समजण्यासारखें होतें. मतनोंदणीच्या वेळचें दृश्य करुणास्पद होतें. पंजाब सरकारचेंही ठाणें या वेळेस सिमल्यासच असतें. त्यांचे अनेक अधिकारी प्रेक्षकांत हजर होते. अनेक निवडून आलेल्या पंजाबी सभासदांनीं विरुद्ध मतें दिलीं. सरकारी प्रतोद, अनेक सभासदांना गृहमंत्र्याकडे अगर अन्य सरकारी अधिकाऱ्याकडे नेई, व क्षणांत सदरहू सभासद सरकारी लॉबींत जाई व आम्ही प्रतोद संतापित संयमानें अगर संयमित संतापानें पहात बसूं. क्षणापूर्वी आम्हांजवळ मत आमचें बाजूनें देतों असें सांगणारा गृहस्थ, क्षणांत बदलतो हें दृश्य उद्वेगजनक होतें ! दगडाला दिलेला आकार राहातो, लाकूड, लोखंड अगर अन्य धातु यांना दिलेले आकार राहातात, पण निसर्गाची ही उत्कृष्ट चीज मनुष्य, व त्याच्यांतील ही निवडक मोतीं कोणीकडे घरंगळतील व कोणाच्या गळ्यांत पडतील याचा भरंवसा नाहीं !! मतनोंदणीचा निकाल जाहीर केल्या-नंतर गृहमंत्री यांचा हर्ष मर्यादेबाहेर गेला. वांकुल्या दाखविण्यास पण कित्येक इंग्रज सभासदांनीं कमी केलें नाहीं !

मनाला लागेल असा हा आमचा पराभव होता. आतांपर्यंत अनेक विजय आम्ही मिळविले होते, त्यानें कांहीं सरकार नमलें नव्हतें अगर सरकारी धोरणांत फरकही झाला नव्हता. तथापि हें खरें असलें तरी, आमची बाजू न्याय्य व केवळ सभासद कांहीं गैरहजर, यामुळें झालेला पराभव अनेकांच्या ‍ ‍ाला फार लागला. या राजकारणावर विश्वास नाहीं, निव्वळ पोरखेळ, हीं मायामंदिरें आहेत, हें सर्व जरी खरें मानलें तरी या मायेच्या जगांत सुद्धां, आम्हीं पराभूत

होणें आम्हाला पसंत नव्हतें. छुटपुटीच्या लढाईतसुद्धां होणारा पराभव मनाला लागतो, व होणारा जय हर्षवितो; मग आम्ही तर मोठे, प्रतिष्ठित, जनतेचे प्रतिनिधि आम्हांला पराभव बोचणें अपरिहार्य होतें. भुलामाई तर खिन्न होऊन बाहेर पडले. पक्ष कचेरींत आमची कार्यकारी मंडळीची सभा होती. बहुतेक जण खिन्न होते. सत्यमूर्तींनीं दुसऱ्या दिवशींच्या कामाबद्दल चर्चा करावी असें सुचविलें. गत घटनांचा विचार करण्याची जरुरी नाहीं, त्यांत वाईट वाटण्याचें कारण नाहीं; वकिलाला कज्जा हरला म्हणून दुःख होण्याचें कारण नाहीं अशी विचारसरणी मांडली. पण आम्ही जनतेचें नुसतेच वकील नव्हतों. तिचे व आमचे हितसंबंध एक; एका हाडामांसाचे म्हणून धंदेवाईकासारखी संकुचित दृष्टि नव्हती, हेंच आमच्या पक्षाचें विशेष होतें. तथापि उद्याचें कर्तव्य करणें जरूर होतें. आलेला अनुभव टाकाऊ नव्हता. गतकालाकडे पाहून नवीन कृति होत नाहीं. करावयाचें तें विद्यमान व भविष्यकाळांतच असतें. गतकालाचा सल्ला घ्यावा एवढाच त्याचा उपयोग समजून ' चलो उठो, आगे बढो', हा कार्य प्रवीण करणारा संदेश नेहमीं फलदायी असतो. एक दोन दिवसांत दडपशाहीचें बिल सरकार मांडणार हें उघड होतें. आमच्या गैरहजर सभासदांना तारा करण्याचें ठरलें. बिलाला तोंड देण्याची जय्यत तयारी करण्याचे मनसुबे आम्ही केले, कांहीं निर्णय घेतले. हें बिल फारच महत्वाचें म्हणून मदतीसाठीं राजाजींनीं यावें म्हणून भुलाभाईंनीं त्यांना पत्र लिहिलें. त्यांनीं उत्तर धाडलें व तें वर्तमानपत्रांत प्रसिद्धही झालें. त्यांत श्री. गाडगीळ, डॉ. राजन, हे तेथें आहेतच, व मतें मिळविण्याच्या कामीं माझ्या इतकाच त्यांचा उपयोग होईल, तुमच्या पक्षाचे प्रतोद तुम्हांस यशस्वी करतील. राजाजींच्या स्तुतीचा अर्थ म्हणजे अधिक दक्षतेनें व अधिक जबाबदारीनें काम करावयास पाहिजे असाच मी घेतला.

दिल्लीपेक्षां सिमला येथें सभासद जास्त प्रमाणांत जमावा जमावानें राहतात. दिल्ली येथे अन्य व्यवसाय पुष्कळ म्हणून सभासद कामाव्यतिरिक्त विशेष प्रमाणांत एकत्र येत नाहीत. उलट सिमला येथील जनता म्हणजे सरकारी नोकर व त्यांचे नोकर व राहिलेले व्यापारी. अशी स्थिति असल्यामुळें, ज्या प्रकारचें राजकारण दिल्ली येथें चालतें तसें येथें नाहीं. कॉलेजें नाहींत, मोठाल्या सार्वजनिक सभा नाहींत, जलसे नाहींत; यामुळें सभासदांना कामानंतर कंटाळवाणें वाटतें. जगापासून सिमला दूरवर असल्याप्रमाणें वाटतें. सारखें डोंगर व दऱ्या पाहून मनुष्य

थोडा कंटाळतो. मंडळींचा जम चांगला असला तर काव्यशास्त्र विनोदानें कंटाळा नाहींसा होऊन उत्साह वाढतो हें उघड आहे. आमचें निवासस्थान म्हणजे कॉलेजचें वसतिगृह अगर तुरुंगांतील स्वतंत्र वॉर्ड याप्रमाणें होतें. मोठा व्हरांडा व १० मोठाल्या खोल्यांची रांग, पुढें दरी, मागें डोंगर अशी रचना होती. या ठिकाणीं आम्ही पांच-सहा हिंदू व पांच-सात मुसलमान असें असून आमच्याच निवासस्थानांत सभागृहांचें 'मार्शल' कॅ. नूरमहमद रहात. त्यांची ती जागा खात्यानें कायम ठेवलेली असे. आमच्यांतील मंडळींची लवकरच एकजूट झाली. मुसलमान सभासदांत नागपूरचे नबाब सिद्दिक अलीखान होते, मलबारी शेट अबदुल सतार वगैरे मंडळी होती. हिंदूंत मी, जेधे, कृष्णकांत मालवीय, रंगा, आयंगार, होसमनी वगैरे मंडळी होतीं. एके ठिकाणीं राहत असल्यामुळें परिचय वाढला. दर रविवारीं सकाळीं आम्हीं एकत्र न्याहारी करीत असूं व कोणीतरी दुसरीकडे राहणारा सभासद पाहुणा म्हणून आम्ही बोलावीत असूं. आमच्या वसतिस्थानांतील जूट पाहून एका इंग्रज अधिकाऱ्यानें 'Gangsters' म्हणून संज्ञा दिली. तीच आम्हीं मान्य करून आमच्या या क्लबाचें नांव 'टोळीबाज' ("The Gangsters") म्हणून ठेविलें. न्याहारीच्या वेळचे फोटोही कांहीं वर्तमानपत्रांनीं प्रसिद्ध करून खालीं "The Gangsters" म्हणून वर्णनही दिलें !! तथापि या एकत्र राहण्याचा व एकजुटीचा परिणाम, सभागृहांतही मतदानाच्यावेळीं दिसूं लागला. आमच्यांत चर्चा होई व त्यामुळें मुसलमान सभासदांचे दृष्टिकोण आम्हाला परिचयानें चांगलें समजूं लागले. सहवासानें व अनुभवानें परंपरागत कल्पना, व पूर्वग्रह दूर होऊं लागले. हळुहळू कॉंग्रेसबद्दल त्यांचें मत नीट होऊं लागलें. क्रिमिनल लॉ अमेंडमेंट बिलाच्या मतदानाच्या दिवशीं आमच्या निवासस्थानांतील एकूण एक मुसलमान सभासदांनीं आमच्या बाजूनें मतें दिलीं! याचें श्रेय कित्येकांनीं मजवर लादलें. पण वस्तुस्थितीनें पाहतां माझा त्याच्यांत कांहीं हिस्सा होता हें खरें असलें तरी सर्व श्रेय या आमच्या क्लबाला होतें. क्लबाची कल्पना माझी पण त्यांत राजकीय हेतु होता हें मात्र खरें नाहीं.

कुप्रसिद्ध व अधिवेशनभर गाजलेलें, फौजदारी कायद्यांत भर टाकणारें बिल ता. २।९।३५ रोजीं गृहमंत्री क्रेक साहेब यांनीं सादर केलें. १९३२ सालीं जो काळा कायदा झाला होता, त्याच्या कलमांत फेरफार करून तो कायम करण्याचा हेतु या बिलाचा होता. बिलांत नुसते त्या कायद्याच्या कलमांत [illegible] होते.

बिलाचे हेतु ( Statement of objects and reasons ) थोडक्यांत समाविष्ट करावयाचे असतात, तेही स्पष्ट केलेले नव्हते. बिल ज्या दिवशीं सादर केलें त्याच दिवशींच्या 'स्टेट्समन' पत्रांत बिलाचें स्वरूप काय आहे याचें स्पष्टीकरण केलें होतें. वास्तविक बिल मांडण्यापूर्वी फक्त कांहीं वर्तमानपत्रकारांना त्यांचे हेतु सांगितलें होते असा खुलासा गृहमंत्री यांनीं केला. 'दोस्त पत्रें' ("Friendly Press") यांना नेहमींच सरकार विश्वासांत घेतें असा निर्वाळा देऊन, हीं दोस्त पत्रें कोणतीं हें मात्र सांगण्याचें नाकारलें. लोकमत अंदाजण्याचा हा एक मार्ग आहे असाही बहाणा केला. तथापि गृहमंत्री क्रेक यांच्याकडून हीच अपेक्षा लोकांची होती. स्वातंत्र्यविरोधी, तोंडपुजे वर्तमानपत्रें त्यांच्या विश्वासाला पात्र असत. अँग्लो-इंडियन पत्रांतून टीका येऊं लागली म्हणजे सरकारची पावलें कशीं पडणार याची दिशा कळूं शकते; कांहीं पक्षी घूत्कार करूं लागले कीं, रात्र पडणार हें सहज समजून येतें. दिल्ली अधिवेशनानंतर या वर्तमानपत्रकारांनीं गिल्ला चालविला होता. निवडणुकींतील काँग्रेसचा जय, अधिवेशनांतील सरकारी पराजय, लोकमताला चढलेलें तेज लक्षांत घेऊन पुढील प्रांतिक निवडणुकींत काँग्रेसला हाणून पाडण्याकरितां तयारी करणें जरूर होतें. आंबट झालेलें तोंड, तिखट करण्याचा प्रयत्न होता. नोकरशाहीला गोड करणें कधींच मानवणारें नव्हतें व नाहीं !! बिल मांडतांना, बादविवाद झाले तरी त्यांत कडवटपणा आणूं नये अशी अपेक्षा व्यक्त करून गृहमंत्री यांनीं बिल मांडलें !! मनुष्याला त्याच्या मुसक्या बांधतांना, तुझा विरोध सभ्य शब्दांत सांग, पण त्यांत कडवटपणा नको, तुझें स्वातंत्र्य कायम रहावें एवढ्याचकरितां हें बंधन आहे, असें सांगण्यासारखेंच हें होतें. जगांतील कांहीं गोष्टी अमर्याद आहेत, त्यांतच नोकरशाहींतील कांहीं लोकांचा निलाजरे-पणा, याची गणना केली पाहिजे ! १९३५ च्या सुधारणा येण्यापूर्वी, त्यांचा अंमल जाहीर होण्यापूर्वी, दडपशाहीचीं हत्यारें शक्य तितकीं नोकरशाहीच्या हातांत पाहिजे होतीं. सुधारणांच्या नादांत 'काळ्या कायद्याकडे' लोकांचें दुर्लक्ष होईल अशी सरकारची अपेक्षा होती. १९०९ च्या सुधारणा जाहीर करण्यापूर्वी, शक्य तेवढे दडपशाहीचे कायदे करून घ्यावे असें मत त्यावेळचे व्हाइसरॉय मिंटो यांचें होतें. त्यांनीं भारतमंत्री मोर्ले यांना धाडलेल्या पत्रांत लिहिलें आहे.

("As to repressive legislation, it is all important that it should precede your announcement of reforms in Parliament.........We must give the medicine first, and then do all we can to take

the case away. If we were to follow up your announcement with stiff legislation and deportation, we should make a fatal mistake. The test of the last dose would remain in the patients mouth.")
यावरून नोकरशाहीचें तंत्र काय असतें हें उघड होतें. प्रांतिक सरकारें शक्य तर काँग्रेसपक्षाचीं न होतील म्हणून या शस्त्रांचा उपयोग करावयाचा. तेंही जमलें नाहीं तर हीं शस्त्रें जेथें जेथें प्रतिगामी प्रांतिक सरकारें असतील त्यांच्या मार्फत उपयोगांत आणावयाचीं, किंबहुना असलीं शस्त्रें तयार ठेवून, त्यांच्या उपयोगाचा मोह उत्पन्न होऊन त्याप्रमाणें उपयोग झाल्यास त्यांतच आनंद मानावयाचा, हाही हेतु त्यांत नसेलच असें म्हणवत नाहीं !! एवढी गोष्ट उघड होती कीं, १९३५ चा कायदा अंमलांत येण्यापूर्वीं, अनेक गोष्टी करून घेण्याची एक प्रचंड योजना नोकरशाहीची होती व त्यांतील हें बिल हा एक महत्त्वाचा भाग होता.

ता. ५।९।३५ रोजीं गृहमंत्री यांनीं सदरहू बिल विचारांत घ्यावें म्हणून सूचना मांडली. या बिलाचा इतिहास सांगितला. १९३२ सालीं मध्यवर्ती कायदे-मंडळानें 'बहुमतानें' एक काळा कायदा पास केला होता, त्याचा अंमल फक्त तीन वर्षें होता. या बिलानें त्या कायद्यांतील कांहीं कलमें कमी करून बाकीचीं कलमें व सर्व कायदा कायम स्वरूपाचा करण्याचा उद्देश होता. या बिलानें नवीन भर दडपशाहींत पडत नाहीं असेंही त्यांनीं गंभीरपणें सांगितलें !! उलट १९३२ च्या कायद्यांत, लष्कर, नाविकदल, विमानदल, पोलिस व अन्य खात्यांतील सरकारी नोकरांना, नोकरीपासून परावृत्त करणें, त्याचप्रमाणें सरकारी नोकरांवर बहिष्कार टाकणें, खोट्या कंड्या उठविणें हे गुन्हे होते; अज्ञान गुन्हेगारांबद्दल पालकांना दंड करणें, या कायद्यानें शक्य होतें; या बाबतींतील सर्व कलमें या नवीन बिलानें रद्द केलीं आहेत म्हणून हें बिल प्रगतिकारक आहे हेंही सांगण्यास ते विसरले नाहींत !! १९३२ सालीं देशांत जातिवाद ( Communalism ), दहशतवाद ( Terrorism ) व कायदेभंग ( Civil Disobedience ) हे जारी होते; व त्याच कारणामुळें देशाची प्रगति होत नव्हती, व हीं कारणें दूर होऊन, प्रगति व्हावी म्हणून १९३२ चा कायदा करण्यांत आला असें सांगून, पहिले दोन वाद वाढत आहेत व कायदेभंग जरी काँग्रेसनें तहकूब केला असला तरी, काँग्रेसच्या शस्त्रागारांत कायदेभंग कायम आहे, ही महत्त्वाची गोष्ट त्यांनीं सांगितली. त्या-वेळीं एका सभासदानें " Thank God " म्हणून आवाजही काढला ! कायदेभंग

तहकूब असला तरी साम्यवाद ( Communism ) फार जोरांत आहे म्हणून, या तीन धोक्यांपासून भारताचा बचाव करण्याची जबाबदारी विद्यमान सरकारावर आहे व ती पार पाडण्याकरितां केवळ कर्तव्य म्हणून सरकारनें हें बिल आणलें आहे असें जीव तोडून सांगितलें. त्याजबरोबर या बिलाचा हेतु राष्ट्रीयवृत्ति दडपून टाकण्याचा नाहीं ( Not to crush the spirit of Nationalism ) अशी त्याची जाहिरातहि केली. भाषणाच्या शेवटीं मुख्य प्रधान मॅकडोनल्ड साहेबांचे पुढील शब्द उधृत करून भाषण संपविलें. " स्वातंत्र्याची किंमत म्हणजे अखंड सावधानता, राजसत्ता अशा ठिकाणीं स्थिर पाहिजे कीं, जेथें स्वातंत्र्य अयोग्य बंधनांनीं मर्यादित होणार नाहीं व त्याचबरोबर न शोभणाऱ्या कृत्यांनीं त्याचा दुरुपयोगही होणार नाहीं." ("The price of liberty is eternal vigilance, and it is our duty to keep the State steady at a point where liberty is neither curtailed by untoward restrictions nor abused by unseemely licence.") नोकरशाही व दडपशाही हें समीकरण आहे असें जर कोणी म्हटलें तर मिदान हिंदुस्थानांतील राजकीय अनुभवाला तें धरूनच होईल. १९०८साली सभाबंदीचा कायदा सिमल्यांतील गार वातावरणांत पास करून चळवळ थंडगार करण्याचा प्रयत्न झाला. सदरहू कायद्यानें वाटेल ती संस्था सरकार बेकायदेशीर करूं शकतें. १९१० सालीं वृत्तपत्रांचा ( Press Act ) कायदा झाला व त्यानें वृत्तपत्रांची मुस्कुटदाबी झाली. १९१८ सालीं रौलट बिलें आलीं, व तेही कायदे पास झाले. १९२२ सालीं सरकारनें प्रेस ॲक्ट रद्द केला. तरी १९२२ ते ३० पर्यंत सामान्य फौजदारी कायद्यानें सरकारनें कारभार हांकला; त्यांत कांहीं अडचण सरकारला आली नाहीं. १९३१-३२ च्या चळवळींत वटहुकूम काढले. १९३१ सालीं नवीन प्रेस ॲक्ट पास केला. १९३२ सालीं नवीन फौजदारी कायदा केला. १९०८ ते १९३४ पर्यंत अनेक कायदे केले, पण चळवळ दडपली गेली नाहीं. नुसत्या संस्थाच बेकायदेशीर करून भागत नाहीं म्हणून १९३० सालीं वटहुकुमानें व १९३२ च्या कायद्यानें, त्यांची स्थावरजंगम मालमत्ता ताब्यांत घेण्याची सोय केली. पुस्तकें आक्षेपार्ह ठरवून भागत नाहीं, पुन्हा छापतां येतात, लोक वाचतात, म्हणून पुन्हा छापणें व वाचणें, वटहुकुमांनीं व १९३२ च्या कायद्यांनीं गुन्हा ठरविले. निरोधन करणें ( Picketing ) वटहुकुमानें १९३०-३२ सालीं बेकायदा ठरविलें तें १९३२ च्या कायद्यानेंही गुन्हा ठरविलें. १९०८-३४ इतका

काल, अनुभव घेऊन शहाणे होण्याऐवजीं, नोकरशाही अधिक चेकाळली होती, हें उघड आहे. प्रस्तुत बिल जर शांतता व सुव्यवस्था यासाठीं पाहिजे होतें तर ते अधिकार प्रांतिक सरकाराला जाणार होते. सुधारणा देऊन नवयुगाची स्थापना करावयाची होती, तर हा अपशकून करण्याचें कारण नव्हतें. स्वातंत्र्याची चळवळ तुरुंगानें अगर हद्दपारीनें दडपली जात नाहीं, लाठीमारानें अगर गोळीबारानें तिचा नाश होत नाहीं, उलट याच कारणांमुळें ती वाढीस लागते, असा इतिहासाचा व येथीलही अनुभव होता. पण अनुभवानें शहाणें होणें सरकारच्या प्रकृतीला न जमणारें होतें. अपवादप्रसंगीं अगर निर्वाणीच्या प्रसंगीं काढावे लागणारे वटहुकूम जर 'कायम कायदा' म्हणून करण्याचा प्रसंग आला तर परिस्थिति सुधारण्याला हे उपाय नाहींत हें समजलें पाहिजे. (" When a political emergency becomes the normal state of affairs, the time has definitely passed for dealing with it either by executive decree or by legislative enactment. The question, then, is of ameliorative and conciliatory states_ manship ") हे लॉर्ड मोर्ले यांचे उद्‌गार नोकरशाहीला क्षुद्र वाटत असले पाहिजेत. विधायक मुत्सद्देगिरीचा आरोप त्यांच्यापैकीं एकावरही करण्याची छाती कोणालाही नव्हती !! वादविवादाच्या वेळीं सत्यमूर्ति यांनीं कायदेमंत्री यांच्या सदसद्‌विवेकबुद्धीला आवाहन केलें. त्याबरोबर त्यांनीं विनोदानें पण वस्तुतः यथार्थ रीतीनें " सदसद्‌विवेकबुद्धि आहे असा मजवर आरोप करतां काय ? " (" Are you charging me with having a conscience ? ") असा प्रश्न केला ! तात्पर्य रगेलपणानें वाटेल तें करून पूर्वीप्रमाणें बहुमत मिळेल या घमेंडींत पुढें येणाऱ्या सुधारणांत विष कालविण्याच्या बुद्धीनें हें बिल आणलें आहे असा आरोप अनेकांनीं केला व त्याच्याविरुद्ध पटेल असें उत्तर सरकाराला देतां आलें नाहीं हें खरें.

बिलावर झालेल्या चर्चेंत अनेकांनीं भाग घेतला. वटहुकुमांना कायम कायदा करणें हें सर्वथा राजनीतीला सोडून आहे. बिलानें भाषणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य, खाजगी मालमत्ता, व्यक्तिस्वातंत्र्य या सर्वांवर गदा येत आहे व तीही कायमची, हें असह्य आहे. ज्यानें आतांपर्यंत उपभोगिलेले हक्क मर्यादित होतात असा कायदा पास करणें अवश्य आहे असें सरकारनें शाबित केलें नाहीं, लोकमतही सरकारच्या बाजूचें नाहीं, या परिस्थितींत हुकूमशाहीच केवळ राज्य करीत आहे असें स्पष्ट सांगण्यांत आलें. सरकारचे जे पक्षपाती सत्यप्रिय होते ते अप्रिय बोलावें लागेल

म्हणून गप्प बसत. तोंडपुज्या लोकांनीं सरकाराला प्रिय म्हणून असत्य बोलण्यालाही कमी केलें नाहीं. सत्य पण अप्रिय बोलणारेही कांहीं कमी नव्हते. खुद्द अध्यक्ष सर अबदुल रहीम यांनीं १९३२ सालीं त्यावेळच्या बिलास तीव्र विरोध केला होता. त्यांतील उदात्त विचार व जळजळीत भाषेचे उतारे सरकाराला अनेकांनीं वाचून दाखविले. वृत्तपत्रासंबंधीं व आक्षेपार्ह मजकूर ठरविण्याच्या बाबतींत नोकरशाहीचा डाव कोर्टांना धुडकावून लावण्याचा कसा आहे हेंही स्पष्ट करण्यांत आलें. कोठलें लिखाण आक्षेपार्ह आहे, हें ठरविण्याचा अधिकार अंमलबजावणी करणारांकडे ( Executive ) देणें न्यायाला धरून नाहीं, हें उघड आहे. सरकारनें आक्षेपार्ह आहे असें ठरविलें कि तें छापलें अगर वाचलें कीं गुन्हा होणार व त्याच्या चौकशीच्या कामीं न्यायाधिशाला खरोखर त्यांत कांहीं आक्षेपार्ह आहे कीं नाहीं हें सुद्धां पहाण्याचा अधिकार नसावा, हें दृश्य हुकूमशाहींत ठीक असेल, पण लोकशाहीचा लौकिक सांगणाऱ्या राजवटींत, सरकारला न शोभणारें होतें याची जाणीव देण्यांत आली. मोघम कायदा करून त्याला अनुसरून वाटेल ते नियम करण्याचा अधिकार आपल्याकडे घेण्याची नोकरशाहीची प्रवृत्ति घातक आहे; व यामुळें जबाबदार राज्यपद्धतींतसुद्धां हुकूमशाही वर्तन करण्याला नोकरशाहीला वाव मिळतो हा इंग्लंडमध्यें येऊं लागलेला अनुभव, नजरेस आणण्यांत आला. कायदेमंडळाला बारीकसारीक नियम करण्यास वेळ नसतो, व हे नियम तज्ज्ञ व कायम नोकरांनीं केल्यास ठीक होईल या दृष्टीनें, अनेक देशांत सर्वसामान्य कायदा करून बाकीचे आवश्यक नियम करण्याचे अधिकार अंमलबजावणी करणाऱ्या ( Executive ) वर्गाकडे देण्यांत येतात. नियमानें गोष्ट ठरविली कीं ती बरोबरच, त्याबाबत कोर्टाला चौकशी करण्याचा अधिकार नाहीं, अधिकाऱ्याचा निकाल हाच त्या गोष्टीच्या कायदेशीरपणाबद्दल पुरावा असा प्रसंग येतो.( The fact of his decision shall be conclusive proof of its legality.) दोन्ही बाजू ऐकून, सार्वजनिक रीतीनें चौकशी होऊन, निःपक्षपातीपणानें कोर्टांत मिळणारा न्यायनिवाडा, या पद्धतींत अशक्य होतो. कोर्ट एवढें पाहणार कीं नियमानें अमुक ठरविलें आहे, त्यामागें कोर्ट जाऊं शकत नाहीं म्हणून नियमानें ठरविल्याविरुद्ध वर्तन झाल्यास तो गुन्हा ! सरकारनें आक्षेपार्ह ठरविलें, तें आक्षेपार्ह झालें; यांत ढवळाढवळ करण्याचा अधिकार कोर्टाला नाहीं. यांत केवढी सत्ता नोकरशाहीला मिळते याची जाणीव सहज होत नाहीं. इंग्लंडमध्येंसुद्धां या नवीन प्रकाराला 'नवा जुलूम' ( New Despotism ) म्हणून

म्हणण्यांत येतें. तेथें पार्लमेंट आहे; मनांत आणील तेव्हां हें बंद करूं शकेल; पण येथें तेंही नाहीं! लोकांना कायदा करण्याचें स्वातंत्र्य नाहीं. जे कांहीं हक्क असतील त्यांचें आक्रमण नोकरशाहीकडून झाल्यास न्यायालयांत थोडें संरक्षण मिळें; तेंही या रीतीनें मर्यादित होत आहे. ही गोष्ट अनेक सभासदांनीं उत्तम रीतीनें विशद केली. कायदा, कायदेपंडित, न्यायालयें यांवर अंमलबजावणी करणारा वर्ग याचा फारसा विश्वास नसतो. एकदां एका बड्या गोऱ्या अधिकाऱ्यानें लॉर्ड मोर्ले यांना सांगितलें कीं, जे कार्यक्षम व श्रेष्ठ बजावणी करणारे अधिकारी असतात त्यांना कायदेपंडितांबाबत आविश्वास वाटतो. (The great executive officers never like or trust lawyers). त्यावर मोर्ले यांनीं उत्तर दिलें कीं, " त्याचा अर्थ त्यांना कायदाच नको आहे, त्यावर विश्वास नाहीं; त्यांचा विश्वास व त्यांची इच्छा स्वैरसत्ता यांवर आहे." ("It is because they do not like or trust law. They in their hearts believe before all else the virtues of will and arbitrary power." ) कधींकाळीं लोक निमुटपणें सहन करणाऱ्या गोष्टी, कायम व अनंतकाल सहन करतील असें मानणें मूर्खपणाचें आहे. जमाना बदलला, नवचैतन्य, नवीं ध्येयें, लोकांना स्फुरवूं लागलीं: या परिस्थितींत जुन्या अनुभवांनीं अगर जुन्या सिद्धांतावर चालणें धोक्याचें आहे असा उपदेश पण सरकाराला करण्यांत आला.

बिलाचें उद्दिष्ट, जातिवाद, दहशतवाद व साम्यवाद यांना हाणून पाडणें हा आहे असें गृहमंत्री यांनीं सांगितलें होतें. वास्तविक पाहतां, या क्षणापर्यंत जातिवादाचें निर्मूलन करण्याकरितां दडपशाही हत्यारांचा उपयोग क्वचितच करण्यांत आला होता. जातिवाद हें परकी सत्तेचें अपत्य आहे, व परकी सत्ता व हें दोन्ही एकदमच नाहींसे होतील, असें सांगणारेही भेटले. दोन्ही पक्षांना न्याय करतों म्हणून सर्व खवा खाणाऱ्या माकडाची गोष्ट पण एका सभासदानें सांगितली. दहशतवाद हा दडपशाहीनेंच जोरावतो हें आंकड्यांनिशीं राजकीय गणिततज्ञांनीं दाखविलें. निराशेच्या पोटीं दहशतवाद जन्म घेतो व दडपशाही त्याची दाई होऊन त्यांचें संगोपन करतें, हा सर्वत्र येणारा अनुभव सभागृहांत सांगण्यांत आला. प्रार्थना, विचारविनिमय, सदसद्विवेकबुद्धीला आवाहन हीं सर्व जेव्हां असमर्थ ठरतात, तेव्हां राजसत्तेला शुद्धीवर आणण्याकरितां दहशतवादाचें दिव्य करावें लागतें. जुलमाची धुंदी उतरण्याकरितां जेव्हां सगळे सोज्ज्वल उपाय थकतात तेव्हांच हें चरचरीत अंजन इतिहासाला घालावें लागतें. ही प्रवृत्ति बळावण्यास सत्तेचा लोभ

हेंच एकमेव कारण आहे, हें पटवून देण्यांत येत होतें. गांधींजीच्या अहिंसेमुळें सरकार देशांत सुरक्षित आहे, नाहींतर सरकाराला कठीण प्रसंग आला असता म्हणून गांधींच्या म्हणण्यास मान देण्यांत सरकारचें संरक्षण व लौकिक आहे, असा इवालाही किस्येकांनीं दिला. एकानेंही दडपशाहीनें दहशतवाद संपेल म्हणून सांगितलें नाहीं. साम्यवादाचा उद्देश 'शेतकरी व कामगार व क्रान्तिवादी मध्यमवर्ग, यांच्या साहाय्यानें सशस्त्र राज्यक्रान्ति करावयाची' ("By the armed insurrection of the widest possible masses of the working class, the peasantry and the revolutionary petty bourgeoisie") हा आहे असा निर्वाळा गृहमंत्री यांनीं दिला होता. सदरहू वाद जरी साम्राज्यशाही विरुद्ध असला तरी तो समोर बसलेल्या पक्षाच्या सभासदांविरुद्ध जास्त तीव्र आहे. ("But it is even more hostile to the political aims and methods of the Honourable Gentlemen opposite.") अशी धोक्याची सूचना काँग्रेसपक्षाला दिली होती. साम्यवादी लोकांचा कार्यक्रम म्हणून, सार्वत्रिक संप, गोंधळ व पुढें सशस्त्र उठावणी असा आहे असें सांगून सदरहू पक्षाचें ध्येय त्यांच्याच शब्दांत खालीलप्रमाणें सांगितलें. ("To be a completely independent political organisation of the vanguard of the working classes, carrying on a merciless struggle both against Imperialism and against Bourgeois National Reformism") साम्राज्यशाही व सुधारणावादी पक्षाविरुद्ध तीव्र लढा सदरहू पक्षाचा कसा व कोठें चालला होता याची सरकारपेक्षां आम्हालाच जास्त जाणीव होती. सरकार राष्ट्रीयवाद हाणून पाडण्याकरितां पक्षाच्या या तत्त्वज्ञानाचा दुरुपयोग कसा करीत होतें, ही गोष्ट सर्वांना माहीत होती. जगभर साम्यवादी लोकांच्या चुकीच्या धोरणामुळें अनंत गोष्टी घडून आल्या, तशा कांहीं येथेंही झाल्या. आजही राष्ट्रीयस्वातंत्र्यावरील लक्ष कमी व्हावें, तें मिळविण्याच्या प्रयत्नांत गोंधळ उत्पन्न व्हावा म्हणून, याच पक्षाला कायदेशीर करून सरकार खेळ खेळत आहे. मागील महायुद्धांत जर्मनीनें लेनिनला स्वित्झर्लंडमधून सुखरूप नेऊन रशियांत पोहोंचविलें; तीच नीति, तेंच धोरण, आजही साम्यवादी लोकांना मोकळें सोडण्यामागें आहे. अर्थात् साम्यवादी लोक हें ओळखत असतील पण सर्वशः तें ओळखून तसें वागतात असें मात्र दिसत नाहीं. तथापि ही सरकारची नीति जुनी आहे, व तिचें स्पष्टीकरणही तेव्हां करण्यांत आलें. मतस्वातंत्र्य पाहिजे, सभास्वातंत्र्य पाहिजे, साम्यवाद जर लोकांना पटला, तर लोक स्वीकारतील; परंतु दडपशाहीनें तो दड-

पून टाकणें अयोग्य आहे, असें कॉंग्रेसपक्षीय सभासदांनीं स्पष्टपणें सांगितलें. दडपशाहीनें साम्यवाद मेला नाहीं. जोंपर्यंत समाजरचना विषम आहे, जोंपर्यंत भांडवलशाही पद्धतीनें उत्पादन चालू आहे, तोंपर्यंत समाजांत बेकारी, दुःख व दारिद्य राहणार. दडपशाहीनें क्षणभर वाचा बंद करतां येईल, पण विचार कसे बंद होतील ! सभाबंदीनें माणसें क्षणभर जाहीर चर्चा करणार नाहींत, पण त्यामुळें दुःखितांची जात जास्त संघटित होणें टळणार नाहीं. गोळ्यांनीं व लाठ्यांनीं डोकीं फुटतील पण विचार व ध्येयें नाश पावणार नाहींत. सामाजिक न्यायावर जोंपर्यंत समाजाची रचना होणार नाहीं तोंपर्यंत माणसांना त्यांची नियति स्वस्थ बसूं देणार नाहीं, ही गोष्ट शोभेल अशा भाषेंत मांडण्यांत आली. तात्पर्य बिलाचें उद्दिष्ट—जें हें तीन वाद व तीन धोके टाळण्याचें आहे—तें साधणार नाही, परिणाम उलट होईल, हें भविष्य स्पष्टपणें केलें गेलें.

बिलांतील कलमवार विचाराकरितां जीं १९३२ च्या कायद्यांतील कलमें गाळलीं त्यांत सरकारनें विशेष कांहींच केलें नाहीं. नोकऱ्या सोडा असा नुसता उपदेश करून नोकऱ्या सोडण्याइतकें तेज, स्वाभिमान, देशभक्ति, गुलामगिरींत अनेक वर्षें काढलेल्या राष्ट्रांतील नोकरवर्गांत आहे हें मानण्यांत चूक होत होती, हें सर्वांना कळून चुकलें होतें. नोकरांवरील बहिष्कार हा अहिंसामय नाहीं असाच प्रचार कांहीं शिष्ट लोकांनीं केला होता, व धोरणी मंडळी नेहमींप्रमाणें त्याविरुद्ध होती; हा अनुभव सरकारला आला होता. या परिस्थितीत हीं कलमें रद्द झालीं यांत नवल नव्हतें. १९३२ च्या कायद्यांतील बाकीचीं कलमें व कायदा कायम करणारें हें बिल होतें. मुद्रणस्वातंत्र्य कायम मर्यादित होणार होतें. मुद्रणस्वातंत्र्याचा दुरुपयोग म्हणून अनेक उतारे गृहमंत्री यांनीं वाचून दाखविले. हिंदु-मुसलमानांत द्वेष व कलह करणारे उतारे, ब्रिटिश सत्ता वाटेल त्या मार्गांनीं निकालीं लावा म्हणून सांगणारे उतारे, दहशतवादाला उत्तेजन देणारे उतारे वाचून दाखवून गृहमंत्री यांनीं कांहीं सभासदांपुढें भीति उत्पन्न केली, तर कांहींची त्यामुळें करमणूकही झाली. लाहोरच्या 'रियासत' म्हणजे 'राजकारण' या पत्राला अवघ्या ३ महिन्यांत १० संपादक लाभले म्हणून, त्यांनीं माहिती दिली. एका दिल्लीच्या पत्राचा संपादक एकेकाळीं मोतद्दार होता, पुढें न्हावी होता, व पुढें सैनिक झाला, तेथून पळून गेला, शिक्षा भोगली, व हल्लीं संपादक आहे, व त्यावर खटला चालू आहे, अशी माहिती अत्यंत महत्त्वाची म्हणून सांगितली. संपादकांचा

चरित्रकोषच ( Who's Who ) त्यांनीं सांगितला नाहीं हें आमचें भाग्य !! शिक्षा देऊनहीं संपादक सुधारत नाहींत हेंही त्यांना कबूल करावें लागलें. रास्त टीका, द्वेषरहित टीका, याला पूर्ण वाव आहे अशीही बात ठोकून देऊन, आतांपर्यंत कायद्याची अंमलबजावणी बेताबातानें करण्यांत आली असें विधान केलें. सत्यमूर्तींनीं सांगितलें कीं, १९३५ सालच्या पहिल्या ६ महिन्यांत ७२ वृत्तपत्रांवर वरवंटा फिरला. नुसत्या केटा धरणीकंपाबाबत १५ वृत्तपत्रांना जामिनकी भरावी लागली. जप्त रक्कम ३० हजारांवर गेली. १९३१ च्या प्रेसॲक्टाखालीं १६६ वृत्तपत्रांवर गदा आली. अडीच लाखांवर रक्कम जप्त करण्यांत आली, व एकंदर, १९३१ ते १९३५ च्या जूनपर्यंत ४४८ वर्तमानपत्रें बंद पडलीं. खरोखरच बेताबेतानें कायद्याची बजावणी होत होती !! लोकशाही घटना येणार म्हणून वास्तविक वर्तमानपत्रें वाढावयाचीं, लोकमत तयार करण्याचें मोठें साधन वर्तमानपत्रें; किंबहुना वर्तमानपत्रांना राज्यघटनेंत व शासनसंस्थेंत महत्त्वाचें स्थान असतें. इंग्लंडमध्यें वर्तमानपत्रें हीं राजसत्तेच्या दौलतीचा चौथा खांब असें समजतात. ( Fourth Estate of the Realm ). राजा, उमरावसभा व कॉमन्ससभा यांच्या इतकें महत्त्व वर्तमानपत्रांना आहे. पण येथें हा खांब दुर्बळ करण्यांतच मुत्सद्देगिरी मानण्यांत येते हें दुर्दैव आहे. वास्तविक हिंदी फौजदारी कायदा ( Indian Penal Code ) हा सर्वांग परिपूर्ण आहे. त्यांतील राजद्रोहाची व जातिद्वेषाची व्याख्या जशीच्या तशी, या प्रेसॲक्टांत होती; व तीच या बिलांत घेतली होती. पण आक्षेपार्ह लिखाण ठरविण्याचा अधिकार न्यायाधिशाच्या हातीं न राहतां बजावणी अधिकाऱ्यांकडे दिला होता. याचा परिणाम उघडपणें जे सरकारविरुद्ध असतील, सरकारी धोरणावर टीका करतील, त्यांच्याच विरुद्ध होणार होता; व मागील अनुभवही तसाच होता. मागील प्रेसॲक्टाविरुद्ध अनेक न्यायाधिशांनीं तक्रारी केल्या होत्या. या कायद्यानें सर्व वर्तमानपत्रांचें स्वातंत्र्य जाऊन त्यांवर सरकारी नियंत्रणच एकप्रकारें बसणार होतें, व तें नियंत्रण म्हणजे विरोधकांची मुस्कटदाबी व तोंडपुजेवाल्यांचें मुखलेपन हाच त्याचा अर्थ होता. दोस्तपत्रें व दुष्मनपत्रें असे वर्ग सरळ पडणार होते, नव्हे पडले होते. तेच अधिक संघटित होणार होते. सर्वत्र व सर्वशः पत्रबंदी न करतां सरकारला पाहिजे तेवढाच प्रचार होईल, हें साधण्याचें नवीन तंत्र या बिलानें सरकार तयार करीत होतें. भाषणस्वातंत्र्य व मुद्रणस्वातंत्र्य म्हणजे राष्ट्रीय जीवनाचीं फुप्फुसें होत, तीं बंद झाल्यास

राष्ट्र गुदमरून मरेल, हें नोकरशाहीला कळत होतें; म्हणून फोडा व झोडा ही नीति सरकारली जात होती. इतकें करूनहि राष्ट्रीय वृत्ति मरेल, अगर कमी होईल असा अनुभव नव्हता व आशाही नव्हती. खुद्द लॉर्ड आयर्विन यांनीं यासंबंधांत असें म्हटलें आहे कीं, ( " To meet the case with rigid and unyielding opposition is merely to repeat the unintelligent mistake of King Canute.")वाढती स्वातंत्र्यप्रेमाची लाट कोणत्याही शब्दानें अगर प्रयत्नानें मागें हटणारी नव्हती. विरोधक त्यांतच बुडून जातील हेंही निश्चित होतें, हें सर्व सभागृहांत चर्चेच्या वेळीं बजावण्यांत आलें. ' कुत्रीं भलीं भुंकोत, आमचा काफिला चालूच आहे" ("Dogs may bark our Caravan goes on") ही होअरसाहेबांची घोषणासुद्धां या बिलानें खोटी पडत होती. कारण भुंकण्याचाही हक्क या बिलानें खतम होत होता ! ! जर्मनीचा प्रसिद्ध हुकूमशाही बादशहा असें म्हणे कीं, " मी व माझी प्रजा यांच्यांत संपूर्ण एकमत आहे. प्रजेनें वाटेल तें बोलावें, मी वाटेल तें करावें. ("There was complete understanding between me and my subjects ; they were to say what they liked and I did what I pleased. ") इतकीहि धमक येथील सरकारला नाहीं. सरकार वाटेल तें करतें, मात्र प्रजेला काय वाटतें तें बोलून दाखविण्याचें स्वातंत्र्य देत नाहीं; इतकेंच नव्हे तर रास्त व योग्य टीकाही करणें धोक्याचें करतें.

१९३२ च्या कायद्यांतील सभास्वातंत्र्याबाबतचीं कलमें कायम करण्यांत येणार होतीं. संस्था अगर सभा, बजावणी अधिकाऱ्यानें बेकायदेशीर ठरवावयाची व तिची मालमत्ता जप्त करावयाची. कोर्टाला अधिकार फक्त जप्त केलेली मालमत्ता संस्थेची आहे कीं नाहीं, येवढेंच ठरविण्याचा; संस्था बेकायदेशीर ठरविणें योग्य होतें कीं नाहीं, हा अधिकार नाहीं. सर्व बिलांत, बजावणीखात्याला संपूर्ण व स्वैर अधिकार देण्यांत आलें होतें. निवडणुकींत पुढें मागें प्रतिगामी पक्ष यशस्वी झाला तर, त्यानें विरोधी पक्षाच्या सर्व संस्था बेकायदेशीर ठरवून, मिळकत जप्त करून त्याला नेस्तनाबूत करण्याची यांत सोय होती. एवढा अधिकार असतां, एवढी सत्ता असतां, पक्षद्वेषविरहित, समतोल बुद्धीनें, या सत्तेचा उपयोग होईल, ही गोष्ट अशक्य आहे. खुद्द विद्यमान सरकारनें १९३२ सालीं, मजुरांच्या संस्था, हरिजन उद्धाराच्या संस्था, मद्यपान निषेधक मंडळें, सूत कमिटया, स्वदेशी प्रचार संघ, राष्ट्रीय मुसलमान पक्ष, राष्ट्रीय खिश्चन पक्ष, म्युनिसिपल पोटकमिटया इत-

केंच नव्हे तर मिठाई विक्रीचीं दुकानें पण बेकायदेशीर ठरविलीं होतीं. कॉंग्रेस-संस्था व खादी कार्यालयें यांची तर पहिल्या झटक्यास वाट लाविली होती. लोकशाही राजकारण म्हणजे संस्थाविषयक राजकारण आणि संघटनेचें राजकारण त्यालाच नख देण्याचा हा प्रयत्न होता! सरकारमान्य. संस्था म्हणजे सरकारचें प्रत्येक धोरण, प्रत्येक कृत्य मान्य करणाऱ्या संस्था; सरकारला जें मान्य, तें त्यांना मान्य असाच हा विग्रह असतो असा अनुभव आहे. भाषणस्वातंत्र्य जरूर पण ते सरकारची स्तुतिपाठक असेल तरच : समारंभ व सभा स्वातंत्र्य जरूर, पण सरकारी नोकरांचा सत्कार होत असेल तरच. विरोधी मतप्रचाराला स्वातंत्र्य दिल्याशिवाय खरी लोकशाही शक्य नाहीं, लोकशिक्षण शक्य नाहीं, हें स्पष्ट आहे. दोन्ही बाजू ऐकून, लोकमतानें कौल द्यावयाचा असतो. तीच गोष्ट या बिलानें मोठ्या प्रमाणांत मर्यादित करण्याचा प्रयत्न होता. निरोधन बंदी व प्रचार स्वातंत्र्य मर्यादित करण्यांत येणार होतें. शांततामय निरोधन करण्याला पूर्ण वाव आहे असें गांधी-आयर्विन तहानें पण मान्य केलें होतें. ("Government have no desire to discourage methods of propaganda, persuasion or advertisement pursued with this object in view, which do not interfere wlth the freedom of action of individuals and are not prejudicial to the maintenanee of law and order.") या अर्थाचे शब्द त्यांत होते; प्रस्तुत बिलानें त्यालाही निकाली लावलें होतें. स्वदेशी प्रचार म्हणजे राजद्रोह जरी नसला तरी गुन्हा होणार होता. स्वदेशी प्रचारसंघ तर बेकायदेशीर ठरविलेच होते. आतां हात जोडून, पायां पडून दारू पिऊं नका अगर बिलायती माल घेऊं नका असें सांगणेंसुद्धां बेकायदेशीर ठरणार होतें. तात्पर्य सर्व तऱ्हेचें स्वातंत्र्य या बिलानें मोठ्या प्रमाणांत मर्यादित होणार होतें. या होणाऱ्या कायद्याखालील खटल्यांना क्रि. प्रो.कोड जरूर पडल्यास लागणार नाहीं असेंही जाहीर करण्याचा अधिकार एका कलमानें प्रांतिक सरकाराला देण्यांत येणार होता. बिन-जामीन अटक, तडकाफडकी निकाल असें हे तंत्र निर्माण होत होतें. जे जे जुलमी कायदे व वटहुकूम जगांत अनेक सुपीक डोक्याच्या राज्यकर्त्यांनीं प्रजेविरुद्ध केले होते त्या सर्वांचा अर्क काढून हें बिल बनाविण्यांत आलें होतें, असें विधान जें चर्चेत केलें गेलें तें खोटें म्हणतां आलें नाहीं.

चर्चेत सत्यमूर्तींनीं चांगलें भाषण करून शेवटीं भवितव्यता कटु भविष्य

लिहीत आहे, वेळींच सरकारानें जागें व्हावें नाहींतर एकदां विधिलेख लिहिला गेला कीं, सर्व शहाणपण, सर्व पश्चात्ताप व्यर्थ होईल; कारण विधिलिखित यत्किंचितही बदलणार नाहीं. सरकारतर्फे दुसरें भाषण मि. ग्रिफिथ यांचें झालें. सदरहू आयरीश गृहस्थ सिव्हिल सर्व्हंट असून डि. मॅ. होते. इंग्लिशमनपेक्षांही यांचा साम्राज्याभिमान अधिक होता. क्रांतिकारकांसंबंधीं त्यांनीं अनेक अनुभव सांगितले व हे सर्व दरोडेखोर व खुनी आहेत म्हणून त्यांची निंदा केली. त्यांची स्वातंत्र्यभक्ति, अतुल स्वार्थत्याग, यांची विटंबना केली. त्यांच्या भाषणांत तीव्र अडथळा झाला हें सांगण्याचें कारणच नाहीं. ते वक्तृत्वपूर्ण बोलले हें खरें, पण अप्रस्तुत व अप्रयोजक बोलले हेंही खरें. सरकारपक्षानें त्यांची वाहवा केली. त्यांच्या भाषणानंतर वातावरण मात्र गरम झालें. स्वतंत्र पक्षातर्फे गौबा यांनीं हें बिल नवीन येणाऱ्या सरकाराला बिलकुल जरूर नाहीं, कारण त्यांना नवीन घटनेंत संरक्षक बंधनें इतकीं दिलीं आहेत कीं त्यांत अधिक भर कट्टर साम्राज्यवादी चर्चिलला सुद्धां घालतां आलीं नाहींत. बिलाचा उपयोग सर्वस्वीं स्वातंत्र्य मारण्यांत होणार आहे म्हणून प्रत्येकानें, प्रत्येक जातीनें, त्याला विरोध केला पाहिजे असें सांगून आपला व पक्षाचा विरोध दर्शविला. युरोपियन गटातर्फे मि. मॉर्गन यांनीं सरकाराला पूर्ण पाठिंबा दिला. त्यांच्या भाषणांत हें बिल अवश्य आहे, कॉंग्रेस केव्हां चळवळ करील याचा भरंवसा नाहीं, सामान्य कायदा पुरेसा नाहीं म्हणून बिल कायदा होणें जरूर आहे असें सांगितलें. मि. मॉर्गन हे व्यापारी प्रतिनिधि व व्यापारी ज्याप्रमाणें वस्तूंचे भाव देतात, त्याप्रमाणें त्यांचें भाषण झालें. कल्पांतापासून हिंदुस्थानाला वांचविणें जरूर आहे म्हणून हें बिल पाहिजे हेंच त्यांचें ध्रुपद होतें! फक्त हिंदुस्थान म्हणजे इंग्रजांचे हिंदुस्थानांतील हितसंबंध एवढें मात्र त्यांनीं सांगितलें नाहीं. सर गुलाम हुसेन हिदायतउल्ला यांनीं हिंदू व मुसलमान या दोघांना हें बिल हवें आहे असें सांगितलें!! सिंधमधील हिंदु संघ व हिंदुसभा यांनीं कॉंग्रेसला विरोध करण्याचें ठरविलें आहे, कारण कॉंग्रेस बेकायदेशीर चळवळ करते; व त्याचप्रमाणें मुसलमान जमातीचें मत आहे, अशी माहिती दिली. हें बिल पास झाल्यानंतर लोकांचे प्रतिनिधि असलेलीं प्रांतिक कायदेमंडळें त्याचप्रमाणें पूरक कायदे करणार आहेत, हीही माहिती सांगितली. साम्यवादी भूमिका काय आहे, त्यांचा कार्यक्रम श्रीमान व जमीनदार वर्गाविरुद्ध कसा आहे, हें सांगून, स्थैर्य व शांतता राखण्याकरितां, या बिलाला पाठिंबा देणार म्हणून जाहीर केलें. पंडित कृष्णकांत मालवीय यांचें

भाषण अत्यंत जळजळीत झालें. "अन्यायाची चीड जर जिभेवाटे बाहेर पडणार नसेल तर, ती तोडून टाकलेली बरी," हें वाक्य उच्चारतांच टाळ्यांचा कडकडाट झाला. त्यांचें पत्र 'अभ्युदय' होतें. त्याच्या बाबतींत आलेले अनुभव सांगत असतांना, नोकरशाही कोणत्या थरापर्यंत जाते याची कल्पना सभेला आली. 'प्रेस सल्लागार' हें पात्र १९३० सालापासून रंगभूमीवर नाचूं लागलें. त्याच्या लीला त्यांनी वर्णन केल्या. हिंदुस्थानांत सर्वत्र बातम्या आल्या तरी, विशिष्ट प्रांतांत त्याला बंदी, विशिष्ट प्रकारें छापण्यास बंदी, खरी हकीगत मोडून, तोडून, सांगण्यास आज्ञा, सहसा कोठलाही हुकूम लेखी न देतां फोनवरून अगर तोंडी सांगण्याची प्रथा, खुद्द कायदेमंडळांतील भाषणें छापण्यास मनाई; एक नाहीं अनेक प्रकार त्यांनीं सभागृहाला सांगून चीड उत्पन्न केली. दहशतवादी लोकांचे मार्ग चुकीचे असतील, पण त्यांचे हेतु उदात्त आहेत, त्यांचा त्याग व त्यांचें शौर्य यांचें कौतुक त्यांनीं आपल्या भाषणांत केलें. त्याबरोबर गृहमंत्री भडकून मधेंमधें बोलूं लागले. अनेक क्रांतिकारकांचा इतिहास लोकांना सांगितला. गृहमंत्री लाल झाले. पं. कृष्णकांत मालवीयांचें तोंडच लाल होतें कारण नेहमीं पान खात खात ते बोलत. तथापि त्यांनीं आपलें भाषण शांतपणें चालूच ठेविलें होतें. शेवटीं गृहमंत्री रागानें 'यापुढें शांत राहणें कठीण आहे' असेंही बोलले. तथापि मालवीयांची भाषणगंगा संथपणें चालूच होती. गंगेच्या लांबीप्रमाणें त्यांचें भाषणही लांबच झालें. कदाचित् तो कुळधर्मही असेल !! क्रांतिकारकांना त्यांच्या मार्गापासून निवृत्त करून, शिष्ट मार्गावर आणल्यानें फायदे होतात, व हें काम आपण स्वतः अनेक वेळा केलें व त्यांत मि. मुडिमन–जे पूर्वी गृहमंत्री होते–त्यांनीं सहानुभूतीनें मदत केली : मानवता सहानुभूतीनें वागल्यानें कमी होत नाहीं, तिची प्रतिष्ठा वाढते हें दाखवून दिलें. इंग्लंडनें कंपनी सरकारच्या वेळीं हिंदी मालावर कसा बहिष्कार घातला याचा इतिहास सांगितला; त्यावेळीं इंग्लंडनें किती जालीम कायदे केले, हिंदी कापड वापरणाऱ्यांना कशी भयंकर दंडाची शिक्षा ठेविली होती, हिंदी कापड वापरणाऱ्या स्त्री-पुरुषांना कसा त्रास देण्यांत येत असे व कपडेही फाडले जात असत हें सांगून येथें सरकार हिंदी उद्योगधंद्यांना कांहींच उत्तेजन देत नाहीं, नुसतें शांततामय निरोधन केलें तर गुन्हा समजला जातो. "हम 'हू' भी करते हैं तो होजाते हैं बदनाम। वो कतल भी करते हैं तो चर्चा नहीं होता ! (आम्ही अहः केल्याबरोबर नापसंती दर्शविली जाते व त्यांनीं खून केले तरी त्याची

नुसती चर्चासुद्धां होत नाही.) हा विरोध समर्पकपणें दाखविला. हें बिल नवीन घटनेविरुद्ध चळवळ करणारांना ठार मारण्याकरितां आहे असें सांगून पुढील वाक्यांत भाषण संपविलें:—हम ने देखी थी अदा कल तेरे दिवानो की। धज्जियाँ कुछ लिये बैठे थे गरिबों की। आज दरबंद किये जाते हैं झिंदानों के। और बिगाडेंगे मिझाज आप के दिवानों के॥ (काल, तुझ्या वेड्या जनतेची शोभा पाहिली, जी आपलीं वस्त्रें फाडून तुकडे हातांत घेऊन बसली होती, आणि आज हीं तुरुंगाचीं द्वारें बंद झालीं. आतां तर आणखी या जनतेचें डोकें भडकेल.) टाळ्यांच्या प्रचंड कडकडाट झाला. गृहमंत्री चिडून बोलले, "वाजवा टाळ्या. खुनी लोकांची स्तुति त्यांनीं केली." ("Go on cheering, he has praised murderers.") मालवीयांच्या भाषणांतील मुद्देसुद्धां गृहमंत्र्यांच्या ध्यानांत येण्याइतकी त्यांची मनःस्थिती समतोल राहिली नाहीं हें उघड झालें; रागानें ते सभागृह सोडून गेले !! चर्चेंत डॉ. देशमुख, सरकारनियुक्त सभासद मि. शर्मा, यांनीं त्यानंतर भाग घेतला. डॉ. देशमुखांनीं हें बिल पास झाल्यास सर्वत्र जिल्हावार थोडे मोठे मुसोलिनी अधिकारी वर्गांत उत्पन्न होतील म्हणून सांगितलें. मुंबईच्या दंग्याची माहिती देत असतांना हिदायतउल्लांनीं मध्येंच तोंड घालून कांहीं प्रश्न विचारलें, त्यावर "तुम्ही त्यावेळीं सरकारी मंत्री होतां, तुम्हाला त्यावेळच्या दंग्याची माहिती असावयास पाहिजे." त्यांनीं "माझा दंग्याशीं संबंध नव्हता" म्हणून सांगितलें. त्यावर "मी तुम्हाला त्याच्या आसपास सुद्धां पाहिलें नाहीं." ("I never saw you round about there.") असा टोला डॉ. देशमुख यांनीं मारला, व तो वर्मीं पण बसला. पूर्ण जबाबदारी ओळखूनच विरोध करणार असें म्हणून त्यांनीं भाषण संपविलें. श्री. आर. एस. शर्मा म्हणजे मद्रासी इडली. जेथें खपेल तेथें जावयाची. सरकारनियुक्त सभासद, जन्मानें मद्रासी, धंद्यानिमित्त राहणें कलकत्त्यास, बंगाल सरकारशीं रहस्य व हिंदुस्थान सरकारानें नियुक्त केलेले असें हें गाळीव रत्न होतें. वर्तमानपत्र सृष्टींत,जेथें नशीब उघडेल व ज्या मार्गानें उघडेल तेथें व त्या मार्गानें जाण्याची परंपरा मद्रासी लोकांची आहे, तिचा मान यांनीं ठेवलेला होता. "पं.मालवीय यांचें भाषण फार पसंत आहे कारण त्या मुळेंच बिलाची आवश्यकता शाबीत झाली" असें सांगून "आपण जर गृहमंत्री असतो तर भाषण संपतांच मालवीयांचें अभिनंदन करून त्यांना आलिंगन दिलें असतें"; असें म्हणताच एकानें "Black and white, beware" म्हणून आवाज काढला व तो हास्यांत विरून गेला !! राष्ट्रीयवृत्तपत्रांची त्यांनीं निंदा केली. जनतेची दिशाभूल ते

करतात म्हणून आरोप केला. 'दि न्यू एंपायर' पत्र काढीत असतां, एकदां त्यांचीं यंत्रें नादुरुस्त झालीं म्हणून, त्यांनीं कांहीं अंक 'स्टेट्समन'च्या छापखान्यांत छापून घेतले. त्यावर निषेधाची सभा भरून हिंदी छापखान्यांत कां छापले नाहीं म्हणून त्यांना लोकांनीं विचारलें. त्यावर तसा छापखाना नाहीं असें सांगतांच एक गृहस्थ उठून त्यानें ' हलवासीया प्रेस ' आहे, तेथें छापा असें सांगितलें. त्यावर तो जिनिंग म्हणजे कापूस पिंजण्याचा व गठ्ठे करण्याचा प्रेस आहे असें उत्तर दिलें. त्याबरोबर एक गृहस्थ अध्यक्षांच्या टेबलावर चढला व म्हणाला " प्रेस तर आहेना, कांहीं हरकत नाहीं." ( " Never mind all the same it is a press.") ही हकीकत सांगून जनतेच्या अज्ञानीपणाची जाणीव दिली. पण याला जबाबदार कोण हें मात्र सांगितलें नाहीं. 'हिंदु' वगैरे पत्रें सरकारी धोरणावर टीका करतात, कॉंग्रेसचें धोरण उचलून धरतात, गांधींचा त्याला आशीर्वाद आहे. सत्यमूर्तींची तर तो जाहिरात शाखाच आहे, असें असून सुद्धां, सरकार ' हिंदू ' ला जाहिरात देतें, संपादकाला ज्युबिली मेडल देतें, वगैरे मोचक व बोचक माहिती सांगून बुद्धिमान मद्रासी राजकारण, भावना, देशप्रेम यांच्या आहारीं न जातां, व्यवहारीपणें कसा वावरतो याचें उत्कृष्ट उदाहरण स्वतःवरून दाखवून दिलें. दहशतवाद निर्मूलन करण्याच्या कामीं बंगालचे गव्हर्नर अँडरसन यांचे आभार मानून आपल्या राजनिष्ठेचें प्रदर्शन करून, हा अय्या खालीं बसला !

सर महमद याकूब यांनीं कॉंग्रेस व सरकार यांच्यांत कांहीं तरी गुप्त संबंध असून दोघेही देशाच्या प्रगतीस अडथळा करतात असा शोध लावला. युरोपमध्यें मुद्रणस्वातंत्र्य फारच कमी, तुर्कस्थानांत तर नाममात्र, हिंदुस्थानांतच फार आहे, व त्याचा दुरुपयोग होत आहे, म्हणून बिलाची आवश्यकता प्रतिपादिली. सरदार संतसिंग यांनीं युरोपियन व्यापारी लोकांनीं, राजकीय प्रगति हाणून पाडण्यासाठीं कट केला आहे, असा उघड आरोप केला. गांधीजी इंग्लंडमधून परतण्यापूर्वींच सरकारी वटहुकुमाच्या प्रती डॉ. अन्सारी यांना मिळाल्या होत्या, हें डॉ. अन्सारी यांचें १९३२ च्या सुरवातीचें विधान खरें आहे असें सांगून, १९३२ सालीं व पुढें कित्येक वर्षें हिंदुस्थानांत लष्करी कायदा राहील, ही गोष्ट चर्चिल साहेबांनीं १९३१ च्या डिसेंबर ३ तारखेस, पार्लमेंटमध्यें सांगितल्याचें त्यांनीं दाखवून दिलें. ३।१२।३१ रोजीं चर्चिल म्हणाले:)" What are we to Do ? We are to send out Committees to India; they are to roam around

India, large parts of which may be under something like martial law. They will roam around India in places where ordinary constitutional rights are superseded by measures of enforced protection. They are to be subjected to the same sort of ill-usage as that to which the Simon Commission were subjected by the adherents of the Congress Party. India has to be kept in this state of unsettlement perhaps for two or three years.") इंग्लंडच्या धोरणास गोलमेज परिषदेच्या वेळीं काँग्रेसनें मान तुकविली नाहीं म्हणून गांधीजी तेथें असतांच सरकारनें दडपशाही जारी करून स्वातंत्र्याची चळवळ मारण्याचें ठरविलें होतें, हें उघड आहे. खुद्द लॉर्ड विलिंग्डन साहेबांचा मंत्र (" Reform and repression will go to-gether ") हाच होता. पैकीं सुधारणांचा पत्ता नव्हता—त्यांचा वायदा होता, तर दडपशाहीचा बाजार हजर व गरम असून, मार भराभर चाललें होतें.—खुद्द गांधीजींचे खालील शब्द सरदार संतसिंगांनीं वाचून दाखविले. त्यावेळीं सभागृहांतील वातावरण गंभीर झालें. ( " Repression appears to me to be crossing what might be called the legitimate limit, and Governmental terrorism is spreading through the land. Both Engish and Indian officials are being brutalised. The latter, high and low, are becoming demoralised by reason of the Government rewarding as meritorious disloyalty to the people and inhuman conduct towards their own kith and kin. The latter are being cowed down. Free speech has been stifled. Goondaism is being practised in the name of law and order. Women who have come out for public service stand in fear of their honour being insulted, and all this, as it seems to me, is being done in order to crush the spirit of freedom which the Congress represents. Repression is not confined to punishing civil breaches of the common law. It goads people to break newly made orders of autocracy designed for the most part to humiliate them. )" हे शब्द आजही लागू पडतात. किंबहुना ब्रिटिश साम्राज्य-

शाहीचें हें प्रमुख लक्षण आहे. सरदार संतसिंगांनंतर कॉंग्रेसपक्षीय शीख सभासद सरदार जोगेंद्रसिंगांनीं सांगितलें कीं, स्वैरसत्ता मारक असते; ती किती वाढवावी याला मर्यादा राहात नाहीं. व शेवटीं तिच्या अमर्याद घेण्यानें घेणाऱ्याचा नाश होतो असा इतिहासाचा सिद्धांत सांगितला. ते मादकतेचे परिणाम सांगत असतां त्यांचे स्नेही मिस्किलपणें टाळ्या देत होते. युरोपियन ग्रूपतर्फे मि. चापमन मार्टीमरनीं सांगितलें कीं, युरोपियन गट कांहीं दशकांत (in a few decades) हिंदुस्थानाला ब्रिटिश राष्ट्रसंघांत योग्य जागा मिळण्याचा प्रयत्न करीत आहे व तो यशस्वी व्हावा म्हणून हें बिल अवश्य आहे!! कलकत्त्याचा हा तरणा व्यापारी या शिवाय दुसरें काय बोलणार? हिंदुस्थानाचें खरे शत्रु इंग्रज व्यापारी हें या सर्व चर्चेंत अनेक वेळां सिद्ध झालें. असफअली यांनीं दडपशाहीच्या कायद्यांचा इतिहास सांगून, दरवर्षी पन्नास हजारांवर खून होत असतां, सरकार विशेष दखल घेत नाहीं; हजारों गुन्हे होतात, पण सरकार त्या बाबतींत कांहीं करीत नाहीं. राजकारणासाठीं हल्लींचें बिल हा एक डाव आहे, व जे या बिलाला पाठिंबा देतील ते देशाचे शत्रु ठरतील. बी. दास यांनीं म्हटलें, "नवीन गृहमंत्री येतात पण नवीन मुद्देसुद्धां मांडतां येत नाहींत, तेंच तें पुन्हां सांगण्यांत येतें." बंगालमध्यें ज्या गुंडगिऱ्या करून (Black and tan methods) सरकारी अधिकाऱ्यांनीं जुलूम केला, त्या बाबतींत 'नेल्सन कमिटी' व 'अदमी (Adami) कमिटी' यांनीं रिपोर्ट केले होते, ते कां छापीत नाहीं म्हणून प्रश्न केला. गृहमंत्री हेग यांनीं कमिटी नेमली आहे असें सांगून वेळ मारून नेली, पण रिपोर्ट प्रसिद्ध केला नाहीं. बंगाल सरकारचीं कृत्यें, बंगाल पोलीस खात्याचीं कृत्यें, ते रिपोर्ट प्रसिद्ध होतील तर जगापुढें येतील, व त्यायोगें वस्तुस्थिति जगास कळेल. म्हणून सरकारनें रिपोर्ट प्रसिद्ध करण्याचें टाळून येणारी ही काळोखी टाळली, असा उघड आरोप केला. "कॉंग्रेसनें व कॉंग्रेस नॅशनॅलिस्ट पक्षानें शुभ्रपत्रिका फेंटाळली आहे सबब या पक्षांत कोण कोण आहेत, त्यांच्या हालचाली, वगैरे गोष्टी, साप्ताहिक गुप्त रिपोर्टांत धाडाव्यात" असें बंगालमधील पोलीस खात्याचें सक्युलर त्यांनीं वांचून दाखविलें. यावरून बिलाची तयारी कशाकरितां आहे, हें उघड होतें. मि. शर्मांचें भाषण त्यांना स्वतःलाच तिरस्करणीय वाटेल. स्वातंत्र्यप्रेमी कोणाही इंग्रजाला तें आवडणार नाहीं. शर्मा यांचें भाषण संपतांच एकजात गोऱ्या सभासदांनीं टाळ्या वाजविल्या हें 'दास' विसरले. इंग्रजांचें स्वातंत्र्यप्रेम म्हणजे स्वतःच्या देशाबद्दल. आयर्लंड, इजिप्त, हिंदुस्थान, ब्रह्मदेश, या सर्वांची

आठवण दासांना झाली नसेल असें नाहीं. डॉ. दलाल हे सरकारनियुक्त सभासद. त्यांचे चुलत भाऊ पूर्वी सरकारनियुक्त सभासद होते व सभागृहांत बॉंब पडला त्यावेळीं त्यांना जखमा झाल्या त्याबद्दल बक्षीस म्हणूनच कीं काय डॉ. दलाल हे सभासद सरकारनें नेमले. दहशतवाद म्हणजे काय याचा अनुभव आपल्या कुटुंबास आहे म्हणून आपण पाठिंबा देणार असें त्यांनीं जाहीर केलें. अखिल चंद्र दत्त यांनीं सांगितलें कीं, इंग्रजांचा येथील इतिहास म्हणजे विश्वासानें दिलेलीं वचनें निर्दयपणें कशीं मोडलीं, यांनींच भरलेला आहे. लॉर्ड लिटननें म्हटलें होतें कीं, " दोन मार्ग इंग्रजापुढें आहेत, एक वचनें पाळावींत अगर हिंदी लोकांना ठकवावें." ("Two courses are open to the Britishers either to act up to their promises or to cheat Indians.") श्रीप्रकाशजींनीं मध्येंच म्हटलें " त्यांनीं शेवटचा मार्ग पत्करला." ("They preferred the latter.") खुद्द सर नृपेंद्र सरकार यांच्या गोलमेज परिषदेंतलि भाषणांतून जातिनिवाड्यानें व अन्य सरकारी धोरणानेंच दहशतवाद वाढेल अशा अर्थाचीं विधानें श्री. दत्तांनीं वाचून दाखविलीं. ( " The belief that the Hindus cannot have their legitimate share or an effective voice in the Legilatures will be a formidable recruiting agency for swelling the ranks of sympathisers of terrorists. ") खुद्द बंगाल युरोपियन संघाचे अध्यक्ष व्हीलर्स यांचेंही मत तसेंच आहे, हेंही त्यांनीं वाचून दाखविलें. सरकारचे हस्तक कसे दंगे घडवून आणतात याचें विवरण केलें. खुद्द डाक्क्यामध्यें दंगे झाले त्याच्या आदल्या रात्रीं एका मुसलमान गृहस्थांच्या घरीं सरकारी अधिकारी जमले होते. मि. ग्रिफिथ हेही त्या सभेला हजर होते. या सभेच्या दुसऱ्या दिवशीं दंगे झाले. दंग्याबाबत नेमलेल्या सरकारी कमिटीचा रिपोर्ट सरकारनें छापला नाहीं. " मि. ग्रिफिथ यांनीं आपली कामगिरी जरूर येथें सांगावी. " हें म्हणतांच सर्वत्र ' शेम शेमचा ' आवाज झाला. बिचारा ग्रिफिथ खालीं मान घालून बसला. दंगा सुरू होण्यापूर्वीच हिंदूंचीं हत्यारें सरकारनें काढून घेतलीं. मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्यांनीं आपल्या डोळ्यासमोर पोलीस लुटमार करीत होते अशा साक्षी दिल्या, पण सरकारनें कांहीं इलाज केले नाहींत. ज्या ठिकाणीं सुबुद्ध व न्यायी अधिकाऱ्यांनीं दंगे ताबडतोब बंद केले, अगर टाळले, त्यांच्या बदल्या केल्याचें त्यांनीं उदाहरणें देऊन दाखवून दिलें. जेथें डि. मॅ. व डी. एस्. पी. यांनीं दंगे घडवून आणिले असे आरोप

होतें, व पुरावा होता, तेथें सरकारनें पुरावेवाल्या गृहस्थांना बेड्या घालून हिंडविलें, खटले केले; व त्यांत सभागृहांत असलेले 'सोमबाबू' हेही एक होते. 'शेम शेम'च्या आवाजानें सभागृह भरून गेलें. पोलीस जुलमाची अनेक उदाहरणें देऊन पोलिसांच्या मूर्खपणाचींहि कांहीं उदाहरणें दिलीं. वर्षांपूर्वी मेलेल्या माणसांना पकडण्याचीं वॉरंटें घेऊन लोकांना कसें छळलें, हेही सोदाहरण दाखविलें. खोटे खटले कसे भरले, पोलिसांच्या हस्तकांनीच कसे बॉंब तयार करून ठेवले, यांची उदाहरणें सरकारी कागदपत्रांतून, त्यांनीं वाचून दाखविली. विचित्र हुकमांचे नमुने सांगितले. अमुक शाळेंतच मुलांना घाला, अमुक ठिकाणीं रहा, अमुक तासच बाहेर फिरा, शिपायाबरोबर पळा. कित्येक विद्यार्थ्यांना जबरदस्तीनें तास तास पोहण्यास लाविलें हीहि गोष्ट नजरेस आणली. इतकें करून सरकार स्वातंत्र्यलालसा मारण्यांत यशस्वी झालें नाही. सरकारनें वाटल्यास आम्हांस मारावें, आम्ही आत्महत्या करणार नाहीं. या बिलाला आशीर्वाद देऊन—मतें देऊन—आम्हीं आपलें मरण ओढवणार नाहीं. ("You can kill us, but we not can commit suicide ourselves. Therefore, we cannot bless your Ordiance Bill and we won't sign our own political death warrrnt") टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटांत त्यांचें भाषण संपलें. फजलूल हक्क यांनी सुद्धा बिलाला विरोध केला. बंगालमधील भीषण दडपशाहीचे थोडे नमुने सांगितले. डोकें दुखतें म्हणून डोकेंच कापून टाकावें या जातीचें हें बिल आहे; मूळ रोग यानें ज्यास्त वाढेल, तो कमी होणार नाहीं, कारण हें औषधच नव्हे. 'तुम्ही मंत्री असतांना किती जुलमी कायदे केले ते तरी सांगा' असा सवाल अेका 'सरकीवाल्या' सभासदानें करतांच 'सबंध बंगाल कौन्सिलच्या वृत्तांतांत एकही वेळां मी दडपशाहीला पाठिंबा दिलेलें उदाहरण तुम्हांला सांपडणार नाहीं,' हें उत्तर मिळालें. 'आणि म्हणूनच तुम्हीं सर झाला नाहीत!!' अशी श्रीप्रकाशजींची विनोदबुद्धी उद्गारली; त्याबरोबर हंशाच हंशा झाला. ज्याप्रमाणें येथील सभागृहांत कार्यकारी सभासद उत्तरें देतात, वागतात, तशा पद्धतीनें जर इंग्लंडमधील सरकार वागलें तर, इंग्लंडमधील नवजवान जें बंगालमधील नवजवनांनीं केलें तेंच करतील, हे सांगून हकजींची नजर मि. ग्रिफिथकडे वळली. ते म्हणाले, 'हा गृहस्थ चांगला वक्ता आहे पण त्यानें सांगितलेली सर्व माहिती व केलेलीं सर्व विधानें चुकीचीं आहेत. त्याला मी चांगला ओळखतो. इंग्रजांना देशांत काय चालतें, लोकांच्या मनांत काय चालतें,

हें कळणें शक्य नाहीं. ते भाषा जाणत नाहींत, दूर राहतात, स्वतःला शिष्ट समजतात. ' " अहो, मि. ग्रिफिथ यांस बंगाली येतें " म्हणून एकानें खवचटपणें सांगितलें. त्याबरोबर हा बंगाली मिय्या गुरगुरला कीं, " मला जपानी येतें इतकेंच मि. ग्रिफिथला बंगाली येतें. " अधिकारी वर्गाला तोंडपुजे देशी अधिकारी, खोट्या गोष्टी सांगतात. एक कहाणी पण त्यांनीं सांगितली. "एक राजा होता, त्याचा मुक्काम रानांत पडला, कोल्हेकुई ऐकून राजानें दरबारी लोकांना विचारलें, ' काय भानगड आहे ! सरकार कोल्हे थंडीनें कुडकुडत आहेत व म्हणून घोंगड्या मागत आहेत,' दरबारींनीं उत्तर दिलें. दुसऱ्या दिवशीं पुन्हां दरबार चालू असतां पुन्हां कोल्हेकुई सुरू झाली. राजानें विचारलें, ' हें पुन्हां काय आहे ' दरबारी कसलेले मुत्सद्दी; यांनीं उत्तर दिलें " सरकार, आपल्या देणगीबद्दल आभार प्रदर्शन चाललें आहे. " उसळलेल्या हास्यलहरींत सर्व सभासदांनीं भाग घेतला. हक्कांची गोष्ट, नव्या दिल्लींत रात्रीं नेहमीं कोल्हेकुई होतें त्यामुळे लोकांना चांगलीच पटली!! जोंपर्यंत आमजनतेच्या संमतीवर राज्य आधारलें जाणार नाहीं, तोंपर्यंत असलीं बिलें व्यर्थ आहेत असें सांगून त्यांनीं भाषण संपविलें. हक्क हे चांगले वक्ते आहेत, त्यांच्यांत विसंगतीचा दोष अनेक दाखवूं शकतील. प्रसंग कसा साधावा हें ते चांगले जाणतात, असा संधिसाधूपणाचा आरोपही त्यांच्यावर उघडपणें केले गेले आहेत. तीन वर्षें या कायदेमंडळांत जें त्यांचें वर्तन होतें, तें संपूर्णपणें राष्ट्रीयवृत्तीला शोभेल असेंच होतें. पांढरी टोपी कां घालत नाहीं ! म्हणूनही या काळांत त्यांना कांहींजणांनीं खिजविलें. तथापि त्यांनीं आमची साथ, येथें होतें तोंपर्यंत सोडली नाहीं. हक्कांची टोलेबाजी झाल्यानंतर 'विजी' ऊर्फ महाराजा कुमार हे उठले. फार सभ्य, वागणुकीला सरळ, बोलतातही बरे. त्यांनीं तडजोडीनें घेतल्यास बरें असें सांगितलें. तडजोडीनें क्रिकेट मॅचवर पडणारें निरोधन कसें बंद करण्यांत आलें, हेंही सांगितलें. कॉंग्रेसनें नवीन घटना राबवावी, मंत्रिपदें घ्यावीं, म्हणजे हा कायदा पास झाला तरी तो पडून राहील व निरुपयोगी होईल. मनांत एक असून दुसरें बोलावें लागत होतें. हें स्पष्टपणें नजरेस येत होतें. टोले मारण्याची इच्छा होती पण चटकन दांडी पडेल याची भीति होती. भोंवतालचे क्षेत्ररक्षक टवकारून पहात होते. शेवटीं, " बिलाला पाठिंबा देतों " असें न म्हणतां " गृहमंत्री यांना पाठिंबा देतों " असें म्हणून ते बसले; यांतील अर्थ, समजणारे समजले.

पंडित् पंतजी उभे राहतांच सर्वत्र शांतता झाली. या बिलानें महान तत्त्वा-

संबंधीं वाद उपस्थित केला आहे, आधुनिक प्रगति व सुधारणा यांच्या मूलभूत तत्त्वांवर हा घाला आहे. ज्ञानानें प्रगति व सुधारणा होते; ज्ञान मोकळ्या वातावरणांत वाढीस लागतें. खुल्या चर्चेनें व ज्ञान प्रसारानें सर्व शोध व सर्व प्रगति झाली आहे. या बिलानें बाह्यतः शांतता होईल, पण ती तोंडांत बोळा घातलेल्या माणसाची शांतता—स्मशानांतील शांतता—होईल. हें बिल परंपरेला घातक आहे, हें इंग्रजांना शोभणारें नाहीं. १८३५सालीं त्यावेळच्या गव्हर्नर जनरलनें—सर चार्लस मेटकॉफनें—मुद्रण स्वातंत्र्य देण्याचें ठरविलें, त्यावेळीं कांहींनीं विरोध केला, तेव्हां विरोधकांना उद्देशून ते म्हणाले, ( " It rests with them to show that the communication of knowledge is a curse and not a benefit and that the essence of good Government is to cover the land with darkness ; for otherwise it must be admitted to be one of the most imperative duties of a Government to confer the incalculable blessing of knowledge on the people, and by what means can this be done more effectively than by the unrestrained liberty of publication and by the stimulus which it gives to the powers of the mind.") ज्ञान, हा जर शाप नसेल तर त्याची तरतूद करणें प्रत्येक सरकारचें कर्तव्य आहे. ज्ञानप्रसारासाठीं उत्कृष्ट साधन म्हणजे मुद्रण स्वातंत्र्य ठेवून लेखनाला पूर्ण वाव देणें हेंच होय. गेल्या शंभर वर्षांत झालेली प्रगति अल्पतर खरीच, पण तिचें मुख्य कारण ज्ञानप्रसार हेंच होय. १९११ ते २० पर्यंत प्रेस ॲक्टाचें नियंत्रण होतें, तेव्हां छापखाने २७८० पासून ३३७१ पर्यंतच वाढले, म्हणजे सरासरीनें वर्षाला ही वाढ ६० नें झाली. उलट १९२१ अखेर प्रेस ॲक्ट रद्द झाला तेव्हां पासून १९३० अखेरपर्यंत या बाबतींत प्रचंड वाढ झाली. ३३७१ पासून छापखान्यांची संख्या ६५१० पर्यंत गेली; म्हणजे दुप्पट झाली. तीच गोष्ट नियतकालिकें व वृत्तपत्रांच्या बाबतींत दिसून येते. १९११ सालीं ही संख्या २९२४ होती. नंतर १९२० सालीं ३०९३ झाली. म्हणजे १० वर्षांत फक्त १६९ नें वाढ झाली. उलट १९३१ सालीं ही संख्या ४५०० पर्यंत गेली; म्हणजे या दहा वर्षांत (१९२०–३०) १५०० नें भर पडली. नियंत्रण नसलें म्हणजे ज्ञानप्रसार वाढतो हें उघड आहे. ग्रंथांच्या बाबतींत हाच अनुभव येतो. १९११–१२ सालीं ११५८४ ग्रंथ प्रसिद्ध झाले. १९१९–१९२० मध्यें तर ११११०च झाले, त्यांची संख्या घटली. १९३०–३१ मध्यें १७४२७ इतकी

झाली.यांतलें रहस्य उघड आहे. तात्पुरते कायदे कायम करण्याचा प्रसंग येणें हीच एक गोष्ट सदरहू बिल फेकून देण्यास पुरेशी आहे. ज्या औषधानें रोग बळावतो हा अनुभव आल्यानंतर, तें घेणें हें शुद्ध मूर्खपणाचें आहे. १९३२चा कायदा फक्त सत्याग्रहाला हाणून पाडण्याकरितां आहे, हें त्यावेळच्या बिलाच्या उद्देशांत स्पष्ट नमूद आहे. सत्याग्रह सध्या बंद आहे; हें बिल आणण्याचें कारण नाहीं, बिलाच्या उद्देशांत जीं कारणें नाहींत तीं सांगून चालणार नाहीं. जबाबदार राज्यपद्धतीची तयारी करण्याकरितां हें बिल आवश्यक आहे हें कारण खोटें, मूर्खपणाचें व विपरितबुद्धीचें लक्षण आहे. हें हत्यार देऊन तुम्हीं प्रतिगामी प्रांतिक पुढाऱ्यांचा अंमल सर्वत्र बसविण्याचा प्रयत्न करीत आहांत. विरोधी पत्रें व पक्ष मारण्यास हें शस्त्र तयार करून देत आहां. अप्रियतेचा वाटेल तो अर्थ करून, रास्त टीका तुम्हीं बंद करीत आहां. अप्रियता म्हणजे द्वेष असें तुम्हीं सरळ ठरवीत आहां. जो स्तुतिपाठक नसेल तो शत्रु असें वातावरण निर्माण करीत आहां. चापलीनच्या बायकोनें चार्ली द्वेष करतो म्हणून घटस्फोट मागितला. चार्लीनें कळकळीनें सांगितलें कीं, द्वेष करीत नाहीं, प्रेम करतों; पण स्तुति मात्र करीत नाहीं; त्याचें चाललें नाहीं, बायकोला घटस्फोट मिळाला. तीच स्थिति कार्यकर्त्यांची होईल. द्वेष नाहीं हें शाबीत करणें कठीण आहे व होईल. अज्ञात मंत्रिमंडळाच्या हातीं आमचे हक्क व आमचें स्वातंत्र्य देणें धोक्याचें आहे. कोण मंत्री होणार, कोणास ठाऊक ? सर्वांना संरक्षणें पाहिजेत, मग जनतेला कां नकोत ? सिव्हिल सर्व्हंटांनीं घेतलीं, व्यापाऱ्यांनीं घेतलीं. हें बिल फायद्याचें आहे, यांवर भरवंसा ठेवून आम्हीं फसणार नाहीं. ' ईव्ह आणि मेरी दोन चुलतबहिणी होत्या,' पंडितजींनीं कहाणी सुरू केली. ' दोघींचा जॉन नांवाचा मित्र होता. तो डोळयानें चकणा व भसाड्या ओंठाचा होता. लग्न व्हावें अशी त्याची इच्छा. ईव्हनें मेरीला कळकळीनें पण गंभीरपणें त्याच्याशीं लग्न कर म्हणून सांगितलें. मेरी म्हणाली, ' तुला लग्नाचा अनुभव आहे. पूर्वी दोन नवरे होऊन गेले. जॉनची दृष्टि विलक्षण आहे, तूंच कां त्याला पत्करीत नाहींस ! ' बराच वेळ ईव्ह थापा मारीत होती, पण शेवटीं तिनें सत्य सांगितलें, ' हें पहा मेरी, तुझे आईबाप आजाआजी यांचें एकदांच लग्न झालें होतें. स्वभावानें व परंपरेनें तूं निष्ठावान आहेस. माझी आई माझ्या बापाची तिसरी बायको होती व तिचा तो तिसरा नवरा होता. या दृष्टीनें मी जॉनशीं लग्न करणें बरोबर नाहीं. शिवाय तुला पतींचो

सेवा करण्याकरितां पति पाहिजे, मला माझी सेवा करण्याकरितां पाहिजे. तूं लग्न केल्यास तूं सुखी आणि तो सुरक्षित होईल; मीं केल्यास आम्ही दोघें दुःखी होऊं. तथापि सर्व वेळीं मीं तुम्हांस मदत करीन, व मला जमेल तसे दोघांचा अगर व्यक्तिशः एकेकाचा वाटेल तसा उपयोगही करून घेईन ! ! चकण्या व बटबटीत ओठांच्या जॉनशीं ( बिलाशीं ) लग्न लावण्याचा उपदेश करून ही ईव्ह ( नोकरशाही ) मजा पाहूं इच्छिते पण आम्ही तें अशक्य करूं. गोरी नोकरशाही खरी सत्ता हातीं ठेवून नामधारी हिंदी सरकारला केवळ बाहुलें म्हणून नाचविणार हें आम्हीं अशक्य करूं. ' कहाणी संपतांच त्या दिवशींची बैठक संपली, पण लॉबींतून मेरी आणि ईव्ह याशिवाय विषयच नव्हता ! !

पंडितजींनीं सरकारनें जे आक्षेपार्ह उतारे छापून वांटले त्यांची चिकित्सा केली. लिहिणारांवर खटले कां केलें नाहींत ? गुन्हेगार सांपडत नाहींत असें असेल तर पोलिसांची नालायकी शाबीत होते. इतकें करून बिलानें सायक्लोस्टाईलवर काढलीं जाणारीं पत्रें कशीं बंद होतील ? ' जातीयवाद वाढणार, वाढणार ' म्हणून सरकारच बोलूं लागलें कीं तो वाढतोच. एका डि. मॅ.नें पंडितजींना सांगितलेली हकीकत त्यांनीं सांगितली. एक तहशीलदार डि. मॅ. जवळ आला व सांगूं लागला कीं, "जातीय तेढीनें तहशील पेटली आहे, व दंगे होणार हे निश्चित." डि.मॅ. यानें उत्तर दिलें, " परत जा व उद्यां असाच रिपोर्ट आला तर तुमच्या नोकरीबुकांत मी नोंद करून तुमची बदली होईल हें ध्यानांत धरा." दुसऱ्या दिवशीं त्यानें रिपोर्ट केला. ' परिस्थिति निवळली.' तिसऱ्या दिवशीं 'सब ठीकचा' रिपोर्ट दिला! या गोष्टींतील तात्पर्य उघड आहे. अधिकारी निग्रहानें वागले कीं, जातीय तेढ शमते. ते घोरपानें वागूं लागले कीं वाढते. समजा, दंगे झाले तरी असें बिल आणणें योग्य नाहीं. अनेक देशांत दंगे होतात. आयर्लंडमधील उदाहरणें त्यांनीं दिलीं. पण तेथें असलें बिल आणण्याचा शहाणपणा सरकारनें केला नाहीं. पंडितजींनी Workers' Daily; Labour Leader; Soldiers, Voice या इंग्लंडमधील कामगारवर्गाच्या वर्तमानपत्रांतील उतारे वाचून दाखविले. ( " The way to victory lies, not through voting, but through mass struggle. What is needed is a repetition of the general strike." ) साम्यवादी इंग्लंड तयार करण्याकरितां प्रत्येक कामगारानें शस्त्रें कशीं वापरावीं हें शिकलें पाहिजे. जेव्हां लढाई येईल—' Red Signal ' मधील हा उतारा होता—तेव्हां तिचें रूपांतर यादवींत

( Civil War) करून युद्धवादी भांडवलवाले, व त्यांची नालायक पद्धति, यांचा निकाल लावतां येईल. इंग्लंडमधील अटर्नी जनलरनें हे सर्व उतारे १९३४ सालीं पार्लमेंटमध्यें वाचून दाखविले होते. त्यानें साम्यवादी लोकांचा प्रचार कसा चालतो, सैनिकांना उपहारगृहांत, नृत्यगृहांत गांठून त्यांच्या हातांत व खिशांत कशीं पत्रकें वाटलीं जातात, हें कथन केलें. वृत्तपत्रांवर २।३ खटले केले त्याचा परिणाम म्हणजे असला प्रचार तीव्र व गुप्तपणें होऊं लागला. हा इंग्लंडमधील अनुभव येथील सरकारानें लक्षांत घ्यावा असें पंडितजींनीं बजाविलें. इंग्लंडमध्यें इतका कम्यूनिझमचा प्रचार चालत असूनही असलें बिल आणण्यांत येत नाहीं. मूलभूत हक्कांवर गदा आणण्याचें तेथील सरकारच्या मनांतही येत नाहीं. उलट येथें १९३४ च्या मुंबईच्या कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या चित्रपटासमुद्धां बंदी करण्यांत येते. प्रेस ॲक्टाखालीं फक्त सतराजणांची जामिनकीची रक्कम जप्त केली असें सरकार म्हणतें तर ४६०० नियतकालिकें चालविणारांपैकीं सतरा म्हणजे ३०० ला १ हें प्रमाण पडतें. याचाच अर्थ एकंदर लिखाण कायदेशीरच असतें. १०।५ सैनिक वाईट वागतात, १०।२ सिव्हिल सर्व्हंट वाईट वागतात, म्हणून सर्वांजवळून जामीन रक्कम कां घेत नाहीं ? डि. मॅजिस्ट्रेट जर आक्षेपार्ह कोणतें हे ठरविणार, तर सिव्हिल सर्व्हंट हा या देशाशीं इमानदार आहे कीं नाहीं, हेंही ठरविण्याचा अधिकार एखाद्या हिंदी गृहस्थाला द्या ? पण गोऱ्यांचा न्याय हिंदी गृहस्थानें करण्याविरुद्ध केवढा गहजब होतो ! ! एका ॲंग्लो इंडियन तरुणाला हिंदी स्त्रियांवर जबरदस्ती केल्याबद्दल फटक्यांची शिक्षा झाली होती, व ते फटके हिंदी माणसानें मारूं नयेत म्हणून या सभेचे एक सभासद सर गिडने यांनीं लॉर्ड रेडिंग यांना विनंति केली, व इंग्लंडचा माजी मुख्य न्यायाधीश व न्यायखात्याचा प्रमुख यांनीं ती मान्य केली ! ! हिंदुस्थान-सरकारचा मुख्य जर असा वागतो तर अन्य लहान अधिकारी कसे वागत असतील, याची सहज कल्पना येते. छापखाने बंद करून लोक बेकार करतां व पोलिसाच्या सात जागांकरितां पाटणा येथें दोन हजार अर्जदार आले तर त्यांवर लाठीहल्ला होतो. देशांत बेकारांची काय ही स्थिति व त्याबद्दल सरकारची ही काळजी आणि या स्थितींत कांहींनीं निराशेनें, बेफाम होऊन, वाममार्ग पत्करला तर दोषी कोण ? पंडितजी रागानें लाल झाले. आम्हांला बेजबाबदार म्हणतां ? इलबर्ट बिलाच्या वेळीं तुम्ही युरोपियन कसे वागलांत ? फुल्लरचा राजीनामा स्वीकारला तेव्हां कसे वागलांत ? जनरल डायरवर मॉंटेग्यूनें दोषारोप केले तेव्हां कसे वागलात ? गांधी-

अर्विन समझोता झाला त्यावेळीं तुमची काय वृत्ति होती ! खुद्द रॅमसे मॅकडो-नल्ड यांनीं स्वच्छ म्हटलें आहे, " इंग्रजांच्या मालकीचीं पत्रें इंग्रजांचें स्वामित्व आहे तसें रहावें, या मताचीं, व हिंदी राष्ट्राच्या विरोधी आहेत. (" The English-owned papers in varying degrees of aggressiveness are pro-English in the sense that they maintain the British ascendency with all its privileges and are vigilantly anti-Nationalist. " ) हें अक्षरशः खरें आहे. त्यांच्या हिंदविरोधीप्रचारांवर सरकार इलाज करीत नाहीं. हिंदी लोकांबद्दल अपमानास्पद लिहिणें, हें तर ते नेहमींच करतात; त्यांच्या या प्रचाराच्या पद्धतीमुळें तेढ वाढत आहे, हा मॅकडोनल्ड साहेबांचा आरोप कोण नाकारूं शकेल ? प्रेस ॲक्ट व अन्य जुलमी कायदे यामुळेंच सरकार अधिकच बेजबाबदार झालें आहे. राजद्रोह पसरविण्याच्या कामांत, खुद्द सरकारी धोरणच बरेंच कारणीभूत आहे म्हणून सरकार टीका बंद करूं इच्छितें. जुलूम करण्याची सत्ता असली कीं जुलूमच होतो. (" Every foolish Government would like to be able to exercise ab solute power but no people with any regard for liberty will give its Government such power") सरकार वाटेल ती सत्ता मागेल, पण लोकांनीं ती देऊं नये, हें त्यांचें सांगणेंच आम्ही मानणार आहोंत. मुद्रणस्वातंत्र्य हीच खरी शक्ति आहे. पंडितजींनीं शेरीडन याचा प्रसिद्ध उतारा वाचून दाखविला. सरकारच्या हातांत व नियंत्रणाखालीं पत्रें असलीं म्हणजे सरकार वाटेल तें करूं शकतें. पण तेंच मुद्रणस्वातंत्र्य द्या, म्हणजे कोणतेंही सरकार कितीही सत्तावान असलें तरी, तें योग्य मार्गावर येतें. हिंदी स्वातंत्र्य दूर नाहीं. नोकरशाही जाणारच, कारण दडपशाही हें तिच्या इतिहासांतलें शेवटचें प्रकरण आहे. मॅकडोनल्ड साहेबांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, " एखाद्या वृद्ध राजाला पदच्युत केल्यानंतर त्याच्या जागीं येणाऱ्या विरुद्ध 'राजद्रोह, राजद्रोह' म्हणून ओरडत तो जसा जातो तीच गत नोकरशाहीची होत आहे." ("The last chapter in the history of bureaucracies is repression. They pass away like an old monarch driven from his throne, hurling accusations of sedition against his approaching successor " ). दोन तास अस्खलित भाषण करून पंडितजी बसतांच सभागृहांतील सर्व बाजूंनीं टाळ्या कित्येक मिनिटें ऐकूं येत होत्या.

सर महंमद झाफरुल्ला यांनीं लांबलचक भाषण करून बिलांतील कलमांचा तपशीलवार विचार केला. " जीवन हें एका अथांग दरीसारखें असून त्यांवर

मानवी संवय व परंपरा यांची कमान आहे. जर ती कमान तुटली, तर अनर्थ होईल; व ही कमान शासन संस्थेनें नीट ठेवणें हें तिचें कर्तव्य आहे." हें कार्लाइलचें वाक्य मोठ्या जोरानें वाचून सरकारच्या जबाबदारीचें वर्णन करण्यांत बराच भाग खर्ची घातला. राजकीय परिस्थिति व शासन संस्थेची गरज हाच अधिकाराचा गाभा आहे. ( Political conditions and reasons of State are the life-blood of executive action but they have no place in Court of Law) त्यांचा विचार न्यायालयांत करणें अप्रस्तुत आहे, हें मुंबईच्या माजी न्यायाधिशाचें म्हणणें आहे म्हणून प्रेस ॲक्टाचें समर्थन केलें. साहेब बोलला नसता इतक्या तीव्रतेनें, तन्मयतेनें व विरोधकांवर तोंडसुख घेऊन, खाविंदचरणीं आपली सेवा सादर केली. झाफरुल्ला हे कादियानी मुसलमान म्हणून कट्टर धर्मवेड त्यांच्यांत दिसे; व तोच कट्टरपणा राजनिष्ठेतही दिसून येई. ते हुषार कायदे-पंडित आहेत. मुद्देसूद बोलतात. हिंदी प्रथम व नंतर मुसलमान हें त्यांना मान्य आहे असें वाटत नाहीं. मुसलमानांचा पुरस्कार सरकारी मर्जी सांभाळून जास्त होतो हें त्यांना पूर्णपणें अवगत होतें. हेंच त्यांच्या वर्तनाचें मुख्य सूत्र होतें. तथापि ते फार मेहनती, दक्ष व आचरणांत सभ्य असत. त्यांच्या भाषणानंतर युरोपियन गटापैकीं जेम्स साहेब बोलण्यास उठले. व त्यांनीं "झाफरुल्ला यांच्या भाषणानें आपलें काम हलकें झालें आहे" असें सांगून शासन संस्थेनें स्वसंरक्षणासाठीं सत्ता घेणें अवश्य आहे व विद्यमान कायद्यानें ती पुरी नसेल तर खास कायदे करुन तिनें ती हस्तगत केली पाहिजे असें प्रतिपादिलें. सर्वत्र साम्यवाद वाढत आहे, त्याचा कार्यक्रम म्हणजे संपत्तीवाल्यावर गदा, धर्मावर गदा, जमीनदारांवर गदा, तेव्हां त्याला गाडावयाचा असेल, तर जालीम उपाय जरूर करावयास पाहिजेत. हिंदी कम्युनिस्ट पार्टीच्या जाहीरनाम्यांत पुढील वाक्य आहे असेंही त्यांनीं ठांसून सांगितलें. (" Destruction of all forms of representative or democratic government, including civil liberties, such as freedom of speech or the Press, of Assembly and trial by jury.") नागरिक स्वातंत्र्य नष्ट करणें हा सदरहू पक्षाचा उद्देश आहे, हें ऐकून सभासद भुलतील हें त्यांना खरें वाटलें. वास्तविक या बिलानें नागरिक हक्कांची वासलात विद्यमान सरकारच लावीत होतें. लोकशाही तर येथें नव्हतीच. तात्पर्य हिंदी कम्युनिस्ट पार्टीच्या पराक्रमाला व तथाकथित कार्यक्रमाला या बिलानें जागाच

ठेविली नाहीं, हें मात्र जेम्ससाहेब सांगण्यास विसरला; कदाचित हा विनयही असेल! जातीयवाद ही नाजूक बाब आहे व तो कमी करण्यास आम्ही युरोपियन मदत करूं असें सांगून बनविण्याचा प्रयत्न केला; त्याबरोबर सत्यमूर्ति म्हणाले, " अन्यायानें जातिनिवाड्यांत मिळालेल्या ११ जागा सोडा कीं ! ! " त्याबरोबर साहेब सर्द झाला. त्यानें विषयांतर केलें. दहशतवादाला कारण कॉंग्रेस पक्ष आहे असेंही बहकला. दहशतवाद, जातिवाद, साम्यवाद यांवर काय उपाय तुम्ही करणार असा प्रश्न विचारतांच अनेक मुखांनीं ' स्वराज्य ' हाच शब्द आला! साहेब आणखी चिडला " स्वराज्य आलें म्हणजे कांहीं स्वर्गांतून पाऊस पडणार नाहीं." " निदान पडलेल्या पावसाचें पाणी स्वराज्यांत आजच्यासारखे वायां जाणार नाहीं, कालवे होतील " असें एकानें सांगितलें. इंग्रज आहेत म्हणून जगांत स्वातंत्र्य आहे अशी बढाई मारल्याबरोबर ' ईजिप्त, आयर्लंड, अमेरिका, हिंदुस्थान ' हे शब्द ओरडले गेले! इंग्रज नको तर जर्मनी पाहिजे का इटली? असा प्रश्न त्यानें केला. ' आमचें आम्हीं ' म्हणून उत्तर मिळालें. श्रीप्रकाशांनीं, त्यांच्या अखेरच्या वक्तृत्वाच्या सरींत अडथळा केल्याबरोबर साहेब चिडला. "शिस्त असेल तर स्वातंत्र्य सुरक्षित राहील " असें ओरडून खालीं बसला. भाषणांत त्यानें अनेक झटापटीं केल्या, वार खाल्ले व दिलें. विशेषत: सत्यमूर्तींवर त्यांचा फार डोळा होता. जेम्स हे युरोपियन संघाचे वेतनी कार्यकर्ते आहेत. युरोपियन व्यापाऱ्यांच्या हितसंबंधांस जपणें व त्यासाठीं येथील इंग्रजी अंमल कसा कायम राहील याचीच त्यांना काळजी लागल्याचें नेहमीं दिसून येतें. हिंदी आकांक्षांना तोंडदेखली सहानुभूति दाखवून वस्तुत: त्यांना विरोध परिणामकारक रीतीनें कसा करावा हें ते चांगलें जाणतात. मद्रासी सभासदांबरोबर त्यांचें बरेंच रहस्य असे. तथापि मद्रासी सभासदच त्यांच्यावर नेहमी टीका करीत. जिव्हाग्रीं एरव्ही नेहमीं मधुरच शब्द असतात. भाषणाच्या वेळीं हिंदीद्वेषाचें गरळ असें ओकत कीं, क्षणभर त्यांच्या रंगाकडे पाहून माणसानें लुब्ध व्हावें. एकी व्हावी म्हणून म्हणत म्हणत भांडणाची पेरणी होई. युरोपियन गटांतील अन्य सभासद, प्रत्यक्ष व्यापारी आणि धंदेवाले होते; त्यामुळें काय बोलणें तें उघड बोलत. दुसऱ्यांच्या सरळ शब्दांतून वांकडे अर्थ काढणें व स्वत:च्या वांकडया शब्दांचा सरळ अर्थ आहे हें भासविणें हें त्यांना संवयीबजा झालें होतें. व्यवसायी राजकारणी म्हणून त्यांचा प्रभाव विशेष पडत नसे.

मि. जेम्सच्या भाषणानंतर स्वतंत्र पक्षाचे एक प्रमुख सभासद मि. मतीन

चौधरी यांचें भाषण झालें. हे पूर्वीपासून राष्ट्रीय वृत्तीचे मुसलमान होते. त्यांनीं बिलाची आवश्यकता नाहीं. प्रांतिक सरकारांची काळजी करण्याचें कारण नाहीं. सुधारणा येणार म्हणून दहशतवाद मंदावला आहे, असल्या कायद्यानें तो वाढेल. महंमदअली यांच्या 'कामेड'पत्रांत नुसतें 'तुर्की लोकांचे हाल होत आहेत, त्यांना मदत करा' असें निवेदन एका इंग्रजानें काढलें. तें छापलें म्हणून जामीनकी मागितली. कोर्टांत प्रकरण गेलें, तेव्हां मुख्य न्यायाधीश यांनीं महंमदअली यांची स्तुती केली, पण कायद्याप्रमाणें कांही करितां येत नाही असें सांगितलें!! मुसलमान समाज, सरहद्द प्रांत सोडून दिल्यास, सत्याग्रहापासून अलिप्त होता तरीसुद्धां १९३०–३५ पर्यंत ६१ मुसलमानी पत्रांवर प्रेस ॲक्टाचा वरवंटा फिरला व तीं बंद पडलीं. नवीन क्वचितच् या काळांत निघालीं. होणाऱ्या कायद्यानें पुढें जीं पत्रें बंद होतील त्यांची जबाबदारी या बिलाला मतें देणारांवर राहील असें त्यांनीं बजावलें. ता. ५, ६, ९, १० व ११ सप्टेंबर याप्रमाणें ५ दिवस चर्चा होऊन, बरेच वक्ते बोलले होते. आणखीही कित्येकांना बोलावयाचें होतें. कांहीं खाजगी कारणांसाठीं कॉंग्रेसशीं सहानुभूति बाळगणारे सभासद, एक दोन दिवसांत घरीं जाऊं इच्छित होते. दोन्ही बाजूंच्या प्रतोदांनीं ताण करून सभासद जास्तींत जास्त हजर ठेवण्याचे प्रयत्न चालू होते. साधारणपणें ५–६ मतें अधिक मिळून आमचा जय होईल असा अंदाज आम्ही बांधला. ता. ११–९–३५ ला आम्हांला कळलें कीं, मुंबईचे दोन सभासद हजर राहण्यास निघाले आहेत; व त्यांचीं मतें सरकारच्या बाजूचीं नेहमीं असल्यामुळें, अधिक काळजी वाटूं लागली. चर्चा दोन दिवस अधिक चालली तर, आमचे २–३ सहानुभूतीवाले सभासद, बाहेरगांवीं जाणार, सरकाराचे दोन येणार, व कदाचित् आम्ही पराभूत होऊं असें चित्र दिसूं लागलें. ता. ११ लाच दुपारीं नेते भुलाभाई याना मी एकंदर परिस्थिति सांगितली व जर चर्चा १२ लाच संपून मतनोंदणी होईल तर विजय नक्की, व चर्चा लांबल्यास धोका वाढेल. त्यांना हें पटलें. त्यानीं सभागृह नेते सर नृपेंद्र सरकार यांस सहज विचारलें कीं, "किती दिवस तुम्ही चर्चा चालविणार?" त्यांनीं उत्तर दिलें, "तुमची इच्छा असेपर्यंत." यावर भुलाभाई म्हणाले, 'चला! उद्यांच संपवूं' त्यांनीं मान्य केलें, व लागलीच अन्य पक्षांच्या प्रमुखांची मी गांठ घेऊन त्यांची मान्यता मिळविली, व त्याप्रमाणें अध्यक्षांना ही झालेली व्यवस्था कळविली. चर्चा केव्हां संपवावी, व अन्य कामकाजासंबंधीं, अनेक वेळां सर्व पक्ष

संमतीनें जी व्यवस्था होते त्याला 'सद्गृहस्थांचा करार' म्हणतात ("Gentlemens Agreement"). असें ठरलें म्हणजे त्यांत बदल करीत नाहीत. पक्षांतील सभासदांना आदेश देण्यांत आला. अनेक सभासद बोलणार होते, यामुळें ते नाराज झाले. मलाही बोलावयाचें होतें, पण माझी बोलण्याची हौस पुरविली असती तर, पराभव होऊन 'शंख' करण्याची आपत्ति ओढवली असती. एकदम हा निर्णय कां घेतला हें सांगणें शक्य नव्हतें व इष्टही नव्हतें. बरोबर ११ वाजतां सर्व सभासदांनीं आपापल्या जागीं हजर राहावें व प्रतोदाची लेखी परवानगी घेतल्याशिवाय सभागृह सोडूं नये असा माझ्या सहीनें आदेश निघाला.

ता. १२-९-३५ रोजीं पहिलें भाषण श्री. नारायणराव जोशी यांचें झालें. वाटेल तितका जुलमी व अन्यायी कायदा असला तरी कधींही त्याविरुद्ध सविनय कायदेभंग करणार नाहीं अशी आमच्यापैकीं कोणींही शपथ घेतलेली नाहीं व घेणार नाहीं. आर्थिक परिस्थिति हलाखीची झाली आहे, त्यामुळें साम्यवाद थंडावला आहे. नोकऱ्यांची वांटणी योग्य केली म्हणजे जातीयवाद संपेल. दहशतवाद, नवीन सुधारणा येतात हें पाहून, निवत चालला आहे. या परिस्थितींत, हें बिल अनावश्यक आहे, असें प्रतिपादिलें. निरोधन बेकायदेशीर करणें म्हणजे मजुरांचें संपाचें हत्यार बोथटून टाकणेंच आहे. सभास्वातंत्र्य नसेल तर मजूरसंघच निर्माण होणार नाहींत. मालकांच्या आहारीं जाऊन मजूरसंघावर या बिलानें गदा आणणें शक्य आहे. प्रेस ॲक्टावर टीका करून जे शांततावादी आहेत व ज्यांना युद्धें होऊ नयेत असें वाटतें त्यांनीं मग प्रचार कसा करावा ! लिखाणबंद, सभाबंद, संस्थाबंद, या तटबंदींत जे विद्यमान सत्ताधारी आहेत त्यांनाच कायम करण्यासाठीं, हें बिल आहे, असें म्हटलें तर रास्तच होईल." असें सांगितलें. सनदशीर चळवळीला वाव दिला पाहिजे. साम्यवादाच्या चर्चेला बंदी करून सरकार उलट कुतूहल वाढवितें. तो हिंसाप्रधान आहे म्हणून त्याच्या चर्चेला बंदी, तर सरकारनें नाझी व फॅसिस्ट तत्त्वज्ञान प्रसाराला कां बंदी केली नाहीं ! नाझीवाद हा एक विशिष्ट प्रकारचा साम्यवादच आहे. कायदा पास केला तरी त्याची अंमलबजावणी, प्रजेला, नागरिक हक्कांना, घातूक अशीच होईल. सरकारप्रिय व गोरे यांनीं कांहीं केलें तरी खपेल. लोकांच्या बाजूचें म्हणणेंच दडपलें जाईल. तसाच अनुभव आहे म्हणून त्यांनीं आपला विरोध प्रकट केला. यानंतर सर यामीनखान उठले. यांच्या पूर्वजानें म्हणे पानपतच्या लढाईत पराक्रम गाजविला होता. भाऊसाहेबांच्या शवास धर्माप्रमाणें

संस्कार करवून आदर दर्शविला होता. सरकारनें जहागिऱ्या कायम ठेविल्या, मान-मरातब वाढविले म्हणून राजनिष्ठ राहणें आपलें कर्तव्य आहे, असें नित्य मानणारे हे गृहस्थ आहेत. त्यांनीं जातीय दंग्याच्या कहाण्या सांगितल्या. हरताळामुळें टांगेवाल्यांचें नुकसान होतें म्हणून अश्रू ढाळले. १९३२ सालीं, दडपशाहीचें बिल सभागृहांत आलें तेव्हां कॉंग्रेसवाल्यांनीं विरोध करून बिलाला अडथळा उत्पन्न केला. 'M. L. A.' म्हणजे 'Member Lunatic Asylum' असें म्हणून आमची टिंगल केली, आणि आतां तर स्वतः ते तेंच अभिधान घेऊन येथें आले आहेत !! 'पण येथें कांहीं निर्ढावलेले आहेतच' ! ("There are certain Habituals") एका सभासदाची वाणी उद्गारली. जमीनदारींत, 'खंड देऊं नका' म्हणून कुळांना, सांगतात. मुसलमान पत्रें हिंदु विरुद्ध वाईट लिहितात, शिया-सुनी वाद वाढवितात, म्हणून प्रेस ॲक्टांतील कलमें आवश्यक आहेत. हीं पत्रें कशी प्रचार करतात यांचीं कात्रणें आपण ठेवलीं आहेत अशी माहिती दिली. मुसलमानी धर्म सहिष्णुता शिकवतो. "लाकुम दीनाकुम वाले यादीन." तुला योग्य वाटतें तें तूं मान, मला जें वाटतें तें मी मानीन; हें सर्वांनीं मानलें तर चांगलें. पण जोंपर्यंत तें होत नाहीं तोंपर्यंत सरकारचें कर्तव्य आहे तें सरकारनें पार पाडलें पाहिजे, व त्या कामीं आपण सरकारलाच पाठिंबा देणार असें सांगितलें. नंतर शौकतमिया उठले. त्यांनीं प्रथम पं. जवाहरलालला सरकारनें मुक्त केल्याबद्दल सरकारचें अभिनंदन केलें. (सौ. कमला नेहरु अत्यवस्थ होत्या म्हणून सरकारनें त्यांना सोडलें ही बातमी सभागृहांत त्याच वेळीं समजली होती.) पं. जवाहरलाल हे एक सभ्य गृहस्थ आहेत असा दाखला मोठ्या भाईनें दिला. आपण स्वभावानें "शांतताप्रिय" आहोंत, असें सांगितलें !! सभासद त्यांच्या विशाल देहाकडे पाहूं लागले. महंमद-अल्ली—त्यांच्या प्रत्येक भाषणांत महंमदअल्लींचा उल्लेख होई—व आपण किती कष्ट केले, किती अपमान सोसले, किती छळ सोसला, याची जर नोंद केली तर त्या कागदांचें ओझें, गृहमंत्री यांना उचलणार नाहीं. मि. ग्रिफिथ शूर आहेत, त्यांचें भाषण चांगलें झालें, पण त्यांनीं आपणांस निवडणुकीच्या प्रचारांत मिदनापूर येथें बंदी करूं नये अशी गंभीर सूचना पण दिली. मि. जेम्सला वाटतें त्यांचीं मुक्ताफळें, मी, अणे, संतसिंग, लालचंद—जातिनिष्ठ—चांगलीं म्हणूं. पण त्यानें याद राखावी कीं, पूर्वीचे दिवस गेले. महायुद्धांत हिंदी लोक लाखांनीं मेले व त्यांनीं ब्रिटिश साम्राज्य राखिलें. स्वयंनिर्णयासाठीं झालेल्या युद्धाचें आम्हांला काय

बक्षीस मिळालें ? तर, हजारों हिंदु, मुसलमान, शीख, या सर्वांना एका गोऱ्या बाईचा अपमान केला म्हणून, पोटावर फरफटावें लागलें. जे डायर व ओडवायरनें पूर्वी केलें, तें करूं नका असें मला गृहमंत्री यांना सांगावयाचें आहे. लोकांना नाकांनीं लिहावयास लाविलें, साधूंना चुना फांसला, " माझे शिपाई येऊन तुमचे लहंगे वर करतील " अशी धमकी पण बॉसवर्थ स्मिथसाहेबानें शेखपुरा जिल्ह्यांतील स्त्रियांना दिली! नाना अत्याचार झाले, पण देश शांत झाला नाहीं. लाखोंना तुरुंगांत घातलेत, अनंत हाल केलेत. प्रत्येक सनदी नोकर परीक्षा पास झाल्यानंतर ३ महिने तुरुंगांत ठेवावा, म्हणजे पुढें नोकरींत नीट वागेल असाही उपाय मियांनीं सुचविला. प्रेस ॲक्टाखालीं पहिला खटला आपले बंधू महंमद अलीवर भरला गेला. जज्जानें सांगितलें, "काय करूं ? कायदा विलक्षण आहे. तुम्हांला पत्र देतां येत नाहीं, पण कीर्ति मात्र परत देतों." ( " I can not give you back your paper, but I give you back your Honour. ) १९०८ ते १९३५ इतका काळ दडपशाही केली; आतां दुसरा मार्ग पत्करा. " मियाभाईंनीं गोष्ट सांगितली. " लंडनमध्यें पिक्याडिली भागांत, रात्रीं मुक्ती फौजेंतील एक अधिकारी, 'या, या, तुम्हांला मोक्षाचा मार्ग दाखवितों' असें ओरडत होता. एका इंग्रज सद्गृहस्थानें त्याला विचारलें, 'तुला हा मोक्षमार्ग माहीत आहे कां ?' 'होय.' 'कशावरून' ? आज ४० वर्षे या मार्गावर मी आहे. यावर सदरहू इंग्रज जो व्यवस्थित जेऊन व पिऊन क्लबांतून निघाला होता, तो चष्मा सांवरून म्हणाला 'चाळीस वर्षांत तुझी प्रगति फक्त पिक्याडिलीपर्यंतच झालेली दिसते, तरी माझा सल्ला तुला असा आहे कीं आतां दुसरा रस्ता शोध. " गोष्ट संपतांच एवढा हंशा पिकला कीं, पांच मिनिटें मिया स्तब्ध राहिले. शेवटीं आतां ही नीति पुरे करा, नवीन पान उघडा, लोकांशीं तह करा. याप्रमाणें न केल्यास भावी काळाची जबाबदारी सर्वस्वी सरकारावर राहील," असें सांगून अलीबंधूंची ' थोरली पाती ' खालीं बसली.

श्री. अणे यांनीं बिलाची आवश्यकता बिलकूल नाहीं असें सांगून ज्या गोष्टी टाळाव्यात म्हणून हें बिल करण्यांत येत आहे, नेमक्या त्याच गोष्टी हें बिल पास झालें तर होतील, असें भविष्य केलें. असले उपाय वरवरचे आहेत, त्यानें रोग उलट बळावतोच. सरकारनें दडपशाही सुरूं केली कीं प्रतिक्रिया म्हणून दहशतवाद, साम्यवाद, जातीयवाद यांना अनुकुल वातावरण मिळून ते फोंफावतात.

("If, the executive creates a reign of terror in this country by the indiscriminate use of the extraordinary powers, as they have been doing, I am sure, they are creating the very conditions under which the disruptive forces like Communism and terrorism can thrive and prosper. This is no cure for the remedy. On the other hand, it may aggravate the disease in such a manner that you will be bound to regard it as hopeless and beyond the scope of any remedy soon afterwards. Wait and see.") सरकारच्या त्या वेळच्या धोरणांत व आजच्या धोरणांत कांहीं फरक पडला नाहीं. फक्त श्री. अणे आज सरकारांत आहेत व केलेलें भविष्य, पुरें करण्याची जबाबदारी पत्करून बसले आहेत !! अणे पुढें म्हणाले कायदा कायम केल्यानें चळवळी बंद पडतील तर तेंही शक्य नाही. यांतील पुढारी, गृहमंत्री याना वाटतात त्यापेक्षां जास्त दृढनिश्चयी आहेत. त्यांचें हृदयपरिवर्तन या मार्गानें होणें शक्य नाहीं. स्वातंत्र्य प्राप्ति झाली तर हें शक्य आहे. असल्या बिलांनीं चळवळ गुप्त रीतीनें वाढेल येवढाच फरक होईल. देशांतील प्रमुख पक्ष आज कार्यक्रम बदलून सभागृहांत आहे–तुम्ही कोणता बदल केलांत ? योग्य मार्गा-वर चळवळ येतांच दडपशाहीचे कायदे रद्द करूं असें हजारदां सांगितलेंत व आतां तर त्यांत भर घालतां ! सभागृहानें अनेक वेळां जनमत मागील अधिवेशनांत जाहीर केलें, तें तुम्ही मानलें कां ? सनदशीर मार्गानें चाललें कीं, तुम्ही जनमत मानत नाहीं. १९३५ चा सुधारणा कायदा चांगला चालावा म्हणून हें बिल आणलें असें सांगतां, तर दोन्ही रद्द करा, कोणी रडणार नाहीं. मंथरेप्रमाणें तुम्ही सल्ला देत आहांत. कैकयीनें मूर्खपणानें तो ऐकला, तर राम १२ वर्षें वनांत जाईल; पण भर-ताला राज्याभिषेक होणार नाहीं. उलट दशरथ मरेल, स्वतः कैकयी विधवा मात्र होईल ! ! लोकाभिराम राम, अयोध्या प्रवेश करील हें भाविष्य निश्चित समजा. वेळींच सावध व्हा व स्वीकारीत असलेला मार्ग सोडा. अणेजी बसले–कॉंग्रेस पक्षानें टाळ्या वाजविल्या. ज्या मार्गानें सरकारनें जाऊं नये म्हणून हा महाभाग सरकारला व्यासाप्रमाणें (ऊर्ध्व बाहुर्विरोम्यपः) हात वर करून सांगत होता, त्याच मार्गावर सरकार कल्पनातीत वेगानें जात असतां, त्याच्या रथाचें सारथ्य आज त्याला करावें लागत आहे हें दृश्य पाहून, कर्माची गति गहन असतें हेंच खरें असें म्हणावें लागतें!

सभागृह नेते सर नृपेन्द्र उठले, व आपण फक्त घडामोडी सांगणार आहोंत,

कदाचित् त्यामुळे वातावरण गरमही होईल अशी प्रस्तावना करून युगांतर, संध्या, सारथी, वगैरे वर्तमानपत्रांनीं बंगालमध्यें दहशतवादाचा प्रचार केला असा इतिहास सांगितला. " मुक्ति कोंनि पथें " ह्या पुस्तकांत युगांतराचे लेख एकत्र छापले होते. याच्या हजारों प्रति बंगालमध्यें वाटल्या गेल्या. तरुणांचीं डोकीं फिरलीं. क्रान्तीचें शिक्षण युगांतर उघड उघड देत असे. क्रान्तीचें तंत्र बंगाल हळूंहळूं शिकूं लागला. खून, दरवडे, यांची प्रणाली सुरू झाली. प्रेस ॲक्ट आला. कांहीं पत्रें बंद पडलीं. दुसरीं सुरू झालीं. १९२२ सालीं प्रेस ॲक्ट रद्द केला. सरकारनें धोका पत्करला. प्रांतिक सरकारें विरुद्ध होतीं. परिणाम असा झाला कीं, बंद वर्तमानपत्रें पुन्हां सुरू झालीं. तींच माणसें, तीच व्यवस्था. नांवेंही तींच, जसेंच्या तसेंच ! १९२६ मध्यें पबना येथील दंग्याच्या वेळीं ' आनंदबझार पत्रिके 'नें वाटेल तें लिहिलें. मौलवींनीं मुसलमानांना सांगितलें कीं, सरकारनें तुम्हांस हिंदूंना लुटण्यास ८ दिवस मुभा दिली आहे. पबना जिल्ह्यांतील खेडीं स्मशानें झालीं आहेत. हिंदू देवता फोडल्या गेल्या. स्त्रियांची विटंबना झाली. तरीसुद्धां हाजी गझनवी व सर रहीम, हे या कृत्यांचा निषेध करीत नाहींत! 'शक्तीनें' लिहिलें, " मुसलमान धर्म म्हणजे दैत्य धर्म कीं काय ? " 'हिंदुस्तान'नें लिहिलें, " मुसलमान लुटारूंच्या भीतीनें स्त्रिया जंगलांत पळाल्या असून हिंस्र पशूंबरोबर त्यांना रहावें लागत आहे. गुंडाच्या टोळ्या सर्वत्र हिंडत आहेत. " 'जागरन'नें लिहिलें " हिंदु विधवा भ्रष्ट करा. स्त्रियांना विधवा ठेवणें धर्मास मान्य नाहीं. " 'फॉरवर्ड'नें लिहिलें कीं, ' सर रहीम यांची स्वतंत्र पक्ष काढण्याची योजना पुरी होण्याकरितां झालेलो जातीय तेढ, अद्यापि सर स्टीफनसन यांना पुरेशी वाटते असें दिसत नाहीं." 'सर्व्हंट'नें लिहिलें कीं, 'हिंदुद्वेषाची लाट, त्यांच्या देवता भ्रष्ट करण्याची, घरें लुटण्याची, स्त्रियांची विटंबना करण्याची, जी वाहिली त्याचा परिणाम हिंदूंना सर्वत्र मुसलमान शेजाऱ्यांची भीति वाटण्यांत होत आहे. पबना येथील दंगा अगदी क्षुल्लक होता. पण वर लिहिलेल्या लेखांमुळें, खोट्या व अतिशयोक्तिपूर्ण लेखांमुळें, तो वाढला. जो दोन दिवसांत शमला असता तो कित्येक महिनेपर्यंत चालला. बंगाल सरकारनें मग खास कायदा केला व तो पास होण्याच्या कामीं हक यांनीं मदत केली असा सरकारनी टोलो मारला—हक मिया म्हणाले " भाडोत्र्यांचें तें मत होतें " ( It was a hirelings vote ). हक यांची स्मरण शक्ति विशेष नाहीं. त्यांनीं दडपशाहीच्या कायद्याच्या बाजूनें बंगाल कौन्सिलांत मत

दिलें आहे. सर नृपेन्द्र सरकार यांची चढाई सुरू झाली आणखी अनेक उतारे त्यांनीं वाचून दाखविले. एका "वर्षांत युगांतरावर ५ खटले केले. वाटेल ती क्षुद्र माणसें संपादक होऊं लागलीं. हा काय ज्ञानप्रसार-हें काय लोकशिक्षण ! खुनांची स्तुति होऊं लागली, दरवडे देशभक्तिचे निदर्शक ठरविले जाऊं लागले." बंगालमध्यें झालेल्या खुनांची यादी त्यांनीं वाचली. कृष्णदास यांनीं गांधीजींना लिहिलेलें पत्र जें सरकारनें मध्येंच दाबलें तें त्यांनीं बाहेर काढून वाचण्यास सुरवात केली! युगांतर गट व अनुशीलन गट, यांच्या भांडणांत बंगालचें राजकारण कसें बिघडलें आहे, दोन्ही गट अहिंसेला न मानणारे कसे आहेत, प्रांतिक कॉंग्रेस कमिटींतील व कलकत्ता कॉर्पोरेशनमधील अधिकाराकरितांच यांचें वांकडें आहे, वगैरे मजकूर सर नृपेंद्र यांनीं सटिक सांगितला. हें पत्र सरकारी हेराचें नाहीं. जें यांत लिहिलें तीच माहिती सरकारची होती. सरकारनें म्हणून जे कायदे केले, ते योग्य होते, असाही निष्कर्ष काढला. "दहशतवाद कायम आहे, जातीयवाद जोरांत आहे, साम्यवाद प्रभावी होत आहे; कॉंग्रेस आहे तोंपर्यंत सत्याग्रह, राहणारच, असें खुद्द कॉंग्रेसवालेच म्हणतात, या स्थितींत विद्यमान बिल पाहिजेच. मुद्रणावर बंधन पाहिजे. नुसता कल्पनांचा प्रचार ठीक, पण त्यापुढें प्रगति होते. साम्यवादाच्या नांवावर स्त्रियांचें राष्ट्रीयकरण करा असेंही सांगितलें जातें." सभागृहानें नाराजी प्रकट केली. त्यांना अडथळे होऊं लागले, त्यांची विचारमालिका तुटली, बाचाबाची झाली. सभागृहांतील वातावरण गरम झालें. सत्यमूर्तींच्या जुन्या भाषणांतील उतारा वाचण्यास त्यांनीं सुरवात केली "तो चुकीचा आहे, शिवाय, 'मद्रास मेल'नें तो विपर्यस्त रिपोर्ट केला आहे," अशी तक्रार सत्यमूर्तींनीं केली. सरकार यांनीं अन्य पत्रांत तसाच रिपोर्ट आहे असें सांगितलें." मी तामीळमध्यें बोललों, रिपोर्टरना समजलें नाहीं" असें अय्या म्हणाला. "ही तामीळ भयंकरच दिसतें" दर वेळीं इंग्रजींतील चुकासाठीं सत्यमूर्तींना हिचा आश्रय घ्यावा लागतो"-सरकारनीं टोला मारला-"मला ही भाषा येत नाहीं फार आनंद वाटतो. सत्यमूर्तींना इंग्लंडमधील कायदे फारसें माहीत नाहींत. या सभागृहांत कायदे मोडणारे मोठ्या संख्येनें उपस्थित आहेत, त्यांना कायदे करा म्हणून सांगणें जरा कठीणच आहे. त्यांची दृष्टि विद्यमान सरकारला जें उपयोगी पडेल त्याला विरोध करावयाचा, हीच आहे. हें सरकार जर या कायद्यानें नीट चालणार असेल, तर हे लोक त्याला विरोध करणार. ज्यांना सरकार चालावें असें वाटतें त्यांनीं या बिलाला पाठिंबा द्यावा"!! असें सांगून सर नृपेंद्र एकदाचे बसले.

त्यांच्या भाषणानें विरोधकांनाच जास्त फायदा झाला, कदाचित् वक्त्यानेंही तें अपेक्षिलें असेल !!

भुलाभाईंनीं भाषणाच्या सुरुवातीस ज्यायोगें विद्यमान सरकारास मदत होईल, व आमच्या देशाचें नुकसान होईल अशा कोठल्याही गोष्टीला काँग्रेस पाठिंबा देणार नाहीं, ही गोष्ट उघड आहे; त्यांत लाजण्याचें कारण नाहीं, असें सांगितलें. सर नृपेंद्र यांनीं बिलाला सोडून भाषण करून, व्यक्तिगत टिंगल करून, चर्चेत ज्या सरकारी सभासदांना कसेसें वाटूं लागलें होतें, त्यांच्या मनाला थोडा विरंगुळा उत्पन्न केला, यानें सरकार यांना समाधान वाटल्यास वाटो, पण चर्चेतील उच्च वातावरण त्यामुळें नाहीसें झालें. कायदेभंग करणारे आम्ही आहोंत. पण कोणते कायदे मोडले व मोडणार, याचा विवेक समजून घेतला पाहिजे. समोर बसलेल्या इंग्रज सभासदांपैकीं राष्ट्राच्या हिताविरुद्ध जाणारा, सद्विवेकबुद्धीला विरोध करणारा कायदा मोडणारे अनेक सभासद प्रसंगीं निघतील तीच गोष्ट आम्ही करतों. व्यक्तिगत टीका मी क्षुद्र नीति समजतों. मागील अनुभव विसरून सनातन तत्त्वासाठीं, राजशासन सत्तेच्या कल्याणाकरितां, आम्ही विरोध करीत आहोंत. कायदा म्हणजे शासन सत्तेचा हुकूम. पण नागरिकांनीं तो मानावा अशी अपेक्षा सदरहू सत्तेनें करण्यापूर्वीं, तो सार्वजनिक हिताचा आहे; समाजाच्या कल्याणाचा आहे म्हणून त्याचें पालन करणें, नागरिकांचें कर्तव्य आहे, ही परिस्थिति असावयास पाहिजे. ज्या कायद्यांत न्याय नाहीं, देशाचें कल्याण नाहीं, देशाची प्रगति नाहीं, तो मी मोडला, त्यांत कमीपणा मला वाटत नाहीं. असे कायदे जसेजसे जास्त कराल, तेवढ्या प्रमाणांत त्यांचा निषेध, त्यांना विरोध व भंग वाढत जाईल हें लक्षांत ठेवा. जनतेच्या संमतीवरच शासन सत्ता अधारलेली आहे नागरिकांचें स्वातंत्र्य मर्यादित करण्याचा तुमचा हेतु उघड आहे. आमचाही विरोध उघड आहे. जनतेचें मत, तुम्हांस क्षुद्र वाटतें, सत्तेच्या मदांत तुम्ही धुंद आहांत तें लाथाडत आहांत, फार काळ हें चालणार नाहीं. लायकीप्रमाणें, प्रत्येक देशाला सरकार व स्वातंत्र्य मिळतें, असें जेम्सनें काल मोठ्या तोन्यानें सांगितलें. मुद्रणस्वातंत्र्याला आम्ही लायख आहोंत, म्हणूनच आम्ही हें बिल ठोकरणार आहोंत. स्वाभिमान व राष्ट्रीयवृत्ति असलेला प्रत्येक सभासद हेंच करील. जुलमी सत्तेपुढें आम्ही मान वांकविणार नाहीं. सत्याग्रहाची, गांधींची तुम्ही कितीही टवाळी केली तरी, त्यानें सत्य कमी होणार नाहीं. थोड्या कुटाळांच्या

टाळया पडतील. या चर्चेत व्यक्तींचा प्रश्न नाहीं. व्यक्तींमधलि प्रश्न नाहीं. गांधी आणि सरकार असाही प्रश्न नाहीं. कोण, कोणत्या वेळीं, काय म्हणाले, हाही प्रश्न नाहीं. सनातन तत्त्वांचा प्रश्न आहे. मुद्रणस्वातंत्र्य पाहिजे, मग पिनल कोडांत थोडेसें तें मर्यादित आहे म्हणून तेंही कोड अगर कायदा, रद्द करा अशी कोटी करणें, जबाबदार मुत्सद्यांना शोभत नाहीं. स्वातंत्र्य दिल्यानें, ज्ञानप्रसार झाल्यानें जनतेचें हित होतें ही गोष्टच तुम्हांला मान्य नाहीं असें दिसतें. कायदे करावे, सत्ता वाढवावी, मनमुराद त्यांची अंमलबजावणी करावी, हीच तुमची दृष्टि आहे; व्यापकपणें पाहूं शकत नाहीं, दूरदृष्टी तर नाहींच नाहीं. या बिलाला पाठिंबा दिला तर, तुमचा अभिमान राहील, तुमचें शील लायक ठरेल, तुमचें स्थान कायम राहील असें मानण्याचें कारण नाहीं. कारभाराची सोय, ही कसोटी नसून, जनतेचें कल्याण ही कसोटी आहे. राज्यकर्त्यांनीं राज्य केलें पाहिजे (Government must govern) असें म्हणून भागत नाहीं. जनता म्हणणार योग्य तऱ्हेनें राज्य केलें पाहिजे; नाहींतर जागा खालीं केली पाहिजे. आम्ही म्हणूं तेंच योग्य हें चालण्याचे दिवस संपले. प्रेस अॅक्ट केला आणखी छप्पन कायदे केलेत तरी, जनता दडपली जाणार नाहीं. नुसत्या लिखाणांनीं क्रान्ति होत नाहीं. फ्रेंच क्रान्तीला देशांतील दारिद्र्य पण कारणीभूत झालें. देशांत दहशतवाद आला व वाढला, याला कारण तुमचें धोरण. खुनी माणसाला तुम्ही मारलेत कांहीं हरकत नाहीं, पण त्यानें केलेलें कृत्य, काय हेतूनें केलें हें सुद्धां पाहिलें पाहिजे. कायद्यानेंसुद्धां हेतु लक्षांत घ्यावा लागतो. कृत्य करण्यास प्रवृत्ति होते, ही सामाजिक बाब आहे, तुम्हीच तसें वातावरण निर्माण केलें, व करीत आहां; तुम्ही जबाबदारींतून सुटूं शकत नाहीं. तुम्ही वाटेल तें केलेंत, राजसत्तेनें वाटेल तें केलें, त्याचा 'होयबा' म्हणण्यांत राजनिष्ठा खास नाही. क्रान्तिकारक गुन्हे करतात, पण तेच यशस्वी झाले म्हणजे, 'कायद्यानें प्रस्थापित झालेलें सरकार' होतें हा इतिहासाचा दाखला आहे. तुम्हाला राज्य कसें करावें हें समजत नाहीं. मूळ रोग तसाच, भलतेच उपाय अंमलांत आणीत आहांत; कांही चिरकालीन तत्त्वें आपण मानलीं पाहिजेत. तुमच्या देशांत तुम्ही तीं मानतां, मग तीं आम्ही येथें मानलीं तर, आम्ही नालायक झालों, नष्ट झालों ? आम्हांस दुसरीं तत्त्वें लावून, कमी लेखणें, ही गोष्ट करूं नका. यांत प्रत्येक इंग्रजाची बेअब्रू आहे. अमुक जागीं राहा, अमुक ठिकाण सोडूं नका, न ऐकल्यास २ वर्षे सजा, यांत काय न्याय झाला हें तरी सांगा.

कायद्यानें अधिकार दिला म्हणून मॅजिस्ट्रेटनें ही शिक्षा मला दिली. पण यांत न्याय कोठें आहे ? तीच गोष्ट निरोधनाची, तीच गोष्ट मुद्रणस्वातंत्र्याची. सर्वत्र तुम्ही कायदे करून न्यायाचा निकाल लावलात. "लेख चांगले आहेत, त्यांत गुन्हा नाहीं, पण कायदा सांगतो कीं, तो लेख सरकारनें आक्षेपार्ह ठरविला," न्यायाधिशानें नाइलाज म्हणून तो छापल्याबद्दल सजा केली, असें अनेक वेळां घडलें. खुद्द बायबल जर सरकारनें आक्षेपार्ह ठरविलें तरीसुद्धां, कायद्यानें त्यांना अधिकार दिला आहे. वाटेल ती संस्था बेकायदेशीर करण्याचा अधिकार दिला आहे. अमूक एक गोष्ट झाली असें फार तर शाबीत करतां येईल, पण एखाद्या गोष्टीचें अस्तित्व नाहीं, ती झाली नाहीं ( Negative ) हें कसें शाबीत होईल ! व संस्था बेकायदेशीर कृत्यें करीत नाहीं, लिखाण आक्षेपार्ह नाहीं, हें आरोपीनें सिद्ध करावें, असें सांगणें म्हणजे कायद्याचें मूलभूत तत्त्व उलटें करणें आहे. गुन्हा सरकारनें शाबीत करावयास पाहिजे. आरोपी हा निरपराधी आहे, असेंच प्रथम मानलें पाहिजे. ही सर्व तत्त्वप्रणाली तुम्ही पार झुगारून देत आहां. अभाव ( Negative ) शाबीत करणें किती कठीण आहे. सहाजोग माणसांना आमच्या कायद्यांपासून भिण्याचें कारण नाहीं, गुंडांचा विचार आम्ही करीत नाहीं असें म्हणणें वेडेपणाचें आहे. आवश्यकता, प्रयोजकता, सामाजिक हित, या कसोटीनें प्रत्येक कायदा पहावा लागतो; व या कसोटीला हें बिल उतरत नाहीं, म्हणूनच आम्ही याला विरोध करीत आहोंत." ( "The test of a good law is the necessity of it, its propriety, its subservience for the good of the society; there is no other test and we stand by that test; and hence we oppose this." ) विवेकी, वेगवान, विचारप्रवर्तक, तल्लीन करून सोडणारें हें भाषण संपतांच, एक प्रकारचें उच्च वातावरण सभागृहांत निर्माण झालें. बाहेर अंधार पडत होता. ६॥ वाजून गेले होते; पण आज मतनोंदणी ठरली होती म्हणून, सभा पुढें चालू झाली.

गृहमंत्री क्रेकसाहेब उत्तर देण्यास उभे राहिले. आज चर्चा संपवावी, या बाबतींत तरी मतैक्य आहे, ही एक भाग्याची गोष्ट आहे. दोन नाणावलेल्या कायदे-पंडितांच्या भाषणानंतर, एक नुसता कारभारी ( Mere Administrator ) यांचें भाषण कितीसें बठणार, असें प्रास्ताविक बोलून, गंभीरपणें, त्यांनीं सांगितलें कीं भाषणें ऐकण्याइतकाच तीं करण्याचा तिटकारा आपणांस आहे. ६ दिवस चर्चेच्या

वेळेस सभासद बसत, उठत, स्वतःस मात्र सारखें येथें हजर राहून प्रत्येक शब्द ऐकणें भाग पडे. आतां उत्तर देतांना झोंप न आली म्हणजे मिळविली !! बिला-कडे वळून त्यांनीं प्रतिपादिलें कीं प्रत्येक लिखाण कोर्टाकडे आक्षेपार्ह ठरविण्यास नेणें कठीण आहे. ' रंगीला रसूल ' हें सरकारनें आधींच आक्षेपार्ह ठरविलें तरी त्याच्या कर्त्याचा खून झाला !! जास्त हानी व हाहाःकार होऊं नये म्हणून असा अधिकार, अंमलबजावणी करणारांकडे असणें जरूर आहे. निरोधनही त्याचकरितां नियंत्रित पाहिजे. " हिंदुशींच व्यवहार करा " " मुसलमानांकडून विकत घ्या " असें आतां होऊं लागलें आहे. जे असें न करतील त्यांना त्रास होतो, व यामुळें व्यक्तिस्वातंत्र्य हिरावलें जातें. 'ब्रिटिश मालांवर बहिष्कार' एवढ्यांवर तें थांबत नाहीं. सर्व राजद्रोही लिखाणांचीं कात्रणें, मी मांडलीं तर त्यांचा एक ढीगच होईल. नमुना म्हणून मी एक चोपडें सभासदांना वाटलें आहे. तेवढेंच लिखाण आक्षेपार्ह सांपडलें हें खरें नाहीं. जबाबदारीनें केलेल्या योग्य व रास्त टीकांना कांहींही भीति नाहीं !! क्रान्तिकारकांबद्दल कोणाला कांहींही वाटो, मला तें पिसाळ-लेल्या कुत्र्यांप्रमाणें व घातुक जनावरांप्रमाणें ( Mad dogs and dangerous animals ) वाटतात, दहशतवाद कमी झाला नाहीं. आमचें हेरखातें उत्कृष्ट आहे, आमची माहिती बरोबर आहे, जातीयवाद नाहीं म्हणण्यांत अर्थ नाहीं. साम्यवाद तर जोरांत आहे. सामान्य वादानें या गोष्टी शमणार नाहींत. सत्यमूर्ती, मद्रासचे मुख्य प्रधान होऊं इच्छितात. त्यांचे शत्रु व मित्रही—कारण सर्वांना कोठें मंत्रिपदें मिळणार—त्यांचें मंत्रिमंडळ हाणून पाडण्याचा प्रयत्न करतील. त्यावेळीं सामान्य कायद्याचाच उपयोग केल्यास, मंत्रिमंडळ क्षणभंगूर ठरेल !! सामान्य कायदे पुरेत, हा त्यांचा आशावाद कौतुकास्पद नाहीं, दुःखदायकच आहे. आम्ही सामान्य काय, पण असामान्य व अनंत कायदे करून कसें तरी निभावून नेत आहोंत, व आम्ही तर किती अनुभवी व मुरलेले आहोंत !! बेफाम व बेलगामी वृत्त-पत्रें, बेमुर्वत राजकीय संस्था यांना, सामान्य कायद्यानें तोंड दिलें तर दोन आठवडे-सुद्धां, त्यांचें मंत्रिमंडळ राहणार नाहीं !! ( पुढें, सर्व कॉंग्रेस मंत्रिमंडळें दोन वर्षे व ४ महिने राहिलीं !! व कोणीही खास कायदे अंमलांत आणून राज्यकारभार चालविला नाहीं ) जातीयवाद, साम्यवाद, दहशतवाद व कायदेभंग या चार खलपुरुषांविरुद्ध हें बिल आहे. सदाचारी, सद्वर्तनी नागरिकांना भिण्याचें कारण नाहीं. जर बिल नापास झालें तर व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट होईल. कॉंग्रेस पक्षानें निवडणुकीच्या

जाहीरनाम्यांतच असल्या बिलांना विरोध करण्याचें जनतेस अभिवचन दिलें आहे, तेव्हां त्यांना पाठिंबा द्या म्हणून सांगणें व्यर्थ आहे. इतर सभासदांना पुढील निवडणुकींत पडाल अशी भीति कांहींनीं घातली आहे. त्यांनीं न भितां सद्सद्विवेक बुद्धीला स्मरून मतें द्यावींत. नव्या राजवटीला धोका नको असेल तर, पाठिंबा द्या. १९३१–३२ सालाप्रमाणें गोंधळ नको असेल तर पाठिंबा द्या ! " असें अगदीं कळकळीनें बजावून गृहमंत्री खालीं बसले. अध्यक्षांनीं बिल विचारांत घ्यावें, या सूचनेवर मतें घेतलीं. मतनोंदणींत सरकाराच्या बाजूस ६१ व विरुद्ध ७१ मतें पडून बिल फेंटाळलें गेलें. सरकाराच्या बाजूनें सर्व अधिकारी, जोशी शिवाय सर्व सरकारनियुक्त बिनसरकारी सभासद, हिंदु व मुसलमान जमीनदार, सनातनी मारवाडी गृहस्थ बजोरीया, यांनीं मतें दिलीं. विरुद्ध मत देणाऱ्यांत सर्व कॉंग्रेस–पक्षीय कॉंग्रेस–नॅ.पक्षीय व ११ मुसलमान सभासद, व याच दिवशीं शपथ घेऊन हजर झालेले बारावे मुसलमान गृहस्थ मि. हुसेनभाई लालजी, हे होते. यांशिवाय ३ ब्रह्मी सभासदांनीं पण आमच्या बरोबर मतें दिलीं. मतनोंदणीचा निकाल जाहीर झाला त्या वेळीं, एवढा कल्लोळ झाला, टाळ्यांचा एवढा कडकडाट झाला कीं, दोन्ही बाजूंच्या दऱ्यांतून, त्याचा प्रतिध्वनी किती वेळ तरी येत होता. रात्रीचे ८ वाजले होते, अनेक महिने खलबतें करून हिंदी लोकांचे पाश जखडण्यासाठीं आणलेलें हें बिल–हें काळें बिल–रात्रीच्या अंधारांत काळें झालें ! सभागृहांतून बाहेर पडतांच सर्वत्र धुकें पडलें होतें. दोन डोंगर व दोन उतरणी उतरून वसतिस्थानास जावयाचें होतें. वादविवादाच्या चर्चेच्या चढउतारांवरून, धुरांतून व धुक्यांतून, आम्ही आपला मार्ग यशस्वीपणें काढला होता, मग या धुक्याची पर्वा थोडीच होती ! घरीं येईपर्यंत ९ वाजले. रस्त्यांत अनेकांनीं अभिनंदन केलें. कारण या वेळीं सरकारानें जय मिळावा म्हणुन आकाशपाताळ एक केलें होतें. जयाची लज्जत यामुळें विशेष होती. लॉंगवूड रेंजमध्ये येतांच तेथील सर्व सभासदांनीं माझ्याभोंवतीं घेर धरून " टोळीबाजांचा जय असो " ( " Three cheers for the gangsters " ) असा त्रिवार घोष केला. या जयाच्या कथा, खऱ्या व कल्पित कितीतरी दिवस पुढें चर्चेचा विषय होऊन बसल्या होत्या. घटना फेंटाळून व हें बिल फेंटाळून, निवडणुकीच्या जाहीरनाम्यांतील प्रतिज्ञेचें आम्ही पूर्ण पालन केलें होतें. यांतील सात्त्विक आनंद घेण्याचा आम्हांस हक्क होता. रात्रीं १२ पर्यंत टेलिफोनवरून एकमेकांचीं अभिनंदनें

आम्ही करीत होतों, व मुसलमान बंधूंनीं जी मदत केली त्याचा विसर कोणालाही झाला नाहीं. मतिन चौधरी यांनीं जिनांच्या गैरहजेरींत चांगली बाजू सांवरून धरली हें नमूद करणें जरूर आहे. नियमाप्रमाणें लाथाडलेलें बिल व्हॉईसरॉय यांच्या शिफारसीसह ता. १६।९।३५ ला सभेपुढे आलें. तें मांडण्याची परवानगीच सभागृहानें ५७ विरुद्ध ६९ मतानें नाकारली. ता. १६ रोजीं व्हॉइसरॉय लॉर्ड विलिंग्डननें सभागृहापुढें भाषण करून, राज्याचा बंदोबस्त ठीक आहे, व्यापार वाढला आहे, सर्वत्र आबादीआबाद आहे, बिल फेंटाळून बेजबाबदारपणा कॉंग्रेस पक्षानें दाखविला, वगैरे टीका केली. अर्थात् त्यांच्या भाषणास कॉंग्रेस पक्ष हजर नव्हता. ता. १२ ते १६ च्या दरम्यान सरकारी प्रतोदानें पुन्हां खटपट करून मतें मिळविण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ ! ता. १६ रोजीं, मूठमाती मिळालेलें बिल, गव्हर्नर जनरलनें, जादा अधिकारांत " देशाची शांतता, सुव्यवस्था व सुराज्य यांच्या हितार्थ ! " जारी केलें.

अधिवेशनांतील मुख्य काम संपलें होतें. शेतकरी व मजूर यांना दिवाणी तुरुंगांत कर्जाबाबत बसवूं नये म्हणून दिवाणी कायद्यांत फरक करण्याचें बिल निवडक समितीकडे धाडलें. त्याचप्रमाणें उद्योगधंद्यांतील मजूरांचें वेतन नियमानें मिळावें म्हणून आलेल्या बिलावर थोडी चर्चा होऊन तें पुढें ढकललें गेलें. दोन्ही बिलांचें क्षेत्र व्यापक व्हावें म्हणून पक्षातर्फे मी कांहीं सूचना चर्चेंत केल्या. कॅन्टोनमेन्ट बिलाचा उल्लेख पूर्वींच येऊन गेला आहे. ब्रह्मदेश हिंदुस्थानांपासून अलग करण्याचें ठरल्यामुळें देण्याघेण्याचा हिशोब करण्याकरितां एक कमिटी नेमली होती. तिचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला होता. त्यावर दोन दिवस चर्चा झाली. कूळ व सावकार यांच्यांतील व्यवहारांचा हिशोब करतात, तसा करून रकम काढतां आली असती; पण ही पद्धति या ' निकसन कमिटीनें ' मान्य केली नाहीं. एकंदर हिंदुस्थान सरकारानें काढलेलें कर्ज व केलेला खर्च यांची छाननी करून ब्रह्मदेशाच्यापायीं गेल्या १०० वर्षांत किती खर्च झाला व ब्रह्मदेशानें त्यांतील किती हिस्सा उचलला हें ठरवून, बाकी काढतां आली असती; हीही पद्धति या कमिटीनें अमान्य केली. जिंदगीची किंमत करून, अनमान धक्क्यानें खर्चाचें प्रमाण ठरवून, हिंदुस्थानाला मिळावयाची बाकी निश्चित केली. चर्चेंत कमिटीच्या रिपोर्टाच्या चिंध्या केल्या गेल्या. पंडितजी, मथुरादास वसनजी, सत्यमूर्ती, वगैरेंनीं त्यांतील अन्याय उघड करून दाखविला. प्रसिद्ध ॲमेरीनें प्रथम कांहीं निवाडा दिला होता, व

त्याच अनुरोधानें 'निक्सन कमिटीचा' निवाडा होता. रिपोर्ट फेटाळून पुन्हां निःपक्षपाती लोकांची कमिटी नेमून, तिनें निवाडा द्यावा, असा ठराव पास झाला, तथापि कांहीं झालें नाहीं. नवीन सुधारणा अंमलांत येण्यापूर्वींच ब्रह्मदेश वेगळा होण्याचें ठरविलें होतें त्याप्रमाणें १९३६ सालींच ब्रह्मदेश वेगळा झाला, इंग्रजांनीं साम्राज्यशाही हितसंबंध राखिले, हिंदी प्रजा व हिंदी सरकार यांचें तोंडास पानें पुसलीं, पण या पापाचें प्रायश्चित्तही त्यांस मिळालें !! मागील अधिवेशनांत बी. दास यांनीं दडपशाहीचे कायदे रद्द करावेत म्हणून आणलेलें बिल १ दिवस चर्चिलें गेलें. मागील अधिवेशनांत सर नृपेन्द्र यांनीं दोन तास भाषण करून दहशतवादी लोकांच्या ५६ खटल्यांतील हकीकती सांगून, सरकारी मिठांस जागरूक आहोंत, हें दाखविलेंच होतें. तेंच भाषण या वेळीं १ तास पुढें चालवून, अनेकांच्या कुचाळक्या करून संपविलें. लाला शामलाल यांनीं पोलिसांच्या छळाच्या अनेक हकीगती सांगितल्या. खोटे पुरावे पोलिसांनीं कसे तयार केले, त्यांच्या हकीगती सांगितल्या. पंजाबांतील सी. आय. डी.च्या ( गुप्त पोलीसांच्या ) लीला वर्णन करून हायकोर्टानें त्या खात्यांवर झाडलेले ताशेरे वाचून दाखविले. शिक्षा देणाऱ्या मॅजिस्ट्रेटनें खोटें रेकॉर्ड कसें तयार केलें त्याबद्दलचा हायकोर्टाचा उतारा वाचून दाखविला. हे उतारे वाचले जात असतां गृहमंत्री लाल झालें होतें, तर सभागृहांत शेम-शेमच्या आरोळ्या उठत होत्या. गझनवींनीं एक तासभर सभागृहाची करमणूक केली. फजलुल हक हे मॅजिस्ट्रेट असतां हिंदु मुलांना 'वंदेमातरम्' ओरडल्याबद्दल फटक्यांची शिक्षा दिली, ही जुनी गोष्ट खबचटपणें मांडली. ती हक्क मियांनीं नाकारतांच, 'मग तुम्ही नुसत्या मुसलमानांनाच शिक्षा दिल्यात !!' अशी कोटी केली. हक्कमिया म्हणाले, "बंगालची फाळणी रद्द करण्याच्या चळवळींत, गझनवी यांनीं प्रमुख भाग घेतला, व आतां टोपी बदलत आहेत." गझनवींनीं उत्तर दिलें, "तुम्हीं मला त्या वेळीं काफीर म्हणालांत." गझनवीच्या हातांत गृहमंत्रीं यांनीं दिलेली कात्रणें ते जोरजोरानें वाचीत, व हंशा पिकवीत. सालोसाल राजद्रोही भाषणें, राजकीय खून किती झाले यांची आंकडेवार माहिती देण्यांत कांहीं वेळ घालविला. आपल्याला धमक्या कशा येतात, तीं पत्रें वांचून दाखविलीं. "आणि अजून एकदांही तुमच्यावर गोळी कोणी झाडली नाहीं !" अशी एकानें पृच्छा करतांच, हीं पत्रें बनावट आहेत, हें सभेला कळून चुकलें. एका चोपड्यांतील वाक्य वाचून त्यांत (Eye for eye, tooth for tooth) बदला घ्यावा असें लिहिलें

आहे. म्हणून हातवारे करून सांगितलें. " समजा दांत खोटें असलें तर, कसा बदला घ्यावयाचा " अशी शंका एका सभासदानें काढतांच, वक्ते कांहीं काळ सर्द झाले, सभेंत हास्याचे फवारे उडाले. दिनेश गुप्ताला फांशी दिल्याबद्दल कलकत्ता कॉर्पोरेशननें दुःख जाहीर केलें म्हणून त्यांनीं टीका केली. " एक, दु, तीन। भारत होईबे स्वाधीन। चार पांच छाय। गांधी महाराजकी जय। सात आठ नाय। पिकेटिंग करते हाय। दस, ग्यारा बारा। इंग्रज धरो और मारो।" हें काव्य त्यांनीं म्हणून दाखवून, हें कलकत्त्यांत प्राथमिक शाळेंत शिकविलें जातें, असें ठोंकून दिलें. पूर्वी, असेंच १९३२च्या वेळीं गझनवींनीं सांगितलें होतें, तें खोटें आहे असें अधिकृत रीतीनें कलकत्ता कॉर्पोरेशननें सांगितलें, असला हा गृहस्थ, पुन्हां तेंच सांगतो याचा काय अर्थ आहे! बोलवितां धनी कोण आहे, हें सभेनें सहज ओळखलें. आणखी कांहीं उतारे वांचले. अध्यक्षांनीं पुन्हां पुन्हां तेच मुद्दे मांडून सभेचा वेळ घेऊं नये असें चापतांच त्यांनीं भाषण बंद केलें. एकदोन भाषणें आणखी झालीं. पण ही खाजगी बिलावरील चर्चा या अधिवेशनांत संपली नाहीं. कांहीं सामाजिक बिलें ता. २६।९ रोजीं मांडण्यांत येऊन हें गाजलेलें अधिवेशन त्या दिवशीं संपलें. दुसऱ्या दिवशीं पक्षाची साधारण सभा झाली, अधिवेशनाचें समालोचन नेत्यांनीं केलें व समाधानानें आम्ही परत निघालो व मानदंडाप्रमाणे पृथ्वीवर असलेल्या नगराज हिमालयाकडे पहात पहात सिमला सोडलें. सिमल्यांत केलेल्या कामाच्या मानानें किती पर्वतप्राय काम अद्यापि पडलें आहे याचा विचार करीत करीत सिमल्यांतिल स्वर्गोतून खाली कालक्याच्या भूतलावर येऊन स्वप्रांतीं रवाना झालो. थंड व गार वातावरणांतून गरमागरम कार्यक्रम करून प्रांतांतील गरमागरम वातावरणांत थंडपणें काम करण्याचें ठरवून पुण्यास पोहोचलों.

---

## : ओटाव्याची छत्री :

१९३५ च्या अधिवेशनानंतर १५ दिवसांच्या आंत मद्रास येथें ऑ.इं.काँ. कमिटीची बैठक भरली. सदरहू बैठकीसाठीं पक्षाच्या कार्याचा रिपोर्ट तयार करून द्यावयाचा होता. अर्थात् हें काम चिटणीस सत्यमूर्ति यांचें होतें; तथापि माहिती संकलित करून त्यांना धाडून दिली व बैठकीस हजर राहिलों. या अधिवेशनांत संस्थांनविषयक प्रश्न पुन्हां निघाला व जबलपुरास पास झालेल्या ठरावामुळें झालेला गोंधळ व गैरसमज दूर करण्याकरितां वर्किंग कमिटीनें ठराव मांडला. त्यांत मी सुचविलेला भाग असल्यामुळें मी अनुमोदन देऊन ठरावांतील अर्थ विशद करून सांगितला; यामुळें अनेक गैरसमज दूर झाले. अधिकार स्वीकाराचा प्रश्न पुन्हां सत्यमूर्ति महाशयांनीं काढलाच. त्याला मी विरोध करून सत्यमूर्तींवर बरीच टीका केली, व या प्रश्नाचा विचार पुढें ढकलावा असें सुचविलें व तें मान्यही झालें. भाषणांत सहज केलेला विनोद सत्यमूर्तींच्या विरोधी वर्तमानपत्रांत मोठाल्या अक्षरांत छापलेला पाहून थोडें दुःखही झालें. मद्रासमध्यें सत्यमूर्तींची लोकप्रियता व त्यांना होत असलेला विरोध, दोन्हीही मोठ्या प्रमाणांत पाहण्यास मिळाली. मद्रासमध्यें असेंब्लींतील कामासंबंधी सामान्य जनतेंत विशेष माहिती आहे असें दिसून आलें. अधिवेशनांस हजर असलेल्या अनेक मद्रासी व आंध्र सभासदांनीं मुद्दाम माझी ओळख करून घेतली, यावरून या प्रांतांत कायदेमंडळी वृत्तीचे लोक विशेष आहेत, त्यांत ते रस घेतात, हा लौकिक खरा वाटूं लागला. दोन मद्रासी म्हणजे ठराव व उपसूचना, दोन महाराष्ट्रीय म्हणजे दोन पक्ष, दोन गुजराथी म्हणजे शेअर बाजार, व दोन बंगाली म्हणजे गुप्त कट, असा विनोदी शेरा कोणी मारला तर, तो अगदींच चुकीचा नाहीं. मद्रासी मंडळींना बोलण्याची भयंकर हौस, त्याकरितां स्वल्प विरामापासून सरनाम्यापर्यंत उपसूचना देतील व बोलतील. अन्य प्रांतीय लोक, या बाबतींत कमी गुन्हेगार आहेत असें नव्हे,पण प्रमाण

मात्र कमी एवढेंच!! साधारणपणें या कारणामुळें अधिकार-स्वीकाराला हा प्रांत उत्सुक होता एवढें स्पष्ट दिसत होतें, व या धोरणापासून देशाचा फायदा होईल याला आधार म्हणून असेंब्लीच्या कामाकडे बोट दाखविलें जात होतें. घटनाभंगाची वृत्ति देशांत तयार करण्याचें कंकण बांधून काम करणारे आम्ही, घटना राबविण्याचें वातावरण निर्माण करीत होतों, हा अनुभव मद्रास येथें विषण्णपणें मला आला. लॉर्ड विल्लिंग्डननें केलेलें भविष्य, "त्यांनीं घटना राबविली नाहीं तर घटना त्यांना राबवील." ("If they do not work the constitution, the constitution will work them.") हें खरें ठरणार असें वाटूं लागलें.

मद्रासेहून परत आल्यानंतर कॉंग्रेसच्या हीरकमहोत्सवानिमित्त प्रांतांत हिंडावें लागलें. महोत्सवाच्या दिवशीं तर पुण्यांत सर्वत्र सणाचें वातावरण उत्पन्न झालें होतें. या निमित्ताने कॉंग्रेस कार्याचा प्रचारही पुष्कळ झाला. आमच्या प्रांतांतही पुष्कळ लोक अधिकार स्वीकाराच्या भाषा बोलूं लागले होते. शिकंदराबाद येथील हिंदू मुसलमान दंग्याबाबत, कांहीं चौकशी व्हावी म्हणून मी सिमला येथें प्रयत्न केले होते. तथापि पांच आरोपींवर खुनाचा खटला भरला होता. तेथील वकीलवर्ग काम चालविण्यास तयार नव्हता. हिंदूंचे पुढारी साळ्वे बंधू यांनीं गांधीजींच्या सल्ल्यानुसार मला काम चालविण्याकरितां नेलें; मजबरोबर श्री. कन्हय्यालाल मुनशी पण होते. शिकंदराबाद येथील मुक्कामांत, मुनशीजींच्या मतांवरून पाहतां, ते संपूर्णपणें अधिकार स्वीकारासाठीं उत्सुक होते. महाराष्ट्रांत कॉंग्रेसपक्षातर्फे १०-१५ शिवाय लोक निवडून येणार नाहींत, एखादें मंत्रिपद महाराष्ट्राच्या वांट्यास येईल, हे त्यांचे विचार चर्चेच्या वेळीं दिसून आले. माझें मत, निदान ४० सभासद निवडून येतील, व अधिकार स्वीकाराविरुद्ध प्रांतांत मोठ्या प्रमाणांत मत आहे, हें ऐकून ते थोडें अस्वस्थही झालेसें वाटलें. मुंबईत वावरणाऱ्या राजकारणी व्यक्तींचे विचार कसे वाहत आहेत, याची थोडी जाणीव मला झाली. खुद्द महाराष्ट्रांतील अनेक व्यक्तींच्या विचारांतून असलेच सूर निघत होते. कॉंग्रेस संस्था स्थापण्याच्या कामीं अनेकांचे श्रम कारणीभूत झाले; तिची बैठक सनदशीरपणावरच आधारलेली होती हें खरें, तथापि राजकारण म्हणजे सरोवरांतील नौकाविहार नव्हे; आणि स्वातंत्र्येच्छु देशांतील राजकारण नुसतेंच प्रगतिमान् आणि प्रवाही असतें असें नव्हे तर, तें आपल्या गतीचें चैतन्य व चोदना (Dynamic) परिस्थितीप्रमाणें क्षणाक्षणाला तयार करीत असतें. त्या आड येणारे सर्व प्रयत्न हे

विघातक होत हें उघड आहे. स्वातंत्र्य असलेल्या देशांत, राजकारणांतील रासक्रीडा रम्य व कदाचित् योग्यही ठरेल.पण असलें सुखासीन,सत्तालोलुप राजकारण,परदास्यांत पडलेल्या देशाला घातुक आहे, असें कोणीही मान्य करील. कॉंग्रेसनें सुरुवातीपासूनच देशांतील राजकारणाचीं सूत्रें हातीं घेतलीं होतीं. परिस्थितीनें कॉंग्रेसला कोणी कितीही विरोध केला तरी,स्वातंत्र्याच्या ध्येयाकडेच तिनें चालना दिली होती. जोंपर्यंत प्रयत्न प्रभावी व प्रवाही आहेत, तोंपर्यंत जीवन आहे व प्रगती पण आहे. त्यांत यांत्रिकपणा आला कीं, गति थांबते. पारतंत्र्य ही जखम आहे; ती वहात आहे तोंपर्यंत तिची जाणीव असते व या जाणिवेनें प्रयत्नाला चालना मिळते. जखमेवर खपली धरली कीं, आंत पू होतो; व नेमकें हेंच कार्य सनदशीर व सुखासीन राजकारण करीत असतें. खपली तशीच असावी, 'बरें वाटतें,' ही प्रवृत्ति घातक. लोकमान्य टिळकांनी ही खपली काढून, जखम उघडी केली; यांत रक्त गेलें असेल, पण देशाची प्रकृति पण सुधारली, हेंही तितकेंच खरें. गांधीजींच्या मार्गानें पुन्हां राजकारण प्रवाही झालें. परिस्थिति गोठून राहणें अशक्य झालें. प्रगतिमान राजकारण सुरू झालें. आहे त्यांत भागवून घ्यावयाचें, जुलुमापुढे मान वाकविणें म्हणजे देवाच्या संदेशाप्रमाणें वर्तन आहे असें सांगावयाचें. निष्क्रियता म्हणजे कालज्ञता हें समीकरण करून मागील अंकावरून पुढे चालूं, असें चालविलेलें राजकारण व्यर्थ आहे. त्यानें संकटें कदाचित् दूर जातात, पण जय नक्कीच दूर जातो. परिस्थितीवर प्रयत्नाने लोकमान्य मात करीत, शरण जात नसत. गांधीजींनीं हें तत्त्व आणखी एक टप्पा पुढे नेऊन आपल्याला पाहिजे ती परिस्थिति उत्पन्न करण्याचें हुकमी सूत्र, राजकारणांत आणिलें. राजकारण नुसतें संरक्षणात्मक न ठेवतां, त्याला आक्रमक स्वरूप दिलें. स्वातंत्र्यावरील आघातांचा प्रतिकार, त्याजबरोबर चढाई पण, राष्ट्राच्या राजकारणांत त्यांनी आणली. सरकारानें हातीं ठेवलेलीं राजकारणांतील सूत्रें कॉंग्रेसच्या हातांत आलीं. १९२० पासून पुढें, सरकार काय करतें याकडे जनता पाहात नाहीं, तर कॉंग्रेस काय करते याकडे पाहाते. राजकाणाचें चालकत्व ( Initiative ) कॉंग्रेसच्या हातांत आलें. त्याला अनुसरून कॉंग्रेसची बैठक बदलली, व्याप व दृष्टि रुंदावली. चालकत्व म्हणजे तयारी व योजना, तयारी व योजन म्हणजे शिस्त व संघटना, त्याजबरोबर कार्यक्षमता. कॉंग्रेस म्हणजे स्वातंत्र्यप्रेमी जनांची सुसज्ज सेना होणें, हें अपरिहार्य झालें. हें स्वरूप प्राप्त झाल्यानंतर सुखासीन व स्थायी राजकारण करणें म्हणजे घडून आलेल्या ऐतिहासिक क्रमाला उलट गति देणें, असाच अर्थ होतो,

जी घटना फेंटाळली व त्याज्य म्हणून ठरविली, तीच स्वीकारून, अधिकार–ग्रहण करून, ती राबविणें म्हणजे गतिमान् राजकारणाला स्थगित करून, परिस्थितीला गोठवून, प्रभावी कर्तृत्वाला मारून टाकणें होतें. अणुमात्र त्यागाचा, ब्रह्मांडा एवढा गौरव करून,कांहीं व्यक्तींना प्रतिष्ठा पाहिजे होती, व त्याला स्वातंत्र्याचा प्रयत्न, हें नांव देण्याचा त्यांचा हट्ट होता. कांहींना प्रामाणिकपणें हेंच योग्य वाटत होतें.मासा सडूं लागला म्हणजे सडण्यास सुरुवात डोक्यापासून होते; तोच न्याय राजकारणांत दिसून येतो. प्राप्त ते घेऊन, त्याचा हत्यारासारखा उपयोग करून, अधिक मिळवूं, असा अभिनिवेश अनेक पुढारी दाखवूं लागले. शत्रू स्वनिधनाचीं साधनें देईल अगर दिलीं आहेत, हें मानणें हास्यास्पद आहे. खुद्द परमेश्वरानेंसुद्धां परमप्रिय भक्तांना सर्व अस्त्रें दिलीं नाहींत, असा पुराणांत दाखला आहे. स्वार्थाच्या, आणे-पैच्या राजकारणांत, सत्तेचीं कवचकुंडलें देणारे कर्ण झाले नाहींत व होणारहि नाहींत, हा इतिहासाचा सिद्धांत आहे. तथापि कांहीं बेरकी, कांहीं भाबडे, कांहीं बिलंदर व्यक्ति, जनतेला तसें कांहीं तरी होईल म्हणून बनवीत होत्या, पण स्वतःच बनल्या जात होत्या. १९३५ अखेरपासूनच हें वातावरण दिसूं लागलें होतें.

१९३६ सालचें दिल्ली अधिवेशन ता. ३ फेब्रुवारीस सुरूं होणार होतें. ता. २-२-३६ रोजीं पक्षाची सर्वसाधारण सभा होती. सभेंत सर्वसाधारणपणें, अधिवेशनांत येणाऱ्या कामांचा विचार झाला. नंतरच्या अौपचारिक चर्चेंत, अधिकार-ग्रहणाची लालसा फार दूरवर पसरली आहे असें आढळून आलें. प्रांताप्रांतांत मंत्रिमंडळाचे मनसुभे होऊं लागले आहेत, असें समजलें; जें मद्रासेंत पाहिलें, जें महाराष्ट्रांत उगवूं लागलें होतें, तें पीक अखिल भारतीय आहे, हें पाहून उद्वेग वाटला. वरील पार्श्वभूमि सबंध अधिवेशनभर राहिली. अधिवेशनाचा पहिला दिवस म्हणजे हस्तांदोलनें, क्षेम–कुशलें विचारणें यांनींच संपून जातो. या खेपेस जॉर्ज बादशहाच्या मृत्यूनिमित्त ठराव येऊन सभा एका दिवसापुरती स्थगीत होणार होती. सभेपुढें येणाऱ्या ठरावास विरोध करावयाचा नाहीं, शिष्टाचारास व भारतीय संस्कृतीस शोभेल याप्रमाणें वर्तन होईल अशीच योजना होती. ठराव सभागृह नेते सर नृपेन्द्र यांनीं मांडला. सर्वमान्य होण्याचा त्यांत प्रयत्न होता पण तो सर्वमान्य होण्यासारखाही नव्हता. सर नृपेन्द्रांचें भाषण थोडक्यांत झालें. त्यांनीं मरहूम बादशहा प्रजाहितदक्ष होतें असें सांगून, नवीन बादशहांचें अभिनंदन केलें. भुलाभाईनीं सांगितलें "ठरावांतील शब्दांकडे

व अर्थांकडे चिकित्सेनें पाहण्याचा हा प्रसंग नव्हे. खाजगी जीवनांत नमुनेदार राहणी, सार्वजनिक जीवनांत सनदशीर वर्तन, सर्वत्र व सर्वदा जबाबदार मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणें वागणूक, या प्रकारें त्यांचें सायमन साहेबानें केलेलें वर्णन योग्य आहे. मरहुम बादशहांच्या कारकीर्दीत या देशांतील राष्ट्रीय वृत्ति वाढली असून, नूतन बादशहा जे स्वातंत्र्यप्रेमी देशाचे आहेत, तेही या देशाला जसें आम्ही स्वातंत्र्य इच्छितों व त्याकरितां झटतो, तें मिळेल अशीच इच्छा करतील. या प्रसंगानें मृत्यू ही नुसती संभवनीय घटना नसून अटळ गोष्ट आहे, हें पुन्हां एकदां नजरेस आणलें असून, या समतावादानें शेतकरी, कामकरी व मुगुटधारी, अखेरीस मातींतच जातात हें दाखवून दिलें आहे. त्यांच्या आत्म्याला शांति मिळो व वारसा हक्कानें आलेलें अधिकार व जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडण्याची शक्ति, नूतन बादशहास लाभो, " असें सांगून भाषण संपविलें. अन्य पक्षांतील प्रमुखांचीं भाषणें झाल्यावर ठराव पास झाला, व त्या दिवशीं सभा तहकूब झाल्याचें अध्यक्षांनीं जाहीर केलें.

४ फेब्रुवारी हा दिवस बिनसरकारी ठरावांचा होता. या अधिवेशनांत ३।४ महत्वाचे ठराव बिनसरकारी सभासदांचे पास झाले. पहिला ठराव सरदार मंगलसिंग यांचा, दोन्ही सभागृहांतील सभासदांची एक संयुक्त कमिटी संरक्षणाच्या कामीं सल्ला देण्याकरितां सरकारनें नेमावी, असा साधा ठराव होता. सर्व पक्षांनीं कमी जास्त प्रमाणांत त्याला पाठिंबा दिला. परंतु युरोपियन गटानें विरोध केला. सरकारतर्फे मि. टॉटनहॅम यांनीं सभासदांचें सद्हेतु मान्य केलें. हिंदी सैन्य देशाबाहेर जाण्यापूर्वी, सभेचा सल्ला घेण्यांत येईल, असें आश्वासन पण दिलें. तथापि ठरावाला विरोध केला. ठराव पास झाला. सरकार पक्षानें मतमोजणी पण मागितली नाहीं. दुसरा महत्वाचा ठराव महमद अझगर अली यांचा, बंगाल ॲन्ड नॉर्थ वेस्टर्न रेल्वे ( B. N. W. Railway ) व मद्रास ॲन्ड सदर्न मराठा रेल्वे ( M. & S. M. Ry. ) सरकारनें आपल्या ताब्यांत घ्याव्यात हा होता. रेल्वेसंबंधीचें धोरण सरकारनें पूर्वीच जाहीर केलें होतें, पण त्याप्रमाणें वर्तन होत नव्हतें. १९३७ सालीं या रेल्वेचे करार संपत होते. रेल्वे सरकारच्या ताब्यांत असल्या म्हणजे अनेक फायदे उतारूंना होतात, त्यांची दाद लागते, शिवाय होणारा नफा सर्वस्वी सरकारला म्हणजे जनतेला मिळतो. १९३० ते ३५ पर्यंत ह्या रेल्वे चालविणाऱ्या कंपन्या भागीदारांना १६ टक्के नफा वाटीत आल्या होत्या. वादविवादांत " सरकारी का

खाजगी व्यवस्था " याही मुद्यांची चर्चा झाली. कारण कांहीं सद्गृहस्थ खाजगी मालकी व खाजगी व्यवस्था ही कार्यक्षमता वाढविणारी असते असें प्रतिपादणारेही होते. उलट सर्वत्र जगभर सार्वजनिक सोयी, विशेषतः वाहतुकीच्या, सरकारी नियंत्रणाखालीं,सरकारी मालकीच्या असाव्यात, हें तत्त्व मान्यता पावलें होतें हेंही दाखविण्यांत आलें. अर्धवट गोऱ्यांचे प्रतिनिधी सर हेन्री गिडने यांनीं साहजिकच विरोध केला. कारण सरकारी ताबा आल्याबरोबर, अर्धवट गोऱ्यांचें जें कुरण या कंपन्यांचें कारभारांत असतें तें नष्ट होणार होतें. सरकारतर्फे रेल्वे-मंत्री सर झाफरुल्ला यांनीं सरकारचें धोरण कायम आहे; १९३१ च्या ठरावाप्रमाणें या कंपन्यांचा कारभार सरकारनें घ्यावा हें खरें, तथापि एकंदर खरेदी रक्कम कशी उभी करावी, त्यावर व्याज काय पडेल, कर्जावर व्याज काय द्यावें लागेल, या सर्व गोष्टींचा विचार सरकार करून त्याप्रमाणें वागेल, असें सांगितलें. सरकारी डावपेचांचा हा एक भाग होता. सरळ खाजगी कंपन्या पाहिजेत असें म्हणणें शक्य नव्हतें. माहिती, चौकशी, विचारविनिमय या तीन तटबंदींतून निर्णय बाहेर पडणें, म्हणजे कालहरण किती होतें याची जाणीव सर्वांनाच आहे. पंतजींनीं सर्व माहिती तयार आहे असें सांगून, स्वतः त्यांनीं व डॉ. झियाउद्दीन यांनीं माहिती दिली. चौकशीचें कारण नाहीं. धोरण पूर्वीचेंच कायम आहे, असें सांगण्यांत आलें; आहे या स्थितींत चर्चेचीही आवश्यकता नाहीं, सरकारला कांहीं करावयास नको हें उघड आहे, असा आरोप अनेकांनीं केला. शेवटीं ठराव पास झाला. तथापि सरकारानें १९३७ सालींहि कांहीं केलें नाहीं व पुढेंहि केलें नाहीं. कारण कांहीं करावयाचेंच नव्हतें. तिसरा महत्त्वाचा ठराव मागासलेल्या भागांचा राज्यकारभारासंबंधीचा होता. मागासलेले, अर्धवट मागासलेले ( Excluded and Partially Excluded Areas ) असे भाग, नवीन घटना कायद्यांत कल्पून त्यांच्याकरितां निराळी राज्यव्यवस्था सुचविण्यांत आली होती. सर्व देशभर एकच पद्धति राज्यकारभारांत असावी, असा हा ठराव होता. घटनेंतील हा भेदभाव नाहींसा व्हावा, ही मागणी त्यांत होती. सिमला अधिवेशनांत हा ठराव माझ्या नांवें बॅलटमध्यें आला, पण वेळेच्या अभावीं त्याला मांडण्याला अवकाश मिळाला नाहीं. या अधिवेशनांत आम्ही ४५ जणांनीं पुन्हां तो दिला होता व तो रामनारायण सिंह यांच्या नांवावर बॅलटमध्यें आला. मागासलेल्या भागांत बिहारचा, आसामचा बराच भाग होता. मुंबईपैकीं खानदेश, नाशिक, ठाणें, पंचमहाल वगैरे जिल्ह्यां-

तील बराच भाग होता. या मागासलेल्या व अर्धबट मागासलेल्या भागांतून वस्ती बहुशः रानटी टोळ्यांची; नाग, गोंड, खाशी, भिल्ल, कातकरी वगैरे लोकांची आहे. या लोकांवर हिंदी लोक अधिकारांत आले तर ते जुलूम करतील म्हणून त्यांच्या बाबतींतील राज्यकारभार म्हणजे गव्हर्नरची खास जबाबदारी ( Special Responsibility ) आहे असें १९३५च्या घटना कायद्याच्या बिलांत होतें. प्रांतिक कायदे मंडळानें कांहींही कायदे केले तरी गव्हर्नरला ते मान्य झाले तरच ते या भागांना लागू. प्रधानमंडळाचा सल्ला, या बाबतींत गव्हर्नरावर बंधनकारक नाहीं. तात्पर्य हे भाग मागासलेले म्हणून त्यांना आधुनिक पद्धतीचा राज्यकारभार उपयोगी नाहीं, या तत्त्वांवर हा फरक घटनेंत केला होता. १९३५च्या कायद्यांत कांहीं बाबतींत वटहुकूम काढून, कांहीं बाबींचा निकाल करावा, अशी योजना होती, म्हणून तो हुकूम निघण्यापूर्वी, कांहीं योग्य फरक करावा म्हणून हा ठराव आणला होता.

रामनारायण सिंह यांनीं मागासलेल्या जातीबद्दलचा कैवार हा केवळ बहाणा आहे, असें ठरावावर बोलतांना स्वच्छ सांगितलें. आतापर्यंत या जातींबद्दल कांहींच सरकारनें केलें नाहीं. "सौ चूहे खाकर बिल्ली चली है हज को,"—शंभर उंदीर खाऊन, मांजरी आतां यात्रेला निघाली आहे—असा टोमणा मारून अनेक सरकारी रिपोर्टांवरून सरकारनें स्वीकारलेलें धोरण चुकीचें आहे असें दाखवून दिलें. सरकारतर्फे सर नृपेन्द्र यांनीं ठराव फार उशिरा आला आहे. तथापि यावर होणारी चर्चा तारेनें भारतमंत्र्याकडे धाडण्यांत येईल असें सांगितलें. नंतर माझें भाषण झालें. घटनेंतील हा फरक जाणून बुजून केला आहे, हें अनेक उतारे दाखवून पटवून देण्याचा प्रयत्न मी केला. बिलाच्या सुरुवातीस पूर्ण मागासलेले भाग ४ होते व अर्धबट मागासलेलें भाग ११ होते. बिलाच्या चर्चेच्या वेळीं ही संख्या वाढविण्याचे अनेक प्रयत्न झाले व शेवटीं आतां ही संख्या ८ व २८ अशी आहे. ही संख्या वाढविण्याची दुरुस्ती जेव्हां कॉमन्स सभेपुढें आली, त्या वेळेच्या चर्चिलसाहेबांच्या भाषणांतील खालील उतारे वाचून दाखविले. ("I am satisfied that the more we can exclude, from the operation of the Bill the better. I like the larger list; I shall be glad if the Under-Secretary were to accept the amendment and even if my Honourable and gallant friend cared to add other districts to it, I should not object. I should not object indeed to including in it the entire scope of

the Great Indian Peninsula." ) सबंध हिंदुस्थान हा मागासलेला भाग ठरवून टाकला तरी चर्चिलसाहेबांना तें हवेंच होतें, हें मी उघड केलें. ब्रिटिश कट्टरांची नीति प्रथम शक्य तितके कमी हक्क द्यावयाचे, व नंतर तेही शक्य तितक्या कमी लोकांना द्यावयाचे. ( "The first object was to give as little as possible and the second object was to give that little to as few persons as possible." ) म्हणून मागासलेले भाग वाढविण्याचा प्रयत्न आहे. कर्नल वेजवुड बेननें कॉमन्स सभेंत, हे भाग जर मागासलेले म्हणून संरक्षित असे ठेवले नाहींं तर पुण्याचे ब्राह्मण या लोकांना लुबाडतील अशी भिती व्यक्त केली होती. पुण्याचे ब्राह्मण सर्व देशभर नाहींत. सर्व देशभर लंडनचें ब्राह्मण व वाणी दोन्ही आहेत,व त्यांना १५०वर्षें या भागानांच काय, पण सर्व देशाला लुबाडण्याचा प्रयत्न चालू आहे, म्हणून त्याला प्रथम बंदी केली पाहिजे. परिशिष्टांत दाखविलेले भाग खरोखरच मागासलेले नाहींत. शिक्षण, सामान्य परिस्थिति, आर्थिक परिस्थिति या कसोट्या लावल्या तर, अन्य भागांप्रमाणेंच हे भाग आहेत, असें सांगून, निरनिराळया प्रांतिक सरकारांच्या रिपोर्टांतून, त्यांचीं मतें, मजप्रमाणेंच आहेत असें दाखवून दिलें. मागासलेल्या जातींतून झपाट्यानें प्रगति होत आहे. या वेळीं त्यांची निराळी व्यवस्था लावणें, म्हणजे त्यांची प्रगति खुंटविणें आहे. सर्व दृष्टीनें हा फरक करणें चुकीचें आहे असें सांगून, मी भाषण संपविलें. सर कावसजींनीं सर नृपेन्द्र यांना माझें झालेलें भाषण सर्व तऱ्हेनें परिपूर्ण असून, तेवढें जरूर तारेनें व्हॉईट हॉलला कळविल्यास योग्य होईल असें सुचविलें ! नंतरच्या चर्चेंत यूरोपियन सभासदांनीं ठरावाला विरोध केला. सरकारातर्फे मुख्य भाषण डॉ. हटन, ज्यांनीं १९३१ च्या खानेसुमारीचा रिपोर्ट लिहिला होता, त्यांनी केलें. त्यांत, चर्चिलसाहेबानें जें भाषण केलें, तें आमचें पाप नसून दुर्दैव आहे. ( It ought to be put down to our misfortune and not our sin. ) असें सांगून अनेक जातींची माहिती सांगून, त्यांना संरक्षण देणें अवश्य आहे, आणि तें फक्त इंग्रज सरकारच देऊं शकेल हेंही ठांसून सांगितलें !! मुंबई प्रांतांतील सरकारी सभासदांनीं मागासलेल्या जातींना, जमीनदार व सावकार लुबाडतात म्हणून टाहो फोडला " आणि सरकारी अधिकारी त्यांना आपल्यापुढें नाचावयास लावतात " असें मी म्हणतांच बाण लागला, वक्ता सरदला व सभागृह हसूं लागलें. निवडणुकीनें या जातींची प्रगति बंद होईल हाही आपला शोध सांगून, सभासद

मजकूर खाली बसले. निरनिराळ्या प्रांतांतील अधिकारी सभासदांनीं, पुढारलेले वर्ग जुलूम करतात म्हणून, हे भाग अलिप्त ठेवले पाहिजेत, असें सांगितलें. तथापि ठराव मताला टाकतांच बिनविरोध पास झाला.

या अधिवेशनांतील आणखी एक महत्त्वाचा ठराव, बिनचौकशीनें नजरबंद केलेल्या राजबंदींच्या मुक्ततेबद्दलचा होता. मोहनलाल सक्सेना यांनीं तो ता. १२।२।३६ च्या सभेंत मांडला. त्या दिवशीं व ता. ७।४।३६ रोजीं, मिळून दोन दिवस चर्चा झाली. पुन्हां दहशतवाद, साम्यवाद यांचा बाऊ करण्यांत आला. सरकारी सभासद मि. हॅन्डस्, जे चितगांवचे जिल्हाधिकारी होते त्यांनीं, सरकारतर्फे विरोध केला. त्यांचा आवाज इतका लहान होता कीं, त्यांनासुद्धां तो ऐकूं जात नसावा!! १०।२० वेळां सभासदांनीं तक्रार केल्यानंतर, अध्यक्षांनीं त्यांना मोठयानें बोलण्यांस सांगितलें पण कांहीं उपयोग झाला नाहीं. १४३५ बिनचौकशीनें डांबलेल्या राजबंदीपैकीं १४२८ बंगाली आहेत, व बंगालमधील चळवळींची यथार्थ कल्पना सभागृहाला नाहीं, असें त्यांचें म्हणणें होतें, दहशतवाद्यांचें जाळें किती दूरवर पसरलें आहे, त्यांची संघटना किती मजबूत आहे, उघड खटले केल्यास पुरावा मिळणें किती अवघड आहे, वगैरे नेहमींच्याच गोष्टी त्यांनीं सांगितल्या. लोकांनीं पुरावा दिला तर, खटले करणें सरकारास शक्य आहे. पुरावा देण्यास लोक तयार नाहींत, या परिस्थितींत सरकारचें धोरण योग्य आहे. सरकार शक्य तेवढी कसून चौकशी करतें, पुरावा पाहून नंतरच स्थानबद्ध करतें, अशी ग्वाही त्यांनीं दिली. अखिल बाबूंनी स्थानबद्धांची 'संख्या २५०० वर आहे व सरकारनें केवळ संशयावरून हे पकडून ठेवले आहेत' असें सांगितलें. १९३४–३५च्या सरकारी रिपोर्टमध्यें असें लिहिलें आहे कीं, ("While Congress politicians were trying for the release of these Detinues, without going into the merits, and thus by this proposal to flood the Province with potential anarchists, Government began to develop a policy calculated to wean the majority of those detained from their mistaken leanings towards terrorism"). यावरून बहुसंख्यांक बंदींचा निव्वळ कल दहशतवादाकडे होता, ते दहशतवादी नव्हते, ही गोष्ट स्पष्ट होते. या शिवाय १९३४ सालीं, या बाबतींतील परिस्थिति निवळली आहे, असें सरकारी रिपोर्ट आहेत, म्हणून यापुढें हे बंदी सोडून दिले पाहिजेत, असें त्यांनीं प्रतिपादिलें. चर्चेंत अनेकांनीं राजबंद्यांची चौकशी करा, बिनमुदत बिनचौकशीनें स्थानबद्ध करून ठेवणें न्याय, नीति, मुत्सद्देगिरीला सोडून आहे

म्हणून सांगितलें. निदान इंग्लिश सभासदांनीं तरी या ठरावाला पाठिंबा दिला पाहिजे. इंग्लिश राजघटनेचें एक मुख्य सूत्र म्हणजे, कोणालाहि चौकशीशिवाय अटक होणार नाहीं असें आहे, असें बजावून पं. लक्ष्मीकांत मैत्र यांनीं त्यांना आळविलें. एका सभासदानें त्यावर "सुवेझची सामुद्रधुनी ओलांडली कीं, मतें व कपडे इंग्रज बदलतो" असा टोमणा मारला. गृहमंत्री यांनीं "बिनचौकशीनें अटकेंत ठेवणें हें वाईट आहे, पण कायदे-मंडळानें कायदा करून, असा अधिकार सरकाराला दिला आहे, तेव्हां आतां तक्रार करण्यांत अर्थ नाहीं," असें गंभीरपणें सांगितलें !! अवघड परिस्थितीसाठीं, खास कायदे करावे लागतात. पुरावा मिळणें शक्य नाहीं. लोक सरकाराच्या विरुद्ध आहेत हीही कबुली देऊन लोकहितार्थच ह्या गोष्टी आम्ही करीत आहोंत, असें सांगण्यास कमी केलें नाहीं. सरकारानें पूर्वी माफी देऊन राजबंदी सोडलें पण प्रत्येक वेळीं वाईट अनुभव आला. कॉंग्रेसनें राजबंदी दिन साजरा करून आपली सहानुभूति दहशतवादाला दाखविली आहे !! कॉंग्रेसनें दहशतवादाला विरोध करून, तो हाणून पाडल्याशिवाय, राजबंदीना सर्वशः सरकार सोडणार नाहीं. परिस्थिति जशी निवळेल त्या मानानें क्रमशः स्थानबद्ध राजबंदी सोडण्याचें धोरण कायम आहे, असें जाहीर करून ठरावाला विरोध केला. गृहमंत्र्यांचें भाषण संपल्याबरोबर अध्यक्षांनीं, ठराव मांडणारे सभासद मोहनलाल सक्सेना यांना उत्तर देण्यास सांगितलें. वास्तविक अनेकांना बोलावयाचें होतें; ठराव सरकारी नव्हता, चर्चाबंदीची सूचना कोणी केली नव्हती, परंतु अध्यक्षांनीं निर्णय बदलला नाहीं. कॉंग्रेस पक्षानें निषेध म्हणून पुढील चर्चेत भाग घेण्याचें नाकारलें, व त्याप्रमाणें मोहनलाल यांनीं जाहीर केलें. ठराव अर्थात् बारगळला. अध्यक्षांचा निर्णय चुकीचा होता. ठराव सरकारी असतां, व मांडणारे गृहमंत्री असते तर, त्यांचें भाषण झाल्यानंतर, तो मतास टाकणें बरोबर होतें. गृहमंत्री यांनीं ठरावाला विरोध करून अनेक आरोप कॉंग्रेस संस्थेवर केले होतें, त्यांना उत्तरें द्यावयाचीं होतीं. हा क्रम असतां विरोधकाचें भाषण झाल्याबरोबर, चर्चा बंद करणें चूक आहे. तथापि त्या वेळीं जरी अध्यक्षांनीं आपला निर्णय बदलला नाहीं तरी पुन्हां तशी चूक केली नाहीं हें मात्र खरें. खाजगी बिलापैकीं दडपशाहीचे कायदे रद्द करावे यासंबंधांतील बिलावरील चर्चा ता. १३ फेब्रुवारीला पुन्हां सुरू झाली. सर महंमद याकुब यांनीं पुन्हां साम्यवादावर हल्ला केला. खुद्द या सभागृहांत साम्यवादी आहेत अशी ग्वाही दिली. कम्युनिस्ट पार्टी संघटीत असून गुप्तपणें तिला

पैसा मिळतो. कम्युनिस्ट कार्यकर्ते मास्कोची यात्रा करून आलेले आहेत. प्रचारतंत्र त्यांनीं उत्तम प्रकारें हस्तगत केलें आहे, खोटें पासपोर्ट तयार करणें, गुप्त हस्तपत्रकें वाटणें, हें तर त्यांचें अगदीं सामान्य कार्य झालें आहे. त्यांच्या भाषणांत त्यांना कोणीतरी जातीयवादी ( Communalist ) म्हणाले. त्यावर त्यांनीं विचारलें " जातियवादी म्हणजे कोण ? " फजलुलहक्कांनी टोला मारला. " ज्याला पदवी मिळाली आहे तो "—याच वर्षीं याकुबसाहेब सर झाले होते—याकुबमिया गरम झाले. " सभागृह म्हणजे कलकत्ता कॉर्पोरेशन नव्हे कीं, जेथें वाटेल तें बोललेलें खपतें, " असा याकुबमियांनीं तीर मारला. हक हे मेयर असतांना कलकत्ता कॉर्पोरेशनच्या सभा विशेष गाजल्या होत्या. सर याकुब यांनीं नंतर गदर पक्षाचें पत्रक वाचून दाखविलें. त्यांत " इंग्रज शिपायांना जास्त पगार मिळतो; हे शीख शिपायांनो, इंग्रज तुमचें शौर्य वर्णन करतील व लवकरच होणाऱ्या युद्धांत तुम्हांस पाडतील; तुम्ही पुन्हा चूक करतां कामा नये; तुम्ही पोटासाठीं गुलामी पतकरली आहे; गदर पार्टी जें सांगेल तें ऐका; गांधींना तुमच्या त्यागाची कल्पना नाहीं; त्यांचा कार्यक्रम खोडसाळ आहे; गांधीवाद संपत आला आहे व गदर पक्ष—लोकपक्ष—लोकप्रिय होत आहे; युद्ध येईपर्यंत बरबर राजनिष्ठ राहा; पण आंतून गदर पक्षाला मिळा; हिंदी सैन्य देशाबाहेर जाऊं नये अशी चळवळ करा; बाहेर धाडलेंच तर शत्रूला मिळा, गदर पक्षानें कार्य सुरू केलें कीं, त्याला तावडतोब मिळा. ब्रिटिश साम्राज्याचा नाश होवो " वगैरे मजकूर होता. हें वाचतांना सर याकुबमिया अभिनयानें बोलत होते. " या पत्रकाचा लेखक मोठा मजेदार गृहस्थ दिसतो. मी त्याला भेटूं इच्छितों, " असें मौ. शौकतअली म्हणाले. " लेखक तुम्हाला दररोज भेटेल, त्याचा पत्ता शोधण्याचें कारण नाहीं. ते सर्व तुमचे जिगरदोस्त आहेत. त्यांपैकीं निम्मे, सभासद होऊन येथें आलें आहेत व निम्मे बाहेर आहेत, " सर याकुब यांनीं हातवारे करून उत्तर दिलें ! सभागृहांत प्रचंड हंशा झाला. गदर पक्षाचा—गदर म्हणजे बंड—इतिहास त्यांनीं सांगितला. थोडेसें शहाणपण जर शिल्लक असेल तर दडपशाहीचे कायदे जरूर आहेत, असें तुम्हांला पटेल. गांधीवाद, साम्यवादी लोकांना मारून टाकावयाचा आहे हें विसरूं नका, असें सांगून भाषण संपविलें. कॅ. लालचंद हे जाट गृहस्थ नंतर बोलले. हे सरकारनियुक्त सभासद, हुजूर आज्ञा म्हणजे देवाची आज्ञा मानणारे; त्यांनीं सांगितलें कीं, कॉंग्रेसच्या शेतांत कायदेभंगाचें पीक येतें.

आजचे काँग्रेसवाले, उद्यांचे दहशतवादी आहेत. तेव्हां त्यांचा पक्का व कायमचा बंदोबस्त झाला पाहिजे!! आमचें भाग्य कीं, कॅप्टन महाशय गृहमंत्री नाहींत, नाहीं तर त्यांनीं काय केलें असतें कोणाला ठाऊक. भुलाभाईनी, बी. दास यांचें बिल बेकायदेशीर संस्था ठरविण्याबाबत असलेला कायदा रद्द व्हावा, याकरितांच मुख्यत्वें आहे असें सांगून, कायद्याच्या दृष्टीनें सदहू बिलाच्या कलमांची छाननी करून बिल पास झाल्यास कांहींहि भिण्याचें कारण नाहीं असें सांगितलें. गेली २८ वर्षें हा सभाबंदी व संस्थाबंदीचा कायदा आहे, पण सरकारानें त्यांत कांहीं बदल केला नाहीं. प्रत्यक्ष हिंसा, अगर हिंसेला उत्तेजन देणाऱ्या संस्थापुरताच कायदा मर्यादित करतां आला असता; पण सरकारानें कांहीं केलें नाहीं, व अमर्याद सत्ता आपल्या हातीं ठेविली आहे. या स्थितींत बिलाला पाठिंबा द्यावा अशी त्यांनीं सर्व हिंदी सभासदांना विनंति केली. कलम २ मतांस टाकतां ६६ मतें बाजूस, व ६६ मतें कलमाच्या विरुद्ध पडलीं. अध्यक्षांनीं परंपरेप्रमाणें विद्यमान परिस्थिति रहावी ( Status quo ) म्हणून कलमाविरुद्ध मत दिलें व बिल खलास झालें. मतनोंदणीपूर्वीं सरकारी प्रतोदानें सिंधचे सभासद मि. लालचंद नवलराय यांना सरकारच्या बाजूनें मत देण्यास सांगितलें होतें, आमचा प्रयत्न, त्यांनीं आमच्या बाजूनें मत द्यावें असा होता. ते लोकनियुक्त सभासद–कॉं. नॅ. पक्षाचे–सभासद होते. अणे यांनीं सांगून पाहिलें, पण उपयोग झाला नाहीं. १९३६ च्या १ एप्रिलपासून सिंध वेगळा होणार हें जाहीर झालें होतें. घटना अंमलांत येईपर्यंत, सल्लागार नेमले जावयाचे होते. नाना कंडया उठल्या होत्या, तथापि लालचंद नवलराय यांनीं " हिंदुसंरक्षणार्थ तटस्थ राहिलों " असें सांगितलें, कदाचित् हेंहि खरें असेल!! "परकी सत्तेला सिंधनें प्रथम दार उघडलें व ती बाहेर जावी म्हणून दार उघडलें असतां, सिंधनेच ती राहावी म्हणून म्हणावें हें दुर्दैव आहे" असें मी त्यांना स्वच्छ सांगितलें. (" Sindh was first to bring in Foreigner, and is last to help him out " ) मतनोंदणीच्या निकालानें आमची तीव्र निराशा झाली. वर्तमानपत्रांतून लालचंद नवलराय यांजवर फारच टीका झाली पण उपयोग काय?

बी. दास यांचें बिल निकाली लागलें तरी सत्यमुर्ति यांचे सर्व दडपशाहीचे कायदे, जे त्यांनीं परिशिष्टांत नमूद केले होते ते, रद्द करण्याचें बिल शिल्लक होतें. या बिलांत त्यांनीं १८१८ च्या रेग्युलेशन पासून १९३४ अखेरपर्यंत काय-

ह्याच्या अंत्रांत असलेले सर्व जुलमी कायदे अगर त्यांतील जुलमी कलमें रद्द करावींत म्हणून मागणी केली होती. बिनचौकशीनें अटक, सभाबंदी, संस्थाबंदी, मुद्रण-नियंत्रण, राजद्रोह, जातीजातींत वाद या सर्व बाबींचा समावेश ज्या ज्या कलमांत अगर कायद्यांत होता त्या सर्वांवर चर्चा होणें अपरिहार्य होतें. सदरहू बिल निवडक कमिटीकडे धाडावें या सूचनेवर भाषण करण्यास त्यांनीं २० फेब्रुवारीला सुरुवात केली. सत्यमूर्ति त्या दिवशीं १ तास बोलले. ता. ९ एप्रिलला पुन्हां हें बिल सभागृहापुढें येणार होतें. अनेक सभासद यावर चर्चा करतील अशी सहाजीकच अपेक्षा होती. लखनौला काँग्रेस अधिवेशन ता. ९ ला सुरू होणार होतें. ता. ९ ला अ. भा. काँग्रेस कमिटीच्या सभेसाठीं अनेक सभासद जाणार होते. सरकारी प्रतोदानें ता. ९ ला सत्यमूर्ति यांचें भाषण संपल्यानंतर एकदम मतमोजणी मागून आमच्या सभासदांच्या गैरहजेरींत बिल फेटाळण्याचा घाट घातला आहे हें ता. ८ ला संध्याकाळीं कळलें. लखनौला सभासद जाणें अवश्य होतें. तेव्हां सत्यमूर्ति यांच्या घरीं जाऊन सर्व परिस्थिति सांगितली. त्यांनीं सबंध ९ चा दिवस मी भाषणांत काढीन व सरकारी डावपेंच हाणून पाडीन असें सांगितलें.आम्ही सर्व लखनौला रवाना झालों. ता. ९ एप्रिलला सत्यमूर्ति यांनीं बरोबर १२ ला भाषणास सुरुवात करून मध्यंतरीचा सुटीचा तास वजा जाता ५ वाजेपर्यंत भाषण लांबविलें, व ५ वाजतां अध्यक्षांनीं "संपलें कां" विचारलें असता 'अद्याप पुष्कळ बोलावयाचें आहे' असें निक्षून सांगितलें !! भाषणांत सर्व सामान्य तत्त्वांची चिकित्सा होती, विद्यमान कायद्यांची टीका होती, व विधायक सूचना होत्या. हिंसेला अगर अत्याचाराला प्रेरणा देणारी टीका असेल तरच ती राजद्रोहात्मक समजावी; सभा, मिरवणुकी काढणें हा हक्क आहे; कोठलीहि भयंकर परिस्थिति उत्पन्न झाली तरी ४८ तासांपेक्षां जास्त काल त्यांना बंदी नसावी. शिवाय याबाबत केलेल्या बंदीच्या हुकुमावर वरील कोर्टांत अपील असावें; बिनचौकशीनें अटक करणें झाल्यास तसाच घोर प्रसंग असला पाहिजे; पण असल्या लोकांची मुक्तता पण शक्य तितक्या लवकर झाली पाहिजे. १९२२ सालीं नेमलेल्या कमिटीनें अनेक दडपशाहीचे कायदे रद्द करावे म्हणून, सरकारास सुचविलें होतें. पण सरकारनें या १४ वर्षांत त्या शिफारसींना फारशी किंमत दिली नाहीं. दहशतवाद कोणालाहि नको आहे, काँग्रेसनेंहि याचा निषेध केला आहे. उलट गोऱ्या लोकांनीं जनरल डायरसारख्या आततायी माणसाचा सत्कार केला. हा

उल्लेख होतांच मि. जेम्सनें "पार्लमेंटनें सत्कार केला नाहीं." असा खुलासा केला; सत्यमूर्ति म्हणाले, "नसेल, पण इंग्रज स्त्री–पुरुषांनीं मोठी रक्कम व तलवार त्यास बहाल केली!!" गृहमंत्री चिडले; त्यांनीं "भगतसिंगाचा गौरव हिंदी पुढाऱ्यांनीं केला" अशी ओरड केली. "कॉंग्रेसनें त्याच्या कृत्याचा निषेध केला" ही माहिती सत्यमूर्तींनीं दिली. "पंडित नेहरूंनीं त्याची वाहवा केली," गृह-मंत्री गरम होऊन बोलले. "होय असें क्षणभर मानलें तरी, डायरचा सत्कार सबंध इंग्लंड राष्ट्रानें केला हें कसें?" असें सत्यमूर्तींनी उत्तर दिलें. या सरबत्तींत पांच वाजले व ता. ९ एप्रिलचा संस्मरणीय दिन संपला. सत्यमूर्तींनीं तार करून ही गोष्ट आम्हांस लखनौला कळविली. ता. १० ला तेहि लखनौला आले. आम्ही त्यांचें अभिनंदन केलें. त्यांचें भाषण, म्हणजे विक्रम होता. भाषण मुद्दे-सूद, माहितीपूर्ण, शिवाय तेंच तें पुन्हां एकदांही सांगितलें नाहीं. ता. २० एप्रिलला या बिलावर पुन्हां चर्चा सुरू झाली. त्याहि दिवशीं त्यांनीं दोन तास भाषण करून या बिलावर एकंदर सुमारे ९ तास भाषण करून सभा-गृहाच्या इतिहासांत अलौकिक अशी गोष्ट केली. त्यांच्या बिलानें अनेक बिलें मागें पडलीं; त्यांना वाव मिळाला नाहीं म्हणून सभासद तक्रारी करूं लागले. अनेक खासगी बिलें नुसतीं मांडलीं गेलीं होतीं; वास्तविक हें बिल महत्त्वाचें होतें. दडपशाहीचे कायदे रद्द करणें ही एक महत्त्वाची बाब, निवडणुकीच्या जाहीर-नाम्यांत होती. आमच्या सभासदांत स्त्रियांचे कैवारी भलत्याच प्रमाणांत होते. लग्न, वारसा, विधवाविवाह–बालविवाह प्रतिबंध, इत्यादि बाबतींत अनेक बिलें आलीं होतीं. अन्यपक्षीय सभासदांनींहि अनेक बिलें आणलीं होतीं. त्यांनाहि वाव मिळावा म्हणून सत्यमूर्तींच्या बिलावरील चर्चा तहकुब करावी अशी सूचना मांडण्यांत येऊन ती मान्य झाल्यावर हिंदू स्त्रियांच्या वारसाबाबत, शारदा कायदा व्यापक करण्याबाबत, आर्य लग्नसंस्काराबाबत, अशीं बरींच बिलें लोकमत अज-मावण्यासाठीं धाडावीं, याप्रमाणें सूचना पास झाल्या.

नवीन घटनेप्रमाणें मतदारसंघ कसे असावे, व मतदान पद्धति कशी असावी यासंबंधीं सरकारानें नेमलेल्या कमिटीचा रिपोर्ट होता, त्यावर सभागृहानें सर्व-पक्षीय निवडक कमिटी नेमली होती, व त्या कमिटीनें एकमताने कांहीं शिफा-रसी सुचविल्या होत्या. शक्य तितके हक्क कमी देणें, शक्य तितक्या थोड्या भागांना देणें, व मतदार संघ असे तयार करणें कीं, स्वाभिमानी, निःस्पृह, नोकर-

शाहीला न जुमानणारे, निवडून येऊं नयेत अशी योजना घटना-कायद्यांत होती. लोकशाहीला यशस्वी व्हावयाचें तर दोन प्रमुख पक्ष हवेत. कांहीं काळ तरी एक पक्ष निश्चित बहुमतांत हवा. या दृष्टीनें एक सभासदी मतदार संघ असणें जरूर होतें. तसेंच एकठा मत देणें मान्य करावयास नको होतें. तथापि अनेक सभासदी मतदार संघ (Multi-Member Constituency) व एकठा मत-पद्धति या दोन्ही गोष्टी हॅमन्ड कमिटीने मान्य करून त्या प्रमाणें योजना तयार केली होती. याशिवाय अशिक्षित मतदारानें आपणांस कोणास मत द्यावयाचें आहे हें निवडणूक-अंमलदारास सांगावें, अगर आपला मुखत्यार घेऊन त्याच्या मार्फत खूण करावी अशीहि शिफारस केली होती. ही तर फारच घातुक होती; यामुळें मतदानांतील गुप्तता जाणार होती. सावकार, जमिनदार, यांनी आपल्याला पसंत असेल असाच मुखत्यार त्यांच्या ताब्यांतील मतदारांना घ्यावयास लावला असता. सभागृहाच्या कमिटीनें अनेक शिफारसी करून एक सभासदी मतदारसंघ, विभागून मत देण्याची पद्धति, सर्वत्र गुप्त-मतदान पद्धति असावी अशा शिफारसी केल्या होत्या. कमिटीचा रिपोर्ट पंडित पंत यांनीं मांडला. चर्चेत झालेल्या माझ्या भाषणांत मुंबई इलाख्यांतील अन्याय मी उघड करून दाखविला. १९१९ मधील साउथबरो कमिटीनें शहर व खेडें विभाग यांत लोकसंख्येप्रमाणे जागांची वाटणी करावी असें नमूद केलें होतें. वास्तविक, विद्या, व्यापार, राजकीय जागृति, या दृष्टीनें शहरांना, लोकसंख्येपेक्षां जास्त जागा दिल्या तरी गैर नव्हतें. १९१९ च्या घटनेंत, मुंबई इलाख्यांतील शहरी वस्ती २७ टक्के असतांना जागा मात्र २३ टक्के मिळाल्या होत्या. नवीन घटनेंत लोकसंख्येच्या प्रमाणांत जागा, १७ टक्केसुद्धां पडत नाहींत. प्रादेशिक जागा १५८ आहेत, त्यांपैकीं, लोकसंख्येच्या मानानें शहरांना निदान ४२ जागा मिळावयास पाहिजेत; परंतु फक्त २७ च दिल्या आहेत. याचें कारण म्हणजे कॉंग्रेसला शहरांतून पाठिंबा फार मिळेल ही भीति होय. कॉंग्रेसचें सामर्थ्य शहर व खेडेंविभाग, सर्व देशभर आहे, हें सरकारला लवकरच कळेल असें मी बजावलें. कॉंग्रेसच्या भीतिनें अनेक-सभासदी-मतदार संघ मुंबई इलाख्यांत ठेवून एकठा मतदार पद्धतीही मान्य केली आहे. या पद्धतीमुळें हरिजन व वरच्या वर्गांतील मतदार एकमेकांच्या उमेदवाराना मतें देणार नाहींत. पुणें कराराचा हेतु आपुलकी उत्पन्न व्हावी, उभयतांत परस्पर भाव उत्पन्न व्हावा, हा आहे ('Mutuality is the essence of the Pact and mutuality is the essence

of the final election') असें डॉ. आंबेडकरांनीं सांगितलें. होतें; यासाठीं विभागून मत देण्याची पद्धति मान्य करावी. एकठ्ठा मतदान पद्धतीनें थोड्या लोकांच्या पाठबळां-वर पैसे खर्चून निवडून येतां येतें. उमेदवाराला, प्रत्येक मतदाराची गरज या पद्धतींत वाटत नाहीं, किंबहुना ही पद्धति खरी लोकशाही निर्माण करणारी नाहीं. याप्रमाणें चर्चेंत मी सांगितलें. २० मार्च रोजीं सर्व दिवसभर चर्चा होऊन, सर्व चर्चेचा रिपोर्ट सरकारनें विलायतेस कळविला. निवडक कामिटीचा रिपोर्ट सभागृहानें एक-मतानें मान्य केला.

वेतना बाबतचें बिल या अधिवेशनांत पास झालें. मुख्य बाब पगार ठराविक तारखेच्या आंत मालकांनीं मजुरांना द्यावा ही होय. निवडक कामिटीनें अनेक धंद्यां-तील कामगारांना हें बिल लागू करावें अशी शिफारस केली. त्याचप्रमाणें नोटीस दिल्याशिवाय मालकानें मजुरांस काढल्यास त्यांस नुकसान भरपाई द्यावी, अशीहि व्यवस्था यांत केली. याला मालकांचा मोठा विरोध होता. सर होमी मोदी यांनीं १० अगर जास्त मजूर, नोटीस न देतां व योग्य कारणाशिवाय गैरहजर राहिल्यास मालकाला १३ दिवसाचा पगार, नुकसान भरपाई म्हणून कापण्याचा हक्क असावा अशी दुरुस्ती सुचविली. वास्तविक ही दुरुस्ती निवडक कमिटीनें अमान्य केली होती, व या गोष्टीला सरकारनेंहि मान्यता दिली होती. परंतु चर्चेच्या वेळीं सर मोदींच्या उपसूचनेला सरकारनें उचलून धरलें. वास्तविक निवडक कमिटीच्या शिफा-रसीप्रमाणें वागण्यास, सरकार नैतिकदृष्ट्या बांधलें गेलें होतें. पुढें येणाऱ्या 'ओटावा' वादविवादाच्या दृष्टीने सरकारने मालक वर्गाला खूष करण्याकरितां, ही पगडी फिर-विली अशी उघड टीका पण करण्यांत आली. सर मोदी यांची उपसूचना मजुरांच्या दृष्टीनें घातुक होती, तिजमुळें तावडतोबी संप उघड बेकायदेशीर होणार होता. योग्य कारण नाहीं असें मालक ठरविणार, पगार कापणार, व मग मजुरानें बाट-ल्यास कोर्टात जावें. हा अन्याय आहे म्हणून मी, गिरी, जोशी, रंगा वगैरेंनीं भाषणें करून विरोध दर्शविला. परंतु काँग्रेस पक्षाशिवाय कोणी विरोध न केल्या-मुळें सर मोदी यांची उपसूचना पास होऊन, मजुरांच्या हक्कांवर आघात बसला. नियमित वेतन सर्व कारखान्यांतून ( Factories ) व अनेक उद्योगधंद्यांतून मिळूं लागलें हें खरें, मजुरांच्या संघटनेवर पण आघात बसला, हेंही खरें. या अधि-वेशनांतील आणखी एक महत्त्वाचें बिल, इटालींतील लोकांशीं देण्याघेण्याबाबत प्रतिबंध करणारें ( Italian Loans & Credit Prohibition Bill ) सरकारनें

मांडलें. वास्तविक, खुद्द बिलांतील कलमांत आक्षेपार्ह असें कांहींहि नव्हतें. कॉंग्रेस पक्ष नसता तर, तें अर्ध्या तासांतहि पास झालें असतें. परंतु ही संधी घेऊन, कॉंग्रेस पक्षानें इंग्लंडचें परराष्ट्रीय धोरण, लीग ऑफ नेशन्स–राष्ट्रसंघ,–जागतिक राजकारण, या सर्वांवर चर्चा केली. वास्तविक, सभेच्या नियमाप्रमाणें परराष्ट्रीय राजकारण सभागृहाच्या अधिकाराबाहेर आहे. तथापि सरकारनें आपण होऊन बिल आणलें, व त्यांवर चर्चा करणें हा सभासदांचा हक्क आहे. सरकार पेंचांत सांपडलें. नियमबाह्य भाषणें होत आहेत, अधिकारातिक्रम होत आहे, अशा बऱ्याच तक्रारी घेण्यांत आल्या. परंतु चर्चा बिलाला धरून आहे, प्रस्तुत आहे, असा अध्यक्षांनीं निर्णय दिल्यामुळें चर्चा पूर्णपणें व बेफामपणेंहि झाली. सभागृहानें एक नवीन अधिकार शाबीत केला, व परराष्ट्रीय राजकारण पुढें उघड उघड प्रसंगोपात चर्चिलें जाऊं लागलें.

सभागृहांतील भाषणासंबंधीं एक महत्त्वाचा निर्णय या अधिवेशनांत लागला. १९३५ च्या सिमला अधिवेशनांत पंडित कृष्णकांत मालवीय यांनीं दडपशाहीच्या बिलावरील स्वतःचें भाषण अभ्युदय छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें. हें चोपडें आक्षेपार्ह आहे म्हणून संयुक्त प्रांताच्या सरकारानें अभ्युदय छापखान्यापासून जामिन मागितला. ही गोष्ट ता. १० जानेवारी १९३६ रोजीं झाली. ता. ३ फेब्रुवारी रोजीं म्हणजे अधिवेशनाच्या सुरवातीच्या दिवशीं सरदार संतसिंग यांनीं तहकुबीची सूचना दिली. ती गव्हर्नर जनरल यांनीं प्रांतिक सरकाराचा प्रश्न आहे म्हणून तिला परवानगी नाकारली. ता. ५ फेब्रुवारीला सरदार संतसिंग यांनीं 'सभासदानें स्वतःचें भाषण छापणें व प्रसिद्ध करणें या हक्कांवर गदा आली आहे' म्हणून त्याचा विचार करण्यासाठीं तहकुबीची सूचना दिली. ती, अध्यक्षांनीं नोटीस उशीरा दिली म्हणून व सभासदांच्या हक्कांचा प्रश्न तहकुबीच्या सूचनेंत विचार करतां येत नाहीं म्हणून नामंजुर केली. ता. १० फेब्रुवारीला सरदार संतसिंग यांनीं सभासदांच्या हक्कांची चर्चा करण्याकरितां व विशेषतः भाषणस्वातंत्र्य व भाषण प्रकाशन या हक्कांचा विचार करण्याकरितां सभागृहांतील चालू काम बंद करावें, व ही चर्चा करावी व अशा सूचनेला नोटीसीची जरुरी नाहीं, असें म्हणून सूचना मांडली. ता. १० फेब्रुवारी हा सबंध दिवस, अशी सूचना मांडतां येतें कीं नाहीं या चर्चेंत गेला. जिन्हा, देसाई, सर नृपेन्द्र सरकार, वगैरे अनेकांनीं या चर्चेंत भाग घेतला. लोकपक्षाचें म्हणणें सभागृहांतील भाषणाबद्दल कोठलाहि खटला होऊं शकत नाहीं. सभासदाला संपूर्ण संरक्षण आहे. सभासद

बोलतो हें कांहीं सभेंत हजर असलेल्या मूठभर लोकांसाठीं नव्हे. तसें असेल तर, सभा म्हणजे एक शाळेंतील वादाविवाद मंडळच होईल. देशभर, लोकांना सभेंत काय झालें, कोण काय बोललें, हें कळणें जरूर आहे. अप्रत्यक्ष श्रोतृवृंद म्हणजे आमदेश म्हणून जर सभेंतील वृत्तांत प्रामाणिकपणें व योग्य रीतीनें छापला तर, त्याही बाबतींत संरक्षण पाहिजे, व खटले होतां कामा नयेत, व हाच नियम इंग्लंडमध्यें सामान्यपणें चालू आहे. संरक्षण नसेल तर स्वच्छ, स्पष्ट व निर्भीड टीका होणार नाहीं. योग्य प्रकारें लोकमत तयार होणार नाहीं. सरकारी रिपोर्ट थोडे लोक वाचतात. वर्तमानपत्रें हीं सर्व जनता वाचते. वर्तमानपत्रें हीं राष्ट्राच्या दौलतीचा चौथा खांब आहे. सभासदांच्या हक्काची बाब वाटेल त्या वेळेस निव्वळ सूचनेने सभागृहापुढे आणतां येते व ती येतांच बाकीच्या बाबी दूर सारून तिजवर चर्चा झाली पाहिजे हा इंग्लिश घटनेंतील दाखला येथें लागू केला पाहिजे; नाहींतर ही बाब सभेपुढें येणें जवळ जवळ अशक्य आहे. खाजगी सभासदानें ठरावानें आणावी तर, तो ठराव बॅलट होऊन आला पाहिजे. शिवाय जे दिवस बिनसरकारी कामाकरितां नेमलेले असतील त्याच दिवशीं तो ठराव येणार. शिवाय बॅलट होऊन ताबडतोब त्यावर चर्चा होईल अशीहि परिस्थिति नसते. उलट, हक्कांचा प्रश्न ताबडतोब उपस्थित करून चर्चिला पाहिजे असा सर्वमान्य संकेत आहे. ठरावाव्यतिरिक्त एखादी सार्वजनिक महत्त्वाची बाब नियम २४ अ प्रमाणें चर्चेसाठीं सभेपुढें आणतां येते. पण त्या बाबतींत सरकारी मंत्र्यानें व अध्यक्षानें संमति दिली तर. सरकारच अतिक्रमण करणार मग सरकार संमति कशी देणार! तहकुबीची सूचना द्यावयाची तर एक दिवससुद्धां नोटिस देण्यांत उशीर होतां कामा नये. शिवाय ती बाब तांतडीची, निश्चित स्वरूपाची व सार्वजनिक महत्त्वाची असली पाहिजे. सर्व दृष्टीनें विचार करतां इंग्लंडमधील एतद्विषयक प्रघात योग्य मानला पाहिजे. सरकारचें म्हणणें, सभागृहांतील काम नियमांनीं नियंत्रित केलेलें आहे. नियमाप्रमाणें सूचना आली तरच चर्चा होईल. तसेंच, हक्कांबाबत सरकारचें म्हणणें कीं, हिंदुस्थानाच्या राज्यकारभारकायद्यांतील कलम ६७ (७) प्रमाणें सभागृहांतिल माणसांना संपूर्ण संरक्षण आहे. त्याचप्रमाणें सदरहू सभागृहांतील वृत्तांत सरकारी रिपोर्टांत जे छापले जातील त्याबद्दल संपूर्ण संरक्षण आहे. खासगी रीतीने कोणी भाषण छापल्यास त्यास संरक्षण नाहीं. तें भाषण राजद्रोही अगर आक्षेपार्ह असल्यास छापणारावर व प्रसिद्ध करणारांवर खटला होईल. अध्यक्षांनीं आपला निर्णय ता. २७

फेब्रुवारी रोजीं दिला. त्यांचें म्हणणें असें कीं, तहकूबीची सूचना देऊन हा प्रश्न उपस्थित करतां येतो; मात्र त्यांत आवश्यक बाबी असल्या पाहिजेत. ठरावाने हा प्रश्न उपस्थित करणें कठीण आहे. सामान्यतः नियम २४ अ प्रमाणें हा प्रश्न उपस्थित केला पाहिजे; व तसें झाल्यास सरकार अगर अध्यक्ष सामान्यपणें संमति देतील असें धरून चाललें पाहिजे. संतसिंग यांची सूचना नियम २४ अ प्रमाणें आणलेली नाहीं म्हणून ती नामंजूर केली गेली. नियम २४ अ मध्यें एकंदर विचार करतां दुरुस्ती करावयास पाहिजे. गुणदोषांच्या दृष्टीनें अध्यक्षांचा निर्णय असा कीं, भाषणस्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य फक्त सभागृहांत आहे. सभागृहांतील भाषणाबद्दल अगर मत दिल्याबद्दल सरकारला अगर अन्य कोणालाही खटला करतां येणार नाहीं, त्याचप्रमाणें सरकारी रिपोर्टांत भाषण छापलें व त्यांत कांहींही असलें तरी सरकारला अगर अन्य कोणाला खटला करतां येणार नाहीं एवढेंच संरक्षण आहे. याचा अर्थ वाटेल त्यानें भाषण छापलें अगर वृत्तांत प्रसिद्ध केला तर संरक्षण आहे असा नव्हे. कलम ६७ (७) अगदी स्पष्ट आहे व अध्यक्षांच्या मतेंही इंग्लंडमधील कायदा असाच आहे. स्वतंत्रपणें सभासदानें भाषण छापणें म्हणजे एक स्वतंत्र प्रकाशन आहे व त्याचा सभागृहांतील कामकाजाशीं संबंध येत नाहीं, म्हणून त्याला संरक्षण नाहीं. या निर्णयामुळें भाषणस्वातंत्र्याची मर्यादा स्पष्ट झाली. वर्तमानपत्रांत जे वृत्तान्त छापतात ते त्यांच्या स्वतःच्या जबाबदारीवर व त्या कामीं सर्वसामान्य कायदा लागू पडणार हें उघड झालें. अर्थात हा निर्णय न्यायालयाचा नव्हे हें खरें, पण त्याचें महत्त्व मात्र कमी नसल्यामुळें भाषणस्वातंत्र्य मर्यादित झालें हें खरें. लोकशिक्षणाच्या दृष्टीनें यांत फरक होणें जरूर आहे. याची जाणीव या प्रसंगानें सर्वांना झाली.

सालमजकुरीं रेल्वे बजेट ता. १८ फेब्रुवारी रोजीं सर महंमद झाफरुल्लाखान यांनीं मांडलें. त्यांनीं १९२४–२५ ते १९३४–३५ च्या कालांतील रेल्वेच्या व्यवहाराचें समालोचन केलें. १९२४–२५ पासून एका ठराविक योजनेप्रमाणें रेल्वेनें आपल्या उत्पन्नांतून सर्वसाधारण कारभाराकरितां कांहीं भाग द्यावा असें ठरलें होतें. १९२४-२५ ते १९२९–३० पर्यंत रेल्वेंतून वरील कारणाकरितां कांहीं उत्पन्न मिळालें. १९३०–३१ पासून आपत्ति-काल सुरू झाला, तरी सुद्धां ५½ कोटी रुपये रेल्वे-कडून सर्वसाधारण राज्यकारभाराकरितां मिळाले. तात्पर्य १९३०–३१ पर्यंत रेल्वे-कडून चालू खर्च, भांडवलावरील व्याज, घसारा फंड वगैरे वजा जातां रु. ४२

कोटी राज्यकारभाराकरितां मिळाले. १९३०-३१ ते ३४-३५ पर्यंत रेल्वेला घसाराफंडांतून रक्कम घेऊन चालू खर्च व व्याज भागवावें लागलें. राज्यकारभाराकरितां कांहीं देतां आलें नाहीं. घसाराफंडांतून रु. २७॥ कोटी रक्कम १९३४-३५ पर्यंत उचलण्यांत आली, व शेवटीं सदरहू फंड रु. ९॥ कोटी पर्यंत आला. जागतिक मंदी, प्रत्येक राष्ट्र स्वयंपूर्ण होण्याची खटपट करूं लागलें, त्यामुळें आंतरराष्ट्रीय व्यापार आकसला; मोटारीमुळें उत्पन्न झालेली स्पर्धा, कामगारांच्या हितार्थ केलेले कायदे, व त्यामुळें वाढलेला खर्च, इत्यादि कारणांनीं रेल्वे खात्याला तूट येऊं लागली असें निदान रेल्वे-मंत्र्यांनीं आपल्या भाषणांत केलें. एकंदर परिस्थिति पाहतां रेल्वेची तूट भरून निघणें कठीण आहे. तथापि पगारांचें स्केल कमी करून, कमी दरानें कर्ज काढून, जुनें फेडून, थोडी व्याजाची बचत करून, मोटारीवर कांहीं नियंत्रण घालून कांहीं प्रयत्न करावयाचें धोरण ठरलें आहे असेंहीं त्यांनीं सांगितलें; अन्य देशांच्या मानानें येथील रेल्वेची परिस्थिति बरी आहे, एवढ्यांतच त्यांनीं समाधान मानून घेतलें. नंतरच्या चर्चेंत एकंदर रेल्वेखात्याच्या कारभारावर चर्चा झाली. लष्करी डावपेचाच्या दृष्टीनें बांधलेल्या रेल्वे-मार्गापासून कांहींच उत्पन्न येत नाहीं. त्यांतील नुकसान लष्करी खात्यांत टाकावयास पाहिजे. रेल्वे-व्यवहारांत बाजवीपेक्षां जास्त भांडवल गुंतविलें जात आहे व त्यामुळें व्याजाची रक्कम वाढत आहे. नुसत्या पगारावरील खर्च एकंदर खर्चाच्या ५८ टक्के आहे. याचा अर्थ असा कीं, कारणापेक्षां, जरुरीपेक्षां जास्त माणसें नेमलीं गेलीं आहेत. शिवाय गोऱ्या अधिकाऱ्यांची वर्णी लठ्ठ पगारावर होणें चालूच आहे. खाजगी कंपन्यांकडे असलेल्या रेल्वे-लायनी सरकारनें ताब्यांत घेतल्यास उत्पन्न वाढेल. त्याचप्रमाणें एंजिनें व इतर सामुग्री येथेंच तयार केल्यास आणखी बचत होईल. अगदीं उघडपणें जी लांचलुचपत चालते ती बंद केल्यास उत्पन्न वाढेल. रेल्वे-बोर्डानें सर्व गोष्टींचें केंद्रीकरण केलें, यामुळें कार्यक्षमता कमी झाली असाहि आक्षेप घेण्यांत आला. तज्ञ म्हणून गोऱ्यांची वर्णी लावण्यांत येते. रेल्वे खातें ही एक धंद्याची बाब आहे, हौसेची बाब नव्हे; या दृष्टीनें कारभार चालविला तर तो काटकसरीनें होऊन फायदा वाढेल व लोकांची सोय होईल. गोऱ्यांचा पगार कमी करतां येत नाहीं म्हणून तिसऱ्या वर्गाच्या उतारूंचें भाडें वाढविणें, त्यांच्या बहातुकीवरील कर वाढविणें म्हणजे विनोदमूर्ति लाला शामलाल म्हणाले ' कुंभाराचें कुंभारणपुढें कांहीं चालत नाहीं म्हणून रागानें तो गाढवांचें कान ओढतो तसें झालें आहे. ( कुम्हारिन, कुम्हार

पर पार न बसाई, गधे के कान खींचे )." परदेशी व्यापार कसा वाढेल, परदेशांतून पक्का माल इकडे अधिक कसा आणतां येईल व कच्चा माल जास्त सोयीनें तिकडे कसा जाईल वगैरे सोयी जाणून माल बाहातुकीचे दर ठरविले आहेत, हा आरोप आंकड्यानिशी शाबीत करण्यांत आला. तूट कशी भरून काढावी यावर बडेभाई शौकतअल्ली म्हणाले, " माझा मुसलमानी धर्म सांगतो कीं, पैसा असेल तेव्हां खर्च करून टाकावा, व नसेल तेव्हां उपवास करावा. असेल तेव्हां ईद व नसेल तेव्हां रमजान; म्हणून रेल्वे खात्यानें वर्षभर रमजानचे रोझे करावे, म्हणजे उपवास करावा." बडे मिया अर्थमंत्री झाले नाहींत हें देशाचें महाभाग्यच समजलें पाहिजे ! असें सांगतात कीं महंमद अल्लीना सभेंत कोणीतरी खिलाफत फंडाचा हिशोब मागितला त्यावर त्यांनीं उत्तर दिलें, " तो स्वर्गात मिळेल." त्यावर प्रश्न विचारणारानें सांगितलें " कांहीं हरकत नाहीं; पण तुम्ही तेथें सांपडाल का ? " अल्लीबंधू म्हणजे बेफामपणा व भंपकपणा, ही टीका अनेक वेळां रास्त वाटते. सर गिडने यांनीं अँग्लो-इंडियनांना मिळणारा पगार कमी आहे अशी तक्रार केली. झाफरुल्लांनीं चर्चेला उत्तर दिल्यानंतर मागणीवरील कपातीवर वादविवाद झाला. रेल्वेबोर्डाचा कारभार, सामुग्री व माल घेण्याचें धोरण, तिसऱ्या वर्गाच्या उतारूंचे हाल, रेल्वे कामगारांचीं गाऱ्हाणीं, मुसलमांनाना देण्यांत येणाऱ्या नोकऱ्या, रेल्वेचें एकीकरण वगैरे प्रश्नांबाबत वादविवाद होऊन, जातवार नोकऱ्यांबद्दलची कपात सोडून, काँग्रेस व काँ. नॅ. पक्ष यांनीं आणलेल्या कपाती पास झाल्या. मागील वर्षी रेल्वे कामगारांच्या गाऱ्हाण्याबाबत बोलतांना १९३० च्या संपांत कमी केलेल्या ५ हजार कामगारांची तक्रार मी मांडली होती. या वर्षी पुन्हां तीच कथा गावी लागली. काटकसरीच्या नांवाखालीं ५ हजार लोक कमी झाले होते. रेल्वे युनियन्सना मान्यता देण्यांत येत नाहीं, बादशाही कमिशनच्या (Royal Commission on Labour) शिफारशीप्रमाणें मान्यता देण्याच्या कामीं उदार धोरण ठेवावें, पगाराचें स्केल न्याय्य नाहीं, वगैरे बाबी मी, गिरी, रंगा, जोशी यांनीं सभागृहापुढें मांडल्या. पंत, दास, सत्यमूर्ति यांनीं रेल्वेच्या उधळपट्टीच्या कारभारावर टीका केली. एकंदर रेल्वेचें लळीत पांच दिवस चाललें. शेवटीं वेळ संपतांच 'कत्तल' सुरू होऊन रेल्वे-बजेट संपलें. रेल्वे मंत्र्यांची माहिती पद्धतशीर असे. ते व्यवस्थित बोलत. ते मुसलमानांच्या हिताबद्दल दक्ष असून निर्भीडपणाहि त्यांच्यांत होता. साल-मजकूरची चर्चा मागील वर्षाच्या चर्चेपेक्षां अधिक उपयुक्त व व्यापक झाली. त्याचें थोडेसें श्रेय नवीन रेल्वे-मंत्र्याला देणें जरूर आहे.

ता. २८ फेब्रुवारी रोजीं ५ वाजतां फडणीस सर ग्रिग यांनीं सालमजकूरचें अंदाजपत्रक मांडलें. १९३४-३५ च्या अखेरच्या हिशोबांत दुरुस्त अंदाजापेक्षां १·६८ कोटी रु. अधिक जमा झाले. १९३५-३६ सालच्या दुरुस्त अंदाजांत २·४२ कोटी रु. सालअखेर शिल्लक राहतील अशी माहिती दिली. वास्तविक १९३५-३६ साल अखेर फक्त ६ लाख रु. शिल्लक राहतील असें मागील सालीं अंदाज-पत्रक-मांडतांना सांगितलें होतें. एवढा फरक कां पडला याचें कारण सांगतांना देशाची आर्थिक स्थिति सुधारली असून ब्रिटिश साम्राज्यांत राहण्यापासून त्यांनीं हिंदुस्थान धुतला जात आहे हें विधान खोटें आहे याचा हा पुरावा आहे असेंही सांगितलें. जास्त शिल्लक राहिल्यामुळें खेडेगांव सुधारणा-फंडाकडे एक कोटी रुपयांऐवजीं रु. २·८१ लाख देतां आले. शेतकऱ्यांकरितां केवढी गोष्ट सरकार करीत आहे याची जाणीव सभासदांना नाहीं, याचें आश्चर्य त्यांनीं प्रगट केलें. नंतर निरनिराळ्या जमेच्या व खर्चाच्या कलमाबाबत फरक पडण्याचीं कारणें सांगून १९३६-३७ सालांत काय अंदाज धरले आहेत हें सांगितलें. संरक्षण खात्यांतील खर्च बराच कमी झाला आहे, पण तो तात्कालीक आहे, ही बचत कायमची नव्हे हेंही सांगून टाकलें. क्वेटयाच्या पुनर्घटनेला-बांधणीला-पुष्कळ खर्च करावा लागेल हें सांगून १९३४-३५ मधील पक्की शिल्लक रु. १·७३ कोटी, १९३५-३६ सालांतील दुरुस्त अंदाजाप्रमाणें शिल्लक रु. २·४२ कोटी, व १९३६-३७ सालांतील अंदाजी शिल्लक रु. २·०५ कोटी यांची वासलात खालीलप्रमाणें केल्याचें जाहीर केलें. शेतकी, शोध, नभोवाणी, ओरिसा व सिंधमधील होणाऱ्या नवीन प्रांतिक सरकारी कचेऱ्या, यांवर त्यांतील बराच भाग खर्च करण्यांत येईल असें सांगून रु. २ कोटींची शिल्लक १९३६-६७ सालांत कांहीं कर कमी करून जिरवावयाची असें जाहीर केलें. पुढील सालीं सुरू होणाऱ्या घटनेमुळें होणारे फरक लक्षांत घेऊन, प्रांतिक सरकारांना करावी लागणारी मदत लक्षांत घेऊनच हे कर कमी करण्याचें ठरलें आहे, असें सांगितलें. नोकरांची पगारकपात मागील वर्षींच काढून टाकली होती, व जी शिल्लक राहिली होती तीही सालमजकुरीं काढून टाकून वर उल्लेखिलेली शिल्लक राहिली होती. पगारकपात कायम ठेविली असती तर, अधिक प्रमाणांत कर कमी करतां आले असते; पण जनतेपेक्षां सरकाराला नोकरांचें हित-अधिक कळतें ही टीका मग रास्त कशी ठरली असती ? कमी केलेल्या करांतील मुख्य बाब म्हणजे रु. २००० खालील उत्पन्नावरील कर माफ केला. दोन हजारां

पेक्षां जास्त उत्पन्नावर जो अधिक कर ( Surcharge ) बसविला होता तो निम्मा म्हणजे मुख्य कराच्या १⁄६ केला. मागील वर्षी केलेल्या टीकेचाच हा परिणाम होय. अर्ध्या तोळ्याच्या ऐवजीं १ आण्यांत एक तोळ्याच्या वजनाचें पाकीट जाईल असें जाहीर केलें. कायमस्वरूपी बाबींतून उत्पन्न वाढत नसतांना उरलेली शिल्लक कर कायमचे कमी करण्याकडे वापरणें ही अदूर दृष्टी आहे, हें त्यांनीं मान्य करून, हिंदुस्थानाची स्थिती झपाट्यानें सुधारत आहे, म्हणूनच हा धोका पत्करला आहे असें विधान केलें. जशी राजकीय प्रगति होत जाईल तशी आर्थिक परिस्थिति सुधारेल. पण राजकीय वातावरण गरम तर राजकीय प्रगतीही होणार नाहीं, असें सांगून फडणिसी व्यवस्थेबाबतचें ( Finance Bill ) बिल सभागृहापुढें मांडलें. दोन दिवस बजेटावर सामान्य चर्चा झाली. त्यांत अंदाजपत्रक शिलकी स्वरूपाचें आहे ( Surplus Budget ) हें खरें नाहीं. एकंदर फडणिसी व्यवहार पाहातां प्रांतिक स्वायत्तता यशस्वी होणार नाहीं, असें अखिल दत्त व गुलाम हुसेन हिदायतुल्ला यांनीं सांगितलें. शौकतअल्ली म्हणाले, "मी सतरा वर्षें सरकारी नोकरी केली. मीं चांगलें काम केलें." एकानें आवाज काढला 'अफू!' त्यावर ते म्हणाले, "होय, अफूचें व माझें चांगलेंच जमत असे. एक दिवस उजाडतांच धर्माचा संदेश आला. दोनदां दाढी करीत होतों तें सोडून दिलें व तिला वाढविली. सुंदर कपडे फेकून दिले व फकिरी पेशा पत्करिला. आम्हां बंधूंना सरकारानें तुरुंगांत टाकलें. माझें पेन्शन बंद केलें. यंदाच्या बजेटांत शिल्लक उरली आहे तरी फडणिसांनीं—ते फार चांगलें गृहस्थ आहेत—मला फार आवडतात—माझी पेन्शनची बाकी रु. २० हजार देऊन टाकावी! मी गरीब आहे एवढें त्यांनीं केलें म्हणजे त्यांचें बजेट गरीब माणसाकरितां केलेलें बजेट ठरेल !! मला खर्च फार येतो. रिक्षावाले माझ्याकडे पाहून दुप्पट पैसे मागतात. आतां हातपाय कमजोर झालेले आहेत. वादविवाद कशाला करतां? दोन्ही पक्षांचीं चार माणसें एकत्र बसवून ठरवून टाका. म्हणजे मतदानाची दगदग व वाटचाल वांचेल!" अध्यक्षांनीं सांगितलें कीं, "देशाच्या गान्हाण्यावर बोला." मिया म्हणाले, "सरकार आपल्या नोकरांची काळजी घेतें, तशी तुम्ही आमची घ्या, व निदान रिक्षा–भत्ता तरी देवबा!" डॉ. राजन् यांनीं फडणिसांच्या चुकीच्या अंदाजावर टीका केली. डॉ. खान यांनीं "हें सरकार गरिबांसाठीं कांहीं करणार नाहीं. हें कार्यकारी मंडळ वाटेल ते वटहुकूम काढतें. वास्तविक हें मंडळ बेकायदेशीर संस्था आहे. त्यांच्यांत दूरदृष्टी नाहीं व अकल नाहीं.

व आपले अधिकार लवकरच जाणार म्हणून भीतिनें ते वाटेल तें करावयास उद्युक्त झाले आहेत. जे परकी अधिकारी आहेत त्यांची दृष्टी स्वतःचा स्वार्थ साधण्याकडे आहे, व जे देशी अधिकारी आहेत ते गुलाम बनलेले आहेत. कांहीं पदव्याकडे डोळे लावून बसले आहेत." नंतर डॉ. साहेबांनीं सरहद्दीवरील सरकारी अधिकाऱ्यांच्या लीला वर्णन केल्या. त्यांच्या भाषणामुळें गोरे अधिकारी सभासद फार गरम झालें. वेळच संपला, नाहीं तर प्रसंगच ओढवला असता!!

शेठ मथुरादास यांनीं "देशाची स्थिती आर्थिक दृष्टया सुधारत आहे हें खरें नाहीं, सरकार काटकसर करीत नाहीं" वगैरे तक्रारी केल्या. मोदी म्हणाले, "बजेट वाईट खरें, पण अगदीं वाईट नाहीं." याकुब यांनीं तक्रार केली कीं, "बजेट भांडवलवाल्यांच्या फायद्याचें आहे, व त्यांची मर्जी संभाळण्याचें काम सरकार करीत आहे." "नभोवाणीवर खर्च करणें म्हणजे सरकारी प्रचार करणेंच होय" असें वसंतदास म्हणाले; ते पुढें म्हणाले, "देशी धंद्यांना उत्तेजन देण्याविरुद्ध सरकार आहे व त्याच दृष्टीनें बजेट तयार केलें आहे." डॉ. बानर्जी यांनीं खर्चाच्या बाबीवर विस्तारशः टीका केली. आधिक कर कमी करूं नये तो तसाच ठेऊन पोस्टाचे दर कमी करावेत असें त्यांनीं सुचविलें. डॉ. दलाल यांनीं येणाऱ्या व्हाइसरॉयची स्तुतीच आपल्या भाषणांमध्यें गायिली, त्यांत दूरदृष्टी होती. डॉ. मजकूर हे सरकार नियुक्त सभासद व नंतर ते सरही झाले; सर कासवजी म्हणाले, "थोडक्यांत बोलण्यांत विद्वत्तेचें रहस्य आहे व ही गोष्ट फडणीस चांगलीच जाणतात." "दीड तास" असा सत्यमूर्तीनीं टोला मारला. उत्तर न देतांच कावसजीनीं फडणिसांच्या अंदाज करण्याच्या पद्धतीवर कोरडे ओढले. पुढें चार वर्षांनीं काय होणार आहे ही दृष्टि ठेवून वागणें गैर आहे. सर्वत्र परिस्थिती अस्थीर आहे. कर देण्यालाहि कांहीं मर्यादा आहेत. शिलकींतून भांडवली कामें–कायम स्वरूपाचीं कामें–पुरीं करणें चूक आहे. त्याचप्रमाणें जमा कमी अंदाजून सालअखेर ती जास्त आली, शिल्लक जास्त उरली, तर ती कर कमी करण्याकडेच खर्च करावी, दुसऱ्या कोणत्याहि कार्याकडे ती खर्च करूं नये. सर कासवजींनीं मध्यंतरी सरकार विरुद्ध टीका करून सरकारला टोला मारला म्हणून "तुम्ही कॉंग्रेस सभासद व्हा. हे घ्या चार आणे" असा उलट टोला फडणिसांनीं त्यांना मारला होता. त्यास उत्तर म्हणून या भाषणांत त्यांनीं (कावसजींनीं) फडणिसांची शास्त्रोक्त टीका करून चांगलीच हजेरी घेतली होती. पंडित पालीवाल यांनीं लेनीननें ड्युमामधील

कामगार प्रतिनिधींना जो सल्ला दिला होता त्याप्रमाणें आपली दृष्टि आहे असें सांगितलें. ( "You are a worker, the Duma is for Buffaloes. You just go and tell all over Russia about the life of workers, explain the horrors of capitalist slavery, call the workers to revolution, fling in the face of the Black Duma the words 'scoundrels', 'exploiters', etc. You introduce such an amendment, that in three years we are going to hang the lot of you black hundred Cadets on lamp posts. Now that will be a real amendment." ) वरील सल्ल्याप्रमाणें शिव्यांचा वर्षाव त्यांनीं केला नाहीं; किंवा उपसूचनाहि मांडली नाहीं. इंग्रज सभासदांनीं बाड-बिस्तारा घेऊन चालतें व्हावें एवढेंच सुचविलें! 'बाडबिस्तारा ठेवून जावें' अशी एकानें सूचना केली!! जनताहितार्थ हा खर्च न होता तो साम्राज्याकरितां खर्च होत आहे;एकंदर जनता अगदी हताश झाली आहे व हा कल्पांत टाळावयाचा असेल तर असले बेडसर फडणीस-शॉच्या मतें हे सगळे निदान ९९ टक्के बेडसर असतात-यांना बाजूस सारून चांगल्या माणसांच्या हातीं कारभार दिला पाहिजे. फडणिसांच्या रोगावर स्वतःचें म्हणून पंडित पालिवाल यांनीं औषध सांगितलें तें असें. "अहंभावाचें संकोचन व मानव्याचें विकसन केल्यास रोग बरा होईल." ( A little deflation of his ego and a little inflation of the man in him will do him immense good.) ही मात्रा फडणिसाला अयोग्य नव्हती, निदान सभासदांनीं सभागृहांत हास्य उधळून ती प्रस्तुत आहे एवढें तरी नमूद केलें. युरोपियन गटाचे मॉर्गन यांनीं अवचित व अकल्पित उरलेली शिल्लक कर्ज-फेड करणाऱ्या फेडफंडांत जमा करणें, ही योग्य गोष्ट केली नाहीं म्हणून टीका केली. ब्रह्मी सभासद यु बी सी यांनीं हिंदी लोकांनीं ब्रम्हदेशाची गळचेपी चालविली आहे, ती तूर्त बंद व्हावी, मग गोऱ्या लोकांकडे आम्ही पाहूं. तेथील हिंदी लोक म्हणजे सरकारच्या दत्तकपुत्राप्रमाणें वागतात अशी टीका केली. ब्रह्मदेश पुढील सालापासून बेगळा होणार हें ठरलें असून, जातां जातां हा अहेर या रंगीबेरंगी पोषाखवाल्या सभासदानें केला. सरदार मंगलसिंग यांनीं सांगितलें कीं, नभोवाणीवरील गाण्यानें पोट भरणार नाहीं. दोन घांस अधिक मिळतील असा कांहीं कार्यक्रम सरकारनें करावा. शेवटीं शीखांना सर्वत्र योग्य लांबीचें किरपाण बाळगण्याची परवानगी असावी अशी सूचना केली, यामुळें पोटाची सोय होईल अशी त्यांची कदाचित् अपेक्षा असावी!! बी. दास यांनीं

लष्करी खात्यावरील खर्चाबद्दल तक्रार केली: बलुचिस्तान व सरहद्दीवरील मुलुख यांवर भलताच खर्च होतो अशी त्यांनीं तक्रार केली: प्रांतवार माणशीं उत्पन्न देऊन संवर्धक खात्यावर प्रांतवार माणशीं खर्च किती अल्प प्रमाणांत आहे हें आंकडेवार दाखवून दिलें. मुंबईत माणशीं उत्पन्न रु. ६–११–० व खर्च रु. १–४–८ इतका आहे. बिहार-ओरिसामध्यें उत्पन्न रु. १–७–२ व खर्च रु. ०–६–३ आहे. अशी प्रांतांची हीन स्थिति असतां सरहद्द प्रांताला सरकार माणशीं रु. ४ देणगी (Subvention) देतें. येथें संवर्धन खात्यावर माणशीं खर्च रु. १–५–७ होतो. सर्व प्रांतापेक्षां हें प्रमाण जास्त आहे; हा अन्याय होय. उत्पन्न कमी व खर्च सर्वांत जास्त ही वांटणी योग्य नाहीं; या मागील हेतु उघड आहे. दास यांची टीका बरीच झोंबली. यानंतर अहमद शहा अबदालीचे वंशज 'नबाबसाहेब ऑफ डेरा' हे बोलावयास उभे राहिले. अर्थात् त्यांनीं फडणीसांची स्तुति केली. ते म्हणाले, "शेतकरी, शिपाई, व्यापारी या सर्वांची सरकारानें सुंदर व्यवस्था केली आहे. हें बजेट उत्कृष्ट आहे." 'यांत राजनिष्ठांची व्यवस्था नाहीं' असें एकानें छेडलें. "माझी नेहमींच तक्रार आहे कीं, हें सरकार राजद्रोही लोकांना घार्जिणें आहे, विरोधी पक्षाचीच खुशामत करतें. ब्रिटिश सरकाराच्या ऐवजीं हिंदी सरकार असतें तर जी टीका येथे ऐकूं येते ती आली नसती. पूर्वींचे राजे महाराजे मोंगल बादशहा म्हणजे हम करे सो कायदा असे होते. 'शिक्काशाही' म्हण हेंच दर्शवितें कीं, सरकारी हुकुम म्हणजेच कायदा. माझा पूर्वज अबदाली याने जेव्हां पानपतीं मराठ्यांचा पराभव केला."–वाक्य पुरें होण्यापूर्वींच अध्यक्षांनी 'बजेटावर बोला' म्हणून हटकलें, त्याबरोबर हा अहमदशहा अबदालीचा वंशज वाग्युद्ध सोडून आपल्या किल्ल्यांत परतला व मटकन् जागेवर बसला. नबाब–मेजर नबाब अहमद नवाज खान, हें सरकारनियुक्त सभासद होते. मूर्ति ठेंगणी, उंच फेटा, पल्लेदार मिशा, बोलण्यांत अतिशय शालीन, व वागण्यांत राजनिष्ठा-तर ओसंडत असे. लॉबींत नमाज पढत, खरे धर्मनिष्ठ, पण त्यांच्यांत कडवेपणा नव्हता. हिंदु–मुसलमानांची एकी असणें जरूर असें म्हणणारे. माझे मुनीम व हिशोब ठेवणारे "पिढ्यानुपिढ्या हिंदू आहेत, हिंदूंचें डोकें व पठाणांचे बाहू यांची जोड झाल्यास हिंदुस्थानाला काय कमी आहे" असें प्रतिपादित. 'एकादे वेळीं तरी आमच्या बाजूनें मत द्या' असें म्हणतां 'मी सूर्याप्रमाणें या जागीं स्थिर आहे. तुम्ही सरकार व्हा, माझें मत तुम्हालाच आहे. कोणीहि सरकार होवो. मी नित्य, सनातन व स्थिर आहे." राजनिष्ठेच्या सद्गुणांचें हें मूर्तिमंत स्वरूपच होतें!

पंडितजींनी फडणिसाच्या अविश्वासी धोरणावर प्रथम टीका केली. नेहमीं कर योजनेचा भाग सुद्धा छापील भाषणांत येई, पण या खेपेस तो छापील भाषण झाल्यानंतर स्वतंत्रपणें दिला गेला. याचा अर्थ बजेटांतील गुप्त गोष्टी लोकांना अगोदर कळूं नयेत हाच होता. पण त्याचबरोबर हातांखालील अधिकाऱ्यांवर अविश्वास प्रकट होतो हेंहि खरें. जेथें अविश्वास सुरू झाला तेथें अवनती पण सुरू होते. औरंगजेबास हाच अनुभव आला. बाप, भाऊ, मुलें यांसर्वांवर तो संशय घेऊं लागला व त्याचा शेवट करुणाजनक झाला. "हीच गोष्ट या सरकारची होणार" हें भविष्य पंतजींनीं वर्तवितांच टाळ्यांचा कडकडाट झाला. "मागील सालीं जमा कमी धरण्यांत चूक होते अशी टीका झाली असतां सुद्धां तीच चूक पुन्हां होत आहे. विरोधी पक्षाची टीका रास्त होती हें कबूल करण्याऐवजीं तीच चूक करावयाची व टीकाकार भीतीचें वातावरण उत्पन्न करतात म्हणून त्यांच्या नांवानें बोटें मोडावयाचीं, ही कांगावखोर वृत्ति फक्त हाच फडणीस करूं जाणें! फडणीस ही गोष्ट जर मुद्दाम जाणून बुजून करीत असतील तर हा इसम लुच्चा (Knave) म्हटला पाहिजे. हा अज्ञानानें करतों, म्हणून 'मूर्ख' (Fool) असें मला म्हणवत नाहीं—कदाचित् यापैकीं ते कांहींहि नसतील—एक गोष्ट मात्र निश्चित कीं, कांहींतरी निश्चितपणें करण्याचें ठरवून हे सद्गृहस्थ या देशांत आलेले आहेत. बजेटांतील भोंगळपणा दिखाऊ आहे, आपलें कार्य पुढें ढकलण्याचा चाणाक्षपणा निश्चितपणें फडणिसांत आहे व त्यांचीं पाऊलेंहि अगदीं योजनापूर्ण पडत आहेत. लष्करी खर्च कमी झाला आहे ही गोष्ट खोटी आहे." पंतांनी आंकड्यानिशी २·६२ कोटी रुपये जास्त खर्च झाला आहे हें सिद्ध करून दाखविलें. आंकडे सांगत असतां ग्रिग महाशय चुळबुळ करीत होते. "खर्चावर नियंत्रण नाहीं, स्थायी फडणिसी समितीला फडणीस जुमानीत नाहींत हा अनुभव सांगितला. वास्तविक ही समिति दरसाल नेमावी असें जेव्हां सभागृहानें ठरविलें त्यावेळीं त्या वेळचे फडणीस सर मालकम हेले यांनीं सभासदांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा फडणीसास मिळावा हा समितीचा उद्देश आहे असें सांगितलें होतें. हल्लींचे फडणीस इतरांना कांहीं कळतें हें मानावयासच तयार नाहींत! समितीच्या कार्यक्षेत्रांत काटकसर सुचविणें, मंजूरी लागणाऱ्या (Votable) सर्वच्या सर्व नवीन बाबींची तपासणी करून ठोकळ रकमा मंजूर करणें, फडणिसी खातें ज्या ज्या बाबतींत सल्ला मागेल त्यावर सल्ला देणें इतक्या गोष्टा व्हाव्यात असें

ठरलें असतां, विद्यमान फडणीस समितीला विचारीत नाहींत. अन्य देशांत असें झालें, तर मंत्रिमंडळें गडगडतात. येथील एकंदर पद्धति इतकी दुष्ट (Wicked), इतकी सडकी ( Rotten ) आहे कीं तिचा निकाल लागल्याशिवाय देशाला आशा करण्यास जागा नाहीं !!" असें तळमळून बोलून पंतजी बसले. सर जेम्स ग्रिग उत्तरादाखल बोलतांना म्हणाले 'मला चिडवण्याला पुरे होईल अशी टीका यंदा झालीच नाहीं.' "चिडण्यास तुम्हांस कांहींतरी कारण लागतें कां ?" एकानें पृच्छा केली. "झालेली टीका सर्व विध्वंसक होती, परस्पर विरोधी टीकाही होती. मी गप्प राहिलों तरी चालेल, पण माझ्याने तें जुळत नाहीं म्हणून बोलतों इतकेंच. मीं कांहीहि बोललों तरी तें चुकीचें व कांहीहि केलें तर तेंहि चुकीचें ! प्रत्येकाला खूष करणें मला शक्य नाहीं, म्हणून मी स्वतःलाच खूष करून घेतो व नेहमींच्या संयमाने ( Cumstomary moderation ) टीकाकारांना उत्तर देण्याचा प्रयत्न करतों !! पंतजींच्या आंकड्याबाबत मला नीट तपासून पाहिलें पाहिजे. तथापि ते म्हणतात तें सर्वस्वीं मी कबूल करावयास तयार नाहीं. नभोवाणीवर होणाऱ्या खर्चावर टीका झाली पण दिल्ली केंद्रांतून होणाऱ्या कार्यक्रमांत सरकारवर टीका होते, हा अजब अनुभव त्यांनीं सांगितला. नंतर हुंडणावळीचें धोरण बरोबर आहे. रेल्वेचें धोरण, संरक्षणाबाबतचें धोरण, जकातीचें धोरण, कर्जाबाबत धोरण, हीं सर्व धोरणें बरोबर आहेत. प्रांतिक सरकारें बेफामपणें कर्ज काढतात ही कावसजीची टीका म्हणजे भांडवलवाल्यांची टीका होय. शक्य तितकें कर्ज काढा, चालू घडी पुरतें पाहा. आज खा, प्या, मजा करा, कारण उद्यां मरावयाचें आहे. हीं कावसजींची नीति स्वीकारली तर उद्यांच हिंदुस्थान मरेल ! कावसजी कॉंग्रेसशीं फार लगट करीत आहेत. कदाचित सुपर–टॅक्स [ प्राप्तीवरील जादा कर ] कमी करून घेण्यासाठीं ही गोष्ट ते करीत असतील पण त्यांच्या जाळ्यांत कॉंग्रेस पक्ष सांपडणार नाहीं. उलट मीठावरील कर कमी करण्याच्या सूचनेस कावसजी मात्र विनाकारण लोभानें पाठिंबा देऊन बसतील ! बजेट फेटाळण्यांत मात्र कॉंग्रेस पक्ष त्यांचा उपयोग करील." "तुम्ही त्यांना चार आणे कर्ज दिलें तरी"—सत्यमूर्तीनें डबचलें—"दोन मल्लांच्या मध्यें येणारांना लाथाच बसतात, ही गोष्ट कॉंग्रेसनें करण्यास विसरूं नये. तथापि पुढें काय होईल हें न सांगतां माझें बजेट योग्य आहे, पुढें मागें मी बजेटाबाबत जरूरीपेक्षां जास्त काळजी दाखविली [Over cautious] असें जरी दिसून आलें तरी मला त्याबाबत पश्चाताप वाटणार नाहीं, व मी प्रदर्शित

करण्याची जरूरी वाटणार नाहीं!!" याप्रमाणें हें 'संयमपूर्ण' भाषण झालें. पश्चाताप व खेद यांचा स्पर्शच ज्याला होत नाहीं असा हा विरळा बांका फडणीस सर्व मित्रमंडळींत व विरोधकांत अप्रिय झाल्यास नवल काय?

साधारण चर्चेनंतर कपातीवरील चर्चा पांच दिवस चालली होती. सरकारी माहिती खात्यानें १९३४-३५ सालच्या हिंदुस्थानांतील प्रगतिबाबत रिपोर्ट छापला होता. त्यांत बिहारमधील धरणीकंपाचा फायदा घेऊन कॉंग्रेसनें आपली मांड लोकमतावर बसविली, फंड गोळा केला, पण तो अनाठायीं खर्च केला. गांधीजींची हरिजन चळवळ म्हणजे एक डाव आहे वगैरे बेछूट विधानें त्यांत केलीं होतीं. रिपोर्टावर सामान्यतः तो मान्य आहे, मात्र त्यांतील प्रत्येक विधान सरकारला मान्य आहे असें नव्हे, असा शेराहि धूर्तपणें मारला होता. गृहखात्याच्या मागणीमध्यें कपात सुचवून भुलाभाईंनीं एकंदर माहितीखात्याची हजेरी घेतली. अणे यांनीं त्यांना पाठिंबा दिला, व एकंदर धोरणाचा इतिहास सांगितला. वार्षिक रिपोर्टांत माहिती असावी असा संकेत असतां साल मजकुरीं एका पक्षावर टीका करण्याचें प्रयोजन नव्हतें, व ती टीकाही रास्त नव्हती. बंगाल सरकारनें असाच उपद्व्याप एकदां केला होता. त्यांत पंडित जवाहरलालबद्दल कांहीं विधानें केलीं होतीं व शेवटीं बंगाल सरकारला तीं जाहीरपणें मागें घ्यावीं लागलीं. गांधीजींच्या हरिजन चळवळीविषयीं संशय प्रकट करणें अन्यायाचें आहे. त्यांच्या उदात्त हेतूबद्दल संशय घेणें चुकीचें आहे. कॉंग्रेसनें हरिजन चळवळ हातीं घेऊन राजकीय फायदा उठविला हेंही म्हणणें बरोबर नाहीं. सरकारनें ही चळवळ कां केली नाहीं? या वर्गाच्या उद्धाराकरितां आजतागायत सरकारनें काय केलें? उलट जे करतात त्यांच्या पवित्र हेतूंबद्दल सरकार शंका घेतें. जगांत आपला अपराध छपविण्यासाठीं गांधीजीसारख्या महात्म्याची निंदा सरकारनें चालविली आहे. या क्षुल्लक व क्षुद्र टीकेवर मी व्यर्थ काळ दवडूं नयें असें मला एकानें सांगितलें. त्याला माझें उत्तर असें कीं, 'न केवलं यो महतोपभाषते। शृणोति तस्मादपि यः स पापभाक्॥' (जो श्रेष्ठ पुरुषाची निंदा करतो तो तर पापी आहेच पण ती ऐकतो तोहि एक पापी आहे. हें पाप मला करावयाचें नाहीं. जे करतील ते भरतील. "कॉंग्रेस ज्युबिली चोपडें नं. ५ बरही, जे कुमारअप्पांनीं राष्ट्रीय कर्जाबाबत लिहिलें आहे, त्याबाबत कॉंग्रेस चिटणीस कृपलानी यांनीं यांतील सर्वच तपशील कॉंग्रेसला मान्य आहे असें नव्हे, सर्वसाधारण मान्यता आहे असा शेरा मारला आहे." हें सांगून गृहमंत्री क्रेक साहेब म्हणाले

तसाच रिपोर्टावर शेरा मारला तर दोष कोणता? तथापि त्यांतील विधानांची जबाबदारी सरकार टाळीत नाहीं. प्रत्येक मोठमोठया चळवळींबाबत दोन मतें असणें शक्य आहे. आमच्यावर इतकी टीका होते पण आम्ही तक्रार करीत नाहीं. मग आम्ही थोडी टीका केली तर राग कां यावा! या रिपोर्टांतील एक दोन बाबी सोडून अनेक वर्तमानपत्रांनीं त्याची उलट स्तुतीच केली आहे. बिहार-धरणीकंपाच्या वेळीं अधिकाऱ्यांना जवाहरलालनीं नालायक म्हटलें तर अनेक लोकांनीं त्यांची स्तुति केली. सुरवातीस काँग्रेस दुःखनिवारण समितीनें सहकार केला, पुढें मात्र तिनें धोरण बदललें. महात्माजींमुळें काँग्रेस-समिति सहकार्य करूं लागली हें खरें आहे. गांधीजींच्या पवित्र व उदात्त हेतूंबद्दल सरकारला बिलकुल संशय नाहीं. (Government as a whole has not the slightest desire to throw any doubt, whatever, on the purity and entirely altruistic character of Mahatma Gandhi's motives.) अशी स्थिति असतां कपात पास करून सरकारला दोष देणें ठीक नव्हे. या भाषणानंतर काँग्रेसपक्षानें कपातीवर मतदान मागितलें नाहीं. अपेक्षेपेक्षां ही चर्चा लवकर संपली. फडणीस सभागृहांत नव्हते; अध्यक्ष अन्य अधिकाऱ्यांना दुसरी मागणी मागण्यास परवानगी देईनात. हा गोंधळ ५–१० मिनिटें चालू होता. इतक्यांत फडणीस धांवत आले व म्हणाले, कीं "मी सभागृहाची माफी मागतों. मला वाटलें कीं ही चर्चा ४॥ पर्यंत चालेल व ४॥ ला कठीण प्रसंग (मतमोजणी) होईल." "पुन्हां अंदाजांत चूक" ("Another case of underestimation") असा अणे यांनीं मधेंच टोला हाणला. सभागृहांत प्रचंड हंशा झाला.

परराष्ट्रीय खात्याची मागणी मांडल्यानंतर, काँग्रेसच्या तर्फे असफअल्ली यांनीं सरहद्दीवरील लष्करी धोरणाचा निषेध करण्याकरितां कपात सुचविली. सरहद्दीवरील लष्करी धोरणाचा साद्यंत इतिहास त्यांनीं सांगितला. अफगाण व हिंदुस्थान सरकारांमध्यें करार होऊन एक रेषा ठरविण्यांत आली, तिला डयूरांड रेषा (Durrand Line) म्हणण्यांत येतें; ही सरहद्द या रेषेच्या दोन्हीं बाजूस राहाणाऱ्या टोळ्यांना न विचारतां आपसांत ठरवून हा प्रदेश दोन्ही सरकारांनीं वांटून घेतला; व हिंदुस्थानाच्या बाजूनें विद्यमान राजकीय कारभारविषयक (Political and Administrative) सरहद्दीपासून ही रेषा शें दोनशें मैल लांब आहे. त्या रेषेपर्यंत पक्का अंमल बसविण्याचें हें आक्रमक धोरण, आगेकुचचें धोरण

( Forward Policy ), चुकीचें आहे. या टोळ्यांचें स्वातंत्र्य अपहरण करण्याचा हक हिंदुस्थान सरकारला नाहीं. शिवाय या रेषेपर्यंत अंमल नेणें म्हणजे रशिया, चीन व पर्शिया या राज्यांशीं कटकट करण्याचा प्रसंग यावयाचा. अंमल बसविण्याच्या धोरणाचा परिणाम म्हणून कोटयवधि रुपये खर्च झाले आहेत. शिवाय लष्करी खर्चही या धोरणानें वाढता आहे. हें धोरण इंग्रजानें ठरवावें व हिंदी लोकांनीं त्याकामीं होणारा खर्च सोसणें हा अन्याय होय. १९२३ सालीं ज्यावेळीं हें आक्रमक धोरण स्वीकारण्यांत आलें, त्यावेळीं याचा अर्थ म्हणजे रानटी टोळ्यांना त्यांच्या मागासलेल्या जीवनापासून मुक्त करून आधुनिक सुधारलेल्या जगांत आणावयाचें असा सांगण्यांत आला होता. प्रत्यक्ष अनुभव मात्र निराळा येत आहे. शौकतल्लींनीं पाठिंबा देतांना सांगितलें कीं, हिंदुस्थानची नैसर्गिक सरहद्द सिंधू नदी ही आहे. त्यापलीकडील पठाण अगर रानटी टोळ्या यांचें स्वातंत्र्य नष्ट करणें योग्य नाहीं. शूर अफगाण लोक पण त्यांचें स्वातंत्र्य नष्ट करणार नाहींत. जर कधीं अफगाण लोक आमच्या हिंदुस्थानचें स्वातंत्र्य हरण करण्याकरितां आले, तर मात्र आम्ही मुसलमान, हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य रक्षणासाठीं, त्यांच्याशीं ते मुसलमान असले तरी लढूं." लष्करी खात्याचे चिटणीस मि. टॉटनहॅम यांनीं सांगितलें कीं, राजकीय सरहद्द व "डयूरांन्ड रेषा" यांमधील मुलखांत राहणारे लोक, सशस्त्र आहेत, शेंकडों बंदुका त्यांच्याजवळ आहेत, लूटमार करण्याच्या दृष्टीनें प्रदेशही सोईचा आहे. जमीन नापीक व खडकाळ असल्यामुळें येथील लोकांचा पूर्वापारचा धंदा म्हणजे मधून मधून हिंदुस्थानांत यावयाचें व लूटमार करावयाची. हें बंद करण्यासाठीं सरकारनें ४२ हजार सैन्य व १५ हजार गस्तवाले ठेवले आहेत. तरीसुद्धां गेल्या ७० वर्षांत २६ मोठ्या मोहिमा सरकारला काढाव्या लागल्या. याशिवाय किरकोळ हल्ले अनेक वेळां करावे लागले. पूर्वीचें धोरण हद्दबंदीचें ( Close Border ) होतें. आपल्या हद्दींतच व्यवस्था करावयाची. जेथपर्यंत प्रत्यक्ष अंमल तेथपर्यंतच सरहद्द.हें धोरण असून सुद्धां १८९५ ते १९१९ पर्यंत दरसाल ५० लाख रुपये खर्च होत. १९१९ ते १९२४ पर्यंत या कामीं एकंदर ११ कोटी रुपये खर्च झालें. १९२४ पासून नवीन धोरण—आक्रमक धोरण( Forward Policy )—सुरू झालें. तेव्हांपासून हा खर्च वार्षिक रु. १२$\frac{3}{4}$ लाखापर्यंत आला आहे. युद्धांत गुंतून वित्तहानि व प्राणहानि करण्यापेक्षां रस्ते बांधण्यांत कांहीं लाख खर्च करून तेथील टोळ्यांना सुधारून शांतता स्थापन करणें जास्त श्रेयस्कर आहे; म्हणूनच हें धोरण

सरकारनें स्वीकारलें आहे. डॉ. खान यांनीं सर्व वस्तुस्थिति सांगितली. रस्ता पाहिजे असें म्हणणारे मूठभर लोक गोळा करून तसें एक पत्रक काढून त्यावर त्यांचे आंगठे घेण्यांत आले. जो रस्ता सरकार करूं इच्छितें तो आफ्रिडी टोळ्या होऊं देणार नाहींत. रशियाच्या भीतीनें हें रस्ते-प्रकरण निघालें आहे. हें आगेकूच धोरण चुकीचें आहे. स्वतःच्या प्रदेशांत रस्ते करा, लोकांच्या जमिनींत घरें बांधून कोण सुखी झाला आहे. परराष्ट्रीय चिटणीस मेटकॉफ यांनीं कपातीला विरोध करतांना सरकारी धोरणाचा खुलासा केला. हें धोरण त्रिविध आहे. प्रस्थापित भाग (Settled Districts) यांत कायदा व सुव्यवस्था यांचा अंमल आहे. या भागांना लागून रानटी टोळ्यांचा मुलूख आहे (Tribal Area). यांत प्रस्थापित राज्यकारभार नाहीं. या रानटी मुलखापलीकडे स्वतंत्र अफगाण मुलूख आहे. प्रस्थापित भागांतील लोकांना रानटी टोळ्यांपासून त्रास होऊं नये म्हणून सरकारास बंदोबस्त करावा लागतो व त्याच दृष्टीनें सरकार वागतें. रानटी मुलुखांतील लोकांनीं अफगाण हद्दींत डाके व दरवडे घालूं नयेत अशी परिस्थिति ठेवण्याचें हिंदुस्थान सरकारचें एक कर्तव्य आहे; व तें पार पाडण्याकरितां सरकार या भागांतील जमातींना व व्यक्तींना नाना तऱ्हेचे भत्ते देतें. तसें न केलें तर अनेक दरवडे ते घालतील व त्यांच्यावर दरवेळीं स्वाऱ्या केल्या तर खर्च वाढेल आणि शेवटीं कांहींही होणार नाहीं. रानटी भागांत रस्ते बांधून अनेक कामें काढून तेथील लोकांना उद्योग देणें हाच मार्ग जास्त सोयीचा, कमी खर्चाचा व सर्वस्वी शहाणपणाचा आहे. हें आगेकुच धोरण सोडून पुन्हां "आसिंधुपर्यंतचें धोरण" (Back to Indus) स्वीकारणें म्हणजे संकटांना आमंत्रण देणें आहे. सिंधूच्या पलीकडील लोकांना दगा देणें आहे. तसें झालें तर रानटी टोळ्या सिंधूपर्यंतच येऊन थांबतील असें नाहीं. जें मागें होत आलें तेंच होईल. पंजाबांतील पांचही नद्या या लोकांचा प्रवाह थांबवूं शकणार नाहींत; म्हणून जें हिंदुस्थानजवळ असून त्याच्या ताब्यांत आहे तें त्यानें त्यांच्याच ताब्यांत ठेविलें पाहिजे. हिंदुस्थान अफाट आहे. परंतु जी भूमि त्याची नाहीं तींतील अणुमात्र घेण्याला तो अफाट नाहीं; त्याचबरोबर वाटेल त्या आक्रमकाला ७ × २½ × ४ फूट लांब, रुंद व खोल इतक्यापेक्षां जास्त जागा देण्याइतका अफाट पण नाहीं. (India is large enough to cover not a single squre mile of ground that is not already her own. But India is not large enough to allow any invader of India—be he an indepen-

dent tribesman or foreign power, from East, West, North or South-more of her soil than a plot of ground 7 feet by 2½ and 4 feet deep.) हें जें १९२३ सालीं परराष्ट्रीय चिटणीस डेनीस ब्रे यांनीं सांगितलें तें खरें आहे. म्हणून ही कपात नापास करा. मतमोजणींत ७२ वि. ४७ मतांनीं कपात पास झाली. मेटकाफ हे ठसक्यांत बोलत. त्यांच्या भाषेंत विनय पण मनांत अहंभाव, आपलेंच बरोबर आहे ही वृत्तीहि पूर्णपणें होती. तथापि मेटकॉफ व टॉटनहॅम हे दोघेही वागणुकींत अत्यंत सभ्य असत, व त्यांच्याविरुद्ध विरोधी पक्षांतील लोक तक्रार करीत नसत.

नंतर कार्यकारी मंडळावर अविश्वास दर्शविणारी इन्कार कपात (Refusal of Supplies) सत्यमूर्तींनीं मांडली. कपातीचा उद्देश त्यांनीं स्पष्टपणें जाहीर केला. सर्व कारभार बेजबाबदार आहे, लोकमताला लाथाडलें जात आहे, प्रश्नांचीं उत्तरेंसुद्धां सरकारी सभासद देत नाहींत. केवळ इंग्रजांच्या हितासाठीं हा कारभार चालला आहे. मरहूम लॉर्ड बेन्टफोर्ड यांनीं स्पष्ट कबूल केलें आहे कीं, एक पंचमांश इंग्रज जनतेची भाकरी हिंदुस्थानांतून मिळते. त्या देशावर ते सर्वस्वी अवलंबून आहेत. आम्ही इंग्रज येथील जनतेच्या कल्याणाकरितां आहोंत ही पाद्री लोकांची एक थाप आहे. (I don't agree with the nostrum of these missioneries who say that "We are in India for the good of the Indian people; we are there, because every fifth Englishman draws and earns his bread directly or indirectly from India.") या स्थितींत हें सरकार जनतेचें हित करील हें शक्य नाहीं. खुद्द फडणिसानें उघड सांगितलें कीं, मी स्वतःलाच खूष करणार आहें. त्यांचे सहकारीही याच मताचे आहेत. फडणीस उघड उघड बोलून दाखवितात—एवढाच फरक. सर्वत्र हिंदी लोकांनाच चेपण्यांत येत आहे. दक्षिण आफ्रिकेंत महात्माजींनीं प्रथम या निराशेंतून प्रकाश दाखवून रस्ता दाखविला. 'सत्याग्रह' हाच तो मार्ग. लॉर्ड हार्डिंज, त्यावेळचे व्हॉइसराय यांनीं सत्याग्रहाला रास्त म्हटलें व सरकारची सहानुभूतीही दाखविली. (I approve the movement of Satyagrah by Indians; no Government can help sympathising with it.) हल्लीं वसाहतींत हिंदी लोकांवर अन्याय होत आहे, पण हें सरकार निष्क्रिय आहे. कोठें देशांत ग्रामोद्योग वाढवावा म्हणून काम सुरू झाल्याबरोबर हॅलेट (गृहखातें चिटणीस) साहेबानें फिरतें (Circular) काढून, या चळवळीशीं कोणीहि सरकारी अधिकाऱ्यानें संबंध ठेवूं नये

असें गुप्तपणें कळविलें. रेल्वेचा कारभार असो, हावरा पुलाचें कंत्राट असो, सर्वत्र गोऱ्यांचें हित पाहिलें जातें. अनेक लोक विनाचौकशीं डांबले आहेत, लक्षावधी बेकार आहेत, हिंदी उद्योगधंद्यांना उत्तेजन नाहीं, मनसोक्त बोलून घेऊं म्हटलें तर तेंहि नाहीं. ठराव, तहकुबीच्या सूचना, प्रश्न वगैरे सर्व व्हाइसरॉय आपल्या जादा अधिकारांत खुशाल फेटाळून लावीत आहेत. अगदीं एकमतानें झालेले ठरावसुद्धां कचऱ्याच्या टोपलींत टाकले जातात. आम्ही दोन अधिक दोन बरोबर चार म्हटलें कीं, सरकार म्हणणार तीन. 'नव्हे बावीस(२२)' असें सर नृपेन्द्र खवचटपणें बोललें. पहा, यावरून मी म्हणतों त्याहिपेक्षां जास्त फरक या दोघांत दिसतो. गोऱ्यांचे कज्जे निराळ्या पद्धतीनें चालून त्यांचे न्यायहि निराळे! आमच्यांतील महान् कार्यकर्त्याला सविनय कायदेभंगाबद्दल शिक्षा झाली तरी 'क' वर्गांत ठेवला जातो. उलट खुनी व दरवडेखोर गोरा 'ब' वर्ग मिळवतो, हा वर्ण भेद कां! तुम्हीं लोकांना किती काळ नाखूष करूं शकाल! लोकमताविरूद्ध हा कारभार आहे म्हणून सभागृहानें ही कपात पास करावी. जेम्सनीं सांगितलें कीं, सत्यमूर्तींचें भाषण ऐकतांना ट्रिप्लिकेनच्या वाळवंटांतील सभा चालू आहे असें वाटतें. लॉर्ड ब्रॅन्टिकचें म्हणणें बरोबर नाहीं. सदरहू गृहस्थ नुसतेंच चायपाणी पिणारे ( Tea-Totallar ) होते म्हणून इतके गंभीर व विरक्त विचार हिंदुस्थानाबाबत त्यांचे होते! ब्रिटिश साम्राज्यशाही ही केवळ कल्पना आहे. हें कार्यकारी मंडळ नुसत्या कपाती पास करून जाणार नाहीं. कांहीं विधायक टीका करा. तुम्हीं तरी काय धोरण ठेवणार! ही कपात पास करण्यानें स्वराज्य येणार नाहीं. हा वादविवाद म्हणजे पोरखेळ आहे. योजना नाहीं, धोरण नाहीं, या स्थितींत विरोधी पक्षाच्या तकलुपी लोकांच्यापासून देशाला वाचविण्यासाठीं कपातीला विरोध करणें जरूर आहे.! ( To save the country from being exploited by superficialities. ) कावसजींनी सांगितलें कीं, हें सरकार व्हाइट हॉलचें गुलाम आहे. कानामात्रा बदलण्याचाही अधिकार त्याला नाहीं. त्याविरुद्ध कपात पास करण्यांत काय अर्थ आहे! नवीन घटना येणार आहे त्यावेळीं आपल्याला जें पाहिजे तें मिळेल. 'लाथासुद्धां!' एका सभासदानें पृच्छा केली. 'होय, दोन्ही बाजूंकडून,' पण प्रसंगीं 'मारतां पण येतील' या कावसजींच्या हजरजबाबी उत्तरानें प्रचंड हंशा उसळला. कावसजी स्वतंत्र पक्षाचे उपनेते होते. त्यांच्या भाषणा-नंतर त्यापक्षाचे नेते जिना बोलले. 'कावसजींनीं आपल्या सदसद्विवेक बुद्धी-

प्रमाणें वर्तन केलें. येथें निराळा व्यवहार आहे. सरकार व विरोधी पक्ष यांची या घटनेप्रमाणे काय परिस्थिती आहे हें पाहिलें पाहिजे. सरकार व विरोधी पक्ष येथें कशासाठीं आहे ? आम्ही खर्चाची रकम मिळूं नये ही गोष्ट कार्यकारी मंडळा-विरुद्ध म्हणून करीत नाहीं. एकंदर सरकार विरुद्ध आमचा रोख आहे. येथील सरकार हिंदुस्थान-मंत्र्याचें नुसतें मुनीम आहे, व फक्त पार्लमेंट येथील कारभारास जबाबदार आहे हें खरें आहे. तथापि, सभासदांनी सल्ला द्यावा, त्याचा कांहीं परिणाम सरकारी धोरणावर व्हावा, हा विद्यमान घटनेचा उद्देश आहे. झाला कां असा परिणाम ? वर्षभर सल्ला दिला, नाना प्रकारचे प्रयत्न केले व आतां साल अखेर आम्ही सरकारबद्दल निकाली मतप्रदर्शन करणें योग्य नाहीं का ? ( We have failed in any influence being felt, when we have failed in every advice that we have given, and when we have exhausted every avenue, every channel, and at the end of the year, we stand vis-a-vis the Government as opposition, have we not got to give our verdict ?) नुसतें धोरणच नापसंत आहे असें नव्हे. नुसती नाममात्र कपात सुचवून हें भागलें असतें हें खरें नाहीं. युरोपियन गट म्हणजे व्यापारी गट त्यांना यांतील महत्त्वाची व व्यापक बाब कशी लक्षांत येणार ! एकाद्या खात्याची बाब नाहीं, सर्व राज्य-कारभाराविरुद्धच तक्रार आहे. विद्यमान घटना आम्हाला कांहीं वाव देत नाहीं, म्हणून मूलग्राही प्रश्नच हाताळला पाहिजे; सबब ही अविश्वासाची इन्कार कपात सुचविली आहे. नाइलाज म्हणून मला तिला मान्यता द्यावी लागत आहे. या सभागृहाचे हक्क कितपत आहेत हें मी जाणतों. हें कायदेमंडळ म्हणजे एक थोतांड ( Fiction ) आहे, हेंही कबूल. तथापि याच्याच आधारें पार्लमेंट व जग यांना आमचें मत, आमचा विरोध दाखविण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. येथें हिंदी मंत्री नाहीं, म्हणून त्यास पार्लमेंटला धरून आणतां येत नाहीं. तथापि कार्यकारी सभा-सदांना-कारण ते त्यांचे मुनीम आहेत-मला जाब विचारला पाहिजे. सांगा एका तरी महत्वाच्या गोष्टींत तुम्ही आमचें ऐकलें कां ? " मिस् मेयोच्या पुस्तकास बंदी केली कीं ! " गृहमंत्री उद्गारले. जिना लाल झाले. "मी जर सरकारी सभासद असतो तर हें उदाहरण देण्यास मला लाज वाटली असती. गृहमंत्री यांना विवेक नाहीं. कार्यकारी सभासदांचा इलाज नसेल. तथापि त्यांनीं मूर्खासारखें तरी बडबडूं नये व मूर्खासारख्या कोटयाही करूं नयेत. नुसतें, कॉंग्रेस पक्ष बेजबाबदार आहे, त्याचें म्हणणें मान्य करणें शक्य नाहीं असें म्हणून भागणार नाहीं. कावसजी तर

कॉंग्रेसमन नाहींत, त्यांचें कुठें ऐकलेंत ? कोणाला बेजबाबदार म्हण, कोणाला अयोग्य म्हण, कोणाला चुकीचें म्हण, तात्पर्य, आम्ही सर्व चूक आहों ! अहो या देशांत कोणीतरी बरोबर असेल ना ? त्याचें तरी ऐकलेंत कां ? आणि याच कारणाकरितां मी कपातीला पाठिंबा देत आहे." हें अत्यंत परिणामकारक अभिनयपूर्ण भाषण संपतांच, कोर्टांतील पंचावर जसा परिणाम दिसून ते गंभीर होतात तीच स्थिती सभागृहांत झाली. सर यामीन यांनीं विरोधी भाषण केलें. त्यानंतर कायदेमंत्री नृपेंद्र सरकार यांनीं सरकारतर्फे भाषण केलें. ते म्हणाले "शिष्टाचार व सभ्यता सोडून सत्यमूर्ती यांचें भाषण झालें. त्यांनीं आम्हाला अप्रामाणिक म्हटलें हें सभ्यतेला धरून नाहीं." "त्यांनीं सरकारी धोरणाला विशेषण लावलें व्यक्तींना नाहीं" असें अध्यक्षांनीं बजावतांच पुन्हां सत्यमूर्तींची टिंगल सुरू केली. "सत्यमूर्ति यांचे प्रश्न जितके सरळ तितकींच उत्तरेंही सरळ आहेत. लालचंद हे कांहीं तरी प्रश्न विचारतात. ते पुष्कळ वाचतात; पण त्यांना तें समजतें कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. आम्ही सरकारी सभासद म्हणजे निबळ विरोधी पक्षाच्या सभासदांचा अपमान करण्याकरितांच येथें आहोंत. आम्ही शिवराळ बोलतों, पण विरोधी सभासदांनीं कोणती शिवी बाकी ठेवली आहे ? कॉंग्रेसपक्ष काय किंवा कॉंग्रेस नॅशनॅलिस्ट पक्ष काय एकच आहे. त्यांचें जें भांडणांचें मूळ होतें तें मेलें,—जाळलें गेलें व त्याच्या अस्थीही गंगेंत गेल्या !! दोघेही सारखेच वागतात. यांचा समज असा आहे कीं, त्यांनीं आम्हास वाटेल तसें बोलावें व आम्ही मात्र हात बांधून त्यांच्याशीं लढावें म्हणजे हा न्याय्य लढा होईल ! पण तसें होणार नाहीं. सत्यमूर्ति म्हणाले कीं, "हिंदुस्थानला शत्रू नाहीं. त्यांनीं फक्त येवढेंच म्हणावयास पाहिजे होतें कीं, पूर्वीही नव्हते. अलेक्झांडर हा जातिभेद म्हणजे काय हें पाहण्यासाठीं आला होता ! महंमद गझनी देवळांची कौशल्यपूर्ण रचना पहावयास आला होता ! आमची एकी व राष्ट्रीयत्व केवढें प्रचंड आहे ! लालचंद, सिंधी-पंजाबी यांना 'परकी' म्हणतात हाच त्याचा पुरावा. कॉंग्रेसच्या मागें देश नाहीं, मुसलमान नाहींत, बरेचसे हिंदूही नाहींत, नुसते सत्यमूर्ति म्हणतात म्हणून तें खरें नाहीं. आठवड्यांतून आठ वेळ ते बोलतात, पण कोठें काय बोललें हें लक्षांत ठेवणें फार कठिण आहे. मित्रांनीं, फिरतीं काढलीं म्हणून न्याय निकाली लागला असें सांगितलें, असें झाल्याचें कधीं ऐकलें नाहीं. पण फिरतें काढलें हायकोर्टानें त्यास आम्ही जबाबदार कसे ? लालचंद यांची आठवण फार होते. त्यांचा मी पाहुणा होतों"—"चांगलेच कृतज्ञ

आहांत !"—सर्वेच आवाज निघाला. "शिवाय हल्लीं वर्तमानपत्रांतून 'ते दडपशाही-च्या बिलावरील मतमोजणींत' तटस्थ राहिले म्हणून त्यांचें सारखें नांव गाजत आहे, कदाचित् त्यामुळेंच आपल्यावरील आक्षेप नाहींसे व्हावेत म्हणून जोराजोरानें आज त्यांनीं सरकाराविरुद्ध भाषण केलें आहे. असे लोक त्यांच्याबद्दल काय वाटेल तें बोलतात; आमचा बिलकूल विश्वास नाहीं. आज तर त्यांनीं वाघासारखें भाषण केलें आहे !!" येथपर्यंत सर्वांची टींगल करून ते पुढें म्हणाले, "जिना यांनीं गंभीर प्रश्न उपस्थित केला म्हणून मी गंभीरपणें उत्तर देतों. गेल्या ७–८ वर्षांत सरकारानें अनेक लोकोपयोगी कायदे केले आहेत. व्यापार व उद्योग यांना उत्तेजन दिलें आहे. प्राप्ति कर कमी केला. हे कांहीं सामान्य प्रश्न नव्हेत. अगदीं अव्वल दर्जाचे आहेत. जिना म्हणतात त्याप्रमाणें कार्यकारी मंडळाची घटनेच्या दृष्टीनें स्थिति आहे खरी. मग आमच्यावर निषेधाचा वर्षाव कां ? घटना वाईट आहे हें आम्हांलाहि मान्य आहे. मग घटनेचा निषेध करा. तिच्याबरोबर आम्हाला कां ओढतां ?" त्यांचें भाषण झाल्यावर मतनोंदणी झाली ६८ वि. ६२ मतांनी कपात पास झाली. स्वतंत्र पक्षांतील लोकांनीं मतनोंदणींत स्वतंत्रता दर्शविली. नेते जिना आमच्या बाजूस, उपनेते सरकारच्या बाजूस, बहुतेक 'सरकी' विभूषित मुसलमान आमच्याविरुद्ध, तर बाकीचे आमच्या बाजूनें. अविश्वासाची कपात पास झाल्यावर त्याचा परिणाम पुढील वादविवादावर होणें अपरिहार्य होतें. क्वेट्टा पुनर्घटनेचा खर्च कर्ज काढून करावा. चालू उत्पन्नांतून खर्च करणें म्हणजे कर भरणारांवरील अन्याय होय. उलट ज्यांपासून उत्पन्न येणार नाहीं अशा गोष्टीवर कर्ज काढून खर्च करणें ही अदूरदृष्टी व अव्यवहार्य होय. या अस्मानी-सुलतानीमुळें आलेल्या प्रसंगाबाबत खर्च चालू उत्पन्नांतूनच केला पाहिजे. म्हणून क्वेट्टा बाबतींतील खर्च चालू उत्पन्नांतूनच करणें योग्य असा सरकारी आग्रह. याबाबत कपात सुचविली गेली व तिच्यावरील वादविवाद उपयुक्त झाला. सभागृहानें चालू खर्चांतून हा खर्च होऊं नये अशा अर्थाची कपात पास केली. कर्ज काढून खर्च करणें म्हणजे चालू क्षणाला त्याकडे कोणी पाहात नाहीं, उलट चालू उत्पन्नांतून हा खर्च होत असेल तर त्याकडे जास्त लक्ष पुरविलें जातें—दक्षता घेतली जाते. ही फडणिसांची विचारसरणी अयोग्य नव्हती. परंतु विरोध करावयाचा हें ठरलेलेंच असल्यामुळें जें व्हावयाचें तें झालें, आणि त्याची जबाबदारी फडणिसांच्या ताठरवृत्तीवरच होती ह्याबाबत दुमत नव्हतें.

ता. ११-३-३६ रोजीं स्वतंत्र पक्षांतील गौबा यांनीं संरक्षणखात्याच्या धोरणाबाबत कपात सुचविली. त्यांनीं आपल्या भाषणांत, काटकसर, हिंदीकरण नोकरींतील पंक्तिप्रपंच वगैरे मुद्यांचा ऊहापोह केला. सर गिडने यांनीं काटकसरीबाबत सहमत दाखविलें. पण या कपातींत मात्र त्यांना न झेपण्यासारखें राजकारण असल्यामुळें त्यांनीं विरोध केला. कॉंग्रेसपक्षातर्फे कपातीस पाठिंबा देणारे माझें भाषण झालें. धोरण, हेतु, नोकर व प्रमाण ( Policy, Purpose, Personnel, Proportion ) या चार मुद्यांचें मी विवरण केलें. " अन्तर्गत शांतता राखणें व परकी आक्रमणापासून आपलें संरक्षण करणें हें धोरण सभागृहानें कित्येक वर्षांपूर्वी मान्य केलें आहे व त्याला अनुसरून सैन्याची संख्या, संघटना व खर्च यांचा विचार केला पाहिजे. हल्लीं अतिपूर्वेकडे परिस्थिति बिकट होत आहे म्हणून सैन्य वाढविलें पाहिजे असें सांगण्यांत येत आहे. याचा अर्थ जगांतील ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या धोरणानें आमचें धोरण ठरविण्यांत येत आहे, ही चूक आहे. ब्रिटिशाकरितां लढण्यासाठीं हिंदी सैन्य देशाबाहेर नेणें हें वरील धोरणाविरुद्ध आहे. म्हणून वरील धोरणाप्रमाणें जरूर ती संख्या ठरविली पाहिजे. विद्यमान संख्या योग्य आहे असें मानलें, तरी त्यावर होणारा खर्च अयोग्य आहे. हिंदुस्थानचें संरक्षण करणें हा हिंदुस्थानचा प्रश्न आहे, असें गोलमेज परिषदेंत ठरलें आहे. सबब ६६ हजार गोरे सैनिक येथें ठेवणें या धोरणाविरुद्ध आहे. शिवाय या ६६ हजार गोऱ्यांऐवजी जर तितकेंच हिंदी सैनिक ठेवले तर कांहींही कार्यक्षमता कमी होणार नाहीं, उलट खर्च मात्र कमी होईल. बंडानंतर १४ वेळां हिंदी सैन्य देशाबाहेर लढलें व त्यांच्या पराक्रमाची स्तुति अनेक इंग्रज सेनापति, मुत्सद्दी, यांनीं केली आहे. देशाचें संरक्षण करणें हा जर आमचा हक्क आहे, तर तें कोणी करावें व कसें करावें हेंही ठरविण्याचा हक्क आमचाच आहे. हिंदुस्थान देश म्हणजे ब्रिटिश तरुणांकरितां शिक्षण केंद्र व वासंतिक विहाराची जागा होता कामा नये. संरक्षणाच्या दृष्टीनें हें ६६ हजार गोरे सैन्य अवश्य आहे कां ? असा प्रश्न आहे व 'त्यांची आवश्यकता नाहीं' हें त्याचें उत्तर आहे. परकी आक्रमणाविरुद्ध त्यांची जरुरी नाहीं. देशांतील जातीय दंगे शमविण्याकरितांही त्यांची जरुरी नाहीं. हें गोरे सैन्य हिंदी सैन्याला शह आहे व ही गोष्ट अनेक इंग्रजांनीं मान्यही केली आहे. हिंदु व मुसलमान सैनिक भरती करतांना सुद्धां सरहद्दीवरील मुसलमान जास्त घेणें व नेपाळांतील गुरख्यांची भरती करणें यामागील धोरण स्पष्ट आहे. देशाबद्दल सैनिकांना कांहींही ज्ञान नसावें,

नुसते यंत्राप्रमाणें त्यांनीं वागावें हा सरकारचा उद्देश आहे. १८५७ सालची पुनरावृत्ति होऊं नये म्हणून हें आहे. २५ हजार गुरखे हिंदु असतील पण ते हिंदुस्थानचे नाहींत. सरहद्दीपलीकडील भरती केलेले सैनिक मुसलमान असतील पण ते या देशांतील नाहींत. या सैनिकांना देशाबद्दल काय वाटणार? देशाचें संरक्षण त्याच देशांतील नागरिक–देशप्रेमी नागरिकच–करूं शकतात हा अनुभव आहे. यांत धर्माचा प्रश्न येतच नाहीं. आज हजारों तरुण सुशिक्षित आहेत. परंतु त्यांना सैन्यांत वाव नाहीं. त्यांचे बापजादे गुलाम होते पण ते तसें राहूं इच्छित नाहींत. बंगाली लोक भित्रे होते, पण बॉंब युगानंतर त्यांना कोणी भित्रे म्हणणार नाहींत. हजारों महारांनीं इंग्रजांना मदत करून स्वराज्य बुडविलें. आतां त्यांना सैन्यांत मज्जाव कां? माझ्या भागांतून महार, मराठे, ब्राम्हण वगैरे लाखों सैनिक तुम्हांला मिळतील. त्यांनीं काय जन्मभर जागले, पट्टेवाले, कारकून, हमाल म्हणूनच राहावें? आम्ही मराठ्यांनीं साम्राज्य चालविलें आहे. आतां आम्ही निःशस्त्र आहोंत हें खरें तथापि जनताव्यापी सत्याग्रही चळवळीनें तुमचें साम्राज्य आम्ही निकामी करूं. समतेची हांक देशभर पसरवूं. आज केवढी सामुग्री सरकार वाया घालवीत आहे पाहा! परंपरेचें खूळ माजवूं नका. परंपरेच्या सनदेच्या आधारावर चालू काळीं कोणीही सत्ता व वैभव गाजवूं शकणार नाहीं. पराक्रम हा कांहीं वंशपरंपरेनें येत नसतो. १९१४ सालीं मी मला पलटणींत घ्या असा अर्ज केला, पण मी बिन-लष्करी जातींत जन्माला आलों म्हणून तो फेटाळण्यांत आला. १९१७ सालीं युद्ध फार पेटलें त्याबरोबर मला पलटणींत दाखल करण्यांत आलें. परंपरा बाजूस राहिली. गरज ही सर्व गोष्टींवर वरवंटा फिरवितें. पलटणींत मी N. C. O. अधिकारी होतो. त्याही दृष्टीनें या चर्चेंत भाग घेण्याचा मला अधिकार आहे. मला किंग्ज कमिशन द्यावें अशी शिफारसही झाली. पण 'जात' आडवी आली. ठीक झालें; आज निराळ्या अर्थानें मी N. C. O. (Non-Co-Operater) राहिलों आहे. गेल्या पंधरा वर्षांत मी बंदूक धरली नाहीं तरी सुद्धां त्या टोकाला बसलेल्या पठाणाला (नबाव–डेरा) मी बरोबर नेम (Bulls eye) धरून मारीन. योग्य तरुण मिळत नाहींत ही तक्रार खरी नाहीं. मला अधिकार द्या. तुम्हांला हजारों तरुण मी माझ्या प्रांतांतून देतों. गोरे सैन्य काढून, गोरे अधिकारी काढून, त्यां ऐवजीं तितक्याच संख्येनें हिंदी सैनिक व हिंदी अधिकारी ठेवले तर दरसाल रु. १३ कोटी वांचतात. 'हें विधान खरें नाहीं.' अशी शंका मि. टॉटनहॅमनें घेतली. मी

उत्तर दिलें कीं, वरील विधान कॅपिटेशन कमिटीनें केलें आहे. (The extra cost of the British troops in India over the cost of maintaining a corresponding number of Indian troops is estimated t £. 10,000,000), चालू हुंडणावळीनें रु. १३ कोटी होतात. एवढी रक्कम बचत झाल्यास देशाच्या उन्नतीसाठीं 'तकलुपी' लोकांसाठीं नव्हे, खर्च करतां येईल. प्रामाणिक, कळकळीच्या कार्यकर्त्यांच्या हातीं एवढी रक्कम आल्यास, तिचा उपयोग देशांतील सुखसोयी व संपत्ति यांची वांटणी कमी विषम करण्याकडे व जास्त सामाजिक न्याय मिळेल अशा व्यवस्थेकडे खर्च करतां येईल." अध्यक्षांच्या कृपेनें व सभेच्या औत्सुक्यामुळें २० ऐवजीं ३० मिनिटें बोलावयास मिळालीं. माझ्या-नंतर डॉ. देशमुख यांचें भाषण झाल्यावर जिना यांनीं भाषण केलें. त्यांनीं सांगितलें कीं, चालू धोरणानें लष्कराचें हिंदीकरण होणार नाहीं. लायख तरुण मिळत नाहींत हें मात्र खोटें आहे. हें सरकार लष्करी व बिन-लष्करी असा खोटा भेद मुद्दाम उत्पन्न करतें. (If there is no class, they create one, if there is a class they keep them separate and divide them. They give us enough work to go for each other and fight against each other and the Treasury Bench is quite happy). इंग्रज बोलून दाखवीत नाहींत, पण त्यांचें हेंच धोरण आहे. माझे मित्र गाडगीळ यांनीं उत्कृष्ट भाषण केलें. पण सर्व हिंदुस्थान फक्त मराठ्यांकरितांच कां? आपले दोष, आपली कम-जोरी आपण कमी करून आपल्या मागणीमागें सामर्थ्य (Sanction) उत्पन्न करूं या. म्हणजे इंग्रज त्याचा अर्थ समजतील. गोरें सैन्य गेलें पाहिजे. हळूहळू जाईल असें म्हणतात पण हळूहळू याचा अर्थ सरकार वाटेल तसा लावीत आहे. आपण एक झालों तर हें तावडतोब करणें शक्य आहे. यामीनखान यांनीं लष्करी व बिनलष्करी जाती हें वर्गीकरण बरोबर आहे असें सांगितलें. मुसलमान ही जात लढाऊ आहे कां? जिनांनीं त्यांना विचारलें. "नाहीं. सर्व मुसलमान जाती लष्करी नाहींत." "मी लढाऊ वर्गांतील आहे कां?" जिनांनीं प्रश्न केला. "तुमच्या वर्गां-तील एक तरी इसम शिपाई होता कां? आहे कां? तसें असेल तर तुमचा वर्ग लष्करी म्हणेन." 'एक शिपाई पुरेल'? पुन्हां जिनांनीं विचारलें. 'होय' असें उत्तर दिलें, पण नुसते कागदोपत्रीं शिपाई नसावेत.' असें म्हणून यामीनखान विषय सोडून बोलूं लागले. अडथळा होऊं लागला व शेवटीं हा लष्करी जातींचा प्रतिनिधी प्रश्नांनींच बेजार होऊन खालीं बसला!! नंतर टॉटनहॅम साहेब उठले.

ते म्हणाले 'सभासद पुरी माहिती घेत नाहींत व सालोसाल शब्दांचा भडिमार करतात, म्हणून मला उत्तर द्यावें लागतें. 'अहो तुम्हाला त्याबद्दल लठ्ठ पगार मिळतो." "माहिती नाहीं व म्हणतात कीं, लष्करी सल्लागार कमिटी नेमा." मग शिकण्याची संधि तरी केव्हां मिळणार' जिना बोलले. "लष्करी हिशोब कमिटींत आम्ही हिंदी लोक घेतले आहेत. किती तरी चोपडीं आम्हीं छापलीं, पण कोणीही अभ्यासपूर्वक तीं वाचीत नाहींत. हिंदीकरणाबाबत गेल्या वर्षापेक्षां जास्त सांगावयाचें नाहीं. आम्ही प्रयोग करून पाहात आहों. चांगले तरुण मिळत नाहींत हें खरें आहे. गोरें सैन्य १९१४ सालीं होतें त्यापेक्षां २० हजारांनीं कमी केलें आहे. हळूहळू आणखी कमी होईल. खर्च जास्त आहे हें खरें पण तोंही आम्ही गेलीं कांहीं वर्षे कमी करीत आलों आहोंत, व जो खर्च होत आहे त्याचा योग्य मोबदला मिळतो इतकें मी प्रामाणिकपणें म्हणूं इच्छितों." कपात ७९ वि. ४५ मतांनीं पास झाली. या विषयावरील एकंदर चर्चा चांगलीच झाली. व्यक्तिशः माझें भाषण सर्वांनीच वाखाणिलें. रॉइज वुइकली (Roy's Weekly)नें 'अत्युत्कृष्ट' (Star-performance) म्हणून नांवाजलें. भाषणाच्या दुसऱ्या दिवशीं आम्हीं हरिजन वसाहतींत गांधिजींकडे गेलो त्यावेळीं 'Bull's eye' म्हणून त्यांनीं माझें स्वागत केलें. बहुतेक मराठी व इंग्रजी वृत्तपत्रांतून तें विस्तारशः देण्यांत आलें. मी भाषणांत सर्व मुद्यांचा मूलभूत विचार केला होता व त्यामुळेंच तें चांगलें वठलें असें माझें मत आहे.

अणे यांनीं दडपशाहीच्या निषेधार्थ कपात मांडली. राजबंदी, स्थानबद्ध, सावरकारांवरील निर्बंध, हिंदुस्थान सेवादलावरील बंदी, वगैरे बाबतींत स्पष्ट विचार मांडून, दडपशाहीनें हा रोग बरा होणार नाहीं, अविश्वासनें अविश्वास वाढेल तेव्हां धोरण बदला असें त्यांनीं बजावलें. लक्ष्मीकान्त मैत्र यांनीं तडफदार भाषण करून त्यांस पाठिंबा दिला. डॉ. खरे यांनीं 'आहे रे व नाहीं रे' यांच्यांतील हें भांडण आहे. अविश्वास, भीति व द्वेष याबर आधारलेलें धोरण असल्यामुळें सरकार कायदा व सुव्यवस्थाच फक्त पाहतें. कायदा म्हणजे गाढव, व सुव्यवस्था म्हणजे नुसती बकबक आहे (Law in this country is an ass ridden over by Satan and order is gas and nothing more). शॉच्या शब्दांत "इंग्लंड हें दुष्ट राष्ट्र आहे व त्यांचा जय म्हणजे नैतिक संकट आहे." (We the English are the wickedest Nation on Earth and our success is immoral

horrer), मध्येंच एकजण 'शॉ आयरिश् आहे' असें ओरडला. 'पण तो इंग्लंडमध्यें राहातो." डॉक्टर यांनीं उत्तर दिलें. सुधारणा हें सनदशीर चळवळीचें फळ नाहीं, दहशतवादामुळें त्या आल्या. दहशतवादाला प्रतिदहशतवाद म्हणजे ही दडपशाही आहे; त्यांत सरकारला यश येणार नाहीं. आतापर्यंत सरकारनें सर्व करून पाहिलें,' पण यश आलें नाहीं. 'आर्धीच मर्कट तशांतचि मद्य प्याला – झाली तया मग वृश्चिक-दंश बाधा,' त्यांतच भुतानें पछाडलें; मग त्याच्या लीला काय वर्णाव्या. हीच स्थिति सरकारच्या वृत्तीची आहे. "लोकशक्ती"नें साम्राज्यशाही युद्धांत भाग घेऊं नये असें म्हटलें म्हणून घे जामीन; कॉंग्रेस सुवर्ण महोत्सवाच्या वेळीं निशाणें फाडलीं, प्रभातफेऱ्या अडविल्या. हिंदु-मुसलमान भांडत असतील पण ते दोघेही तुमच्या परकी सत्तेविरुद्ध आहेत. या स्थितींत तुम्हास राज्य करावयाचें असेल तर लॉर्ड लोथियन म्हणतात त्याप्रमाणें हुकुमशाही तंत्र स्वीकारलें पाहिजे, मुद्रण-स्वातंत्र्य खलास केलें पाहिजे, विश्वविद्यालयें झाडून साफ केलीं पाहिजेत, गुप्त-पोलीस संघटीत केलें पाहिजेत, नागरिक हक्क निकालीं लावले पाहिजेत. सरकार-विरुद्ध बोलणारे पक्ष हाणून पाडण्यासाठीं जबरदस्त व राजकीय पक्ष काढला पाहिजे. अनेकांना फांशी दिलें पाहिजे व रस्त्यानें लष्कर फिरविलें पाहिजे. इतकें केलें म्हणजे हिंदुस्थान शांत होईल,—मात्र कांहीं काळच. ( We certainly could not govern a unitedly hostile India with our present methods. But, no doubt if we adopted the methods of modern dictatorship and took over the Press, purged the universities, created a secret Ogpu police, nullified all civil liberties and created a 'strong arm' political party to smash up every kind of political opinions not friendly to our rule, and paraded military force and ruthless execution in suffient numbers, India could probobly be kept quiet for a time ). हे सर्व उपाय हिंदुस्थान सरकारनें १९४२ सालीं केले, व ते करूनही शांतता झाली नाहीं. हें पाहण्यासाठीं मात्र लॉर्ड लोथियन हयात नाहींत हें त्याचें सुदैवच समजलें पाहिजे. सरकार आपला अभिमानी असा पक्ष तयार करीत आहे. त्यांत वेतनी, विनावेतनी, पदवीवाले, बिनपदवीवाले, सर्व चिजा त्यांत आहेत असें सांगून डॉ. खरे यांनीं खालील हिंदी काव्य गाऊन त्यांचे विचार काय असतील ते दर्शविले. 'हे हिंद तुझको खाक में क्यों न मिलायँगे हम । इज्जत तेरे शौक़से क्यों ना घटायेंगे हम । तालीम जैसी पाते हैं उस राह जायँगे हम ।

अपने वतनसे नफरत क्यों न करेंगे हम ।। खैरख्वाह इंग्लिस्तान के क्यों न बनेंगे हम ।। साहबने दी खाते हैं रोटी डबल जो हम ।। ' हिंदुस्थान हिंदुस्थान जेव्हां होता, तेव्हां इंग्लंड यःकश्चित् होतें व हिंदुस्थान हिंदुस्थानच राहील तेव्हां इंग्लंड खलास होईल. ( India was India when England was a pup, India will be India when England is broken up ). अशा तऱ्हेचें डॉ. खरे यांचे भाषण प्रचंड हास्यांत खलास झालें. नंतर शर्मा व गृहमंत्री यांचीं भाषणें झालीं. " दडपशाही वस्तुतः नाहीं असल्यास आवश्यक तेवढींच आहे " असें गृहमंत्री यांनीं सांगितलें. कपात मंजूर झाली.

युरोपियन गटाचे नेते हडसन यांनीं जादा कराबाबत ( Surcharge on Income-tax ) कपात सुचविली. त्यांचें म्हणणें कीं, हा जादा कर १९३१ सालीं संकटकालीन ( Emergency ) आहे असें सांगण्यांत आलें त्यावेळीं केलेली पगारकाट व ही करवाढ, आम्ही नेहमींची परिस्थिति आली कीं काढून टाकूं, पैकीं सरकारी नोकरांची पगारकाट दूर झाली, पण फडणीस करवाढ दूर करण्यांत तडफ दाखवीत नाहींत. त्यांचे अंदाज चुकले, वसूल जास्त झाला. अपेक्षेपेक्षां सालअखेर शिल्लक जास्त राहिली; म्हणून तिचा उपयोग केवळ न्याय म्हणून कर दूर करण्याकडे झाला पाहिजे. करवाढ कायम ठेवल्यामुळें व्यापारीमंदी दूर होत नाहीं, व उद्योगधंद्यांची वाढ खुंटली आहे. शिवाय आयात करही वाढविला आहे तोही कमी झाला पाहिजे. प्रांतांना देणग्या देऊन नवीन घटना अमलांत आणणें धोक्याचें आहे. आर्थिक परिस्थिति चांगली असेल तरच नवीन घटना अमलांत आणावी हें आमचें म्हणणें कायम आहे. कमाल कर लादून, नवीन घटना राबविणाऱ्यांना कर बसविण्याला माया राहात नाहीं, सर्व उद्योगधंदेवाले–देशी व परदेशी–व व्यापारी यांची मागणी हा जादा कर कमी करावा अशी आहे. या कपातीला सर मोदी यांनीं पाठिंबा दिला. ही मागणी अगदीं रास्त आहे.बजेटच्या चर्चेच्या वेळीं शूस्टर साहेब–माजी अर्थमंत्री–अगदीं चिंताक्रान्त असत, हल्लींचे फडणीस तसे दिसत नाहींत. चर्चेच्या वेळीं ते जें हळूहळू पुटपुटतात तें जर सर्वांनीं ऐकलें तर चर्चा नुसती शाब्दिक राहाणार नाहीं ! ! तथापि आम्हा दुर्दैवी, शापित, दलित व दडपलेल्या भांडवलवाल्या वर्गाकडे थोडे सहानुभूतीनें त्यांनी पाहावें अशी आमची इच्छा आहे ! बजेटाच्या रचनेंत आम्हाला स्थान नाहीं, चर्चेंतही कोणी विचारणारे नसले, तर दुर्दैव आहे. शिलकी बजेट मांडलें म्हणून आम्ही

फडणिसाची सारखी स्तुति करावी हें योग्य नाहीं. संकट कालीन कर संकट संपल्यावर चालू ठेवणें गैर आहे. निव्वळ श्रीमंत म्हणून त्यांच्यावर कर लादणें बरोबर नाहीं. सर्व वर्गांना न्याय मिळाला पाहिजे. नवीन घटना आल्यावर इस्टेटवाले व भांडवलवाले यांच्यासाठीं काय वाढून ठेवलें आहे याची मला कल्पना आहे. नामवंत लोकांकडून या वर्गाविरुद्ध चाललेल्या चळवळींना मान्यता मिळत आहे. प्रसंग आला म्हणजे दाखवूं! 'काय! कावसजी समाजसत्तावादी होणार?' एकानें प्रश्न केला. 'अखेरच्या आर्धींचे ते व अखेरचा मी,' असें मोदींनीं उत्तर दिलें व पुढें म्हणाले "तसा प्रसंग आला म्हणजे एक तर आम्ही सत्याग्रह करूं किंवा जें अधिक शक्य वाटतें तें म्हणजे जें सद्गुणांत कमी पण सामर्थ्यांत व परिणामांत जास्त असें कांहीं तरी करूं. ( We will offer non-violent non-co-operation or it is just possible, we may offer something which may be less virtuous but more effective. )" 'हा दहशतवादी दिसतो.' एकानें आवाज काढला. "प्रसंग येईपर्यंत आम्हाला जिवंत राहण्याचा हक्क आहे," असें म्हणून थोडक्यांत पण चटकदार भाषण करून ते बसले. पंतजी म्हणाले, "सरकारी वचनावर मोदी कां विश्वास ठेवतात? भारतमंत्र्याच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, वचनें देणें आणि मोडणें हा त्यांचा धंदा आहे. पगारकाट प्रथम दूर केली कारण हजारों रुपये महिना मिळवणारे बिचारे गोरे अधिकारी पगारकाटीमुळें दारिद्र्यांत आले!! उपासमार होऊन मेले असते म्हणून फडणिसानें पगारकाट रद्द केली!! ही गरिबांवर दया झाली. आतां दुबळ्यांच्यावरही प्राप्तीवरील व जादा प्राप्तीवरील जादा कर कमी करून फडणिसानें त्यांना अडचणींतून दूर केलें; केवढा न्याय केला!! श्रीमंतांवर कर बसवून गरिबांना न्याय द्या अशी सर्वत्र ओरड चालू असतां फडणिसांचें धोरण 'ज्यांच्याजवळ आहे त्यालाच अधिक दे व ज्यांच्याजवळ कमी आहे त्यांच्याकडून अधिक घे!!' या बायबलप्रणींत उक्तीप्रमाणें आहे. प्राप्ती कर भरणारे गरीब नाहींत. त्यांच्यावरील जादा कर कमी करण्याऐवजीं मिठावरील कर अगर जादा कर कमी केला असता तर गरिबांना कांहीं फायदा झाला असता."

सनातनी बजोरिया, कावसजी, यांनीं पाठिंबा दिला. जेम्सनें सांगितलें कीं, प्राप्ती कर देणारे एकंदर ६,६०,००० लोक आहेत. पैकीं, दोन हजार रुपयांच्या आंत प्राप्ति असून कर देणारे ३,८७,३९२ आहेत, त्यांना माफी मिळाली. जादा प्राप्ती

कर देणारे अवघे ३४०७ आहेत. येवढ्या लोकांवर तुम्ही असा किती कर बस-विणार व त्यांना किती घोळून काढणार ? श्रीमंतांपेक्षां गरिबांकडेच फडणिसाचें लक्ष दिसतें. आज कर पद्धतीनें विषमता दूर करण्याचा सवाल नाहीं. व्यापार-वृद्धीसाठीं प्राप्तीकरावरील जादा कर दूर करणें जरूर आहे. तात्पर्य सर्व भांडवल-वाले व श्रीमान्‌वर्गी सभासद कपातीच्या बाजूनें होते. कॉंग्रेस पक्ष विरुद्ध होता. उत्तर देताना फडणीस म्हणाले " सर्वत्र हरिजनांना मदत करा अशी मागणी झाली आहे. मात्र हे हरिजन मुंबईतील बडे भांडवलवाले आहेत. युक्तीनें सर्व जादा कराविरुद्ध सभागृह उठविण्याचा हा उद्योग या कपातीनें केला आहे. पण सुरीनें झालेल्या जखमेंतील रक्तप्रवाह, पोस्टाचें तिकिट चिकटवून थांबणार नाहीं." पंतजींचें भाषण झाल्यावर वास्तविक उत्तर देण्याचें कारणच नव्हतें. "जादा कर कमी केला, म्हणजे ताबडतोब व्यापार वाढेल ही गप्प आहे. क्रुशेन सॉल्ट घेतल्याबरोबर आजचा रोगी उद्यां लागलीच मल्ल बनेल असें म्हणण्या-सारखें आहे. येथें कराचा बोजा जास्त आहे, मग तो कमी करावयाचा असेल तर आयात कर कमी करावयास पाहिजे. संरक्षण म्हणजे कराचा बोजाच आहे." ' समंध ' सत्यमूर्ती बोलले, " दोन आहेत; एक तुम्ही घ्या व एक मी घेतों," फडणीस कडाडला, ' संरक्षण म्हणजे गरिबांवर बोजा हें मी पुन्हां म्हणतों. मिठावरील कराचा बोजा फक्त रु. ७ कोटी आहे. आयात करांच्या संरक्षणामुळें होणारा बोजा दरसालचा रु. ३४ कोटींचा आहे. प्राप्ती-कराच्या दृष्टीनें पाहातां इंग्लंडमध्यें करांचे दर व प्रमाण अधिक प्राप्तीवाल्यांवर जास्त आहे. आम्ही वचनें पाळूं पण त्यांतून भलताच अर्थ काढूं नये. संकटकाळ संपला असें एकमत नाहीं म्हणून सरकाराचें धोरण योग्य आहे." कपात नापास झाली. या चर्चेंत संरक्षणाविरुद्ध फडणीस किती आहेत हें स्पष्ट झालें. गरिबांचा कैवार खोटा. संरक्षणाच्या धोरणानें हिंदी व्यापार व उद्योगधंदे वाढीस लागले, त्यामुळें विलायतेंतील धंदेवाले नाराज होते; व हें धोरण बदलण्याचा विडाच उच-लून हा सद्‌गृहस्थ येथें आला होता; व त्या दृष्टीनें त्याचीं पावलेंही पडत होतीं. शेवटल्या दिवशीं जोशी यांनीं कस्टम खात्यांतील नोकरांच्या पगाराबाबत कपात सुचवून चर्चा केली. नंतर महंमद अझम यांनीं कस्टम खात्यांतील मुसलमान नोकरांची संख्या जास्त व्हावी म्हणून एक कपात सुचवून सांगितलें. कर्नल गिडने यांना अँग्लो-इंडियन नोकरांचा पगार वाढवावा हें सांगावयाचें होतें, पण योग्य

कपात सुचविली नाहीं म्हणून जमलें नाहीं. त्यांची तरफदारी युरोपियन गट किती करीत होता हें या वेळीं प्रत्ययास आलें; आणि तेंही साहजिक होतें ! ! पोस्ट व तार खात्यांतील नोकरांच्या पगाराबाबत व मुसलमानांची संख्या येथें कमी आहे, याबाबत थोडा वेळ चर्चा झाली. सरकारतर्फे बेवूर यांनीं उत्तर दिलें. त्यांत एकंदर परिस्थितीचें माहितीपूर्ण विवेचन होतें. फ्रँक नॉईस यांनीं जातवार नोकऱ्याबाबत सांगितलें कीं, शें. २५ पेक्षां जास्त मुसलमान १९३४ सालीं घेतलें. २१८४ नवीन भरती झाली त्यांत ८२८ मुसलमान होते. कपाती नापास झाल्या. पांच वाजतां कत्तल सुरू होते. पंधरा मिनिटें राहिलीं. तेवढ्यांत सत्यमूर्तींनीं गव्हर्नर जनरलच्या खर्चावर टीका केली. "२०हजार रुपये पगार पण४०हजार रुपये भोजन-भत्ता, रु. १,४१,८४० करार भत्ता, रु. ४३००० मोटार भत्ता, रु. ३। लाख प्रवास खर्च व १। लाख रुपये आणखी एक भत्ता, याचा अर्थ काय ? व्हॉइसरॉय यांचें घर म्हणजे सदावर्त आहे कीं काय ?" गृहमंत्री म्हणाले " ही कपात नाहीं. " सत्यमुर्ती म्हणाले, ' हें सरळ भाषण व रोखठोक सवाल आहे. ' " मी व्हॉइसरॉय नव्हतों व त्यांचा स्वारी कामगारही नव्हतों, तेव्हां ह्या भत्त्याविषयीं मला विशेष माहिती नाहीं !" गृहमंत्र्यांनीं उत्तर दिलें. 'जे जेवावयाला तेथें जातात त्यांनीं पैसे द्यावेत.' असे एकजण म्हणाला. " कॉंग्रेसवाले जात नाहींत " दुसरा म्हणाला. ' हा त्यांचा दोष आहे ' गृहमंत्री म्हणाले. पुन्हां सत्यमूर्ति बोलूं लागले. जोशी यांनीं तक्रार केली कीं, सत्यमूर्ति एकदां बसून बोलले आतां उभे राहून बोलत आहेत. दोन भाषणें करण्याचा अधिकार नाहीं ! " कोणीच बोलत नाहीं म्हणून मी बोलून घेतों " अय्या बोलला. गृहमंत्री म्हणाले " मी बोलण्याचा प्रयत्न करतों पण अडथळे होत आहेत ! !" एवढ्यांत पांच वाजले, प्रचंड हंशा झाला व कत्तल सुरू होऊन मागण्या मांडण्यांत येऊन चर्चा संपली. फडणिसी व्यवस्थेच्या बिलावरील चर्चेस मार्ग मोकळा झाला.

१६ मार्च १९३६ रोजीं फडणिसी बिलाच्या चर्चेस सुरुवात झाली. बिल विचारांत घ्यावें ही सूचना मांडतांना फडणीस म्हणाले कीं, " पश्चिम युरोपमध्यें शत्रूला 'प्रथम वार कर' असें सांगणें सभ्यतेचें व अस्सल शिलेदारीचें लक्षण मानण्यांत येतें. या पौर्वात्य देशांत ही प्रथा सुरू व्हावी म्हणून मी कांहीं न बोलतां विरोधकांनीं प्रथम गोळीबार करावा असें सुचवितों !" पहिला वार अनुग्रह बाबू, जे पुढील वर्षीं बिहारमध्यें फडणीस झाले, यांनीं काढला; उधळपट्टीवर टीका केली.

हिंदीकरण होत नाहीं, जें थोडें होत आहे त्यामुळें ‘ जयचंद ’ आणि ‘मिरजाफर’च जास्त होत आहेत. लोकांशीं समरस होणारे क्वचित्. या नव्या हिंदी अधिकाऱ्यांची एक जात होऊं पहात आहे. नंतर त्यांनीं बिहार धरणीकंपाबाबत कॉंग्रेसचें कार्य किती उत्कृष्ट होतें हें खुद्द सरकारी अधिकाऱ्यांचे उतारे वाचून दाखवून सिद्ध केलें. गृहमंत्री यांनीं निष्कारण कॉंग्रेसला नांवें ठेविलीं. उध्वस्त भागांत चरखा सुरू करून कॉंग्रेसनें आशा उत्पन्न केली. कॉंग्रेस आपलें ध्येय निश्चित प्राप्त करील. टीकाकार व विरोधक कांहींही म्हणोत विद्यमान कार्यकर्ते पाया घालीत आहेत. त्यांतच ते मरतील. तथापि अशा मरणांत त्यांना समाधान आहे. कारण योग्य काल येतांच त्यांच्या अस्थींतून स्वातंत्र्याचा उदय निश्चित होणार असा त्यांचा आत्मविश्वास आहे. डॉ. झियाउद्दीन यांनीं आयात कराबाबत टीका केली. शेतकरी वर्गाला कांहीं तरी मदत केली हें ठीक पण त्यांचें कर्ज १२०० कोटी रुपयांच्या वर झालें आहे. व्याजाचा दर द. द. २० रु. पर्यंत आहे. हिंदुस्थान सरकारच्या उत्पन्नाच्या तिप्पट रक्कम गरीब शेतकरी नुसते व्याजापायीं सावकारांना देतात. व्याजावर कांहीं तरी नियंत्रण पाहिजे. व्याज दामदुप्पटीपेक्षांही जास्त घेतलें जातें. पूर्वीं हें तरी नैतिक बंधन होतें. शिवाय १०–२० वर्षांनीं बंडें होत; सावकारांचीं घरें व वह्या जाळल्या जात, मग साहजीकच कूळ व सावकार कोणीच उरत नसे. तुम्हीं सर्वत्र शांतता व सुव्यवस्था ठेवून हाही मार्ग बंद केलात. हिंदुस्थानांत पत आहे म्हणून देशी व्यापार बुडाला व शांतता आहे म्हणून शेतकरी वर्ग बुडाला. ‘तुम्हांला क्रान्ति हवी आहे’ एकानें खवचटपणें विचारलें. ‘ छे छे, भलतेंच, मी उत्क्रान्ति-वादी आहे. सरकार योग्य वेळीं जागें झालें नाहीं तर सर्वत्र समाजसत्तावाद बोकाळेल. व्यापारधंद्यांना संरक्षण असावें पण गरिबांच्या दृष्टीनें सरकारनें पुन्हां एकदां कमिटी नेमून संरक्षणाबाबत चौकशी केली पाहिजे. मला कमिटी नेहमीं आवडतें, मात्र ती तिघांची असावी व त्यांतील दोघे नेहमीं गैरहजर असावेत !!’ तो एकच सभासद कोण असावा हें मात्र केवळ विनयवृत्तीनें त्यांनीं सांगितलें नाहीं. पंडित कृष्णकांत मालवीय यांनीं नवीन घटनेबाबत टीका केली. सदरहू घटना म्हणजे ब्रिटिश पाश घट्ट आवळून धरण्याचें एक साधन आहे. नवीन घटनेनें कोणा-लाही समाधान वाटत नाहीं. नौ छेद, पेंदी गायब, गला नदारद। मुफलिस को गरामियों में झज्झार मिला तो ऐसा ॥ (गरीब भिकाऱ्याला कडक उन्हाळ्यांत जें मडकें मिळालें त्याला नऊ भोकें, तळ बेपत्ता, तोंड नाहींसें झालेलें अशी ही घटना

आहे. ) जगांत लवकरच महायुद्ध होईल व त्यांत आम्ही निष्कारण भरडले जाऊं. इंग्लंडची परराष्ट्रीय नीति सरळ नाहीं. पुढील युद्धांत हवाई युद्धाला प्राधान्य येणार या दृष्टीनें सरकारनें काय केलें आहे ? तरुणांना लष्करी शिक्षण दिलें पाहिजे. नंतर त्यांनीं जातीय निवाड्यावर टीका केली. नृपेन्द्र म्हणतात त्याप्रमाणें तो मेला, गेला व त्याची राख गंगेत टाकली हें खरें नाहीं. राष्ट्रीयता बिघडविणारा, भांडणें लावणारा, लोकशाही विरुद्ध असणारा हा निवाडा रद्द झालाच पाहिजे. एक राष्ट्र होऊं नये, एकजूट होऊं नये म्हणून मुद्दाम हा निवाडा दिला आहे. या भूमीवर आकाश जसें कायम आहे तसेंच आम्ही कायम राहणार. जे हंसतील ते हंसून संप-तील; जे रडतील ते रडून खलास होतील. आम्ही शांत चित्तानें देवावर भरंवसा ठेवून राहूं. जें होणार तें टळणार नाहीं. कांहीही आपत्ती येवोत, कितीही अंधार होवो, काळ उलटी घेईल व आमचें निजलेलें नशीब जागें होईल. आमच्या मार्गांतील शत्रू कांहीही करोत, कितीही कांटे रोवोत, तरी परिस्थिती खास बदलेल. ज़माना लेगा कोई करवट । नसीब बेकस का बो चुकेगा । खिलेंगे कुछ कुदरती शिगुफे । जब अपने काँटे बो खों चुकेगा । नंतर दडपशाहीचें वर्णन पुढील काव्यांत केलें:– बो ला और आर्डर के नामपर हमको पकडते हैं । चले इन्साफ करने, हैं बडे नौशेरवाँ हो कर । अल्लाह रे ज़ालीम तेरे कानून की बंदीश । लबबंद, ज़बानबंद, नज़रबंद, क़लमबंद ॥ आणि हें सर्व कशाकरितां तर म्हणे आमच्या कल्याणाकरितां. सर्वत्र निराशा आहे. दारिद्य, उपासमार, बेकारी हीं पाहवत नाहींत. महत्त्वाकांक्षी तरुणांना संधि मिळत नाहीं. केवळ आपला अम्मल कायम ठेवण्या-करितांच हे काळे कायदे आहेत. तुमच्या हातून आमची उन्नति पुरे. या खुदा अब हाथ उठाले बंदगाने इश्कसे । डूबकर भी लगही जायेंगे किसी साहिल से हम । ( हे खलाशा, तुझा हात बाजूला कर, तुझी मला मदत नको. मला बुडूं दे. हा प्रवाह मला कोठल्यातरी किनाऱ्याला खास नेईल.)" त्रागा करून पंडित बोलला.

पंडितजींनीं या बिलावर एक तासभर भाषण केलें. ब्रिटिश अंमलाखालीं या देशाचें शोषण झालें ही गोष्ट फडणीस नाकबूल करतात याचें त्यांनीं आश्चर्य प्रगट केलें व व्यापाऱ्याबाबत बोधप्रद आंकडे सांगितले. चलनाबाबत सरकारचें धोरण चुकीचें असून त्यामुळें हिंदी उद्योगधंदे मारले जात आहेत व येथील सर्व धोरण लंडनमधील भांडवलवाल्यांच्या तंत्रानें चाललें आहे हें त्यांनीं अगदीं स्पष्ट केलें. लोकांना निःशस्त्र करून, अज्ञानांत ठेऊन, दुःखांत व दारिद्र्यांत कुजत ठेवून, नुसती

शांतता व सुव्यवस्था ठेवण्यापलीकडे सरकारनें कांहींही केलें नाहीं. देशाची उन्नति व्हावी म्हणून उद्योगधंदे वाढवून कांहींच केलेले नाहीं. उत्तान पर्वत, अथांग नद्या, सुंदर शेतें, अमोलिक खनिज संपत्ति इतकें सृष्टीनें देऊन हा देश दुःखांत व दारिद्र्यांत कां असावा ! माणशीं उत्पन्न किती क्षुद्र ! उलट इंग्लंड देश किती लहान, पण संपत्ति किती अफाट; माणशीं उत्पन्न किती तरी ! हें कां ? याचें उत्तर हेंच, कीं 'हा देश साम्राज्यशाहीनें ग्रासला आहे म्हणून पिळला जात आहे.' 'तुम्ही कां सहन करता ?' जिना मधेंच म्हणाले. 'मला जर जिनासारखी ताकद असती तर मी चमत्कार घडवून आणले असते व याचा निकाल तावडतोब लावला असतां. ब्रिटिश संबंधानें कांहीं उन्नति झाली, पण आर्थिक स्थिती सुधारली हें खरें नाहीं. धंद्यांत संरक्षणाचा स्वीकार इंग्लंडनें केला, व या देशानें ही नीति स्वीकारूं नये म्हणून फडणीस सांगतात. नास्तिक बोल्शेविकानें येथें येऊन खिश्चन धर्माचा प्रसार करावा येवढें हें विचित्र आहे. सर जॉन स्टॅचीनीं ( १८७८-८० चे फडणीस ) उघड सांगितलें कीं, कांहीं कर्तव्यकर्म हिंदुस्थानाच्या बाबतींत मला आहे, पण त्याहीपेक्षां माझ्या देशाबाबत मला ज्यास्त आहे ! याचा अर्थ इंग्लंडची गरज प्रथम असाच होतो व तसा अनुभवही आहे. विद्यमान फडणीसही त्याच मताचे असणार ! हा सद्गृहस्थ आयात करांविरुद्ध फार आहे. यास खुला व्यापार पाहिजे. मग इंग्लंड मध्यें साखर, खाण्याचे पदार्थ, फळें यांवर आयात कर कां बसविला ? आयात करानें देशाचा व्यापार वाढतो, रोजगार वाढतो, भरभराट होते हें धोरण इंग्लंडमध्यें उघड स्वीकारलें गेलें, तरी फडणिसांचें खुल्या व्यापाराचें तुणतुणें चालूच आहे. इंग्लंडचे धंदे वाढावे म्हणून १९ व्या शतकाच्या आरंभीं हेंच धोरण होतें. धंदे वाढले प्रगति झाली. मग खुल्या व्यापाराचें धोरण सुचलें. आतां सर्वत्र प्रगति झाली, खुला व्यापार बोचूं लागला. लगेच यांनीं पवित्रा बदलला. हें सर्व जर इंग्लंड करतें, मग हिंदुस्थानालाच निराळा न्याय कां ?' नंतर पंडितजींनीं निरनिराळ्या पार्लमेंटच्या कमिटींतील उतार्‍यावरून येथील देशी उद्योगधंदे कसे मारले गेले व त्याला इंग्रजी अम्मल कसा कारणीभूत झाला हें स्पष्ट केलें. इंग्लंड, कोट्यवधि रुपये सालोसाल नेत आहे. हिंदुस्थान दरसाल १५० कोटी रुपये भूर्दंड किती काळ सहन करूं शकेल. 'तार्तरांची स्वारी वाईट पण आमच्या संरक्षणानें हिंदुस्थान बुडत आहे. तार्तरांचें शत्रुत्व तरी होतें. पण आमची मैत्री या देशाचा नाश करीत आहे. २० वर्षे झालीं. जी ओबडधोबड आमची वागणूक होती

तीच आज आहे. हिंदी लोकांना इंग्रजांचें डोकेंही दिसत नसून अंमल मात्र जाणवत आहे—आतां निदान गृहमंत्र्यांचें डोकें तरी दिसत आहे. पोरसवदा इंग्रज अधिकारी वाटेल तसा वागतो. तो येथील लोकांपासून दूर, इतकेंच नव्हे तर त्यांच्या संस्कृतीपासूनही दूर. इकडे येतात, मुक्काम करतात, संपत्ती कमावतात व जातात. इंग्रजाला एक रुपया येथें मिळणें म्हणजे तो हिंदुस्थानाला पारखा होणें हें उघड आहे! ("The Tarter invasion was mischievous, but our protection that destroys India. It was their enmity, but it is our friendship; young men, boys almost govern there, without society and without symphathy with the Natives. .. Animated with all the avarice of age and all the impetuousity of youth, they roll in one after another; wave after wave and there is nothing before the eyes of the Native, but an endless hopeless prospect of new flights of birds of prey and passage with appetites continually renewing for a food that is continually nothing. Every rupee of profit made by an Englishnan is lost for ever in India.)" हे बर्कचे शब्द वाचून दाखवितांच टाळ्यांचा कडकडाट झाला. "तीच नीति अजूनहि आहे. हजारों मैल रेल्वे बांधली, पण येथें तिची सामुग्री एंजिनें वगैरे तयार करण्याबाबत काय केलेत? १५० वर्षांत हिंदुस्थानांतील देशी धंद्यांबाबत वाढ होण्यासाठीं काय केलेत? अवघ्या ४॥ वर्षांत खुद्द इंग्लंडमध्यें अनेक कमिट्या नेमल्या, त्यांनीं चौकशा केल्या, लागलीच उद्योगधंद्यांना अवश्य असलेली मदत रकमेनें अगर आयात कर (Bounty) बसवून मिळाली. ओटावा योजना हाही त्याच उपाययोजनेचा भाग होता. सरकारनें पुढाकार घेऊन उद्योग-धंदे उभे केले पाहिजेत, चालविले पाहिजेत. खुल्या व्यापाराचें हें जुनाट गोधडें फेकून दिलें पाहिजे. कोणीच जर घेत नाहीं तर याच देशांवर सक्ती कां? आमची लोकसंख्या जगाच्या $\frac{१}{५}$ आहे, पण जगांतील उपभोग्य वस्तूंपैकीं आम्ही $\frac{१}{५०}$ सुद्धां उपभोगीत नाहीं. देशांत धान्य व कापूस पिकतो, परंतु तो बाहेर जातो. देश भुकी व अर्धनग्न. अमेरिकेंत अनेक पटींनीं गहूं व कापूस पिकतो. पण त्यापैकीं $\frac{१}{१०}$ ही बाहेर जात नाहीं. आमच्या लोकसंख्येच्या $\frac{१}{३}$ त्यांची आबादी असून आमच्यापेक्षां ते शंभर पटीनें माल जास्त उपयोगांत आणतात. किती तरी पटींनीं त्यांची राहणी श्रेष्ठ आहे. जर ह्या देशास स्वातंत्र्य मिळेल व साम्राज्यशाहीची

पकड नाहींशी होईल तर हा संपन्न देश आपली उन्नत्ति फार लवकर करून घेईल." शेठ मथुरादास यांनीं व्यापार सावरला नाहीं असें सांगितलें. १९३०-३१ सालीं १७३.०६ कोटि रु. चा आयात माल आला व रु. २२६,९७ कोटींचा माल परदेशीं गेला. एकंदर परराष्ट्रीय व्यापार रु. ३९९·५६ कोटींचा झाला. १९३०-३१ पासून हा सारखा कमी होत आहे. १९३३-३४ सालीं रु. ११७'३१ कोटी आयात व रु. १५०'२३ कोटी निर्यात, मिळून एकंदर रु. २६७'५४ कोटींचा व्यापार झाला. १९३५-३६ च्या १० महिन्यांत रु. ११३·७४ कोटि आयात व रु. १३२·५१ कोटि निर्यात व्यापार ही परिस्थिति आहे. शिवाय रुपयाची किंमत १९३१ च्या मानानें ४० टक्के घसरली आहे. हें सर्व लक्षांत घेतां व्यापार अधिकच मंदावला आहे हें उघड होईल. ओटावा योजनेनें आयात माल वाढला, पण निर्यात व्यापार वाढला नाहीं. किंमतीच्या दृष्टीनें पाहातां येणाऱ्या मालाची किंमत फक्त ४० टक्क्यांनीं उतरली, उलट निर्यात होणाऱ्या मालाची किंमत ५२ टक्के उतरली. याचा अर्थ ४० टक्के अधिक माल १९२९ सालाच्या किंमतीनें धाडावा लागतो; पण त्याचप्रमाणें फक्त २८ टक्केच अधिक आणावा लागतो. १९२८-२९ सालीं ८ प्रांतांतील उत्पादनाची किंमत रु. १०२१·२० कोटि होती ती १९३३-३४ सालीं रु. ४७३·९४ कोटि झाली. भावहि पडले आहेत. १९२८-२९ च्या भावांच्या सूचक अंकांशीं तुलना करतां १९३५-३६ सालांतील उत्पादनाची किंमत निम्मीसुद्धां राहिली नाहीं. मंदीचें वातावरण अजून गेलें नाहीं. उद्योगधंद्यांना उत्तेजन दिलें जात नाहीं. उलट कांहीं धंद्यांत अंतर्गत जकात ( Excise ) बसविली जात आहे. व त्यांची प्रगति अडविली जात आहे. मंदाईत सरकारनें कांहीं केलें नाहीं. अन्य देशांत व्यापारी करार करून चलन निर्मूल्य करून वाहतुकीच्या दरांत फरक करून, व्यापार सांवरून धरण्यांत आला. उद्योगधंद्यांना आधार देण्यांत आला. १९३४ च्या एका वर्षांत शेती, गवळी धंदे, साखर वाहतूक वगैरे धंद्यांना इंग्लंडमध्यें १४½ दशलक्ष पौंड मदत ( Subsidy ) म्हणून देण्यांत आले. याशिवाय अनेक मदतीच्या योजना करून इंग्लंडनें आपली आर्थिक परिस्थिती मंदाईच्या संकटांत सांवरून धरली, एवढेंच नव्हे तर सुधारलीहि. येथें धंद्यांना संरक्षण देण्यांत विरोध, कुचराई, विलंब, इतकें करून दिलेंच तर लागलीच वर्षादोन वर्षांनीं त्यावर अंतर्गत जकात बसवून वार करावयाचा. यानंतर करांच्या प्रमाणाबाबत

कांहीं टीका व कांहीं सूचना करून त्यांनीं आपलें माहितीपूर्ण भाषण संपविलें. नंतर पंजाबमधील एक जमीनदार अबदुल्ला यांनीं पंजाबच्या शेतकऱ्यांची कहाणी गायली व त्यांची क्रयशक्ति वाढवावी म्हणजे ते जास्त इंग्लिश माल घेतील असें आश्वासन फडणीस यांस दिलें !

मोदी म्हणाले "पंतजींचें भाषण ऐकून मी अगदीं खूष झालों आहे. देशाचें उद्योगधंदे वाढविलेच पाहिजेत. उद्योगधंदे वाढवून औद्योगीकरण करण्यास अवश्य असलेला कच्चा माल, मजूरवर्ग, योजकत्ता व भांडवल सर्व कांहीं या देशांत आहे. देशांतील बेकारी, धंदे वाढले तरच जाईल. पाश्चात्य देशांत ज्या परिस्थितींत उद्योगधंदे वाढले तीच परिस्थिति येथेंही आहे. वाढती लोकसंख्या व शास्त्रीय प्रगति लक्षांत घेतां खूप उत्पादन वाढवून माणशीं उत्पन्न व संपत्ति वाढवून राहणी सुधारतां येईल. नुसत्या कापडधंद्यांत ५ लाख लोक कामावर आहेत. संरक्षण दिलें असल्यामुळें हा धंदा उभा राहूं शकला. तीच स्थिति पोलाद धंद्याची आहे. सरकारनें संरक्षणाबाबत धोरण बदललें पाहिजे. पुन्हां एकदां समिती नेमून दहा वर्षांत संरक्षणानें किती प्रगति झाली हें पाहून व्यापक नीति स्वीकारली पाहिजे. ३ वर्षें संरक्षण द्यावयाच्या आधीं चौकशी, नंतर चौकशी, यानें उद्योग-धंद्यांत विश्वासाचें वातावरण उत्पन्न होत नाहीं. प्रसिद्ध पंडित टॉसिक यांच्या मतें संरक्षण योग्य काल असावें. १० वर्षें हा काल अपुरा आहे. प्रसंगीं ३० वर्षें-सुद्धां योग्य ठरतील, असें त्यांचें म्हणणें आहे. टॅरिफ बोर्डाची संघटना विशेष समाधानकारक नाहीं. खुल्या व्यापाराचें पक्षपाती इंग्लंडनें Import Duties Advisory Committee नेमून $\frac{3}{4}$ आयात मालाच्या बाबतींत कांहींना कांहीं तरी संरक्षण दिलें. ३ वर्षांत या कमिटीनें ३१० अर्ज तपासले, निकाल दिला व एकंदर ७०० दशलक्ष किंमतीच्या आयात मालावर या कमिटीच्या शिफारशींचा परिणाम झाला. येथें कायम बोर्ड नाहीं, अगोदर अर्ज करावा, मग कमिटीची नेमणूक किचकट चौकशी, मग रिपोर्ट, नंतर कायदा ! कोण विलंब, सदासर्वदा व सर्वत्र संरक्षण असावें असें माझें मत नाहीं. पण अवघें जग संरक्षणानें भरलें असतां हिंदुस्थानानें मात्र खुल्या व्यापाराच्या ओंडक्याला धरून मरून जावें हा न्याय नाहीं व व्यवहारही पण नव्हे. संरक्षणानें उपभोगी गिऱ्हाइकावर बोजा पडतो हें सर्वस्वीं योग्य नाहीं. आज कापडाला जी किंमत गिऱ्हाइकाला द्यावी लागत आहे तीच संरक्षण नसेल तर द्यावी लागेल. परदेशांतील मालाशीं टक्कर द्यावयाची तर

प्रसंगीं संरक्षणानें जरी बोजा पडला तरी तो स्वीकारला पाहिजे. नाहीं तर देशांत परकीय स्वस्त मालाचे ढीग पडतील, देशी धंदे निकालीं लागतील, बेकारी वाढेल. संरक्षण पाहिजे, टॅरिफ बोर्डाची पुनर्घटना झाली पाहिजे. बोर्डानें अगदीं कांटेकोर-पणानें वागतां कामा नये. प्रसंगीं कच्चा माल परदेशांतून आणून येथें धंदा उभारणें जरी शक्य असेल तरी सुद्धां संरक्षण दिलें पाहिजे. अन्य देश असेच वागले आहेत. नुसती त्रयस्थाची भूमिका न ठेवतां सरकारनें धंद्यांना सक्रीय मदत केली पाहिजे. जर एकंदर औद्योगिक उत्पादन पाहिलें तर हिंदुस्थानांत दरसाल माणशीं २०रु. चें होतें. जपानमध्यें माणशीं १५८ रु., अमेरिकेंत माणशीं ७२० रु., इंग्लंड४१०रु., कॅनडा ४७० रु.,त्याप्रमाणें माणशीं उत्पन्न पाहिलें तर येथें अगदीं १०० रु. धरलें तरी कॅनडांत १३०० रु., इंग्लंड ११०० रु., अमेरिका २००० रु. व जपान २७० रुपये. संपत्तीच्या दृष्टीनें पाहतां सेव्हिंग्ज बँकांची स्थिति खरी परिस्थिति दाखविणारी आहे. या देशांत माणशीं २ रु. सेव्हिंग्ज बँकेंत आहेत. इंग्लंड २७० रु. जपान ९० रु., फ्रान्स १२५ रु. अशी परिस्थिति आहे. ही परिस्थिति सुधारावयाची म्हणजे देशांत उद्योगधंदे वाढविले पाहिजेत. आम्हांला नुसतें हरिजन म्हणण्यांत काय अर्थ आहे ? खुशाल म्हणा; पण मदत तरी करा,' असा टोला मारून त्यांनीं आपलें विद्वत्ता प्रचुर भाषण संपविलें. डॉ. राजन् म्हणाले 'या देशांत ३६॥ कोटि लोकांपैकीं दरसाल १० कोटी लोक मलेरियानें आजारी पडतात, त्यांपैकीं ३० लाख मृत्युमुखीं पडतात. सुमारें ७ कोटी निःसत्त्व होतात. जीवनमान जें शक्य आहे त्यापेक्षां निम्म्यानें कमी आहे. योग्य निगा घेतल्यास तें दुप्पट होणें शक्य आहे, हें कर्नल मेगाचें मत आहे. मलेरियानें लोक मरतात व निकामी होतात. यामुळें दरसाल १९ कोटी रुपयांचें नुकसान होतें, असा सदरहु मेगा साहेबांचा अंदाज आहे. दर माणशीं मासिक उत्पन्न ३॥। रु. धरून त्यानें हिशोब केला आहे. सायमन कमिशनच्या रिपोर्टाप्रमाणें हें नुकसान ४६ कोटी होतें. मलेरिया बरा झाल्यानंतर माणसें कमताकद होतात, त्यामुळें होणारें नुकसान ७४ कोटी रुपये होतें असा हिशोब केला आहे. मलेरियल सर्व्हेच्या आंकड्याप्रमाणें एकंदर कुटुंबांना १०७-६० कोटी रुपये दरसाल नुकसान येतें. यावरून देशाच्या दृष्टीनें हें नुकसान किती तरी मोठें असलें पाहिजे. हें सर्व नुकसान टाळतां येण्या-सारखें आहे, हा रोग असाध्य नाहीं. दलदली नाहींशा करून योग्य वेळीं औष-धोपचार करून, सात्त्विक व पौष्टिक अन्न मिळेल अशी व्यवस्था करून, ही आपत्ति

टळणारी आहे. क्किनाइनचा उत्पादन खर्च पौंडामागें ८ रुपये आहे. सरकार मात्र २७ रुपये किंमत घेतें त्यांतही सरकार नफा मारतें !" 'साठ हजार पौंड फुकट वाटतों' फडणीस ओरडला. 'बाकीचे तीन लाख पौंड कां दिलें नाहींत. सर्व फुकट वाटायास पाहिजे !' डॉ. राजन् म्हणाले. 'सिंकोनाची झाडें लावा, त्यांची लागवड वाढवा म्हणजे परदेशाकडे क्किनाइन्साठीं पहावें लागणार नाहीं. अन्न अपुरें व योग्य तऱ्हेचें मिळत नाहीं सरकारनें या बाबतींत काय केलें ? तुरुंगांत मिळतें इतकें सुद्धां कोट्यवधि लोकांना मिळत नाहीं. सहा हजार मैलांवरून मूठभर गोऱ्या लोकांकरितां डॉक्टर आणण्यांत येतात. येथें पंचवीस हजार पदवीधर डॉक्टर आहेत. ते काय नालायक आहेत ! सरकारी नोकरींत किती भेद पाळतां? गोऱ्यांना सर्वत्र वाव आहे. हें फार दिवस चालणार नाहीं' असें सांगून त्यांनीं आपलें भाषण संपविलें. नंतर संतसिंग व महमद याकूब यांनीं, जातीय निवाड्याबाबत एकमेकांचे वाभाडे काढले व ही शीख-मुसलमान यांची लढाई संपल्यानंतर काझमी यांनीं सरकारच्या चलनविषयक धोरणावर टीका केली. इंग्रजी राज्यांत रयत निकृष्ट अवस्थेप्रत गेली; सावकार तरले व शेफारले, हें सिद्ध करणारे अनेक उतारे काझमी यांनीं इंग्रज ग्रंथकार व अधिकारी यांच्या लिखाणांतून वाचून दाखविले. हल्लींसारखीं कोर्टें पूर्वीं नव्हतीं. सावकाराला,—धनकोला—ऋणकोनें बुडविलें तर सरकार दरबार करता येत नव्हता. सावकार व कूळ यांच्यांतील कज्जे आपसांत मिटवीत. ब्रिटिश अम्मल सुरू झाल्याबरोबर हें बदललें. पूर्वीं खेड्यांतून एकमेकांवर विश्वास असल्यामुळें कर्ज मिळें व फेडलेंही जाई. व्याजाचा दर बेताचा असे. कूळ तरतें असेल तर सावकार तरणार, हें सावकार ओळखून असें व तसा वागें. आतां उलट झालें आहे. सावकार कुळाला जास्त कर्ज देतो व त्याची सर्व इस्टेट, सर्व कमाई लाटण्याकडे त्याची प्रवृत्ति असते व कोर्टांमुळें हें सोपें झालें आहे. याचा परिणाम सावकार निर्दय व जुलमी, कुळें लबाड व गुलामी वृत्तीचीं झालीं आहेत. ( The money-lender due to this becomes avaricious, heartless and an oppressor, and the debtor, becomes crafty, lier, dishonest and a slave.) सर जी बिंगेटसाहेबानें स्पष्ट म्हटलें आहे कीं ही परिस्थिती इंग्रजी राज्य व त्यांचे कायदे यांनीं उत्पन्न झाली आहे; हें कबूल न करणें म्हणजे दुर्बलता आहे. ( But if we were not to state it then it would be a great weakness on our part, that our Government and our laws are the cause of this animosity

and daily increasing downfall.) इंग्रजी अंमलांतील कायद्यांमुळें सावकारवर्ग माजला व त्याचा परिणाम म्हणजे जनतेचें दारिद्र्य वाढलें; संपत्ति मूठभर लोकांच्या हातांत जमूं लागली. ही परिस्थिती १८५२ सालीं होती. त्यानंतर अनेक कायदे झाले. व्याजाचे दर नियंत्रित करण्यांत आले हें खरें. तथापि शेतकऱ्यांची परिस्थिति सुधारली नाहीं. सरकारी ग्रामसुधारणेमुळें कांहीं लोकांचें फावलें इतकेंच. विमानें व नभोवाणी हीं ठीक; पण ह्यांनीं दारिद्र्य कसें नष्ट होणार? उंटाच्या पाठीवर एवढा बोजा झाला आहे कीं, अगदी एकादी काडी अधिक पडली कीं त्याची पाठ मोडेल. परिस्थिति भयंकर झाली आहे. सरकारनें छाती-ठोकपणें कांहीं तरी करावें. उपाय म्हणून ५० कोटी रुपये चलन, कांहींही सोनें वगैरे बाजूस न ठेवतां, (without cover) वाढवावें व तें सर्व शेतीच्या उन्नतीसाठीं एका वर्षांत खर्च करावें, असें सांगितलें. शेतकऱ्याची बाजू आणखी चांगल्या रीतीनें डॉ. डिसोझा यांनीं मांडली. हे आय्. सी. एस्. सेवानिवृत्त जज्ज. हे सरकारनें नेमलेले सभासद होते. नोकरींत निःस्पृहतेबद्दल त्यांचा लौकिक होता. येथेंही मधून मधून ते त्यांची चमक दाखवीत. त्यांनीं सांगितलें ' शेतकी हा मुख्य धंदा आहे. मुख्य धान्याचे भाव १९२९ च्या मानानें ५३·६ टक्के घटले आहेत. याचा अर्थ वार्षिक उत्पन्नांत ५४७·२६ कोटींनीं घट आली. एकंदर ही रक्कम राष्ट्रीय कर्जाच्या निम्मी होते. उत्पन्नांत भाव घसरले म्हणून घट झाली. पण व्याजाचे दर कायम, अन्य देणीं कायम, यामुळें शेतकऱ्यावरील बोजा पदार्थांच्या दृष्टीनें अधिकच वाढला आहे. शिवाय आयात-करांचा बोजा, फडणिसांच्या म्हणण्याप्रमाणें ३४ कोटींचा त्यांच्यावर आहेच. या परिस्थितींत जनतेची परिस्थिती सुधारली असें फडणिसांनीं म्हणणें धाष्टर्याचें आहे. पूर्वी या देशांतून तांदूळ बाहेर जाई, परंतु तोही आतां जात नाहीं. पूर्वेकडील राष्ट्रें स्वावलंबी बनत आहेत. त्या त्या देशांत--सयाम, जावा, इंडो-चायना,-भाताची लागवड वाढली; इतकेंच नव्हे तर ते देश या देशांत तांदूळ धाडूं लागले. १९१४ पूर्वी २३ लक्ष टन तांदूळ निर्यात होई. आतां १९३४-३५ सालीं वरील देशांतून ४ लाख टन तांदूळ येथें आला. याचा परिणाम असा झाला कीं, येथील भातशेतीकडील जमीन कमी लागवड होऊं लागली. १९३१-३२ सालीं ८·४० कोटी एकर जमिनीमध्यें भात लावलें होतें. १९३४-३५ सालीं ८·१ कोटींपर्यंत हें प्रमाण आलें. ४० लाख टन भात कमी पिकूं लागलें. १८ टक्के घट झाली. दोन एकर भात जमीन लागवडीस आणून पांच

माणसें पोट भरूं शकतात, असें धरलें तर वरील परिस्थितीमुळें ७५ लाख लोक बेकार झाले. सरकारी उत्पन्नही घटलेलें असणारच. कोण मेहनत करणार, पिकवणार व मातीमोल किंमतीनें विकणार ! कुठें आहे तुमची सुस्थिति व सुबत्ता ?" 'इर्वेत' गिडनें यांनीं सांगितलें. सरकारला, भाताला संरक्षण द्यावें, परदेशी भातावर आयात कर बसवावा अशी विनंती केली पण व्यर्थ. अखंड तांदुळावर आयात बसबावी ही विनंति अमान्य करून कणीवर मणीं बारा आणे आयात बसविली ! कारण उघड आहे. अखंड तांदूळ इंडोचायनांतून येत होता व तो देश फ्रान्सच्या मालकीचा ! तेव्हां फ्रान्सच्या विरुद्ध कसें जावें ? तांदुळानंतर डॉ. डिसोझा खोबऱ्याविषयीं बोलतांना म्हणाले ' सीलोनमधून खोबरें येतें, पण त्यावर आयात कमी. कारण तो साम्राज्यान्तर्गत देश आहे. पण देशी खोबऱ्याला विरोधक, सीलोनचें खोबरें आहे हें सरकार जाणूनसुद्धां न्याय्य संरक्षण देत नाहीं. सिलोन हिंदी मालाला कांहीही सवलत देत नाहीं. सर्व एकतर्फी चाललेलें आहे. सिलोनमध्यें ब्रिटिश कापड, लोखंडी व पोलादी माल खपतो म्हणून त्या देशाला दुखवावयाचें नाहीं. हा माल घेऊन त्याची किंमत सीलोन फक्त खोबरें व त्याचें तेल निर्यात करूनच देऊं शकतो. आणि हें व्हावें म्हणूनच सीलोनच्या या मालावर कमी जकात घेऊन हा माल या देशांत रिचविला जातो. शेती व उद्योगधंदेवाले यांच्यांतील हितविरोध इंग्लंडमधील शेतकऱ्यांच्या हितवाद्यांनाही पसंत नाहीं. तेथील शेतकऱ्यांच्या प्रतिनिधींनीं तेथील सरकारला शेतीला संरक्षण देण्याविषयीं बजाऊन, व त्याप्रमाणें न केल्यास सर्वत्र व्यापाराला विरोधी वातावरण उत्पन्न होईल असा इषाराही दिला आहे. ( "Unless they (agriculturists) could get fair play there would be a great sense of hostility in Imperial trade in the County Districts."—Hon. Lambert in the House of Commons. 21-5-35 ) येथें शेतीकडेही दुर्लक्ष केलें जातें. ओटावा करार करणारे सर षणमुखम् चेट्टी यांचा निवडणुकींत पराभव झाला, याचा बोध सरकारनें घ्यावयास हवा. आहे असेंच चालूं राहिलें तर पुढील निवडणुकींत कठीण प्रसंग येईल. संरक्षण हिंदी शेतीस पाहिजे आहे. जगभर खुल्या व्यापाराची री ओढणारी जात नष्ट झाली आहे. तीन अवशेष आहेत. स्नोडन्, लेटन्, ग्रिग. पहिले दोन त्या देशाचें कांहींही करूं शकत नाहींत, तिसरा मात्र आमच्या फडणिसी व्यवहाराचा मुसोलिनी आहे. त्यानें मनांत आणलें तर तो चांगलेंही करील. हिंदी शेतीला संरक्षण देण्यानें ब्रिटिश व्यापाराला

धोका नाहीं; शिवाय येथेंच सर्व धान्य व खाद्य वस्तु पिकत असल्यामुळे आयात कर बसवून खाद्य पदार्थांवर कर बसत नाहीं; म्हणून या दोन्ही बाबतींत त्यांना तक्रार करण्याचें कारण नाहीं." इंग्रजांचें हित न दुखवितां कल्याण करण्याचा हा मार्ग फडणिसांना डॉ. डिसोझा यांनीं सांगितला पण व्यर्थ !

सरकारतर्फे सर गिरिजा शंकर बाजपेयी यांनीं टीकेला कांहीं उत्तर दिलें. "सरकार कोयनेलपासून फायदा घेत नाहीं. सिंकोनाची लागवड करण्याचा सरकार प्रयत्न करीत आहे. सर्व जंगलें चरण्यास खुलीं केलीं तर गुरांचे रोग फैलावतील. शिवाय वैरणीची वांटणी योग्य होणार नाहीं. दुधाचा पुरवठा वाढविण्याच्या कामीं ही खरी अडचण आहे. सरकार मलेरियाच्या बाबतींत लक्षपूर्वक पाहात असून, हातीं असलेल्या सामुग्रीचा योग्य उपयोग करीत आहे ! ! त्यांत हिंदुस्थान सरकारनें संपूर्ण यश संपादिलें आहे असें तें म्हणत नाहीं; पण जें काय करतां येईल तें करण्याचा सरकारचा निश्चय आहे;" असें त्यांनीं अगदीं गंभीरपणें जाहीर केलें ! ! न पटणारी गोष्ट पटेल अशा शब्दांत कशी सांगावी ही कला बाजपेयी यांना चांगली साधलेली आहे. गिडनें यांनीं पुन्हां अँग्लो-इंडियनांवर अन्याय होत आहे; रेल्वे-मध्यें त्यांचें पगाराचें स्केल सुरवातीचें व अखेरचें कमी करण्यांत आलें आहे; अँग्लो-इंडियनांची राहणी निराळी व सवयी निराळ्या, त्यांना तुरुंगांतसुद्धां निराळ्या राहणीचे म्हणून वागवितात. सरकारनें पोस्ट, तार, टेलिफोन व रेल्वे खात्यांत कांहीं जागा यांच्यासाठीं राखून ठेविल्या आहेत हें खरें, पण रेल्वेमंत्री यांचें म्हणणें असें कीं, कामगाराच्या राहणीला अनुसरून पगार असावा हें अमान्य. या स्थितींत नुसत्या जागा राखून ठेवून काय उपयोग ! वास्तविक पार्लमेंटनें नवीन घटना कायद्यांत(क.२४२) असें म्हटलें आहे कीं, ( Shall have due regard to the past association of the Community with these Services....and the remunerations attaching to such posts.) परंपरा पाहून या वर्गांतील नोकरांचा पगार ठरविला पाहिजे, असा याचा उघड अर्थ होतो; व त्याप्रमाणें घडवून आणण्याची जबाबदारी कायद्यानें गव्हर्नर जनरलवर आहे. पगारांत ६० टक्के घट करणें म्हणजे वरील कलमाचा अर्थ योग्य लावणें नव्हे. अल्पसंख्याकांचें संरक्षण कसें होणार ? घटनेंत आहे याचा अर्थ, त्याप्रमाणें करण्याचें कर्तव्यकर्म सरकारचें आहे. पार्लमेंटमध्यें या कलमाचा अर्थ काय यावर चर्चा झाली, ती गिडनें यांनीं वाचून दाखविली. पगारकपात करून डाळभाताच्या राहणींत जगण्यास आम्हांस भाग पाडूं नका. जें पार्लमेंटनें

दिलें आहे तें द्या. संपाच्या वेळीं अँग्लो-इंडियन कामगार राजनिष्ठ राहिले त्याचें हेंच कां बक्षीस!" संतापून त्यांनीं असा प्रश्न केला. 'तुम्हाला नक्की काय पाहिजे?' जिनांनीं प्रश्न केला. "सुरवातीला पगार निदान ४५ रुपये पाहिजे; म्हणजे निदान त्याला जगतां तरी येईल; व तसें झालें म्हणजे 'Due regard' याचा अर्थ सरकारनें योग्य लावला असें होईल." वास्तविक हिंदी पोर्टरचा सुरवातीचा पगार १८ रुपये व अँग्लो इंडियनचा सुरवातीचा पगार ३० रुपये सरकारनें ठरविला होता. हा फरकही अन्याय्य होता, पण हा अन्याय, वर्गभेद कायद्यानें केलाच आहे व तो आणखी व्हावा ही स्वार्थी मागणी या अँग्लो-इंडियनांची होती. इंग्रजांचे लेकावळे म्हणून ते त्यांची बाजू घेत. पण रेल्वेमंत्री झाफरउल्ला यांनीं मात्र त्यांना नेटानें विरोध केला. त्यांनीं, राखीव जागा ठेवण्यांत सदरहू जमातीला फाजील प्रमाण मिळालें आहे हें प्रथम सांगितलें. तथापि राहणीप्रमाणें पगार असावा हें अमान्य आहे असें पुन्हा एकदां बजावलें. २४२ कलमाचा अर्थ अँग्लो-इंडियनांकरितां कोणत्या जागा कोणत्या प्रमाणांत ठरवाव्यांत याबद्दल नियम करतांना कांहीं गोष्टी लक्षांत घेतल्या जाव्यांत हा आहे. या गोष्टींत या जागांवर अँग्लो-इंडियन होते म्हणून त्यांचें प्रमाण त्या मानानें ठरवावें; याचा अर्थ एकाच जागेवर एक हिंदी व एक अँग्लो-इंडियन असेल तर त्यांना निरनिराळें पगाराचें प्रमाण असावें असा नाहीं. मुसलमानांच्या हिताबद्दल जितके झाफरउल्ला दक्ष असत तितके हिंदी विरुद्ध अहिंदी असा प्रश्न आला असतांही दक्ष असत.

जोशी यांनीं बादशाही कमिशनच्या मजुरांबाबतच्या शिफारशी सरकार अमलांत आणीत नाहीं अशी तक्रार केली. ज्यांची ऐपत कमी आहे त्यांच्यापासून अधिक कर घेण्यांत येतात. अद्यापही ऐपतीप्रमाणें कर हे मान्य झालेले नाहींत. त्याचप्रमाणें सरकारी मदतीची ज्यांना जास्त जरूर आहे त्यांना ती कमी मिळते, हेंही धोरण बदललें गेलें नाहीं. सर्वत्र मजुरीचे दर कमीच होत आहेत. सर्वत्र बेकारी वाढत आहे. सरकार सर्व माहिती गोळा करीत नाहीं. सरकारनें आंकडे गोळा करण्याची व्यवस्था अद्यापि नीट केलेली नाहीं. १९२५ मध्यें चौकशी कमिटी नेमली गेली, विश्वेश्वरअय्या यांनीं रिपोर्टही केला; पण अजून कांही नाहीं. दोन तज्ज्ञ आले व गेले. सर्व माहिती गोळा केली—संकलित केली—म्हणजे देशांतील विविध गोष्टींचें चांगलें ज्ञान होतें. उपाययोजना करण्याला सोपें जातें. ग्रामोद्धार अपुरा आहे. प्रांतांना दरसाल नुसत्या रकमा दान करण्यानें कार्य होणार

नाहीं. बेकारी घालविण्याकरितां उद्योगधंद्यांची बाढ होणें जरूर आहे. संरक्षणाच्या प्रश्नाची पुन्हां एकदां चौकशी झाली पाहिजे. योजक वर्गाला संरक्षण दिलें म्हणजे धंद्यांतील कामगारांनाहि कांहीं तरी संरक्षण द्यावयास पाहिजे. त्या दृष्टीनें पदार्थांच्या किंमती व मजुरीचे दर यांवरही सरकारी नियमन पाहिजे. कामगारांतील कर्जबाजारीपणा वाढला आहे व त्याचें कारण आजारीपणांत त्यांस भत्ता मिळत नाहीं, तो मिळावयास पाहिजे. त्या बाबतींत विमा योजना व्हावयास पाहिजे. या दृष्टीनें पहातां प्रांतीवरील कर कमी होतां कामा नये. सरकारनें वचन दिलें होतें असें सांगण्यांत येतें. सरकार वचन देणार कोण? कर बसविणें अगर कमी करणें हा या सभागृहाचा हक्क आहे. या हक्कावर सरकारनें गदा आणली आहे. गरिबांना लागणाऱ्या पदार्थांवर जकात व कर बसवून तुम्ही त्यांच्यावर बोजा लादतां हें गैर आहे. कर कमी न करतां ती रक्कम उद्योगधंद्यांना द्या. गरिबांवर बोजा व श्रीमंतांची मनधरणी याचे परिणाम वाईट होतील असें बजावून जोशांनीं आपलें भाषण संपाविलें.

यूरोपियन गटाचे नेते सर लेस्ली हडसन यांनी पुन्हां एकदां प्रांतीकराचे दर कमी करावेत असें सुचविलें. संकटकालीन कर कायम करूं नयेत. निदान प्रांतिक स्वायत्ततेच्या सुरवातीला हे नसावेत; यांत शहाणपणा आहे असें आपलें मत त्यांनीं पुन्हां एकदां ठांसून सांगितलें. १९३१ सालीं १३॥ कोटि रुपये तूट आली तेव्हां जादा कर प्रांतीकरांवर बसविला. आतां बजेटमध्यें तूट नाहीं. मागील सालीं ५ कोटि रुपये उलट शिल्लक राहिली, व पुढील सालीं २ कोटि रुपये शिल्लक राहील असा अंदाज असतां जादा कर ठेवणें अन्याय्य आहे. बिकट परिस्थिति आहे हें खरें नाहीं. १९३१ सालीं झालेली वाढ निरनिराळ्या उत्पन्नावर ६६ टक्के पासून १०० टक्केपर्यंत झाली आहे. त्या वेळेचे फडणीस यांनीं ही वाढ कायमची नाहीं असें वचन दिलें होतें. त्यांनीं दिलेलीं वचनें पूर्ण केलीं पाहिजेत. स्वतःच्या फायद्याचीं वचनें लोकांनीं पाळावीं हा त्यांचा धर्म आहे हें सांगण्यांत इंग्रज कधीं मागें पडत नाहींत!

सत्यनारायणसिंह यांनीं विहारमध्यें धरणीकंपाच्या वेळीं बाबू राजेंद्रप्रसाद यांच्या नेतृत्वाखालीं किती उत्कृष्ट काम केलें याची माहिती दिली. कॉंग्रेस साहाय्यक कमिटीनें चार हजार विहिरी बांधल्या. त्यानंतर सरकारनें विहिरी बांधण्यास सुरुवात केली. पण सरकारी विहिरी पहिला पावसाळा येतांच निकामी झाल्या. त्याचप्रमाणें सरकारी अधिकाऱ्यांनीं नुसती उचळपट्टी केली. कॉंग्रेस आपल्या सेवेनें

लोकप्रिय झालेली आहे. सरकारी रिपोर्टीत कितीहि विरुद्ध टीका केली गेली तरी त्याचा कांहींही परिणाम होणार नाहीं. महमद अझरअली यांनीं अमेरिकेंत ज्याप्रमाणें खास शेतकरी सुधारणा खातें ( A.A.A. ) काढलें आहे, त्याप्रमाणें येथें उपाययोजना करावयास पाहिजे असें बजाविलें. नंतर बजेट अधिकारी संजीवराव हे सरकारी सभासद बोलले. खरें बजेट तयार करण्याचें श्रेय या व्यक्तीला असे. गंभीर पण खोल बुद्धीचा इसम; नेहमीं अत्यंत कार्यक्षम, पण अगदीं क्वचित् बोले. वर्षअखेर आली म्हणजे प्रत्येक खातें घाईघाईनें मंजूर केलेल्या रकमा खर्च करतें. कारण ता. ३१ मार्चच्या आंत मंजूर रकमा खर्च न झाल्यास त्या रद्द होतात; म्हणून या बाबतींत सरकारनें कांहीं नियम करावे अशी टीका करण्यांत आली होती' तिला उत्तर देतांना त्यांनीं अशी माहिती दिली कीं, ' घाईनें सर्व रक्कम खर्च करणें हें देशाच्या हिताविरुद्ध आहे ' अशी सर्व खात्यांना नियमानें ताकीद दिली आहे. जर मंजूर झालेली रक्कम योग्य रीतीनें खर्च होत नसेल तर ती रद्द होऊं द्यावी. दुसऱ्या चांगल्या कामाकरितां तिचा उपयोग होईल. सामान्यत: मंजूर रक्कम खर्च न झाल्यास ती पुन्हां त्या खात्याला मिळणार नाहीं असें नाहीं; म्हणून वाटेल तसा खर्च न करतां, मंजूर रक्कम सालअखेर परत यावी व याप्रमाणें अधिकारी न वागतील तर त्याची दखल घेण्यांत येईल. ( Failure to spend the total allotments made to executive officers, will not, in ordinary circumstances operate against them, in any way. They should therefore freely surrender all money that cannot be expended economically. Serious notice will be taken of any officer, who acts in disregard of these orders. ) त्याचप्रमाणें मंजूर रक्कम रद्द करणें झाल्यास पुढील वर्षीच्या मागणीच्या परिशिष्टांत ती बाब घालावी असाहि नियम असल्याचें त्यांनीं सांगितलें. ( Expenditure likely to lapse, should, as for as possible, be provided for in the Schedule of Demands for the the ensuing year. ) हिशेब-तपासनीस सारखी दक्षता घेत असल्यामुळें हें प्रमाद कमी झाले आहेत. नंतर खर्च वाढला आहे ह्या टीकेला उत्तर देतांना त्यांनीं सांगितलें कीं, १९३२–३३ सालीं म्हणजे काटकसरीला सुरुवात झाल्यानंतरच्या पहिल्या वर्षांत, सामान्य राज्यकारभाराचा खर्च, वसुली खर्च वजा जाता १६'१० कोटी रुपये होता. तो १९३२-३३, १९३३-३४, १९३४-३५, व १९३५-३६ सालीं अनुक्रमें १८'७२ कोटी, २२·८० कोटी, २२'०३ कोटी व २१'७४

कोटी रुपये झाला. परंतु या सालवार खर्चातून नभोवाणी, ग्रामोद्धार–फंड, विमान खातें, सिंध व ओरिसा येथील बांधकामें व प्रांतांना दिलेल्या देणग्या (Subventions) या बाबींवरील खर्च वजा केला तर १९३६-३७ सालअखेर वार्षिक वाढ फक्त १·४५ कोटीने झाली आहे. त्यांत पगार काट कमी केल्यानें वाढलेला खर्च वजा केला असतां फक्त ४५ लाख रुपयांचीच वाढ झाली आहे असें दिसून येईल. ही रक्कमही निरनिराळ्या संवर्धक खात्यांवरच खर्च झाली आहे. निष्कारण खर्च वाढला हें खरें नाहीं. संरक्षणखात्यावरील खर्चाबाबत खुद्द फडणिसांनींच विवेचन केलें आहे. आर्थिक स्थिति सुधारत आहे असें फडणिसांचें निदान नाहीं. वस्तूंचे भाव व उत्पादन, मंदी सुरू होण्यापूर्वी होते तेवढयापर्यंत अद्यापि आले नाहींत हें खरें; तथापि थोडीशी परिस्थिति सुधारत आहे हेंही खरें. या वर्षी परराष्ट्रीय व्यापार वाढला आहे व अन्तर्गत (Inland) व्यापारही वाढला आहे. याचा अर्थ लोकांची क्रयशक्ती वाढली आहे असाच लावला पाहिजे. तसेंच प्रांतवार सरकारी रिपोर्ट पाहिलें तर १९३४ पेक्षां १९३५ सालीं पदार्थांचे भाव वाढलेले आहेत असेंच दिसून येतें. १९३१ सालीं पोस्टल सेव्हिंग बँकेमध्यें ३७ कोटी रुपये रक्कम होती. १९२५ मध्यें ही रक्कम फक्त २६ कोटी रुपये होती. १९३५ मध्यें ही रक्कम ६८ कोटी रुपये व साल अखेर ती ७७ कोटी रुपयेपर्यंत जाईल. तसेंच पोस्टल कॅश सर्टिफिकीटें १९२५ सालीं १३ कोटी रुपयांची लोकांजवळ होतीं. १९३१ सालीं ३८ कोटी रुपये तर १९३५ सालीं ६६ कोटी रुपयांची झालीं. यावरून देशाची सांपत्तिक स्थिति सुधारत आहे असेंच दिसून येईल!! यावर लोकांचा आक्षेप असा आहे कीं, १९३१ नंतर जें सोनें महागलें व गरिबांनीं विकलें त्यामुळें ही वाढ झाली आहे. या देशांत लोक बँकांत पैसे न गुंतवितां सोन्याच्या अगर चांदीच्या दागिन्यांत गुंतवितात व जरुरीच्या प्रसंगीं ते दागिने विकून नड भागवितात. जें सोनें विकलें गेलें तें अडीअडचणीसाठीं उपयोगीं पडावें म्हणून ठेवलेलें सोनें नव्हे. कारण मग पोस्टल बँकेंतून डिपॉझिट रकमा वाढल्या नसत्या. १९२३-२४ ते १९३०-३१ पर्यंत पो. बँकेंतील वाढ १२ कोटी रुपयांनीं झाली. सोनें परदेशी जाऊं लागलें तेव्हांपासून म्हणजे १९३१-३२ ते १९३६-३७ पर्यंत ही वाढ ४० कोटी रुपयांनीं झाली. यावरून सोनें विकून आलेलीच रक्कम बँकांतून भरली गेली असें नव्हे. तर सर्वसाधारण परिस्थिति सुधारली म्हणून ही वाढ झाली. याशिवाय सोनें विकून आलेल्या रकमा व्याजीं

लावल्या आहेत अशी सरकारी माहिती आहे. हल्लीं, सावकारसुद्धां बँकांकडून कर्ज कमी घेत आहेत. कारण त्यांना खाजगी लोकांकडून रकमा कमी व्याजानें मिळत असल्या पाहिजेत. अर्थात् याबद्दल आंकडेवार माहिती देणें शक्य नाहीं. तथापि सोन्याच्या निर्यातीचा परिणाम व त्याच्या विक्रीचा परिणाम म्हणजे हिंदुस्थान सरकारनें १९३१ ते १९३६ अखेरपर्यंत ४० कोटी रुपयांचें इंग्लंडमधील कर्ज फेडलें. शिवाय रिझर्व बँक ऑफ इंडियाजवळ सरकारची चलन बाबतींतील ( Paper Currency and Gold Standard Reserves ) रु. १३२ कोटींचे शिल्लक सोनें व स्टर्लिंगमध्यें आहे. १९३१ सालीं ही रक्कम ७९ कोटी रुपये होती. शिवाय ११ कोटी रुपये भांडवलस्वरूपी खर्च सरकारनें इंग्लंडमध्यें केला आहे. डॉ. डिसोझा यांचें म्हणणें भाताची किंमत कमी झाल्यानें ५२ कोटी रुपये क्रयशक्ति मद्रासमधील शेतकऱ्यांची कमी झाली. वस्तुस्थिति अशी आहे कीं, ४५ कोटी रुपये तांदुळांपैकीं ४४ कोटी रुपयांचा तांदूळ मद्रास इलाख्यांतच उपयोगांत आणला जातो. फक्त १ कोटी रुपयांनींच क्रयशक्ति काय ती कमी झाली आहे असें म्हणतां येईल. स्वतः पिकविलेलें धान्य पिकविणारांकडून जितकें खाल्लें जातें, त्याबाबतींत भाव वाढले अगर कमी झाले तरी क्रयशक्ति त्याप्रमाणांत जास्त अगर कमी होत नाहीं. सुबोध मुद्देसूद पण अगदीं हलक्या आवाजांत खालीं मान घालून झालेलें भाषण संपतांच, विरोधी पक्षानेंसुद्धां टाळ्या वाजवून गुणग्राहकता दाखविली.

स्वामी वेंकटाचलम् चेट्टी यांनीं प्रत्येकजण गिऱ्हाइकांची काळजी वाहतो पण व्यापाऱ्यांकडे कोणी लक्ष देत नाहीं, अशी तक्रार केली. उद्योगधंदेवाले संरक्षण मिळवितात, त्यांचे कैवारी येथें आहेत. जेथें व्यापारी व उद्योगधंदेवाले एकच आहेत तेथें कांहीं अडचण नाहीं. पण या देशांत शेंकडों असे गृहस्थ आहेत कीं, ते निव्वळ देशांत झालेलें अगर परदेशांत झालेलें उत्पादन देशीं अगर परदेशी विकून उपजीविका करतात. याही वर्गाच्या हिताकडे लक्ष द्यावयास पाहिजे. अंतर्गत व्यापार साधारणपणें परराष्ट्रीय व्यापाराच्या दसपट किंमतीचा असला म्हणजे तें योग्य प्रमाण समजलें जातें, तशी वस्तुस्थिति येथें नाहीं. बँकांतून शिलका वाढल्या याचा अर्थ सांपत्तिक स्थिति वाढली असा नाहीं. फायदेशीर रीतीनें सदरहू रक्कम व्यापार व उद्योगधंदे यांत गुंतवितां येत नाहीं, असा त्याचा अर्थ आहे. बँकांतील रकमांवरून आमजनतेची सांपत्तिक स्थितींत प्रगति झाली हें

म्हणणें चुकीचें आहे. त्याचप्रमाणें भाव उतरले म्हणजे सरकारी देणें देण्याकरितां शेतकऱ्यांना जास्त धान्य विकावें लागतें व त्या प्रमाणांत त्यांची क्रयशक्ति कमी होते. धान्याच्या रूपानें सरकारी सारा वगैरे देणीं घेण्यांत येत असतीं तर गोष्ट निराळी होती. बजेटाधिकारी संजीवराव यांच्या विचारसरणींत हा दोष आहे. हुंडणावळीचा दर १८ पेन्सनां चिकटून बसविण्यानें देशाचें नुकसानच होत आहे. मोठया प्रमाणांत देशी धंद्यांना उत्तेजन व संरक्षण द्यावयास पाहिजे. परमेश्वर सरकारी सभासदांना लोकांच्या आकांक्षा समजून घेऊन वागण्याचें शहाणपण देवो अशी करुणा भाकून स्वामी खालीं बसले. 'परमेश्वर विरोधी पक्षाच्या सभासदांनाही दयाळूपणें सुबुद्धी देवो' असें सर नृपेंद्र डोळे मिटून छातीवर हात ठेऊन मिशनऱ्याप्रमाणें उद्गारले! परमेश्वरानें तटस्थपणाची भूमिका स्विकारून क्षिरसागरीं शयन केलें होतें!! डॉ. बानर्जी यांनीं मागील २२ वर्षांत १० वेळां तूट आली ९ वेळां शिल्लक राहिली, व ३ वेळां जमा व खर्च यांची तोंडमिळवणी झाली असें सांगून, दर वेळेस तूट, कर्ज काढून व कर वाढवून भरून काढली अशी माहिती दिली. १९१४ पूर्वी अनुत्पादक कर्ज संपत आलें होतें. नंतर त्याची वाढ झाली. संरक्षक व संवर्धक बाबी यांच्यावरील खर्चांत जें प्रमाण असावयास पाहिजे तें नाहीं. वाढलेलें करांचें उत्पन्न संवर्धक बाबींकडे खर्च झालें नाहीं. सामान्य राज्यकारभाराकडे त्याचा विनियोग झाला. पगार काट केली; पण कमी पगारवाल्यांची. संरक्षक बाबींकडील खर्च अन्य देशांइतका व संवर्धक बाबींवरील खर्च फारच कमी. शिक्षण, आरोग्य वगैरे बाबींवरील खर्च मोठया प्रमाणांत व्हावयास पाहिजे. जें विकलें गेलें तें सोनें, जर फायद्यासाठीं विकलें गेलें, व जात आहे, तर त्यावर निर्यात कर कां बसवीत नाहीं? गेल्या सहा वर्षांत २७५ कोटी रुपयांचें सोनें देशास पारखें झालें व त्या मानानें देशांत पैसा कमी झाला. १० टक्के कर बसविला असता तर २७॥ कोटी रुपये देशाच्या संवर्धक कार्यावर खर्च करण्याकरितां मिळाले असते. निर्यात कमी झाली असती तर देशांत सोनें राहिलें असतें. गरीब शेतकऱ्याजवळ सोनें आहे, हें म्हणणें धादांत खोटें आहे. मंदाई नाहींशी व्हावी म्हणून अन्य देशांनीं कितीतरी प्रयत्न केलें. पण येथें कांहीं नाहीं. बेकारी सारखी वाढत आहे. मंदाईपूर्वी इंग्लंडमधील देणीं निर्यातमालानें फेडलीं जात. नंतर सोन्याच्या निर्यातीनें व्यापार कमी झाला. हें लक्षण चांगलें नाहीं. सारासार विचार करून संरक्षण दिलें जातें तें अपुरें आहे. धंदेवाल्यांना शाश्वति वाटत नाहीं.

फडणीस ‘ खुल्या व्यापाराचे ’ अभिमानी असले तरी परिस्थितीप्रमाणें वागणें त्यांना जरूर आहे. प्रसिद्ध पंडित कीन्स यानेंही आपलीं मतें बदललीं आहेत. त्याचें मतही सरकारनें धंद्यांना आतां उत्तेजन द्यावें, निव्वळ त्रयस्थाची भूमिका ठेऊं नये, असें झालें आहे. घनश्याम गुप्ता बोलले “ व्यापार वाढला अगर बँकांतील शिलका वाढल्या म्हणजे खेडुत सुधारला अगर सुखी झाला हें म्हणणें चुकीचें आहे. शेतांत चरणाऱ्या कोल्ह्याला शेतकऱ्यानें मारलें; त्याच्या अंगावर सूज आली; त्याला दुःखी पाहून दुसरा कोल्हा म्हणाला, ‘काय लठ्ठ झाला आहेस रे!’ पंचतंत्रांतील ही गोष्टच जणूं येथें घडत आहे. अडीअडचणीला उपयोगी पडणारें सोनें गेलें, भाव उतरले शेतकरी संपत आला तरी आमचें सरकार देश सुधारत आहे असें म्हणतें हें केवढें आश्चर्य! एक पट कर घेऊन हजार पटीनें सूर्य पावसाच्या रूपानें देतो त्याप्रमाणें राजानें वागलें पाहिजे, हा आर्यांचा आदर्श आहे. माझ्या प्रांतांत शेंकडों खेडीं पाण्याशिवाय आहेत. पाणीसुद्धां पिण्यास या राज्यांत मिळत नाहीं! अशा राज्याचा काय उपयोग? ” गुप्तजींनीं डोळयांत पाणी आणून वरील शब्द उच्चारले. जमीनधारा हळूहळू मर्यादेंत आणावा ( Progressive Moderation ) असें धोरण लॉर्ड कर्झन यांनीं जाहीर केलें. पण प्रत्यक्ष अनुभव मात्र अगदीं उलट येत आहे. हळूहळू जनता नागवली जात आहे ( Progressive Exploitation ) ६० वर्षांत छत्तीसगड विभागांत ३०० टक्यानें साराबाढ झालेली आहे. “ सारा वसुली, देशकाल, परिस्थितीप्रमाणें करावी हें धोरण, पण वस्तुस्थिति मात्र अगदीं उलट! बँकांत पैसे आहेत; पण १९३४–३५ सालांत एकट्या बंगालमध्यें ३०६४६ खातेदार सरकारला धारा देऊं शकले नाहींत व १९३७ लोकांच्या जमिनी त्यासाठीं विक्रीस काढल्या गेल्या; हा काय सांपत्तिक स्थिति सुधारल्याचा दाखला? बरें, त्या जमिनीची किंमत सरकारला जी आली ती साऱ्याच्या २·९९ पट म्हणजे सरकार जमिनीच्या किंमतीपैकीं दरसाल ३३·३३ टक्के सारा म्हणून वसूल करतें असा त्याचा सरळ अर्थ होतो! मध्य प्रांतांत १९३२-३३ सालीं सारा वसुलीसाठीं १,३२,७१० एकर जमीन १३,८१,६७० रुपायांस सरकारनें विकली, म्हणजे एकरीं १० रुपये आले, व सारा एकरीं रु. १ पेक्षां थोडा अधिक आहे. हें धोरण, ही सारा घेण्याची पद्धति बरोबर आहे कां? त्याच सालीं सारा सक्तीनें वसूल करण्याचें प्रसंग एकटया वऱ्हाडांत ३० टक्क्यानें वाढले. काय वऱ्हाडचा शेतकरी बँकेंत पैसे ठेवतो व आपली काळी (जमीन) विकली

जाऊं देतो ? ८० टक्के जनता शेतीवर जगते. त्यांचे हितसंरक्षण तुम्ही कसें करतां ! दोन हजार रुपये उत्पन्न झालें तर प्राप्तीकर, आणि शेतीवर मात्र उत्पन्न होवो न होवो, दाणा पिको न पिको, कर आपला आहेच हा काय न्याय झाला ? सामाजिक बाबतींत वाईट प्रथा देशांत आहेत, सरकार कायदे करून सुधारणा कां करीत नाहीं ? चहा व कॉफीचा प्रसार व्हावा म्हणून मात्र सरकार दक्ष ! मध्यप्रांतांत ४ टक्के लोक उर्दू बोलणारे आहेत तरीसुद्धां त्यांच्याकरितां सरकारी शाळा आहेत. सरहद्द प्रांतांत शीख व हिंदु मोठया प्रमाणांत असून तेथील सरकारनें त्या भाषा शिकविणाऱ्या खाजगी शाळांना मान्यता मिळणार नाहीं असें सर्क्युलर काढलें आहे, हा अन्याय होय. तें रद्द केलें पाहिजे हें सांगण्यांत कांहीं जातीयता नाहीं." गुप्ताजींच्या नंतर सर फ्रँक नॉइस् यांनीं चर्चेंत भाग घेतला. "मजुरांच्या बाबतींत सरकारनें कांहीं केलें नाहीं हें खरें नाहीं. जोशी यांची अपेक्षा फार मोठी आहे. परंतु बादशाही कमिशनच्या सर्व शिफारसी अमलांत आणणें अगर राष्ट्रसंघाच्या मजूर विषयक ठरावांची ताबडतोब अंमल बजावणी करणें अवघड आहे. उद्योग-धंदे हें खातें प्रांतिक आहे म्हणून प्रत्यक्ष उत्तेजन देणें वगैरे प्रश्न येथें चर्चून उपयोग काय? तथापि हिंदी कोठारखातें (Indian Stores Department) स्वदेशी माल घेऊन कामगारांना वारंवार सल्ला देऊन देशी धंद्यांनां उत्तेजनच देत आहे. देशी मालाच्या प्रदर्शनांना सरकार मदत करतें, इतकें करून सरकारवर आक्षेप करणें बरोबर नाहीं." दुसरा कोणी हे बोलला असतां तर सभागृहानें त्याची रेवडीच उडविली असती, पण नॉईस हे पडले प्रामाणिक गृहस्थ, आपल्या हातून जें करतां येईल तें करणारे, जरी गोष्ट बारीकसारीक असली, अगर कोणी सांगितली कीं लागलीच टिपून घेऊन तिच्यासंबंधीं चौकशी करून उलगडा करीत. या गोष्टींची एक खतावणीच त्यांच्याजवळ असे. कोणी कांहीं विचारलें कीं, ठेव लिहून; कोणी कांहीं विनंती केली ठेव लिहून, व दररोज, दर आठवड्याला या लिहिलेल्या गोष्टींचा निकाल लावीत. मगरूर तर ते नव्हेतच उलट विनयशीलच म्हटलें पाहिजेत. तथापि त्यांनीं खरोखरच सरकारी धोरण योग्य आहे हें मनापासून मानलें असलें तरी त्यांचें हें मत सभागृहाला पसंत पडलें नाहीं. सर कावसजी यांनीं क्वेटा पुनर्घटनेचा खर्च चालू उत्पन्नांतून केला म्हणून पुन्हां फडणिसावर टीका केली. चर्चेंतसुद्धां धरणीकंपाचे धक्के वारंवार बसूं लागले! ! कांहीं सभासदांचीं मनें मतें व डोकींही पण ठिकाणावर न राहतां गडगडूं लागल्याचें दृश्य पहावें

लागलें ! डॉ. खानसाहेब यांनीं सरहद्दीवरील धोरणावर आणखी प्रकाश पाडला. टोळ्यांच्या बाबतींत सरकारी धोरण कसें चुकलें तें त्यांनीं सांगितलें. सरकारी कारभारांत लांचलुचपतीचें प्रमाण फार मोठें आहे अशी तक्रार करून लांचलुचपतीबद्दल नोकरींतून काढलेले पोलिस अधिकारी, अन्नाबारी मॅजिस्टेट वर्ग १ चे नेमले, त्याचीं उदाहरणें त्यांनीं सांगितलीं. मतदार संघ वेडेवांकडे करून खुदाईखिदमतगार न निवडून येतील अशी व्यवस्था कशी करण्यांत आली याचीं उदाहरणें दिलीं. ग्रामोद्धाराची नवलकथा सांगतांना ती सत्य आहे हें त्यांना पुन्हां पुन्हां सांगावें लागलें. "सुधारणा अगर ग्रामोद्धारखातें याचा मुख्य, लष्करी खात्यांतील आहे. त्याच्या ताब्यांत शेतकीसुधारणा खातें दिलें आहे ! गुरांचें खातेंही त्याच्याच ताब्यांत !! त्यानें डेरा इस्माइलखानचा जो बाग तयार केला त्या कामीं त्याला मिळालेल्या वाटचालीचा भत्ता बागेवर झालेल्या खर्चापेक्षां जास्त झालेला दिसेल ! ग्रामोद्धारासाठीं सरकारनें या गृहस्थाच्या हातीं हवाली केलेला पैसा त्यानें सरहद्द भागांत सोनें सांपडतें कां या कामीं खर्च करून त्याची माती केली. हा ग्रामोद्धार झाला. सोनें जर सरहद्दप्रांतांत सांपडलें असतें तर तें पठाणांनीं केव्हांच हस्तगत केलें असतें ! " सभागृहांत सर्वत्र हंशाच हंशा झाला. डॉ. खान पुढें म्हणाले " नौशेरा व पेशावर या रस्त्यावर 'ग्रामोद्धार' अशी पाटी लावली आहे एवढाच काय तो ग्रामोद्धार आमच्या प्रांतांत या फडणिसामुळें झाला आहे. दोनशें वर्षांत ब्रिटिशांनीं छोटा नागपूर प्रांतांत काय सुधारणा व उद्धार केला याचें वर्णन सभेनें ऐकलेंच आहे. अन्न नाहीं, वस्त्र नाहीं ही स्थिती जर तुमच्या सुधारणेनें व ग्रामोद्धारानें होणार असेल तर सरहद्दीवरील पठाण व आफ्रिडी लोक यांना असली सुधारणा नको आहे. अप्रामाणिक सुधारलेला नागरिक होण्यापेक्षां ते मरण पत्करतील. हिंदी अधिकारी आपल्या हाताखालच्या गोऱ्या अधिकाऱ्यांना सलाम करतांना मी स्वतः पाहिलें आहेत व 'असें कां करतां ?' म्हणून विचारलें तर 'आपोआप टोपी पाहिली कीं हात वर जातो' असें सांगतात. ही वृत्ति गेली पाहिजे. ही शिस्त नव्हे. सर्वत्र साम्यता पाहिजे, व तशी परिस्थिति उत्पन्न केली पाहिजे. रशिया तें करीत आहे. आज रशियाला ध्येय आहे, आत्मा आहे. प्रत्येक गोष्ट योजनापूर्वक करीत आहे. कांहींतरी, कसें तरी, रेटीत नाहींत (not muddling through) पूर्वींचे दिवस आतां विसरा. लोकांनीं आतां स्वतंत्र होण्याचा निश्चय केला आहे, हें वेळींच ओळखा."

अमरेन्द्र चट्टोपाध्याय हे एकेकाळचे क्रान्तिकारक, फांशीची शिक्षा झालेले पुढें अनेक वर्षे गुप्त झालेले व नंतर प्रगट होऊन राष्ट्रीय वृत्तीनें काम करणारे गृहस्थ पोटनिवडणुकींत निवडून आले होते. त्यांनीं, जें १७६५ मध्यें सरकारी धोरण होतें तेंच आजही कायम आहे असें सांगून त्या धोरणानें हिंदुस्थान मात्र नागवला गेला असें प्रतिपादिलें. शिक्षणाबाबत जो वर्ग इंग्रजी शिक्षणानें उत्पन्न झाला आहे तो जातीनें हिंदी असला तरी मतें, संस्कृति व अभिरुचि यांनीं पूर्ण विदेशी बनला आहे. लॉर्ड मेकॉलेची इच्छा अगदीं अशीच होती. ( To form a class of persons, Indian in blood and colour, but English in taste, in opinion, in morals and intellect. ) याचा परिणाम हे शिक्षित लोक कारकुनींव्यतिरिक्त इतर कामाला नालायक झालेले असतात. यामुळें बेकारी वाढली आहे. मॅट्रिक झालेला इसम विचलित चित्त, भटक्या, बेफाम व बेकार! कारण 'कामाला नालायक' असेंच त्याचें वर्णन करावें लागेल. सबंध शिक्षण-प्रणालीच चूक आहे. एकादा लांब बांबू असावा, त्याला जागोजाग गांठीं पण फांद्या नाहींत. बुंध्याला जेवढा त्याचा व्यास जवळजवळ तेवढाच शेंडयाला; असें या शिक्षणपद्धतीचें वर्णन बंगाल बेकार समितीनें केलें आहे तें बरोबर आहे. ( It is like a bamboo, each joint being an examination, and the diameter remaining practically of the same size from the root to the top. It has no branches and the crowing top covers a very small area. ) परीक्षेनें गर्दी केलेली ही पद्धति टाकाऊ आहे. नंतर अमरेंद्र-बाबूंनीं, खेडेगांवांत हिंडतांना पोलिसांनीं त्यांना कसा त्रास दिला याचें वर्णन केलें. ज्यांनीं ज्यांनीं त्यांना पाहुणे म्हणून ठेवलें, त्यांना त्यांना त्रास झाला. या सर्व गोष्टी जिल्हा मॅ. मि. ग्रिफीथ यांना माहीत आहेत. मिदनापूर जिल्ह्यांतील कारभार म्हणजे कहर आहे. घरें लुटलीं, शेतें लुटलीं गेलीं, स्त्रियांची विटंबना झाली तरी लोक शांत राहिले. नालायक अधिकारी व लोकद्रोही लोकांना बढती कशी मिळाली याचेंही थोडेसें वर्णन त्यांनीं केलें. बोलण्यांत अर्थ नाहीं. विधि-मंडळें उत्पन्न करून, त्यांचा मोह उत्पन्न करून युक्तिबाज सरकारनें अनेक देश-भक्तांना खऱ्या देशभक्तीच्या मार्गापासून भ्रष्ट केलें. मी कांहीं आशेनें येथें आलों. पण आतां पूर्ण निराश झालों. इंग्लंडमध्यें असा कारभार चालला असता तर तुम्ही सहन केला असता काय ? हा कारभार आम्ही एकमताने जर विरोध करूं तर आत्तांच खलास होईल. लोकांच्या आकांक्षा माराव्यात हा सरकारी धोरणाचा

सरळ अर्थ आहे. राणीच्या जाहीरनाम्यांत, प्रजेच्या संतोषांत तिच्या कृतज्ञतेंत, तिच्या सुखांत, राज्याचें सामर्थ्य व वैभव आहे असें म्हटलें आहे, पण येथील धोरण उलट आहे. ' आम्हांला सेनापती, मुत्सद्दी, कायदे पंडित, राज्यकार्य धुरंधर असें हिंदी लोक नको असून मेहनत करणारे शेतकरी हवे आहेत ' असें एका इंग्रजाचें म्हणणें सरकारी धोरणांत मान्य झालेलें दिसत आहे. जातीय निवाडयावर थोडें बोलून त्यांनीं फडणिसांना हेर हिटलरनें ज्याप्रमाणें कर्ज बुडविलें त्याप्रमाणें कर्ज बुडविण्याचा सल्ला दिला !!

उत्तराच्या सुरवातीस अनेक सभासदांची टिंगल करून नंतर फडणिसांनीं मुख्य आक्षेपांना उत्तर देण्याचा प्रयत्न केला. यूरोपियन गटाची टीका, वचनें पाळलीं नाहींत म्हणून आहे. वचनभंगाच्या आरोपानंतर मजकडून त्यांना गोडगोड वर्तन दिसेल असें मानण्याचें कारण नाहीं. त्यांचें म्हणणें ऐकलें तर प्रांतिक स्वायत्तता सुरू होणें कठीण आहे. नेमियर यांचा निकाल येईपर्यंत बजेटांतील अंदाजामध्यें थोडीशी माया ठेवणें जरूर आहे. जें वचन दिलें आहे, त्याबाबतींत आणखी खुलासा करून सभागृहाला मी बनवूं इच्छित नाहीं. यांतच सदरहू गटानें समाधान मानावें. ब्रिटिश राज्यापासून अनेक तोटे झाल्याचें अनेक सभासदांनीं सांगितलें. दारिद्य, पिळवणूक, रोगराई, नामर्दी, सर्व कांहीं गोष्टी या राज्यामुळें झाल्या. त्यापूर्वीं देश अगदीं भरभराटींत होता असें सांगण्यांत येतें. वेदांत दुष्काळाचा उल्लेख आहे, कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत आहे, चंद्रगुप्ताच्या वेळीं १२ वर्षें दुष्काळ होता. ९१७ सालीं पडलेल्या दुष्काळांत लाखों माणसें मेलीं व अधिकारी श्रीमंत झाले अशीं वर्णनें इतिहासांत आहेत. मुसलमानी अमलांत देशाची स्थिति वाईटच होती. ' लोकसंख्या जबर आहे, खेड्यांतील लोकांची स्थिति दीन आहे, सरदार लोक मात्र गबर असून चैन करतात ' असें वर्णन एका रशियन प्रवाशानें सन १४७० मधील परिस्थितीचें केलेलें आहे. अकबर राज्यावर आला त्यावेळच्या दुष्काळाचें वर्णन खालील शब्दांत आहे. " रोटी रोटी म्हणून लोक प्राण सोडीत आहेत, तर पांचशें हत्तींना लोणी, साखर व भात यांचा मलिदा चालू आहे.याला सर्व जग हंसतें आहे व नांवें ठेवीत आहे. माणसें माणसांना खात आहेत. दुष्काळ पीडित लोकांकडे बघवत नाहीं. दोन वर्षें चाललेली लढाई, दुष्काळ, अवर्षण यामुळें शेतकरी उरला नाहीं. सर्वत्र शहरें लुटलीं जात आहेत." खुद्द अकबर नाम्यांतही असा उल्लेख आहे. ( Life, says Abdul Hamid, was offered

for, a loaf but none would buy; rank was to be sold for a cake, but none cared for it. For a long time, dog's flesh was sold for goat's flesh, and the pounded bones of the dead were mixed with flour and sold. Destitution at last reached such a pitch that men began to devour each other, and the flesh of a son was preferred, to his love.) सन १७६० च्या परिस्थितीचें वर्णन शब्दांत करणें कठीण झालें. (Certain it is that in several parts the living have been fed on the dead.) 'अहो १७७० म्हणजे ब्रिटिश अमदानींत.' डॉ. बानर्जी म्हणाले. फडणीस पुढें म्हणाले, "आतां ब्रिटिश अमलांत काय झालें तें पाहा. मागील राज्यकर्त्यांपेक्षां यांनीं शेती सुधारली, उत्पादन वाढविलें, वाहतुकींत भर घातली, कालवे काढले, पीक वाढलें, तर सरकारसाऱ्याचें प्रमाण कमी झालें." प्रो. ब्रिजनारायण यांचें हें वाक्य आहे. दक्षिण हिंदुस्थानांतील लोक अशक्त आहेत व ते हवा पिऊन राहातात कीं काय ! असा संशय जर्मन प्रवाशांनीं घेतला होता. सर टॉमस रो म्हणतो "हिंदुस्थानांतील लोक म्हणजे जसे मासे समुद्रांत राहातात तसे राहातात. मोठा मासा लहान माशाला गिळंकृत करतो. लहान शेतकऱ्याला मोठा शेतकरी प्रथम ग्रासतो, नंतर त्याला जमीनदार गिळतो. लहान जमीनदाराला मोठा जमिनदार तोंडांत टाकतो आणि या सर्वांना राजा लुटतो." "चांगली जमीन" बर्नियर म्हणतो "लागवडीस नाहीं. लोक कर्जांनीं गांजले आहेत. जमीन गेली, त्यांचीं मुलें गुलाम म्हणून नेण्यांत आलीं, गांवगन्ना लोक शेती सोडून शहरांत जात आहेत, लष्करांत जात आहेत, कांहीं हिंदु राजांच्या राज्यांत आश्रय घेत आहेत; कारण तेथें जुलूम कमी आहे. जमिनीची मशागत नाहीं, पाटबंधारे नादुरुस्त पडले आहेत, मारहाण करूनच लोकांना कामाला लावले जात आहे. पंडितजींचे आरोप खोटे आहेत." पंडितजी म्हणाले "१५० वर्षांत इंग्लंडनें व्यापार व उद्योग सुधारला, रहाणी सुधारली व हें सर्व हिंदुस्थानांतील व्यापार व धंदे बुडवून केलें हा खरा आक्षेप आहे." "तोही खोटा आहे" ग्रिग म्हणाले. नंतर लॉर्ड कर्झनचा एक लांब उतारा त्यांनीं वाचून दाखविला. "कांहींच्या मतें हिंदुस्थान खचत चालला आहे. हें त्यांचें राजकीय मत आहे. ते आंकडे मानीत नाहींत, त्यांच्या मतें वादविवादाला या बाबतींत जागा नाहीं. सर्वत्र कर माफी झाली म्हणजेच देश सुधारेल. हीच त्याची कसोटी आहे. त्याही दृष्टीनें पाहातां कर कमी झाले आहेत. तथापि त्यांचें म्हणणें कायमच आहे." प्रगतिशून्य, प्रतिगामी, दलित, दरिद्री अशा

हिंदुस्थानावर मी गेलीं ५॥ वर्षे राज्य केलें नाहीं. दारिद्र्य आहे, पण तें प्रत्येक मोठ्या लोकवस्तीच्या देशांत आहे. प्रश्न असा आहे, कीं तें वाढतें आहे कां! एवढ्या मोठ्या देशांत या बाबतींत वस्तुस्थिति उठावदारपणें कळणें शक्य आहे. तुलनेनें पाहतां अलेक्झांडर, अशोक, अकबर व अवरंगजेब यांच्यावेळीं जी स्थिति या देशाची होती त्यापेक्षां आतां जास्त शांतता व जास्त सुव्यवस्था आहे. जनतेंत समाधान व संतोष जास्त प्रमाणांत आहे. रहाणी सुधारली आहे व न्याय अधिक उच्च दर्जाचा मिळत आहे" इंग्रजांनीं सुरवातीस जें केलें त्याची तरफदारी कोणीही करणार नाहीं. आमच्या हातून चुकाही झाल्या" ब्रिग देवता बोलली 'निदान १९१९ च्यानंतर इंग्लंडच्या हितार्थ येथील राज्यकारभार चालतो असें कोणी म्हणणार नाहीं. तेव्हां-पासून आर्थिक स्वायत्तता या देशाला मिळाली आहे. दुसरा आक्षेप इंग्लंडला धाडण्यांत येणारा पैसा ( Home Charges ), यांत पगार, पेन्शन, व्याज व नफा या सर्वांचा समावेश होतो. येथें गुंतविलेल्या परकी भांडवलावरील व्याज याला-सुद्धां करभार म्हणणें अयोग्य आहे. परदेशी भांडवल समितीच्या ( External Capital Committee ) रिपोर्टांत प्रो. मुकर्जी म्हणतात. 'ब्रिटिश भांडवलानें हिंदुस्थानचा अनेक तऱ्हांनीं फायदा झाला आहे. तो अगदी उघडपणें दाखवितां येणार नाही. हिंदी लोकांनीं धंदे काढले म्हणजे आनंद होतो. त्यांना फायदा मिळाला म्हणजे समाधान वाटतें. पण धंदे काढून ब्रिटिश भांडवलवाल्यांनींच हा मार्ग प्रथम येथील लोकांना सोपा करून ठेवला आहे. अनेक वर्षे या भांडवल-वाल्यांना नुकसानींत काढावी लागलीं. हें नुकसान दिसत नाहीं. मात्र आतां दर-साल मिळणारे १६ दशलक्ष पौंड ( सुमारें रु. २२ कोटि ) मात्र दिसून येतात. सर्वत्र रेल्वे, आगबोटी काम करूं लागल्या, बाजार पेठा बसल्या, मालाला मागणी येऊं लागली, कामगार वर्ग तयार झाला, म्हणजे उत्पन्न होणाऱ्या परिस्थितीचा फायदा, धंद्यांत मागाहून येणाऱ्या भांडवलवाल्यांना कांहीं प्राथमिक नुकसान न येतां कार्यक्षेत्र तयार असें मिळतें. ज्यांनीं प्रथम या दिशेनें पाऊल टाकलें त्यांना साहजिकच नुकसान सोसावें लागलें, अनुभव विकत घ्यावा लागला. हें सर्व नुकसान व ही किंमत ब्रिटिश भांडवलानें दिली. अजूनहि कांहीं भांडवलावर ब्रिटिशांना कांहीं नफा मिळत नाहीं.' बँकिंग कमिटीच्या रिपोर्टांतसुद्धां परकी भांडवलाचा उपयोग केल्याशिवाय कृषिप्रधान देशाची उन्नति लवकर होणार नाहीं असें म्हटलें आहे. म्हणून भांडवलावरील व्याज हा करभार नव्हे, लूट नव्हे, लुबा-

म्हणणें नव्हे. माझ्या मतें एकंदर परकी भांडवल येथें ६६० दशलक्ष पौंड अगदीं उघड दिसणारें आहे. शिवाय जे परकी व्यापारी या व अन्य देशांत व्यापार करतात त्यांचें येथें गुंतविलेलें भांडवल जर १४० दशलक्ष पौंड धरलें तर वट बेरीज ८०० दश लक्ष पौंड होतें आतां २६ द. ल. पौंड व्याज म्हणजे वार्षिक व्याजाचा दर फक्त ३½ टक्के पडतो. या देशांत व्याजाचा दर सर्वसामान्यपणें १८टक्के आहे. या स्थितींत किती स्वस्त दरानें ब्रिटिश भांडवल मिळालें तें पहा! एकंदर इंग्लंडमध्यें चालूं उत्पन्नांतून ३८ दशलक्ष पौंड १९३४-३५ सालीं धाडण्यांत आले. त्यांपैकीं २६ दशलक्ष पौंड व्याजाबद्दल गेले. राहिलेले १२ दशलक्ष पौंड सुमारें ( १६ कोटि रु. ) फार तर हिंदुस्थानाला इंग्लंडला फुकटांत द्यावें लागलें असें म्हणतां येईल. तथापि या रकमेंतून सरकाराला लागणाऱ्या मालाची किंमत दिलेली आहे. ती थोडीका असेना, वजा ही घातलीच पाहिजे. क्षणभर ती घातली नाहीं तरी १६ कोटि रुपयांपेक्षां ती रक्कम वाढत नाहीं. दरसाल १५० कोटि रुपये इंग्लंडला फुकटांत मिळतात, हें पंतजींचें विधान निदान अतिशयोक्तीचें आहे. कदाचित् या १५० कोटि रुपयांत ब्रिटिश लोकांचें या देशांतील सर्व तऱ्हेचें उत्पन्न समाविष्ट केलेलें दिसतें; व तसें करणें न्याय्य नाहीं. या देशाचें वार्षिक उत्पन्न (National Dividend) १६०० कोटि रुपये धरलें तर १६ कोटि रुपये ही रक्कम १ टक्का आहे. उलट संरक्षणाच्या धोरणामुळें जनतेला कमींत कमी २७ कोटि रुपयांचा बोजा सोसावा लागतो. इंग्लंडला द्यावा लागणारा १६ कोटि रुपयांचा करभार व येथील भांडवलवाल्यांना द्यावा लागणारा हा २७ कोटि रुपयांचा करभार, याची तुलना सभागृहानें करावी व नंतरच प्रत्यक्ष कर, ज्याचें सर्व उत्पन्न सरकारला मिळतें, तें कमी करणें योग्य होईल कीं नाहीं तें ठरवावें!

पंतजी व मोदी यांची युति एका बाबतींत पक्की झालेली दिसते. देशाच्या औद्योगीकरणाच्याबाबत त्यांचें एकमत आहे. कॉंग्रेस व भांडवलवाले अशी ही एकजूट आहे. मला वाटतें मोदींचा, पंतांना पुढें करून, माझ्यावर वार करण्याचा त्यांचा उद्देश असवा. तथापि या खेपेस पंतांनीं आर्थिक नियोजनाबाबत कांहींच सांगितलें नाहीं. माझा दारुगोळा अगदी वायां गेला. सामाजिक मालकी नको फक्त नियंत्रण पाहिजे असें त्यांचे मत दिसतें. उलट त्यांचे नेते म्हणतात—हा हिंदुस्थान टाइम्समधील त्यांच्या भाषणाचा उतारा आहे—" जमिनीचा प्रश्न सर्व जमीन सामुदायिक मालकीची केल्यानेंच सुटणार आहे व तें करतांना खाजगी मालकी

नष्ट होईल" ("The land problem could only be solved by collectivisation which would involve expropriation") तूर्त तरी पंतजींना रशियन नमुना नको आहे. केवळ स्फूर्तीसाठीं तें यंदा मुंबईच्या गिरणी मालक संघाकडे वळले आहेत आणि शेपूट तुटलेल्या कोल्ह्याप्रमाणे त्या संघाला मिळण्यासाठी मला आमंत्रण करीत आहेत! "तुम्ही यूरोपियन व्यापारी संघाला मिळतां" पंतजींनी टोला परतविला. 'औद्योगीकरण' ही नवीन घोषणा यंदा गर्जू लागली आहे. अधिक अधिक संरक्षण, कमी कमी चौकशी करून अधिकाधिक काळपर्यंत मिळावे; ब तें साधणें हा मोदींचा मंत्र आहे. पंतजींचें म्हणणें सरकारने भांडवलाची व व्याजाची हमी घेऊन हें औद्योगीकरण घडवून आणावें. संरक्षण हें भांडवलवाल्यांना कधींहि पुरेसें वाटत नाहीं. शंभर वर्षांपूर्वी लिस्टनें लिहिलेले विचार पंतजी आजच्या जगाला लावूं पाहात आहेत. तथापि १९२३ सालीं ज्या प्रमाणांत व ज्या मर्यादेंत संरक्षित व्यापाराचें धोरण स्वीकारलें गेलें आहे, तें सरकारी सभासद म्हणून मला मान्य आहे. ठराविक कालांत संरक्षित धंदा आपल्या पायावर उभा राहिला पाहिजे व त्याचबरोबर सरकारी उत्पन्नावर त्याचा परिणाम काय होईल हेंहि पाहिलें पाहिजे उद्योगधंदे वाढविले म्हणजे बेकारी जाईल हा भ्रम आहे. समजा सर्व तयार माल येथे झाला तर जास्तींत जास्त आणखी १० लाख लोकांना काम मिळेल असें प्रो. टॉमस (मद्रास) यांचें मत आहे. उलट आयात माल येणें बंद झाला अगर कमी झाला तर येथील येथील निर्यात मालावर त्याचा परिणाम होईल. कदाचित् तागाच्या गिरण्या बंद होतील, माणसें बेकार होतील व एकंदरीनें बेकारी वाढेलच" "अहो ताग फक्त या देशांतच होतो" एकाने माहिती दिली "नाही हो, इतर देशही आता त्यांच्या बदली अन्य पदार्थ उपयोगांत आणूं लागेल आहेत. संरक्षणानें येथील पदार्थांचा उत्पादन खर्च वाढेल, त्यामुळें त्यांची विक्री किंमत वाढेल; आणि त्याचा परिणाम म्हणजे मागणी कमी होईल. उद्योगधंद्यांतील उत्पादन दुप्पट झालें तर दरसाल एक हजार पदवीधर यांना काम मिळेल असें सप्रू-समितीचें म्हणणें आहे. उत्पादन दुप्पट होईल असें धरलें तरी दरसाल हजारों धंदेशिक्षण घेऊन तयार झालेल्या इसमांना नेहमींच रोजगार मिळेल असें नाहीं. परकी व्यापाऱ्यांशीं टक्कर देतांना उत्पादन खर्च कमी करावा लागेल. आणि याचा अर्थ असा कीं मजुरी व मजूर कमी करावे लागतील जपाननें कापड धंदा वाढविला व परदेशीं माल खपावा म्हणून उत्पादन खर्च कमी

केला व त्याचा परिणाम त्या धंद्यांतील २७ टक्के मजूर कमी झाले!! निव्वळ औद्योगीकरणानें बेकारी जाईल हें खोटें, उलट संरक्षण देऊन तें घडवून आणणें हें धोरण चुकीचें आहे. संरक्षणानें गिऱ्हाइकावर अन्याय होतो असें म्हणणारे जोशी यांच्याबरोबर सहमत असणारे अनेक आहेत. मी टीका केली पण विधायक काय सुचविलेंत असें कोणी विचारील तर माझें मत असें आहे कीं, खेडेगांवांतून सुरवात केली पाहिजे. खेडुतानें जास्ती उत्पादन केलें पाहिजे व जास्ती विक्रतही घेतलें पाहिजे. त्या दृष्टीनें आरोग्य व शिक्षण हे महत्त्वाचे प्रश्न आहेत. पण हे गेलीं १५ वर्षें प्रांतांतील प्रधानांनीं सोडवावयाचे होते. पुढील वर्षी सर्वच प्रांतिक कारभार मंत्र्यांच्या हातीं जावयाचा आहे." पण 'त्यांच्याजवळ पैसे कोठून असणार!' डॉ. बानर्जी यांनीं विचारलें. 'म्हणूनच माझें महत्त्वाचें कार्य प्रांतिक स्वायत्ततेच्या दृष्टीनें बजेट तयार करण्याचें आहे, असें मी म्हणतों तें खरें आहे. हिंदुस्थान सरकार प्रांतांना सर्व प्रकारें मदत करण्यास तयार आहे व त्याचा पुरावा म्हणजे चालू सालचें बजेट होय." सभागृहानें शांतपणें (!) त्याचें भाषण ऐकलें, म्हणून आभार मानून बनवाबनवी करणारें भाषण फडणविसांनीं संपविलें. बिल विचारांत घ्यावें ही सूचना मान्य झाली.

मागील सालाप्रमाणें कलमवार चर्चेच्या वेळीं मीठ, प्राप्तीकर, पोस्टाचे दर या बाबत दर कमी व्हावेत म्हणून उपसूचना देण्यांत आल्या त्या पासही झाल्या. २७ कोटी लोकांकडून मिठावरील कर म्हणून सरकार ८·७५ कोटी रुपये वसूल करते. जेथें वार्षिक उत्पन्न ४२ रुपये सुद्धा नाहीं तेथें अगदी आवश्यक अशा मिठासारख्या वस्तूवर कर बसवून तो वसूल करणें अन्यायाचें आहे असें अनेकांनी सांगितलें. चर्चेच्या वेळीं प्रो. रंगा व अध्यक्ष यांचा खटका उडाला. अध्यक्षांचें म्हणणें विषयाला धरून बोललें पाहिजे. रंगांनीं 'शक्य तेवढें विषयाला धरून बोलतो आहे' गंभीरपणें अश्वासन दिलें. अध्यक्षांचें म्हणणें असें की, येथें शक्यतेचा प्रश्न नाहीं. प्रत्यक्ष भाषण विषयाला धरूनच पाहिजे. रंगा म्हणजे बेफाम बोलणें. तथापि एक तासभर मिठावरील करा बाबत बोलून त्यांनी वातावरण तिखट करून सोडलें. आयात कर माणशीं १॥ रुपाया आहे, अंतर्गत कर माणशीं रु. १८७ आहे. जमीन धारा माणशीं तितकाच; स्टँपवरील कर माणशीं ८११ आणे आहे, व हे सर्व मिळून माणशी कर रु.५८१ होतो व त्यांत मिठावरील कर माणशीं ४६ आणे धरला तर एकंदर माणशीं करांचा बोजा उत्पन्नाच्या मानाने जास्त आहे. १६०० कोटी रुपये

वार्षिक उत्पन्न धरलें तर माणशीं दरसाल ४४।। रुपये उत्पन्न पडतें. त्यामानानें कर निःसंशय जास्त आहेत; अशी रास्त टीका करण्यांत आली. वास्तविक माणशीं उत्पन्न ४४।। रुपयापेक्षांही कमी आहे. मिठावरील करच वास्तविक नको आहे अशी जुनी मागणी असतांनासुद्धा कॉंग्रेस पक्षानें कांही प्रमाणानें दर कमी करावा एवढीच मागणी केली होती. जिनांनी आपण मिठावरील कर कमी करण्याच्या उपसूचनेवर मत देणार नाहीं असें जाहीर केलें. त्यांचें म्हणणें असें कीं, 'कर कमी करा हें मान्य केल्यास दुसरी उत्पन्नाची बाब दाखवून दिली पाहिजे. शिवाय कर कमी केल्याने प्रत्यक्ष फायदा मिठाच्या व्यापाऱ्यांचाच होईल.' फडणिसानें सांगितलें कीं, 'कांहीही होणें शक्य नाही.' शेवटीं सव्वा रुपयानें मिठावरील जकात कमी व्हावी ही उपसूचना पास झाली. पोस्टाच्या दराबाबत कार्ड दोन पैशांचें करावें अशी उपसूचना कॉंग्रेस पक्षानें दिलेली होती. १९२५–२६ सालापासून पोस्ट व तार खातें ही व्यापारी धोरणानें चालावी असें ठरलें. १९३४–३५सालीं या खात्याला ३८·८१ लाख रुपये फायदा झाला. तो बहुतेक पगारकाट कमी करून जिरविण्यांत आला. १९२१-२२ सालीं कार्ड पैशाला मिळत होतें, तेव्हां ६४·८ कोटी कार्डें खपलीं. १९३५-३६ सालीं तीन पैसे दर असतांना ४१·० कोटी खपतील असा अंदाज होता. अर्धा आणा दर केल्यास विक्री जास्त वाढेल व उत्पन्नांत ५० लाख रुपये तूट येणार नाहीं, हें पटवून देण्यांत आलें. पै अर्ध्या पैनें गरिबांना काय फायदा मिळणार म्हणून सरकारतर्फे विचारण्यांत आलें. मिठावरील कर कमी केल्यास सहा आणे फायदा माणशीं मिळाला असता पण त्यालाहि विरोध; क्षुल्लक म्हणून पोस्टाचे दर कमी करण्यास विरोध; तात्पर्य, बजेट जसेंच्या तसेंच राहावें हा अभिमान मुळाशीं होता. वास्तविक व्यापारी तत्त्वांवर हें खातें आहे असें जर खरें तर सर्वत्र ५० टक्के भाव कमी झाले असतां, मजुरी कमी झाली असतां, या खात्यांनीं ५० टक्क्यांनीं आपल्या सोयींच्या किंमती वाढविल्या. केवळ मक्तेबाजी आहे म्हणून हें होऊं शकतें. जेथें सार्वजनिक सोयीचें उत्पादन सरकारी मालकीचें आहे तेथें त्याबाबीपासून सरकारनें विशेष नफा मिळवूं नये, हें न्याय्य तत्त्व होय. जनतेची सोय हीच दृष्टि तेथें पाहिजे. अर्धा आणा कार्ड केल्यानें खात्याला नुकसान येणार नाहीं असें आंकडे देऊन पंडितजींनीं सांगितलें. जिनांनीं पण कार्डांचे दर कमी केल्यास मिळणारी सवलत गरिबांनाच मिळेल कारण यांत मध्यस्थ नाहीं. कारण नसतांना या खात्यांत जागांची खोगीर भरती केली आहे अशी तक्रार पण करण्यांत

आली. डायरेक्टर जनरल, असिस्टंट डायरेक्टर जनरल, डे. डा. जनरल, अ. डे. डा. जनरल, वगैरे नांवामागून नांवें वाचून दाखवून आयंगार यांनीं ही खोगीर-भरती सभागृहापुढें ठळकपणें मांडिली. बिनसरकारी सभासदांची स्थिति, झाडावर असलेल्या फळांवर दगड मारून एखादें पडलें तर तें घ्यावें अशी आहे. उलट माकड झाडाच्या शेंडयावर बसतें, त्याला सहज वाटेल तें फळ घेतां येतें; म्हणून फडणिसांनींच आपण होऊन कांहीं तरी सूचना स्वीकाराबी असें आयंगार यांनीं उपमेनें सांगतांच प्रचंड हास्यकल्लोळ सभागृहांत झाला. शेवटीं कॉंग्रेस पक्षाची उपसूचना पास झाली. बुकपोस्टाचे दर कमी व्हावेत म्हणून युरोपियन गटानें उपसूचना केली. १८७८ पासून १९२१ पर्यंत पहिल्या १० तोळ्यास अर्धा आणा दर होता. १९२१ सालीं पहिल्या ५ तोळ्यांस अर्धा आणा दर करण्यांत आला. १९३४ सालीं, अर्ध्या आण्याऐवजीं पहिल्या पांच तोळ्यांस पाऊण आणा करण्यांत आला. पहिल्या २॥ तोळ्यांस अर्धा आणा करावा व पुढल्या २॥ तोळ्यांस पाऊण आणा व नंतरच्या प्रत्येक ५ तोळ्यांस अर्धा आणा असावा अशी उपसूचना होती. व्यापारी वर्गाच्या हिताच्या दृष्टीनें ही सूचना जरी करण्यांत आली होती, तरी तिचा मुख्य फायदा इंग्रज व्यापाऱ्यांनाच होणार होता. जेव्हां दर १९३४ सालीं वाढविला, त्याचा परिणाम बुकपोस्टाच्या संख्येवर विशेष झाला नाहीं. १९३४–३५ सालीं ९.८ कोटी ही संख्या होती व १९३५–३६ सालाला ती ११.२ कोटी अंदाजली होती. पोस्टामागें व्यापार ( Trade follows Mail ) अशा जाहिराती देऊन पोस्टखात्यानें आपलें उत्पन्न वाढविलें होतें. या दरांत कमी केलें तर उत्पन्न सुमारें ८ लाखांनीं कमी झालें असतें, व सरकारनें युरोपियन कंपन्यांच्या सोयीसाठी, कदाचित् सभागृहानें मान्य केल्यास, सभागृहाचें आपण कांहींतरी मानलें, हें दाखविण्याकरितां हे कमी दर स्वीकारले असते, व कार्डांच्या बाबतींतील धोरण कायम ठेवलें असतें म्हणून कॉंग्रेस पक्ष, स्वराज्य पक्ष तटस्थ राहिले व उपसूचना नापास झाली. जेम्सची युक्ती फसली. वर्तमानपत्राबाबत वजन ८ तोळे यावर पाव आणा दर आहे तो १० तोळ्यांस पाव आणा करावा व यांत कांहीं नुकसान होणारहि नव्हतें; म्हणून त्याप्रमाणें उपसूचना करण्यांत आली. तिला सरकारतर्फे विरोध करण्यांत आला पण ती पास झाली. प्राप्तीवरील कराबाबत मथुरादास यांनीं उपसूचना सुचवून प्राप्तीवरील करामध्यें जास्त न्याय्य पद्धति अमलांत आणण्याचा प्रयत्न केला. दोन हजार रुपयांपर्यंत कर माफी, पण

दोन हजारांपासून पांच हजारांपर्यंत रुपयास सहा पै हा कराचा दर; पण तो आकारतांना सर्व पांच हजारांवर आकारला जाई. वास्तविक पहिले दोन हजार करमाफीतले म्हणून वगळावयास पाहिजेतच. फक्त तीन हजारांवरच कराची आकारणी करावयास पाहिजे. तसेंच ज्या ज्या उत्पन्नाच्या टप्प्यापासून दर वाढेल, तो वाढलेला दर फक्त त्या टप्प्यांतील उत्पन्नाच्या रकमेवरच बसला पाहिजे. उदाहरणार्थ पांच हजार रुपयांपासून दहा हजारांपर्यंत रुपायाला ९ पै दर ठेवला होता. तो आकारतांना पहिले दोन हजारांवर माफी. दोन ते पांच हजारांपर्यंत ६ पै व पांच हजारांवर जेवढें उत्पन्न राहील त्यावर ९ पै याप्रमाणें कर आकारावा असा उपसूचनेचा भावार्थ होता. सर्व उत्पन्नावर सरसहा एकाच दरानें कर आकारणें न्यायाचें नाहीं असें त्यांचें म्हणणें होतें. दोन हजार रुपये उत्पन्नवाला कांहीं कर देत नाही. २०१० रुपये उत्पन्न झालें कीं त्याला रु. ६२ आ. १३ कर पडून प्रत्यक्ष उत्पन्न रु. १९४७ आ. ३ राहातें यांतील अन्याय उघड आहे. सरकार हल्लीं या स्थितींत दोन हजारांवरील कर रु. १० घेतें व दोन हजार रुपये उत्पन्न करमाफ म्हणून सोडतें पण हा अनमान धक्यानें न्याय झाला. त्यांत कांहीं तत्त्व असावें म्हणून मथुरादास यांची उपसूचना होती. आणखी त्यांनीं आपल्या सूचनेंत प्राप्तीदारांच्या प्रत्येक मुलामागें कांहीं रक्कम करमाफ म्हणून ठरवावी; तसेंच व्यापारांत; कधी फायदा तर कधी नुकसान येते. म्हणून तीन वर्षांची सरासरी काढून त्यावर कर आकारावा या दोन गोष्टींचा समावेश केला होता. ज्याला मूलबाळ नाहीं त्यालाही तोच दर व ज्यास मुलें आहेत त्याला तोच दर हा अन्याय हाय. इंग्लंडमध्यें प्रत्येक मुलामागें कांहीं रक्कम करमाफ असते. तसेंच यंदा फायदा झाला तर कर भरला; पुढील वर्षीं नुकसान झालें तर कर नाहीं. धंद्यांतील फायदा सालोसाल धरणें व नुकसानी लक्षांत न घेणें हेंहि न्याय्य नाहीं. इंग्लंडमध्यें ही नुकसानी कर बसवितांना लक्षांत घेतात. या सूचनेला फडणिसानें विरोध केला, पण त्यांत न्याय आहे हें कबूल केलें. प्राप्तीवरील कराचा प्रश्न सरकार तज्ज्ञामार्फत तपासीत आहे; व त्याच्या शिफारशी येतील त्यावेळीं सरकार त्यास योग्य वाटेल तें करील असें सांगितलें. उपसूचना परत घेण्यांत आली. नंतर सर्व कलमें पास झालीं. बिलाचा सरनामा पास झाला. मूळ बिलांत फरक झाल्यामुळें फडणिसानें 'तिसरें वाचन करावें' ही सूचना मांडण्याचें नाकारलें, व पुन्हां मागील सालाप्रमाणें गव्हर्नर जनरलनें तेंच बिल जसें प्रथम मांडलें होतें तसेंच्या तसेंच शिफारस करून सभागृहाकडे, 'शांतता,

सुव्यवस्था, सुराज्य ' या देशांत राहावें म्हणून पास करण्याकरितां पाठवून दिलें.

शिफारसपत्र घेऊन आलेलें बिल, म्हणजे पूर्वीचें बिल, जसेंच्या तसेंच होतें. जेवढ्या दुरुस्त्या सभागृहानें केल्या होत्या त्या सर्व नामंजूर करून गव्हर्नर जनरलनें, फडणिसानें प्रथम मांडलेलें बिल पास करावें अशी सभागृहाकडे शिफारस केली होती. मिठाच्या कराबाबत केलेली दुरुस्ती रद्द व्हावी ही सूचना फडणिसानें प्रथम मांडली. वर्तमानपत्राबाबत ८ तोळ्यांऐवजीं १० तोळे वजनावर पाव आणा दर असावा ही एक क्षुल्लक बाब सरकारनें स्वीकारली होती. सभागृहानें केलेल्या कर कमी करण्याच्या दुरुस्त्या सरकारला स्वीकारणें शक्य नाहीं असें सांगून. शिक्का मारून अधिकार गाजविण्याचा ( Certification ) प्रसंग सभागृहानेंच आणला आहे असा आरोप केला. घटनेबाबत नाखुषी दर्शविण्याकरितां ज्या कपाती पास करण्यांत आल्या त्याबद्दल फडणिसांची तक्रार नव्हती. परिस्थितीप्रमाणें सरकार शक्य तेवढे न्याय्य करतें व लोकमताला मान देतें. सभागृहानें अनेक कमिटया मागितल्या म्हणून नेमल्या अनेक कायदे केले वगैरे भाकडकथा सांगण्यास सुरुवात केली. संरक्षण सुव्यवस्था व फडणिसी या तीन गोष्टींवर सर्व राज्यकारभार आधारलेला आहे व या तीनही गोष्टींची जबाबदारी सरकारवरच आहे. त्यांत सरकार कोणालाही ढवळा· ढवळ करून देणार नाहीं. या बाबतींतील धोरण व अंमलबजावणी हीं सर्वस्वी सरकारी बाब आहे, आणि जर सभागृहानें ही जबाबदारी पार पाडण्याकरितां फडणिसी व्यवस्था बिलांत विरोधक अशा दुरुस्त्या केल्या तर सदरहू बिल शिक्का मारून जारी करण्याचा अधिकार सरकारला असणें जरूर आहे. सरकारी धोरण ठरविण्यापूर्वी सभागृहाचें मत समजून घ्यावें, शक्य तर त्यास मान द्यावा हें ठीक व त्याप्रमाणें सरकार करतेंही. बिलांत केलेल्या दुरुस्त्या मान्य करणें म्हणजे सर्व व्यवस्था गोंधळांत टाकणें होय. ८० कोटींच्या बजेटांत एक·कोटीपर्यंत दुरुस्त्या स्वीकारणें शक्य नाहीं. सध्याचें सरकार हें लोकमताला जबाबदार नाहीं हें खरें; पण जेव्हां तें जबाबदार होईल तेव्हांही तें कांहीं निराळें वागेल व वाटेल त्या दुरुस्त्या स्वीकारील हेंही खरें नाहीं.

भुलाभाईंनीं विरोध करतांना सांगितलें कीं, " सरकार लोकमताला जुमानीत नाहीं, बेगुमान आहे. कौन्सिलें निव्वळ नाममात्र आहेत असें जें दादाभाईंनीं म्हटलें आहे तें खरें आहे; खर्चांत हिंदी प्रतिनिधींना हात घालतां येत नाहीं. जादा कर बसविण्यास मदत केली तर देशद्रोह मात्र पदरीं येतो. बजेटापैकीं मोठा भाग

मंजुरीसाठीं मसतोच. सरकारनें कायदेमंडळाचा बुरखा घेऊन पूर्वीपेक्षांही जास्त जुलूमशाही कारभार चालविला आहे. पूर्वी जुलमी राजा जुलूम करी, खाटकाप्रमाणें वागे, जनता भांबावे, घाबरे; परंतु सुधारणा युगांतील हा जुलूम म्हणजे खूनच ! मात्र तो एखाद्या निष्णात पण निष्ठुर अशा शस्त्रक्रिया करणाऱ्या वैद्यानें एखाद्या रोग्याचें सर्व रक्त काढावें पण अंगावर एक जखमसुद्धां दिसूं देऊं नये अशा दादाभाईंनीं ३७ वर्षांपूर्वी काढलेल्या उद्‌गारांप्रमाणें अगदीं यथार्थ होय. ("The Legislative Council was simply and solely, 'he declared,' a delusion and a farce, and its working constituted a worse despotism than was ever exercised by any Native Ruler even in the old days. An oriental despot when he misgoverned, acted so to speak like a butcher and people were astounded and horrified; this new despotism of civilisation rather resembled a murder effected by a clever but unscrupulous surgeon who drew all the blood from his victim while leaving scracely a scar upon the skin.") त्यानंतर हिंदुस्थानच्या राज्यकारभाराबाबत दोन कायदे झाले व त्यामुळें स्वातंत्र्य वाढलें असेंच सांगण्यांत येतें. पण अनुभव मात्र स्वातंत्र्य कमी झाल्याचाच येत आहे. आमचें खर्चाच्या बाबतींतील सांगणें ऐकलें जात नाहीं. सरकार उगाच कोटया करून, चेष्टा करून, वेळ मारून नेण्याचा प्रयत्न करतें; हें फार काळ चालणार नाहीं. एक तर सरकारला लोकमतानुवर्ति व्हावें लागेल अगर लोकांना आपल्या दुर्बलतेची पूर्ण जाणीव होऊन पुढें काय करावें हें कळेल व तें या थोतांडापासून अलिप्त राहातील." जिनांनीं संरक्षणाच्या धोरणावर टाका केली. "जेव्हां तुम्हाला कोणी मित्र उरला नाहीं तेव्हां तुम्ही संरक्षण मान्य केलेंत पण तें विवेकी असावें ( Discriminating Protection ) असें ठरवून पाठींत वार केलात. सरकार हें निव्वळ सत्तेच्या जोरावर करीत आहे. गेल्या वर्षी इंडो-ब्रिटिश करार सभागृहानें अमान्य केला, तो तुम्ही मान्य केलात. जर तुम्हाला कांहीं थोडीशी सदसद्विवेकबुद्धी असेल तर हें कृत्य या देशाच्या हितार्थ होतें असें या सभागृहांत तुम्हांला म्हणतां येणार नाहीं. लोकमताला मान दिला हें दाखविण्याकरितां ज्या गोष्टी सांगण्यांत आल्या त्या ऐकून हसूं आल्याशिवाय राहात नाहीं. हायकोर्टें स्थापिलीं, लष्करी कॉलेज काढलें, टेरिटोरियल फोर्स काढले; काय सुधारणा ह्या ! पोस्ट कार्डाचा दर कमी केला असता तर काय झालें असतें !

पण ऐकतो कोण? कोणताहि ठराव बहुमतानें पास झाला तर ठीक, नाहींतर शिक्काबाजीचा अधिकार आहेच! अशा स्थितींत विरोध करणें अटळ आहे."

लो. ना. अणे यांनी शिक्काबाजीचा अधिकार असला तरी तो कोणत्या परिस्थितींत चालवावा याच्या मर्यादा, घटनेप्रमाणें व रूढ संकेताप्रमाणें, सांगितल्या. सभासगृहांतील बहुसंख्यांक सभासदांचें मत क्षुद्र मानून सरकार वागत आहे. अशा परिस्थितींत स्वाभिमानाचा मार्ग म्हणजे विरोध करणें हाच होय असें बजावलें. सर नृपेंद्र यांनीं नेहमींप्रमाणें कुचाळ्या काढल्या. "जर शिक्केबाजीचा अधिकार घटनेंत दिला आहे तर तो दिखाऊ नाहीं, तर त्याचा उपयोग करण्यासाठींच दिला आहे सबब सरकार त्याचा उपयोग करीत आहे. लोकमताला मानणें म्हणजे सरकार जबाबदार होणें; पण ही गोष्ट विद्यमान घटनेंत नाहीं. (No desire to introduce at the present stage any measure of responsible Government into the Central Administration.) हें १९१९ च्या बिलाच्या वेळीं स्पष्ट करण्यांत आलें आहे. तरीसुद्धां १९२० ते १९३४ पर्यंत अनेक वेळां लोकमताला मान देण्यांत आला. कारण त्यावेळचे पुष्कळ लोकप्रतिनिधि समंजस होते." शेवटच्या वाक्यानें मतनोंदणीचा निकाल पक्का करून टाकला. ५१ वि. ६८ मतांनीं हें बिल फेटाळलें गेलें. १९३५ सालीं ११ वर्षांनीं प्रथम फेटाळलें गेलें; १९३६ सालीं लागोपाठ फेटाळलें गेलें. मागील सालीं सरकारला थोडी क्षिति वाटली पण यंदा मुळींच कांहीं नाहीं! सभागृहाच्या चिटणिसानें बिलावर मारावयाचा शेरा अगोदरच लिहून ठेवला होता. मतनोंदणीचा निकाल जाहीर होतांच फडणिसानें शेऱ्याची मागणी केली व अध्यक्षांनीं त्यावर सही केली. लोकमताच्या अपमानाची याप्रमाणें नोंद झाली! फडणीस मागील सालीं खिन्न होता तो यंदा हसत बाहेर पडला. त्यानें निरगट्टपणांत फारच लवकर प्रगति दाखविली!!

बजेटांत नमूद करून मंजुरी मिळाल्यानंतरसुद्धां पुष्कळवेळां आर्थिक खर्च होतो व तो झाल्यानंतर अधिक झालेला खर्च मंजुरीकरितां येतो. तसेंच अधिक खर्च होईल म्हणून पुरवणी मागण्याही मांडण्यांत येतात. सामान्यतः यावेळीं आर्थिकदृष्ट्याच चर्चा होते. गाऱ्हाणीं मांडणें अगर धोरणाबाबत चर्चा होत नाहीं कारण धोरण मंजूर झालेलें असून रक्कमच फक्त जास्त लागलेली असते, अगर मागितलेली असते. परंतु पुष्कळ वेळां या प्रसंगाचा फायदा घेऊन सरकार नवीन

खर्चाची बाब सुरू करतें, असाच प्रकार या सालीं झाला. सत्यमूर्ति यांनी पुन्हां इन्कार कपात ( Refursal of Supplies ) दिली. त्यांचें म्हणणें ही बाब नवीन असल्यामुळें ( New Service ) असल्यामुळे ही कपात कायदेशीर आहे. यावर चर्चा झाली. पुरवणी बजेट मागण्याच्या वेळीं जरी एखादी बाब नवीन असली तरी तेवढया बाबीच्या धोरणाबद्दल फार तर टीका करतां येईल; पण तें निमित्त करून सर्व साधारण, राज्यकारभारावर टीका करतां येणार नाहीं असें सरकारचें म्हणणें. शेवटीं, याप्रमाणें कपात मांडणें योग्य आहे; सर्वसाधारण धोरणावर टीका करणें योग्य असलें तरी त्या विशिष्ट बाबीच्या धोरणाबाबतच टीका करावी असा निर्णय अध्यक्षांनीं दिला. यामुळे ही चर्चा म्हणजे बजेट-चर्चेची छोटी आवृत्तीच होय. स्थायी फडणिसी कमिटीवर काम करतांना आमची संख्या जास्त होती व फडणिसाचे व आमचे खटके उडत. १९३५ चा हा अनुभव लक्षांत घेऊन फडणिसानें १९३६ च्या दिल्लीच्या अधिवेशनांत बजेट संपेपर्यंत ही कामिटी बोलावलीच नव्हती. म्हणून अनेकांनीं त्याच्यावर टीका केली. या कमिटीपुढे क्वेटा येथील भूकंपाच्या वेळीं जो खर्च वाहतुकीसाठी करण्यांत आला त्याचे आंकडे सांगण्यांत आले तेव्हां मी त्यांवर बरीच टीका केली. खाणींतील राडेरोडे वाहून नेण्यासाठीं मोटारीमागे दरमहा रु. ७३० भाडें व शिवाय पेट्रोल पुरवठा फुकट असा करार सहा महिन्यांकरितां सरकारनें केला होता. सरकारनें गाडया विकत घेऊन हें काम केलें असतें तर फायदेशीर पडलें असतें. तथापि या टीकेचा परिणाम होऊन पुन्हां करार करण्याच्यावेळीं दरमहा भाडें निम्में करण्यांत आलें. वरील सर्व हकीकत मी सभागृहापुढे मांडली. तेव्हां सहाजीकच चर्चेला रंग आला. त्याचप्रमाणें खर्चाच्या नवीन बाबी या कमिटीपुढे मांडल्या नाहीत म्हणून पंतजीनीं टीका केली जर सभागृहाची मंजुरी वास्तविक पाहिजे होती तर हें करणें जरूर होतें. हें न केल्यामुळे फडणिसाला मुलतानशाही गाजवावयाची आहे, कमिटी नको, कोणाचा सल्ला नको ही गोष्ट सभागृहाला स्पष्ट कळली. फडणिसानें "बजेट संपल्यावर मी कमिटीची सभा बोलावीन. हें काम कमिटीपुढे ठेवावें अगर न ठेवावें हें मी तेथें चर्चीन" असें सांगून बगल मारली. बजेटावरील चर्चा, फडणिसी बिलावरील चर्चा पुरवणी मागण्यावरील चर्चा या वेळीं जें वातावरण उत्पन्न झालें त्याचा फायदा लोकपक्षाला ओटावा कराराच्या चर्चेच्यावेळीं चांगलाच झाला. याप्रसंगानें, शक्य तेवढा लोकमताबद्दल तिरस्कार, लोकप्रतिनिधींना कांही समजत नाही अशी सरळ

सरळ भाषा, आणि अधिकाराचा उन्माद सभासदांच्या चांगलाच प्रत्ययास आला आणि सरकार व सभागृहांतील लोकपक्षीय सभासद युद्धाच्या पवित्र्यांत जास्त जास्त दिसूं लागले.

या अधिवेशनांतील मुख्य विषय "ओटावा कराराचा पुनर्विचार" हा होता. सरकारनें १९३५ च्या दिल्ली अधिवेशनाच्या वेळीं जाहीर केलें होतें कीं, या अधिवेशनांत सरकार त्या कराराबाबत आपली योजना पुढें मांडणार आहे. यंदाच्या अधिवेशनाच्या सुरवातीपासून सरकारी प्यादीं फिरूं लागलीं होतीं. एवढेंच नव्हे तर इंग्लंडमधील व्यापारी वर्गाचे लोक, उद्योगधंद्याचे प्रतिनिधी, इंग्रजसुलभ मार्गांनीं ओटावा करार कायम राहावा म्हणून प्रयत्न करण्याकरितां येथें आले होते. येथील इंग्रज–मालकीच्या वर्तमानपत्रांतून जोरदार चळवळ सुरू झाली होती, त्याचबरोबर हिंदी व्यापारी पण कमी जास्त प्रमाणांत संघटित प्रयत्न करीत होते. हिंदी व्यापारी संघाचे प्रतिनिधीही दिल्लीस जमले होते. फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्सचे चिटणीस श्री. मुल्हेरकर व अनेक अधिकारी यावेळीं हजर होते. अनेक चोपडीं–लिखाणें, माहितीपत्रकें यांची गर्दी उसळली होती. सभासदांनीं माहिती घेऊन मतें बनवावीं म्हणून सरकारतर्फे मूळ कराराच्या प्रति, आंकड्यांचे तक्के, तज्ज्ञांच्या लेखमाला, सर्व कांहीं सभासदांना वांटण्यांत आल्या होत्या. सरकार व इंग्रज व्यापारी यांनीं संघटित रीतीनें आपआपली सामुग्री उपयोगांत आणण्याचें ठरविलेलें दिसत होतें. प्रांतिक कौन्सिलांतून जे सरकारी अधिकारी, लोकपक्षीय सभासदांवर वजन पाडून काम करूं शकतील असें सरकारनें तात्पुरते सभासद म्हणून नेमले होते. तज्ज्ञ म्हणून डॉ. मथाई, मि. बर्ट वगैरे मंडळी तर सभागृहांतील चकमकीसाठीं तयार ठेविली होती. मतनोंदणीच्या दिवशीं सहजच कां होईना, पंजाब-सरकारचे बडे अधिकारी दिल्लीस हजर होते. तात्पर्य, सरकारनें सामदामादि सिद्ध अशी चतुरंग सेना तयार ठेविली होती.

कॉंग्रेस व अन्य लोकपक्ष यांना या चर्चेचें पूर्ण महत्त्व कळलें होतें, चर्चेच्या आधीं व चालू असतांना पक्षप्रमुखांच्या अनेक बैठकी झाल्या. श्री. मुल्हेरकर हे हिंदी व्यापारासंबंधीं तपशीलवार माहिती देण्यास तत्पर होते. त्यांचा लोकपक्षाला फार उपयोग झाला. प्रो.के.टी.शहा, प्रो. वकील, श्री. घोष, प्रि.डी.आर.गाडगीळ, यांच्या लेखांचीं कात्रणें, माहितीपत्रकें व याशिवाय अन्यरीतीनें काढलेली माहिती संकलित करून तयार झालेला दारुगोळा मी स्वतःकरितां व पक्षाकरितां तयार

केला होता. याशिवाय मतें जास्त कशीं मिळतील या दृष्टीनें सरकारी डावपेंचावर उलट डावपेंच करण्यासाठीं आम्ही तीनहि पक्षांचे प्रतोद सारखे दक्ष होतों. कोण अधिकारी कोणत्या बिनसरकारी सभासदाबरोबर बोलतो आहे याकडे आमचें लक्ष होतेंच. शिवाय सभागृहाबाहेर 'बोटचेपे' सभासदांच्या मागें आमचे 'गेस्टापो' सारखे होतेच. चर्चेंत काय चालेल व होईल तें सर्व उघड व तेथील शस्त्रेंहि शाब्दिक! पण शब्दांच्या आवाजापेक्षां अन्य वस्तूंचा कर्ण–मधुर आवाज काढण्यास इंग्रज उद्योग–धंदेवाले कमी करणार नाहींत, सर्व तयारीनें ते आले आहेत अशा भूमका उठल्या असल्यामुळें आम्हांला विशेष दक्षता घ्यावी लागली. चर्चा ता. २६ मार्चला सुरू होऊन २७ व ३० मार्चपर्यंत चालून शेवटच्या तारखेस मतदान झालें. या दिवसांत रात्रंदिन जागरण घडलें असें म्हटलें तर अतिशयोक्ति खास होणार नाहीं.

ओटावा करारार्चे महत्त्व सरकार व इंग्लंडमधील लोक कां मानीत होतें हें समजून घेणें जरूर आहे. इंग्लंडने १९ व्या शतकाच्या सुरवातीस जकाती बसवून आपले उद्योगधंदे वाढविले व पुढें खुल्या व्यापाराचा स्वीकार केला. कारण इंग्लंड सर्व राष्ट्रांच्यापेक्षां उद्योगधंद्याबाबत आघाडीस होतें. युरोपांतील अन्य राष्ट्रांनीं हळुहळू उद्योगधंदे वाढविले व इंग्लंडशीं स्पर्धा सुरू केली. १९ व्या शतकाच्या अखेरीस खुद्द इंग्लंडमध्यें पुन्हां 'संरक्षित व्यापार' असावा असें म्हणणारा एक पक्ष जोसेफ चेंबरलेन यांच्या नेतृत्वाखालीं निघाला. तथापि इंग्लंडनें आपलें धोरण कायम ठेवलें. १९१३-१४सालीं हिंदुस्थानांत येणाऱ्या आयातमालापैकीं, ६२टक्के माल इंग्लंडचा असे. महायुद्धानंतर ही स्थिति हळुहळू बदलली. १९२९च्या मंदीनंतर यांत फारच फरक पडला व १९३१-३२ सालांत हें प्रमाण ३५·४ टक्के झालें. १९०३ सालापासून साम्राज्यांतील देशांचें एक संघटन असावें व त्यांनीं आपापसांत व्यापारी सवलती द्याव्यात ही विचारसरणी (Imperial Preference) सुरू झाली होती. १९१९ सालापासून इंग्लंडमध्यें साम्राज्यांतील देशांतून येणाऱ्या चहा, कॉफी, फळें, रेशीम या जिनसांवर सवलतीनें जकात आकारली जाऊं लागली. ही स्थिति १९२९ पर्यंत होती. १९३० च्या साम्राज्य परिषदेंत मंदाईमुळें व्यापार खालावला होता म्हणून विचार झाला. त्यावेळीं हे सवलतीचे प्रश्न पुढें आले. हिंदुस्थाननें मर्यादित अगर विवेकी संरक्षणाचें (Discriminating protection) धोरण स्वीकारलेलें होतें. म्हणून सर्वसाधारणपणें हिंदुस्थानच्या प्रतिनिधींनीं साम्राज्यां-

तर्गत व्यापारवृद्धीला सहानुभूति दर्शविली, पण प्रत्येक योजना प्रत्यक्षपणें जेव्हां पुढें येईल त्यावेळीं त्यावर परिस्थितीप्रमाणें विचार करण्याचें आश्वासन दिलें. सदरहू परिषदेंत इंग्लंडचें जमलें नाहीं म्हणून एक वर्षानें पुन्हां त्या परिषदेच्या आर्थिक समितीनें ओटावा येथें जमावें व प्रत्यक्ष योजना मांडाव्यांत असा संकेत झाला. १९३१ सालीं इंग्लंडची व अन्य देशांची आर्थिक परिस्थिति बिकट झाली. सुवर्णचलन कायम ठेवण्यासाठीं निवडून येणारें राष्ट्रीय सरकार स्थानापन्न झाल्याबरोबर पौंडाचा व सोन्याचा संबंध तोडतें झालें. मजूर सरकार तर संपुष्टांत आलें होतें. मॅकडोनल्डचें ध्येय संपत्तीच्या साधनांचें राष्ट्रीयकरण करण्याचें होतें. त्या ऐवजीं फक्त सरकारचेंच राष्ट्रीयकरण त्यांनीं केलें. राष्ट्रीय सरकार म्हणजे कट्टर साम्राज्यवादी सरकार हें स्पष्ट होतें. तें भांडवलवाल्यांचें सरकार होतें. सवलतीच्या व्यापाराचें तत्त्व हिंदुस्थानावर लादलें जाणार हें स्पष्ट झालें. खुद्द इंग्लंडनें एप्रिल १९३२ मध्यें खुल्या व्यापाराला तिलांजली दिली. इंग्लंडचे फडणीस नेव्हिल चेंबरलेन यानें आयात मालावर जकात बसविण्याचा कायदा पास करून घेतला व हें बिल, ज्या जागीं त्याचे वडील जोसेफ चेंबरलेन बसत व ज्या जागेवर उभें राहून त्यांनीं संरक्षित व्यापाराची मागणी केली, त्याच जागीं सभागृहाची परंपरा मोडून उभें राहून बिल मांडलें व पितृकार्य संपादिलें!! सभागृहानें टाळया पिटल्या; त्या परंपरा मोडली म्हणून, कां वडिलांची गादी चालविली म्हणून हें मात्र कळलें नाहीं!! आयात कराच्या कायद्यानें ( Import Duties Act ) इंग्लंडमध्यें येणाऱ्या बहुतेक वस्तूंवर जकात बसविण्यांत आली. ज्या वस्तु हिंदुस्थान व अन्य साम्राज्यांतर्गत देशांतून इंग्लंडमध्यें येत त्या वस्तूंना आयातकराची माफी ता. १५ नोव्हेंबर १९३२ पर्यंतच राहील; त्यानंतर इंग्लंडचें सरकार त्यावर जकात बसवील असें कलम ४ मध्यें बजावलें होतें. जर इंग्लंड व हिंदुस्थान व इतर वसाहती यांच्यांत ता. १५ नोव्हेंबर १९३२ पर्यंत कांहीं व्यापारी करार झाले तर ही माफी पुढेंहि चालू राहील असें बिलाच्या चर्चेच्या वेळीं सांगण्यांत आलें होतें. वसाहती व हिंदुस्थान यांना खुषीनें नव्हे तर धाक दाखवून सवलतीच्या जोखडांत गुंतविण्याचा हा अगदीं नागवा प्रयत्न होता. हिंदुस्थान व वसाहती यांच्यातहि स्पर्धा होती. या सर्वांचा फायदा इंग्लंडनें घेण्याचा डाव टाकला व तो ओटावा मुक्कामीं ता. २० ऑगस्ट १९३२ रोजीं यशस्वी केला.

ओटावा परिषदेला हिंदुस्थान सरकारनें प्रतिनिधी धाडण्याचें कारण नव्हतें.

इंग्लंडशीं असलेला व्यापार बुडेल ही भीति व्यर्थ होती. इंग्लंड व हिंदुस्थान यांचे संबंध सावकार व कूळ असे होते. इंग्लंडला हिंदुस्थानाशीं व्यापार वाढविल्यावांचून गत्यंतर नव्हतें. कूळ तरतें राहिलें तरच सावकार तरणार ही गोष्ट उघड असतां हिंदुस्थान सरकारनें प्रतिनिधी धाडले. सर अतुल चतर्जी व सर जॉर्ज रेनी हे दोन सरकारी अधिकारी, सर षण्मुखं चेट्टी, जीनवाला, अबदुल्ला हरून व अबदुल समाद हे बिनसरकारी सभासद होते. हिंदुस्थानचा व्यापार बुडेल ही भीति व करार केला तर वाढेल ही आशा दाखवून हा करार करण्यांत आला. भीति निराधार होती व आशा खोटी ठरली. ह्या सभासदांना हें कळलें नसेल असें वाटत नाहीं. ज्यांनीं त्यांना नियुक्त केले त्यांनींच काय करावयाचें हें जणूं ठरविलेलेंच होतें. वरील करारानंतर सभासदांना सरकारनें पदव्या देऊन गौरविलें. या करारानें व्यक्तिगत विचार न करतां काय साधलें हें पाहणें जरूर आहे. कराराचा मतितार्थ असाः—कराराच्या योजनेंत हिंदुस्थान येवो अगर न येवो कांहीं वस्तू इंग्लंडमध्यें आयात कर न देतां आणण्याची परवानगी (Import Duties Act) कायद्यानें ठेविली होती. त्या वस्तूंची नोंद परिशिष्ट १ मध्यें केली होती. पण त्या वस्तू अगदीं थोड्या होत्या. ओटावा योजनेंत बाकी वस्तूंबाबत बसाहती व हिंदुस्थान जर आले असते तर त्या वस्तूंवरील आयात करास माफी मिळणार होती. ओटावा करारांतील पहिल्या कलमानें ही माफी देण्यांत आली. साम्राज्याबाहेरील ज्या कांहीं वस्तू आयात होतील त्यांवर आयात जकात जास्त आणि हिंदुस्थान अगर बसाहतींतून जो माल आयात होईल त्यावर कमी अगर जकात माफ असाही एक भाग त्यांत होता. तागाचा पक्का माल, काथ्याचा माल, गालिचे, कापड, कच्चे कातडें, अशुद्ध लोखंड या वस्तु या करारामुळें इंग्लंडमध्यें आयात जकातीशिवाय जाऊं लागल्या. याच वस्तूं जर इंग्लंडमधून हिंदुस्थानांत आल्या तर त्यांवर आयात कर—जकात, द्यावी लागते. सामाज्याच्या बाहेरून इंग्लंडमध्यें येणाऱ्या वस्तूंचे तीन प्रकार या करारांत केले होते. कांहीं वस्तूंवर ठराविक दरानें आयात जकात बसविण्यांत आली. कांहीं वस्तुंवर म्हणजे कॉफी वगैरे यांवर जो कर बसविण्यांत येई त्यापेक्षां हंडरवेट मागें ९ शि. ४ पे नें कमी दर हिंदी कॉफीवर बसविण्यांत यावयाचा. हल्लीं जे कराचे दर आहेत व साम्राज्यांतील देशांतून येणाऱ्या वस्तुंना कराच्या ज्या सवलती आहेत त्या कायम ठेवावयाच्या व यदाकदाचित् दर वाढविले तरी साम्राज्यांतील देशांना कांहीं तरी सवलत मिळेल असें करावयाचें [illegible] हिंदुस्थान

इंग्लंडला मुख्यत्वे पुरवठा करतें त्यावर आयात जकात माफ करण्याचेंही कलम या करारांत होतें. हिंदुस्थानांत येणाऱ्या मालापैकीं कांहीं माल इंग्लंडमधून आल्यास त्यावर आयात जकात दहा टक्के कमी व कांहीं मालावर साडेसात टक्के कमी, इतर देशांना मात्र ही सवलत नाहीं. या वस्तू म्हणजे मोटारी, मोटारीचें सामान वगैरे होत. ज्या वस्तूंबाबत हिंदुस्थाननें संरक्षक जकात ठेवली नसेल, त्या वस्तूंबाबत पुन्हां इंग्लंडमधून येणाऱ्या मालावर सवलतीचे दर ठेवण्यांत आले. कलम ८ नें हिंदी कापूस इंग्लंडमध्यें जास्त खपेल या दृष्टीनें प्रयत्न करावेत व त्याला इंग्लंडच्या सरकारनें मदत करावी असें ठरलें. या कराराला मुदत नव्हती. मात्र कलम १४ प्रमाणें सहा महिन्यांची नोटीस देऊन हा करार रद्द करण्याचा अधिकार उभय पक्षांना होता. ओटावा-करार होण्यापूर्वी हिंदुस्थान सरकारनें असा एकादा करार झाला तर, तो कायदेमंडळापुढें ठेऊन त्याला मान्यता मिळाली तरच तो अमलांत येईल, असें जाहीर केलें होतें.

हा करार नोव्हेंबर १९३२ मध्यें असेंब्लीपुढे मान्यतेसाठीं मांडण्यांत आला. कराराचा विचार करण्यासाठी सभासदांची एक कमिटी नेमण्यांत आली. या कमिटीनें, हा करार व यालाच अनुसरून लोखंड व पोलादाबाबत केलेला करार मान्य करावा अशी शिफारस करण्यांत येऊन सभागृहानें ती ता. ७-१२-३२ ला मान्यही केली. नंतर या शिफारशीचें कायद्यांत रूपांतर होऊन तो कायदा ता. १-१-१९३३ पासून अंमलांतही आला. या कराराचा हिंदी व्यापारावर तीन वर्षांनीं काय परिणाम होतो त्याचा रिपोर्ट सरकारनें या सभागृहापुढे मांडावा व सभागृहानें जर या करारानें हिंदुस्थानचें हित झालें नाहीं असा रिपोर्ट दिला तर सरकारनें एक जाहीर पत्रक काढून वरील कायदा रद्द करावा अशीही शिफारस कमिटीनें केली होती. त्याप्रमाणें सरकारनें रिपोर्ट केला नव्हता. तीन वर्षें पुरीं होऊन गेलीं होतीं. आणखी कालहरण करण्याच्या उद्देशानें सरकारतर्फे सर महमद झाफरउल्ला यांनीं जो ठराव मांडला त्याचा अर्थ असा होता कीं, सभागृहानें एक कमिटी नेमावी व त्या कमिटीनें या कराराचा हिंदी व्यापारावर काय परिणाम झाला यावर रिपोर्ट करून तो सभागृहापुढे ठेवावा. कांहीं माहिती, कांहीं आंकडे, जमा करून त्याची चोपडी सरकारनें सभासदांना पुरविली होती. तथापि तेवढयानें सरकारनें आपलें कर्तव्य-कर्म केलें असें मात्र कोणीच समजलें नाहीं. ठरावावर भाषण करतांना व्यापार मंत्री झाफरउल्लांनीं प्रथमच अशी घोषणा केली कीं, सभागृह जो निकाल देईल तो सर-

कारला मान्य आहे. ठरावांत नमूद केलेल्या कमिटीवर काम करावयास लोकपक्षांतील एकही सभासद तयार नाही याबद्दल त्यांनीं खेद प्रदर्शित केला. कमिटी नेमावी हेंच योग्य होईल असें त्यांनी बजाविलें. सभागृहाने अनेकवेळां या पद्धतीनें काम केलें आहे असें दाखले देऊन दर्शविलें. खुद्द कराराच्या परिणामा बाबत बोलतांना ते म्हणाले "हिंदुस्थान ५५ वस्तूंना सवलती देतें, तर इंग्लंडनें १६३ वस्तूंना सवलती दिल्या आहेत. रु. ४१ कोटीच्या मालाला इंग्लंडनें सवलती दिल्या. उलट हिंदुस्थाननें फक्त १७ कोटी रुपयांच्याच मालाला गेल्या वर्षीं सवलती दिल्या. अर्थात् हिंदुस्थानांतून धाडण्यांत आलेला माल बहुतेक कच्चा माल होता हें त्यांना कबूल करावें लागलें. ओटावा करार झाला त्यावेळीं बिकट परिस्थिति होती व ज्या काळांत त्याची अम्मल बजावणी झाली तोही काल नेहमींचा नव्हता; बिकटच होता. जागतिक मंदाई दूर करण्याकरतां हुंडणावळीचे धोके टाळण्याकरितां अनेक राष्ट्रांनीं अनेक धोरणें स्वीकारलीं. व्यापार बंदी, व्यापारी परवाने, हिस्से ठरवून व्यापार नियंत्रण, आयात करवाढ इत्यादि प्रकारांमुळें आंतरराष्ट्रीय व्यापाराची घडी पार बदलून गेली होती. वस्तूंची अदलाबदल असें त्याचें स्वरूप होऊं लागलें अशा परिस्थितींत हा करार झाला. या करारामुळें उपस्थित झालेल्या कांहीं अपेक्षा सफळ झाल्या नसतील पण हा कारच न होता तर हिंदुस्थानच्या व्यापाराची स्थिती काय झाली असती हेंहि पाहिलें पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. जर करार झाला नसता तर इंग्लंडनें अनेक वस्तूंवर जकात बसविली असती व हिंदुस्थानचा, त्या वस्तूंचा व्यापार, इंग्लंडशीं कमी झाला असता. शिवाय ज्या वस्तूंवर सवलतीच्या दरानें जकात बसविली आहे ते दर मिळाले नसते व या देशाचें नुकसान झालें असतें. जगांतील अनेक देशांची जी व्यापाराबाबत परिस्थिति झाली ती या देशाची झाली असती, निदान ती तरी या करारानें टळली. या धोक्यापासून हा देश सुरक्षित राहिला येवढी तरी किंमत ( Insurance Value ) या कराराची आहे. वस्तुतः या करारामुळें कांहीं वस्तूंचा व्यापार वाढला आहे. आळशीची ( Lineseed ) निर्यात १९३१-३२ सालीं १,२०,००० टन होती ती १९३३-३४ सालीं ३,७९,००० टन झाली. १९३४-३५ ला २,३९,००० टन, झाली. १९३५-३६ च्या ११ महिन्यांत १,४८,००० टन झाली आहे. यापैकीं १,७६,००० टन, १,०४,००० टन, ४४०००टन, अनुक्रमें इतकी इंग्लंडमध्यें झालीं. १९३१-३२ मध्यें इंग्लंडमध्यें फक्त १,४,००० टनच निर्यात होत असे. शिवाय किंमतही बरी मिळाली. हीच गोष्ट

तांदुळाची. १९३१ साली २३ हजार टन तांदुळ इंग्लंडमध्यें येथून गेला. १९३५ मध्यें ७५ हजार टन गेला. शेंगदाणा १९३१ साली ८१ हजार टन गेला. १९३५ साली ९० हजार टन गेला. किंमत १ कोटी रुपयांपर्यंत आली. चहा रु.२० कोटींचा जातो त्यावर पौंडामागें २ पेनीची सवलतीची जकात असल्यामुळें हा फायदा या देशाला मिळतो. निर्यात चहापैकीं ९० टक्के चहा एकटें इंग्लंड घेतें व जर करार झाला नसता तर इतर देशांप्रमाणें यावर पौंडामागें ४ पेनी जकात द्यावी लागली असती. ८ व्या कलमाप्रमाणें प्रयत्न होऊन कापूस निर्यातही वाढली. १९३२-३३ साली २,३०,००० गांठींची निर्यात झाली. ३,९४,००० गांठी १९३४-३५ साली, गेल्या. त्यांत आंखूड धाग्याच्या कापसाचेंही प्रमाण वाढलें होतें. नुसताच लांब धाग्याचाच कापूस जास्त गेला असें नव्हे; सर्व गोष्टींचा विचार करून कमिटी आपला रिपोर्ट करील. हिंदुस्थानचें हित हीच एक दृष्टि सदरहू कमिटी ठेवील. जर कमिटीनें हा करार या देशाच्या हिताविरुद्ध आहे असा निर्णय दिला व सभागृहानें तो मान्य केला तर सरकार करार रद्द करण्याची नोटीस देईल" असें पुन्हां एकवार सांगून आपलें भाषण संपविलें.

व्यापारमंत्री झाफरउल्लाखान यांचें भाषण अतिरेकी नव्हतें. अभिनिवेशहि त्यांत नसल्यामुळें तें विचारप्रवर्तक झालें. आतांच नोटीस देण्यापेक्षां कमिटीनें सर्व माहिती घ्यावी व रिपोर्ट करावा हें म्हणणें गैर नाहीं असें वाटणें सहाजीक होतें. उलट आतांच नोटीस दिली कीं, आपला व्यापार कमी होईल म्हणून इंग्लंड-मधील सरकार जास्त सरळ बोलेल व अन्य देशांशीं कोणत्या रीतीनें या देशाला फायदेशीर होईल त्याप्रमाणें व्यापारी करार करतां येतील हेंही अजमावतां येईल, हा फायदा होण्यासारखा होता; वरील विचार डोळ्यापुढें ठेवून कॉंग्रेस पक्षानें करार रद्द करावा अशी ६ महिन्यांची नोटीस द्यावी अशी उपसूचना आणली. जिना यांनीं आपल्या सूचनेंत करार रद्द करण्याची नोटीस तावडतोब द्यावी असें वाक्य तर घातलेंच पण त्याबरोबर हिंदुस्थान सरकारनें व्यापाराबाबत चौकशी करून रिपोर्ट करावा व कोणत्या देशांशीं करार केले असतां या देशाला फायदेशीर होईल तें पाहावें व तसे करार करून ते सभागृहापुढें मान्यतेसाठीं ठेवावे असें म्हटलें होतें. गौबा यांची उपसूचना सरकारी ठरावालाच जुळणारी होती. वसनजी यांची जिना व कॉंग्रेस यांच्या उपसूचनेस जुळणारी अशी होती. गौबांच्या उप-सूचनेनें जिनांचे सर्वच अनुयायी जिनांच्या मागें जातील हें अशक्य आहे असें

उघड दाखवून दिलें व गौबा हें सहज मतें बदलूं शकतात हेंहि कळून आलें. त्यांचा धर्म व राजकीय धर्म दोन्ही प्रवाही आहेत असें म्हणणें प्राप्त आहे. कांहींच्या मतें ही प्रगतीचीं लक्षणें होऊं शकतात! मुसलमान सभासदांत असा विचार पसरविण्यांत आला कीं, हा ठराव मुसलमान मंत्र्यानें मांडला आहे व त्यास जर मुसलमानांनीं पाठिंबा दिला नाहीं तर सरकारच्या दृष्टीनें मुसलमानांची किंमत कमी होईल. कांहीं सभासद यास बळी पडलेच, पण बरेच आपल्या पक्षनिष्ठेला व देशाभिमानाला जागले. जमीनदार व व्यापारी सभासदांत खाजगी प्रचार चालू होताच, त्याचाहि परिणाम झालाच. तथापि कॉंग्रेस पक्ष, जिनांचे अनुयायी, कारण त्या पक्षांतील निम्याच्यावर लोक सरकारकडे झुकले होते, व कॉंग्रेस नॅशनॅलिस्ट पक्ष यांनीं सहकार्य करून परिणामकारक विरोध करण्याचें ठरविलें व जिनांची उपसूचना मान्य केली; किंबहुना कॉंग्रेसची उपसूचना व जिनांची उपसूचना या सर्वच ठरवून देण्यांत आल्या होत्या; हें सर्व डावपेचांच्या दृष्टीनेंच करण्यांत आलें होतें. कोणी बोलावें व कोणत्या मुद्यावर बोलावें हेंही ठरविण्यांत आलें होतें. माझ्याकडे जे मुद्दे देण्यांत आले होते त्यांची जय्यत तयारी मी चालविली होती. व्यापारमंत्र्याच्या भाषणानंतर भुलाभाईंनीं भाषण केलें. त्यांनीं सांगितलें कीं, "ओटावा योजनेंत हिंदुस्थानाशीं केलेला करार मात्र विनमुदतीचा आहे, बाकीच्या वसाहतींनीं मात्र आपणांस असें बांधून घेतलेलें नाहीं. आज चार वर्षें झालीं, इंग्लंड हा करार रद्द करावा अगर दुरुस्त करावा असें म्हणत नाहीं याचा अर्थ तो इंग्लंडला फायदेशीर आहे असा उघड होतो. ज्या वेळीं हा करार मान्यतेसाठीं मांडण्यांत आला त्या वेळीं यापासून देशाचा फायदा आहे किंवा नाहीं हें विचारांत न घेतां तो नुकसानकारक आहे कां, या चुकीच्या दृष्टीनें विचारांत आला. व्यापार फायद्यासाठीं करावयाचा असतो. व्यापाराकडे राजकारणी दृष्टीनें पाहूं नये म्हणतां तर साम्राज्यक सवलती ( Imperial Preferences ) याचा अर्थ एका देशाचें अधिराज्य व दुसरा गुलाम असाच होतो. यांत तरी राजकारण आहेच कीं नाहीं. हा करार सर्वस्वीं इंग्लंडचा व्यापार सुधारावा एवढ्याचसाठीं करण्यांत आलेला आहे. हा करार झाला नसता तर हिंदुस्थानचें नुकसान झालें असतें हें खरें नाहीं. जेव्हां वैद्य रोग्याला बरें करूं शकत नाहीं तेव्हां तोही असेंच म्हणतो कीं, माझें औषध घेतलें नसतें तर खात्रीनें हा रोग जास्त बळावला असता! १९३४ सालीं सभागृहानें कमिटी नेमली होती. त्यापैकीं नियोगी, सर अबदुल रहीम व सिताराम राजू यांनीं

आपल्या निवेदनांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, ( १ ) या कराराप्रमाणें इंग्लंडनें ज्या सवलती हिंदी शेतकी मालाला दिल्या त्यापासून हिंदी शेतकी मालाची निर्यात वाढली नाहीं किंवा जी करारापूर्वी कमी झाली होती तीही भरून निघाली नाहीं; उलट अन्य देशांशीं व्यापार कमी झाला. ( २ ) अन्य देशांतील व्यापार-पेठ कमी झाल्यामुळें जी निर्यात–व्यापारांत तुट येऊं लागली होती ती भरून निघाली नाहीं, जी १९३३–३४ सालीं, थोडीशी वाढ झालेली दिसते ती महत्त्वाची नाहीं. देशाची परिस्थिति सुधारत आहे असें त्यावरून वाटत नाहीं. ( ३ ) जगांतील अन्य राष्ट्रांकडे पहातां राष्ट्रांराष्ट्रांशीं करार करणें हेंच श्रेयस्कर आहे. वास्तविक १९३४ च्या ऑगस्टमध्यें हें निवेदन सरकारजवळ आलें त्यावेळींच सरकारनें हा करार रद्द करण्याची नोटीस कां दिली नाहीं ! हिंदी व्यापारी–संघानेंही हीच गोष्ट सरकारच्या नजरेस आणली. नोटीस दिली तर इंग्लंडची मर्जी व सद्भावना यांना हादरा बसेल असें सांगण्यांत येतें. धंदा करावयाचा, व्यापारी करार करावयाचा; येथें मर्जी व सद्भावना यांचा प्रश्न उद्भवतोच कोठें ? हा व्यवहार आहे. नोटीस दिल्याबरोबर इंग्लंड तडजोडीच्या वृत्तीचें होईल ( Negotiating Mind ); करारानें काय झालें तें पाहा. ( १ ) आळशी तेल, कातडीं, तंबाखू, कच्चें लोखंड यांची आयात इंग्लंडांत वाढली. पण हा माल इंग्लंडनें हिंदुस्थानापासून कमी घेतला व जी वाढ झाली त्याचा फायदा मात्र वसाहती व अन्य देश यांनीं लुटला ! ( २ ) तांदूळ, पेंड, शेंगदाणा, डाळी हा माल इंग्लंडनें या देशांपासून जास्त घेतला हें खरें पण या गोष्टींचा व्यापार अन्य देशांशीं कमी झाला हेंही तितकेंच खरें ! ( ३ ) कॉफी व तंबाखू यांना सवलत मिळूनसुद्धां त्यांच्या निर्यातींत वाढ झाली नाहीं. ज्या बाबतींत १० टक्के सवलत या देशाला दिली त्या वस्तु ज्या अन्य देशांतुन येत त्या राष्ट्रांनीं आपलीं चलनें घसरवून स्पर्धा कायम ठेवली व त्यामुळें या देशाला फायदा मिळाला नाहीं, इंग्लंड मधील तयार मालाला या देशांत कमी आयात कर घेऊन उत्तेजन मात्र मिळालें. अन्य देशांशीं इंग्लंडच्या मालाला टक्कर देतां येत नव्हती, ती देतां येऊं लागली. इंग्लंडला जीवदान मिळालें, एवढेंच या करारानें झालें! इंग्लंडनें आपला व्यापार सांवरला व कांहीं बाबतींत या करारानें वाढविलाही. या करारामुळें इंग्लंडनें साम्राज्यापुरतें राष्ट्रीय अर्थवादाचें धोरण स्वीकारून आंतरराष्ट्रीय व्यापाराला आळा घातला, व याचाच परिणाम म्हणजे जगभर प्रत्येक राष्ट्र आपआपल्या पुरतें पाहूं लागलें. आणि सर्वत्र आयात कर व संरक्षण यांचें युग सुरू झालें. हिंदुस्थानांतून ३ कोटी रुपयांचा

जास्त माल इंग्लंडला गेला तर एकंदर रु. २४ कोटींनीं परराष्ट्रीय व्यापार १९३३–३४ सालीं कमी झाला ही गोष्ट डॉ. मथाई यांनींही मान्य केली. अन्य राष्ट्रांनीं आपापला व्यापार सावरण्याकरितां ज्या कांहीं उपाययोजना केल्या त्यामुळें हें नुकसान आलें असें डॉक्टर म्हणतात. ओटावा करार–योजनेंत राष्ट्रीय अर्थवाद स्वीकारला गेला, साम्राज्यांत सवलतीचें धोरण स्वीकारलें गेलें म्हणून त्या देशांना, असें करणें भाग पडलें हें अगदीं स्पष्ट आहे. या करारामुळें हिंदुस्थानांतील कच्चा माल अन्य राष्ट्रें कमी घेऊं लागलीं. कारण त्यांचा पक्का माल हिंदुस्थानमध्यें जकात वाढल्यामुळें व इंग्लंडला सवलतीची जकात दिल्यामुळें कमी येऊं लागला. देवघेव ही उभयपक्षीं असते. त्यांच्या मालाचा खप इकडे कमी झाल्याबरोबर या देशाचा मालही ते कमी घेऊं लागले. थोडा जास्त माल इंग्लंडमध्यें खपला. पण एकंदरींत नुकसान मात्र या देशाचेंच झालें हें अमान्य करणें शक्य नाहीं. आळशीला मागणी वाढली असें सांगण्यांत येतें, पण त्याचें कारण १९३३–३४ मध्यें अर्जेंटाइन देशांत त्याचें पीक बुडालें म्हणून ही तात्कालिक वाढ झाली होती; पुढें ती राहिली नाहीं. व्यापाऱ्यांची बाजू घेऊन मी मांडत नाहीं. साधी कसोटी लावतो. यांत देशाचा फायदा झाला कां? जर नसेल तर करार रद्द झालाच पाहिजे!" मुलाभाईनंतर गौबा यांनीं 'प्रो. घोष यांच्या चोपड्याचा अनुवाद करून करार मोडूं नये, त्यांत सुधारणा करून घ्यावी' असें प्रतिपादिलें. मुंबईच्या हिंदी व्यापारी संघाचे प्रतिनिधी श्री. मथुरादास वसनजी यांनीं आपलें भाषण वाचून दाखविलें. पार्लमेंटमध्यें भाषणें वाचीत नाहींत पण येथें पूर्ण मुभा आहे. यापासून फायदे व तोटेही आहेत. वसनजी यांचें भाषण जवळजवळ प्रो. के. टी. शहा यांचीच विचारसरणी आहे असें सभागृहानें मानलें व लक्ष देऊन ऐकलें. त्यांनीं सांगितलें, वार्षिक व्यापारी रिपोर्ट, दोनतीन चौकशी कमिट्यांचे रिपोर्ट, अन्य सरकारी माहिती इतकी उपलब्ध आहे कीं, कराराचा व्यापारावर परिणाम काय झाला हें पाहाण्याकरितां आणखी कमिटी नेमण्याचें कारण नाहीं. त्यांनीं कराराचा तीन दृष्टींनीं विचार केला. (१) या देशाचा अन्य (साम्राज्याबाहेरील) देशांशीं असलेला व्यापार या करारामुळें बुडाला, ही तूट कराराच्या छत्रीखालीं असलेल्या साम्राज्यांतील देशांशीं झालेल्या व्यापारानें भरून निघाली नाहीं. (२) व्यापारी आढावा ज्या प्रकारामुळें अनुकूल असा असे त्यांत आतां विघातक असा फरक पडलेला आहे. (३) हिंदी उद्योगधंद्यांना सवलतीमुळें साम्राज्यांतील वसाहतींपासून व खुद्द इंग्लंडपासून अधिक

प्रतिकूल वातावरण उत्पन्न झालें. १९१८ नंतर हिंदुस्थानचा वस्तुगत परराष्ट्रीय व्यापार ( Stores and Merchandise ) सरासरीनें दरसाल रु. ५७३ कोटींचा होता. १९३४–३५ सालीं रु. २९३ कोटींचा होता, म्हणजे ५० टक्के घट झाली. यांत रुपयाची सोन्यांतील किंमत कमी झाली ही गोष्ट विचारांत घेतली गेली नाहीं, ती विचारांत घेतली तर ही घट आणखी झालेली आहे. अन्य राष्ट्रांनीं राष्ट्रीय अर्थवाद स्वीकारून संरक्षणाच्या तटबंदीमुळे हें घडलें असें म्हणणें सर्वस्वी खरें नाहीं. १९२९ च्या मंदाईच्या पूर्वीपासून हीं राष्ट्रें या धोरणानें कमी जास्त रीतीनें वागत आहेत. तथापि हा करार होईपर्यंत या देशांशीं असलेला हिंदुस्थानचा व्यापार कमी झाला नव्हता. १९३२ सालीं इंग्लंडनें संरक्षणाचें धोरण स्वीकारलें साम्राज्यांतील देशांनीं हिंदुस्थानला हा करार करण्यास भाग पाडलें, व त्याचाच परिणाम या देशाचा निर्यात व्यापार बुडाला. १९३१–३२ सालीं निर्यात व्यापार रु. १५७·६कोटी होता, तो १९३४–३५ सालीं रु. १५२·३९ कोटींपर्यंत घसरला. इंग्लंडमध्यें रुपये ५·८१ कोटींनीं जास्त माल या सालीं गेला, पण अन्य देशांत १०·४ कोटींनीं कमी झाला. तूट भरून आली नाहीं. सवलतीच्या वस्तूंची निर्यात १९३१–३२ सालीं रुपये ११०·९३ कोटींची होती, व १९३४–३५ सालीं रुपये ९४·४१ कोटींची झाली. यांतील खुद्द इंग्लंडमध्यें अनुक्रमें रुपये ३३·३ व ३६·७ कोटींची निर्यात झाली. उलट याच वर्षांत अन्य देशांत ही निर्यात अनुक्रमें रुपये ७७·७३ कोटी व रुपये ५७·७० कोटींची झाली. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे इंग्लंडशीं या करारामुळें रु. ३·४ कोटींनीं व्यापार वाढला पण अन्य देशांशीं मात्र रु. २० कोटींनीं घटला. सवलती नसलेल्या (Non-Preferred) वस्तूंच्या बाबतींत हाच अनुभव आहे. १९३१-३२ सालीं ही निर्यात ४६·६३ कोटींची होती. १९३४–३५ सालीं रु. ५७·९८ कोटींची झाली म्हणजे वाढली. ब्रिटनचा हिस्सा १९३१–३२ सालीं रु. ९·५८ कोटींचा यांत होता; आणि १९३४–३५ सालांत रु. ११·३६ कोटींचा झाला. अन्य देशांचा अनुक्रमें रु. ३७·०५ व रु. ४६·६२ कोटी झाला. यापासून एक गोष्ट स्पष्ट होते कीं, व्यापारवृद्धीसाठीं साम्राज्यांतर्गत सवलत-योजनेची या देशाला जरूरी नाहीं. अन्य देश संरक्षणाच्या बाजूनें असले तरी उद्योगधंदे चालविण्याकरितां या देशाचा माल ते घेतात. सामान्यतः व्यापारी आढावा अनुकूल असून इंग्लंडचें सर्व देणें वगैरे देऊन दरसाल हिंदुस्थानांत कांहीं ना कांहीं सोनें येई व व्यापाराची बाकी चुकती होई. हा

करार झाल्यापासून उलट परिस्थिति झाली. या देशांत सोनें येण्याऐवजीं बाहेर देशांत तें मोठ्या प्रमाणांत जाऊं लागलें. इंग्लंडला व्याजाबद्दल व गुलामीचा करभार म्हणून जी रक्कम द्यावी लागते ती द्यावयाची तर इतर देशांशीं निर्यात व्यापार वाढवून या देशाची बाकी राहिली पाहिजे. नुसता इंग्लंड व हिंदुस्थान यांतील मालाचा व्यवहार घेतला तरी इंग्लंडचाच माल येथें जास्त येतो. त्याची किंमत, व वर दर्शविलेलीं व्याजें, पगार, पेन्शन वगैरे बाबतचीं देणीं द्यावयाचीं म्हणजे मोठया प्रमाणांत व्यापारी आढावा अनुकूल पाहिजे, नाहींतर सोनें बाहेर धाडून बाकी चुकती केली पाहिजे. १९३२–३३ सालीं इंग्लंडची मालापोटीं बाकी रु. २·० कोटी होती. १९३२–३३ सालीं रु. ११·८ कोटी झाली व १९३४–३५ सालीं रु. ६·२ कोटींची होती. या करारामुळें इंग्लंडचाच माल जास्त येऊं लागल्यामुळें ही बाकी वाढली. उलट १९२९–३० सालीं जर्मनीवर या देशाची मालाबाबत बाकी रु. १० कोटी होती; तर १९३४–३५ सालांत जर्मनीची या देशावर रु. ३·१ कोटींची बाकी निघाली. नेदरलंडवर १९२९–३० सालीं रु. ४·९ कोटींची बाकी होती तर १९३४–३५ सालीं रु. १·२ कोटींची झाली. बेल्जमवर ५·४ कोटींवरून २·० कोटींपर्यंत आली. फ्रान्स रु. १२·२ कोटींपासून रु. ३·७ कोटींपर्यंत आली. जपानवर रु. ८·७ कोटींवरून रु. ३·३ कोटींपर्यंत आली. संयुक्त संस्थानें ( अमेरिका ) यांवरील रु. १८·६ कोटींवरून रु. ४·५ कोटीपर्यंत आली. यावरून एकंदर व्यापाराचें स्वरूप बदलून या देशाचें नुकसान झालें. १९२९–३० सालीं मालाची निर्यात रु. ३१०·८ कोटींची होती ती १९३४–३५ सालीं रु. १५१·२ कोटींनी झाली, म्हणजे ५२ टक्के घटली. आयात माल १९२९–३० सालीं रु. २३८·९ कोटींचा आला व १९३४–३५ मध्यें रु. १३१·१ कोटींचाच आला; म्हणजे ४५ टक्के घट बसली. इंग्लंडमधून १९२९–३० सालीं आयात माल रु. ४४·८ कोटींचा आला तर १९३४–३५ सालीं रु. ५३·७ कोटींचा आला; म्हणजे ह्यांत मात्र ३६ टक्के वाढ झाली !! इतर देशांतून हा माल रु. ६९·८ कोटींपासून रु. ६६·९ कोटींपर्यंत घटला; म्हणजे ५ टक्के घटला. या सगळयाचा अर्थ असा आहे कीं, इंग्लंडनें आपला व्यापार वाढविला. करार करूनसुद्धां जेथें माल स्वस्त मिळेल तेथें इंग्लंडनें तो विकत घेतला आणि या कराराचा फायदा घेऊन स्वतःच्या मालाला चांगली किंमत व हुकमी गिऱ्हाईक मिळविलें. याचा परिणाम आमच्या उद्योगधंद्यावर झाला. हिंदु-

स्थानच्या कच्च्या मालाला मोकळी व व्यापक बाजारपेठ मिळेनाशी झाली व इंग्लंडमधील पक्क्या मालाला स्पर्धा अधिक वाढली. या करारानें या देशाचा सर्वस्वी घात केला आहे. तो रद्द झालाच पाहिजे. शेठ गोविंददास यांनीं वसाहत मंत्री मि. टॉमस यांच्या भाषणांतील एक उतारा वाचून दाखविला. त्यांत त्यांनीं ओटावा करारामुळें इंग्लंडचा व्यापार सावरला, ९९ दशलक्ष पौंड किंमतीचा माल १९३२ सालीं वसाहती व हिंदुस्थान या देशांत निर्यात झाला, तो १९३४ सालीं १२४ दशलक्ष पौंडांपर्यंत गेला. आणि हें सर्व भाव कमी होत असतांना घडलें असें स्पष्ट म्हटलें आहे. या करारानें इंग्लंडचा निर्यात व्यापार सरासरीनें दरसाल २० दशलक्ष पौंडांनीं वाढला. हिंदुस्थानांत येणाऱ्या आयात मालाची पाहाणी केली तर असें आढळून येईल कीं, इंग्लंड व जपान यांनीं आपल्या व्यापाराची वाढ करून घेतली आहे. १९३१-३२ मध्यें ब्रिटनचा माल येथें येणाऱ्या एकंदर मालाच्या ३५·५ टक्क्यांनीं होता तो १९३४-३५ मध्यें ४०·६ टक्केपर्यंत वाढला. जपाननें २·६ टक्केवरून १५·७ टक्केपर्यंत प्रगति केली. बाकी सर्व देशांचें हें प्रमाण घटलें. जपानशीं व्यापार-करार झाला म्हणून ही वाढ झाली. निर्यात व्यापाराच्या दृष्टीनें पाहतां या देशांतून साम्राज्यांत जाणाऱ्या मालाचें प्रमाण १९३१-३२ सालीं ४४·२ टक्के होतें तें १९३४-३५ सालीं ४५·२ टक्के झालें. साम्राज्यांत व्यापार वाढीला जागा नाहीं व या करारामुळें बाहेरहि कठीण होऊन बसलें हें शेटजींनीं विशद करून सांगितलें.

प्रो. बानर्जी यांनीं "इंग्लंडमध्यें बिनसवलतीच्या मालाची जेवढी (३९·७) निर्यात वाढली तेवढी (७·५) सवलतीच्या मालाची वाढली नाहीं." असें सांगून, "इंग्लंड हें या कराराचा दुहेरी फायदा घेत आहे" असेंही सांगितलें. उलट येथें येणाऱ्या इंग्लंडमधील मालापैकीं सवलतीच्या मालाची वाढ ३४ टक्के झाली व बिनसवलतीच्या मालांत फक्त १४ टक्के वाढ झाली. यावरून जर करार केला नसता तर इंग्लंडनें आयात कर बसवून सूड घेतला असतां हें खोटें ठरतें. इंग्लंडला हिंदुस्थानचा माल घ्यावाच लागला असतां हें बिनसवलतीच्या माल खरेदीच्या वाढाव्यावरून स्पष्ट दिसतें. 'सूड घेतला असतां' असें मी म्हटलें नाहीं. व्यापार-मंत्री यांनीं खुलासा केला. प्रो. बानर्जी यांनीं तो मान्य केला. ते म्हणाले, 'करारामुळें व्यापार वाढला नाहीं; उलट या देशाचा व्यापार १९३४-३५ सालांत कमीच झाला. व्यापाराची बग बदलली. साम्राज्यांतील देशांशीं सवलतीनें

व्यापार करावयाचा याचा अर्थ मालाला पेठ कमी होणार व पेठ—गिऱ्हाईक—कमी झाली म्हणजे स्पर्धा कमी व त्यामुळें भाव कमी असें नुकसान होणार व झालेंहि. सवलतीमुळें तयार मालाच्या धंद्यावर जास्त परिणाम होतो ही गोष्ट ओटावा करार करण्याच्यावेळीं हिंदुस्थानच्या प्रतिनिधींनीं नजरेआड केली. त्याचा धंद्यावर परिणाम झालाच. हिंदुस्थान सर्व देशांशीं व्यापारी करार करण्यास स्वतंत्र पाहिजे. ओटाव्याच्या जोखडांत मान अडकवून घेतल्यामुळें या देशानें आपलें स्वातंत्र्य गमावलें आणि नुकसान करून घेतलें.

डॉ. बानर्जीनंतर सरकारी तज्ज्ञ डॉ. मथाई यांचें भाषण झालें. हे डॉक्टर नामांकित अर्थशास्त्रज्ञ, अनुभवी आंकडेपंडित व लोकप्रिय प्राध्यापक होते. सत्यमूर्ति, चेट्टियर संतानम् वगैरे बहुतेक मद्रासी सभासद त्यांचे शिष्य होते; असा हा गृहस्थ भाषणांस उभा राहिल्याबरोबर सर्व सभागृह उत्सुकतेनें भाषण ऐकण्यासाठीं सरसावलें. त्यांनीं आपली बाजू शांतपणें, न रागावतां, सुबोध व शास्त्रीय रीतीनें मांडली. किंचित् मिशनरी वृत्तीहि भाषणांत होती. भावनावश न होतां गुणदोषाच्या दृष्टीनें विचार करणें जरूर आहे असें सांगून ज्यावेळीं जगभर मंदाईचें तीव्र वातावरण होतें व सर्वत्र व्यापार बसला होता, त्यावेळीं साम्राज्यांतील देशांनीं एकत्र येऊन सुविचारानें व सामुदायिक रीतीनें प्राप्त संकट टाळलें, व्यापार सांवरला ही गोष्ट दृष्टीआड न करण्याविषयीं बजावलें. हा करार कांहीं देशांशीं व कांहीं वस्तूंबाबत झाला; त्यांत जें उद्दिष्ट होतें तें साध्य झालें कां ? हा मुख्य प्रश्न आहे व याच दृष्टीनें करार सुधारावयाचा कां रद्द करावयाचा याचा विचार केला पाहिजे. ज्या देशांशीं ज्या वस्तूंबाबत करार झाला त्या वस्तूंचा व्यापार त्या देशाशीं वाढला पाहिजे. हिंदुस्थानांतील सवलतींच्या वस्तूंची निर्यात इंग्लंडमध्यें वाढली आहे. यामुळें एकंदरीनें इंग्लंडचाच फायदा झाला या देशाचा कांहींही फायदा झाला नाहीं ही गोष्ट आंकड्यानें नाशाबित करतां येणार नाहीं हें खरें. हिंदुस्थानाचाही थोडासा फायदा झाला हीही गोष्ट कांहींना कबूल नाहीं. त्यांनीं टक्केवारी ( Percentage ) देऊन ही गोष्ट शाबित करावयाचा प्रयत्न केला आहे. टक्केवारीवर फारसा विश्वास ठेवणें धोक्याचें आहे असा अनुभव डॉक्टर मथाईंनीं सांगितला. 'मग असले आंकडे छापतां कशाला ?' असा डॉ. बानर्जी यांनीं प्रश्न विचारला. 'टक्केवारीनें विचार न करतां ऐन व्यापार कमी झाला या दृष्टीनें विचार करण्याचा आपला उद्देश आहे' असें डॉ. मथाई यांनीं त्यास उत्तर दिलें. "सवलतींच्या वस्तूंचा व्यापार वाढला व त्याचा

फायदा इंग्लंड व हिंदुस्थान या दोघांनाही झाला. सवलतीच्या वस्तूंचा अन्य देशांशीं निर्यात व्यापार ६५ टक्के आहे. तसेंच करारांत असलेल्या वस्तूंची आयात या देशांत अन्य देशांपासून ६० ते ६५ टक्के आहे, ही गोष्ट लक्षांत घेऊन हा करार करून निरनिराळे हितसंबंध जुळवून घेण्यांत आले." 'ही स्थिति आतां आहे कां?' असा प्रश्न डॉक्टरांना विचारण्यांत आला. "करारानंतर काय झालें हें लक्षांत घेऊन कराराच्या वेळच्या स्थितीवर विचार करणें हा अयोग्य मार्ग आहे." डॉ. मथाई म्हणाले. "मग तीन वर्षांत काय अनुभव आला याचा विचार न करतां त्या वेळच्या परिस्थितीचाच संबंध लक्षांत घेऊन आज विचार करावा असें तुमचें म्हणणें आहे कीं काय?" असा सरळ जिनांनीं प्रश्न केला. डॉ. मथाई गोंधळले. "त्यावेळीं करार योग्य असेल पण हा प्रश्न आज योग्य आहे कां? आलेल्या अनुभवानंतर योग्य आहे का?" याचें उत्तर डॉ. मथाई टाळूं लागले. जिनांनीं पुन्हां प्रश्न केला, 'आज या घटकेला या कराराबद्दल तुमचें मत सांगा?' करारांत समाविष्ट झालेल्या वस्तूंच्या व्यापाराबाबत हिंदुस्थानचा थोडासा फायदा झाला असें आपलें मत असल्याचें त्यांनीं सांगितलें. इंग्लंडचा फायदा जास्त झाला ही गोष्ट त्यांनीं अमान्य केली. व्यापाराची वग (Diversion) बदलली ही गोष्ट भ्रामक आहे. सवलतीच्या वस्तूंचा बाजार फक्त इंग्लंडशीं वाढला व अन्य देशांशीं कमी झाला तर करारापासून फायदा कांहींच झाला नाहीं असें म्हणावयाचें; मात्र जर इंग्लंडशीं व अन्य देशांशीं वाढला तर तो कराराचा परिणाम नव्हे असें म्हणावयाचें हें तर्कशुद्ध नाहीं. एकंदरींत व्यापार घटत असता हा करार झाला. या करारानें साम्राज्यांतील देशांचा व्यापार सांवरला व त्याचाच परिणाम म्हणून सर्व अन्य देशांशींसुद्धां व्यापार वाढला. अमुक गोष्टीमुळें अमुक झालें असें न म्हणतां एकंदर सर्व गोष्टींचा परिणाम म्हणून व्यापार वाढला हें म्हणणें जास्त श्रेयस्कर ठरेल. सवलतीच्या वस्तूंबाबत हिंदुस्थानची स्थिति स्पर्धेच्या दृष्टीनें ठीक नाहीं, व याचा विचार करतां सवलती मिळाल्या म्हणून या देशांचीं गिऱ्हाइकी राहिली. आळशी, शेंगदाणा, चहा, तागाचा तयार माल, या सर्वांबाबत स्पर्धा आहे. सवलतीमुळेंच हिंदुस्थानचा हा माल चांगला खपला, नाहींतर अन्य देशांशीं टक्कर देतां आली नसती. ज्या वस्तूंना सवलती नाहींत त्यांचाही व्यापार वाढला. खुद्द इंग्लंडशींही व्यापार वाढला. त्या सवलती करारांत नव्हत्या म्हणून करारानें कांहींही फायदा झाला नाहीं हें म्हणणें चुकीचें आहे. बिनसवलतीच्या वस्तूंबाबत—ताग, कापूस—हिंदुस्थानची स्थिति स्पर्धेच्या दृष्टीनें भक्कम आहे म्हणून वाढ झाली.

व्यापारी आढाव्याच्या दृष्टीनें नुसत्या दोन देशांतील व्यापाराचा आढावा लक्षांत न घेतां एक देश बिरुद्ध अनेक देश असा घेतला असतां व्यापाराची खरी परिस्थिति समजते. या दृष्टीनें विचार करतां करारामुळें व्यापार घटला असें म्हणतां यावयाचें नाहीं. व्यापाराचा विचार करतांना प्रमाण न पाहातां किंमत लक्षांत घेतली जाते. त्या दृष्टीनेंही व्यापार घटला नाहीं. १९३२–३३ व १९३४–३५ या दोन सालांत पदार्थांचे भाव सारखेच होते. पण १९२९ च्या मंदाईनंतर सर्वत्र भाव कमी झाले हें खरें आहे. त्यांतल्या त्यांत शेती-मालाचे भाव जास्त घसरले. या देशाचा मोठा व्यापार म्हणजे शेतीमालाचा आहे व आयात व्यापार तयार मालाचा आहे, व तयार मालाच्या किंमती, शेतीमालाच्या किंमतीपेक्षां कमी उतरल्या हें लक्षांत घेतां, एकंदर व्यापारी आढावा कां कमी झाला हें स्पष्ट होईल. तात्पर्य, जो मर्यादित उद्देश ठेऊन हा करार झाला तो लक्षांत घेतां, बऱ्याच प्रमाणांत करार सफल झाला असें म्हणतां आलें तर, करार रद्द करण्याचें कारण नाहीं. शिवाय वारंवार जकातीच्या धोरणांत फरक केल्यानें व्यापारांत अस्थिरता उत्पन्न होते व त्याची घडी बिघडते. शिवाय एकतर्फी नोटीस देऊन करार रद्द करणें म्हणजे नाराजी उत्पन्न करणें होय. करारांतील इतर कोणत्याही देशांनीं हा विचार मनांत आणलेला नाहीं." 'अहो, त्यांच्या बाबतींत ५ वर्षांची मुदत आहे. मुदत संपतांच तो आपोआप रद्द होतो' असें जिनांनीं पुन्हां बजाविलें. 'तीन वर्षें हा करार अस्तित्वांत आहे, त्यानें फायदा झाला आहे. तो रद्द करण्यापूर्वीं अनेकवार विचार करा' एवढी अखेरची विनंती करून डॉ. मथाई खालीं बसले. त्यांच्या शिष्यांनीं, मित्रांनीं व विरोधकांनींही त्यांचें अभिनंदन केलें. मनास न पटलें तरी गुणग्राहकता व्यक्त करण्याची परंपरा, सौजन्य सभागृहांत नेहमींच दाखविलें जाई व त्यामुळें राजकारणांतील तीव्र विरोध व कटुता यांना किंचित आळा बसे.

माझ्या दृष्टीनें थोडक्यांत, अत्यंत मुद्देसूद व एकदम पटणारें भाषण मतिन चौधरी यांनीं केलें. १९३२ सालीं ते कौन्सिलचे सभासद होते. त्या वेळेस काय झालें याची चांगली जाणीव त्यांना होती. सुरवातीस, त्यांनीं व्यापारमंत्रि यांचें भाषण भंपकपणाचें झालें नाहीं याबद्दल आनंद व्यक्त केला. १९३२ सालीं सभागृहापुढें हा करार मान्यतेसाठीं आला त्यावेळीं सर जोसेफ भोर, सर षण्मुखम् चेट्टी यांनीं जीं भरमसाट भाषणें केलीं व करार मान्य झाल्याबरोबर एकदम निर्यात व्यापार वाढेल, उत्पादन वाढेल वगैरे भविष्यें केलीं, त्याप्रमाणें झाफरउल्ला, यांनीं

कांहीं केलें नाहीं हें ठीक झालें असें सांगितलें. सर्व भविष्यें खोटीं ठरलीं, आशा विफल झाल्या, आलेल्या अनुभवानें शहाणे होऊन करार रद्द करणेंच योग्य आहे असें प्रतिपादिलें. नंतर प्रत्येक वस्तू घेऊन या करारानें तिच्याबर काय परिणाम झाला हें सांगण्यास त्यांनीं सुरवात केली. जोसेफ भोर यांच्या मतें चहाची निर्यात हा मोठा भाग आहे. त्याची त्या सालीं रु. २३ कोटींची निर्यात झाली. या करारानें सवलत मिळाल्यामुळें हा व्यापार वाढेल. करार मान्य न केल्यास जावा व सीलोन यांच्याशीं स्पर्धा करणें कठीण पडेल व निदान साडे सात लाख एकर जमीन चहाच्या लागवडींतून कमी होईल. वस्तुतः जावा व सिलोन यांची स्पर्धा नाहीं. प्रश्न जास्त चहा कसा खपेल हा आहे. जावा व सीलोन यांनीं खपाबाबत हिस्सेरशीचे करार केले होते. या हिस्सेरशीच्या करारांत ( Tea Export Restriction Scheme ) हिंदुस्थान १९३३ मध्यें सामील झाला व हिंदुस्थाननें किती चहा निर्यात करावा या बाबतींत बंधन घालून घेतलें. याचा सरळ अर्थ असा कीं, सवलतीचा फायदा कांहीही नाहीं व ही गोष्टही सरकारी रिपोर्टांत नमूद केली आहे. (The effects of the preference have been completely obscured by the introduction of the Tea Export Restriction Scheme, which came into operation in 1933. The object of preference was to increase the U. K. Market for Indian Tea. The object of the Restriction Scheme was to restrict the export of tea by arrangement arrived at by Chief Tea producing countries, both export and expansion of production of Tea was regulated.) या हिस्सेरशीच्या योजनेनें खपही वाढला नाहीं, उत्पादनही वाढलें नाहीं. रु. ४५ कोटींच्या मालाला करारानें सवलत मिळाली असें सांगण्यांत येतें. पैकीं रु. २३ कोटींच्या मालाला—चहाला—या करारापासून कांहीं फायदा झाला नाहीं हें उघड आहे. कॉफीच्या बाबतींत सवलत मिळून व्यापार वाढेल हें दुसरें भविष्यही खोटें ठरलें. १९३२ सालीं इंग्लंडमध्यें हिंदुस्थानांतून ५० हजार हंडरवेट कॉफीची निर्यात झाली. १९३३ सालीं ४५ हजार व १९३५ सालीं ३६ हजार हंडरवेट अशी ही निर्यात झाली. या करारानें कॉफीचा व्यापार वाढला नाहीं. आळशीच्या लागवडीस १९१३–१४ सालीं ५० लाख एकर जमीन होती. १९३२ सालीं ३० लाख एकराची लागवड होती. भोर साहेबांनीं सांगितलें कीं, ओटावा करारानें सवलत मिळून निदान १० लाख एकर अधिक लागवड होईल

व एकरीं रु. १० नफा धरला तर निदान एक कोटी रुपये हिंदी शेतकऱ्यांच्या खिशांत पडतील. वस्तुस्थिति अशी आहे. १९३१–३२ मध्यें या पिकाच्या लागवडीस जमीन ३३,०९,००० एकर होती; १९३२–३३ सालीं ३२,९९,००० झाली, १९३३–३४ सालीं ३२,५७,००० झाली व १९३४–३५ सालीं ३३,८१,०२२ इतकी झाली. १० लाख एकर अधिक लागवड व एक कोटी रुपये नफा हें सर्व शेखमहंमदी स्वप्न ठरलें!! आळशीची निर्यात १९३३–३४ सालीं ९ हजारांपासून १,४०,०००, हजारपर्यंत वाढली, पण याचें कारण त्या सालीं अर्जेंटाइनमधील पीक बुडालें हे आहे. अन्य जी वाढ झाली ती करारांतील व कराराबाहेरील देशांतील येथें झालेल्या निर्यातीनें झाली. हा परिणाम खास या कराराचा नाहीं. आळशीच्या तेलाबद्दल भोर व चेट्टी यांनीं या करारामुळें वाढ होईल असें सांगितलें. ' इंग्लंडमध्यें हें नऊ दशलक्ष पौंड खपतें. अशी ही फायद्याची बाजार पेठ पंधरा टक्के जकातीची सवलत मिळेल तर सर्वस्वी हिंदुस्थानच्या ताब्यांत येईल. ' असें या दोघांनीं सांगितलें होतें. १९३२–३३ सालीं १४,७७, ००० गॅलन हें तेल इंग्लंडमध्यें धाडण्यांत आलें. १९३४–३५ मध्यें हें प्रमाण ७,४३,०००वर आलें. करारांतील सामील देश १९३२ मध्यें हा माल ६५ टक्के घेत असत, तो माल १९३४–३५मध्यें ४५ टक्क्यांवर आला. तीच स्थिती अन्य वनस्पतींच्या तेलाबाबत आहे. इंग्लंडची बाजारपेठ काबीज करण्याचा या तऱ्हेचा इतिहास आहे!! गव्हाबाबत,पंजाब व सिंध येथें उत्पादन वाढेल व मणामागें चार आणे सवलत मिळाल्याबरोबर दहा लाख टन गहूं हा देश निर्यात करूं शकेल आणि कॅनडा व ऑस्ट्रेलिया या देशांशीं टक्कर देऊं शकेल, असें त्या वेळीं सांगण्यांत आलें होतें. आतां खुद्द सरकार म्हणतें कीं, '१९३४ च्या पीक नियोजन परिषदेनें (Crops Planning Conference) किती तरी वर्षें हिंदुस्थानांतून गहूं निर्यात करणें शक्य नाहीं ' असा अभिप्राय दिला आहे " अशा परिस्थितींत सवलतीचा फायदा काय झाला हें सांगणें कठीण ! ( In the circumstances the value of preference is entirely problematic. ) कांहीं वस्तूंबाबत व्यापार वाढला, पण त्याचबरोबर बिनसवलतीच्या वस्तूंचाहि व्यापार वाढला आहे. उलट सवलतीच्या वस्तूंचा व्यापार अन्य देशांशीं मात्र कमी झाला आहे १९३०–३१ सालीं सवलतीच्या वस्तूंचा व्यापार अन्य देशांशीं रु. १०५ कोटींचा झाला. तो कमी होत होत रु. ५० कोटींवर १९३४–३५ मध्यें आला. हें करारामुळें झालें हें जरी सर्वस्वीं खरें

नसलें तरी एक गोष्ट मात्र खरी कीं, त्यांचा माल जर हिंदुस्थान घेणार नाहीं तर हिंदुस्थानचा माल ते तरी कां घेतील ? करारामुळें इंग्लंडची व्यापारी पकड या देशावर वाढली, इंग्लंडांतील व्यापाऱ्यांनीं स्पर्धा करूं नये म्हणून व हिंदुस्थान केवळ व्यापारी दृष्टीनें इंग्लंडच्या ताब्यांत राहावा म्हणून हा करार झाला हें उघड आहे. अन्य देशांवरही या गोष्टीचा परिणाम झाला. आमची गिऱ्हाइकी बुडाली. एकंदरींत हा करार अनिष्ट ठरला म्हणून तो रद्द व्हावा हेंच इष्ट."

मतिन चौधरी यांचें भाषण जितकें मुद्देसूद व सुबोध झालें त्याच्याविरुद्ध अबदुल्ला हरून यांचें झालें. ते ओटाव्याला प्रतिनिधी होते. त्यांना अनेकांनीं प्रश्न विचारून बेजार केलें. ते बरेच रागावले आणि 'सभागृहानें, राजकारणाच्या दृष्टीनें विचार न करतां व्यापारी दृष्टीनें विचार करावा' एवढें सांगून ते खालीं बसले ! अविनाश लिंगम् चेट्टी यांनी भाषणास सुरवात केली. "परकी राष्ट्रांना सवलती देणें म्हणजे त्या राष्ट्रांतील उद्योगधंद्यांना सवलती, संरक्षण, देणें हाच त्याचा अर्थ होतो. या सवलतीनें मात्र स्वतःच्या राष्ट्रांतील उद्योगधंद्यांना स्पर्धा निर्माण होते हें उघड होतें. संरक्षण म्हटलें कीं ग्रिगसाहेब गिऱ्हाइकांची बाजू घेतात व त्या संरक्षणामुळे पदार्थ महाग होतात मग सवलतीनें जकात घेतली तरी तेंच होतें ! ! शिवाय देशाचें जकातीपासून जें नुकसान होतें तें निराळें ! सवलतीमुळें जकात कमी घेतली गेली त्याचा फायदा एकंदरींत एक कोट रुपये जकात कमी मिळण्यांत झाला. पूर्वींचे दर असते तर एक कोट रुपये आयात कर जास्त आला असता, हें उघड नुकसान या करारापासून झालें. ओटावा कराराबाबत एक प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ सर ऑर्थर साल्टर म्हणतात. "The only true criterion of success, let us remember, for 'Ottawa' is whether or not it results in an increase of total volume of trade, imperial, internal and external together in the total mass of profitable interchanges. To change the direction without increasing the total of our trade is no success. To increase one section at the expense of greater loss, direct or indirect elsewhere would be a failure." याप्रमाणें जर एकंदर व्यापार वाढला असेल तर करार यशस्वी ठरेल. नुसती वग बदलून एका देशाशीं वाढला पण दुसऱ्या देशाशीं कमी झाला तर करार अयशस्वी ठरेल. हीच कसोटी योग्य आहे. मात्र हिंदुस्थानाच्या बाबतींत ते ही कसोटी लावण्यास तयार नाहींत.

नुसता हिंदुस्थानचा माल इंग्लंडमध्यें जास्त खपला असेल व अन्य ठिकाणीं कांहीही झालें असलें तरी हा करार यशस्वी झाला अशी त्यांची विचारसरणी घातकी व स्वार्थी झाली. १९३१–३२ सालीं एकंदर १६१ कोटींची निर्यात व १२६ कोटींचा आयात व्यापार या देशाचा होता व शिवाय रु. ३५ कोटींचा अनुकूल व्यापारी आढावा होता. १९३४–३५ सालीं रु. १५५ कोटी व रु. १३२ कोटींचा हा व्यापार झाला व रु. २३ कोटी अनुकूल व्यापारी आढावा राहिला; म्हणजे रु. १२ कोटींनीं हा आढावा कमी झाला. ही साक्ष कराराच्या यशाची खास नव्हे! कराराबाहेरील देशांनी निरनिराळीं बंधनें स्वसंरक्षणार्थ घातली. १९३४ सालीं सभागृहाच्या कमिटींतील अल्पमतवाले—ज्यांत खुद्द सभागृहाचे अध्यक्ष सर अबदुल रहीम होते, त्यांनीं आपल्या भिन्न मतपत्रिकेंत स्पष्ट म्हटलें आहे कीं, अन्य देशांशीं व्यापार कमी होत आहे व तो वाढवावयाचा असेल तर ह्या सवलती संपुष्टांत आणल्या पाहिजेत. अन्य देशांनीं उघड-उघड प्रतिरोध केला काय अगर आपल्या देशांतील आयात-निर्यात जुळवून घेतली काय त्याचा परिणाम या देशाचा त्यांच्याशीं असलेला व्यापार कमी झाला हे खरें; या देशाचा व्यापार हा करार राहिल्यानें आणखी घटणार आहे. आळशीच्या बाबतींत इंग्लंडच्या युक्त्या लोकांना नीट कळल्या नाहींत. साम्राज्या बाहेरील देशांतून येणाऱ्या आळशीवर जकात टनामागें ७० शिलिंगपासून १०० शिलिंगा-पर्यंत वाढविली व याचा फायदा हिंदुस्थानला झाला असें सांगण्यांत येतें. पण वस्तु-स्थिति अशी आहे कीं, ७० शिलिंग जरी जकात होती तरी हें तेल निरनिराळ्या वस्तु—शाई, वॉर्निश, रंग वगैरे—करण्यांत खर्च केले म्हणजे ४०' शिलिंग जकात परत मिळे (Drawback), ही गोष्ट या सभेने हा करार मान्य केला तेव्हां सभेला माहीत नव्हती. जकात १०० शिलिंग झाली त्यावेळीं परत मिळण्याचें प्रमाण ६० शिलिंगपर्यंत नेलें. एकंदर तेलापैकीं साठ टक्के तेल अन्य पदार्थ तयार करण्याकडे इंग्लंड खर्च करतें व त्यामुळे दिलेली जकात वर लिहिल्याप्रमाणें परत मिळते. याचा परिणाम हिंदुस्थानच्या आळशीला इंग्लंडमध्ये मागणी वाढली नाहीं. जकात परत देण्याच्या पद्धतीमुळें मिळालेल्या सवलतीचा या देशाला फायदा झाला नाहीं.

नंतर जकातखात्यांतील मुख्य अधिकारी मि. लाइड यांनीं भाषणास सुरवात केली. कांहीं मालावर ५० टक्के जकात होती ती सवलतीनें १० टक्के कमी झाली आणि सवलतीपासून विशेष नुकसान झालें नाहीं. ओटावा करारामुळें कांहीं वस्तूंना सवलतीची जकात देण्यांत आली. त्या बहुतेक वस्तूंवर पूर्वीं किंमतीच्या

२५ टक्के जकात होती. करारानंतर ती ३० टक्के करण्यांत आली व दहा टक्के सवलत देण्यांत आली, म्हणून नुकसान झालें नाहीं. सवलतीमुळें ब्रिटिश माल जास्त आला हें खरें पण तो चांगला व टिकाऊ होता. १९३२-३३ सालीं मोटारीपासून जकातीचें उत्पन्न रु. ६४ लाख होतें तें १९३४-३५ मध्यें १.०२ कोटी झालें. पूर्वीचे दर कायम व दहा टक्के सवलत अशीहि स्थिती कांहीं वस्तूंच्या बाबतींत होती हें खरें आहे. पण बहुतेक वस्तूंच्या बाबतींत जकातीचे दर वाढवून मग १० टक्के सवलत देण्यांत आली व या रीतीनें नुकसान न येईल अशी खबरदारी घेण्यांत आली. या गोष्टी सभागृहाच्या टॅरिफ बिलाच्या कमिटीनेंच केल्या. करारामुळें जकातीचें नुकसान झालें हें म्हणणें निर्विवाद नाहीं. करार नसता तर काय झालें असतें हें सांगणें कठीण आहे." 'करारामुळें जकातीच्या उत्पन्नांत कांहींहि नुकसान झालें नाहीं असें तुमचें मत आहे कां?' अणे यांनीं प्रश्न केला. "तसा पुरावा नाहीं, नुकसान झालेंच नाहीं असें विधान मी करीत नाहीं! ज्या वस्तूंवर करारामुळें पूर्ण परिणाम झाला, ज्यांवर थोडा झाला, ज्यांवर जकातीच्या दृष्टीनें कांहींही झाला नाहीं, असे तीन भाग केले तर, पुढीलप्रमाणें परिस्थिती आढळून येते. १९३२-३३ सालापेक्षां १९३३-३४ सालांत पहिल्या भागांत जकातीचें उत्पन्न सव्वा टक्क्यानें वाढलें, दुसऱ्या भागांत ५ टक्क्यांनीं कमी झालें व तिसऱ्या भागांत २३ टक्क्यांनीं कमी झालें. अर्थात् या तीन भागांतील विभागणी निर्दोष नाहीं. तथापि करारामुळें ज्यांच्या दरांत फरक झाला त्या वस्तूंच्या जकातीचें उत्पन्न वाढलें. १९३२-३३ सालीं रु. १७.३० कोटी होतें तें १९३४-३५ सालीं रु. १९.७१ कोटी झालें. १९३२-३३ सालापैकीं तीन महिनेच सवलतीची जकात होती आणि १९३४-३५ सालांत निव्वळ ज्यांच्या दरांत फरक झाला आहे अशाच वस्तूंच्या जकातीचें उत्पन्न रु. १३.४७ कोटी होतें. ज्यांच्या दरांच्या बाबतींत करारानें बिलकुल फरक झाला नाहीं त्यांचें उत्पन्न १९३३-३४ सालीं रु. १९.४१ कोटी होतें तें १९३४-३५ सालीं रु. २१.२६ कोटी झालें. यांतून साखरेवरील जकातीचें उत्पन्न वगळलें आहे. निदान यावरून तरी उत्पन्न कमी झालें असें म्हणतां येणार नाहीं. जकातींत जी सवलत मिळाली ती सर्व व्यापाऱ्यांनीं खिशांत टाकली असें मला वाटत नाहीं. थोड्या किंमतीवरून व्यापाऱ्यांनीं गिऱ्हाइकी वाढविली असली पाहिजे. निदान तो हेतू मनांत धरून करारांतील योजना ठरविण्यांत आली होती. सवलतीमुळें संरक्षण इंग्रज व्यापाऱ्यांना मिळालें, व त्यामुळें हा एक कराराचा बोजा हिंदी गिऱ्हाइकांवर

असला असें म्हणणें चुकीचें आहे." इंग्रज व्यापाऱ्यांची ही अधिकाऱ्यामार्फत तरफदारी संपल्यानंतर, मि. जेम्स हे सरसावले. "युरोपियन व्यापारी संघानें करार दुरुस्त करावा, परंतु टाकावूं म्हणून रद्द करूं नये, अशी भूमिका घेतल्याचें सांगितलें जर १० टक्के सवलत हिंदी निर्यात व्यापाराला इंग्लंडमध्यें मिळाली नसती, तर वाईट स्थिति झाली असती. इतर देशांशीं जरी व्यापार कमी झाला असला तरी इंग्लंडशीं वाढला हेंच कराराचें यश आहे असा आग्रह धरला. जागतिक मंदीमुळें कांहीं बाबींत कराराच्यावेळीं केलेल्या अपेक्षा सफल झाल्या नाहींत हें खरें; पण त्याला कारण जगांतील चलनांत झालेले फरक, हुंडणावळींतील अस्थिरता, राष्ट्रीय अर्थवाद, भावाची चढउतार हे आहेत. ह्या गोष्टींमुळें करार झाला, करारामुळें ह्या गोष्टी झाल्या नाहींत. 'इंडियन फॉयनॅन्स' या पत्रांत संपादकानें स्पष्ट म्हटलें आहे कीं, करारामुळें अन्यदेशांनीं सूडबुद्धीनें हिंदी माल बंद केला, अगर कमी केला असें म्हणणें अज्ञानमूलक, अगर अप्रामाणिकपणाचें आहे. मला वाटतें अज्ञानामुळें लोक हा करार रद्द करा असें म्हणत आहेत. समजा, करार रद्द केला, त्याच्या जागीं काय ठेवणार आहात; कांहीं योजना आहे कां? निदान कॉंग्रेसजवळ नाहीं. हा पक्ष विध्वंसक आहे. शेट वसनजींची सूचना भोंगळ आहे. जिनांच्या उपसूचनेंत करार रद्द करा, व नंतर तपासणी करून देशादेशांशीं करार करा असें आहे. पण रद्द करा हें आहे; कारण कॉंग्रेसचीं मतें त्यांना हवीं आहेत. कॉंग्रेसची वेशभूषा चोरण्यांत ते पटाईत आहेत!! करार रद्द करून विचार करण्यांत किती वेळ जाईल याची त्यांना कल्पना नाहीं; मध्यंतरीं व्यापार बुडेल. प्रत्येक देशांशीं करार करून, व्यापारी मेळ घालणें ( Bilateral Agreement ) ही एक प्रथा आहे; पण ही प्रथा घातुक आहे. २२ देशांतील शें. ७२ टक्के व्यापार या पद्धतीनें होत आहे, व या मुळेंच जगांतील आंतरराष्ट्रीय व्यापार आकसला आहे. मी त्याविरुद्ध आहे; पण कोणतीही योजना निर्विकारपणें तपासण्यास तयार आहे. करार दुरुस्त करा. करारामुळें तयार माल सवलतीनें वसाहतींतून व या देशांतून इंग्लंडमध्यें जावूं लागला आहे. इंग्लंडच्या तसल्या तयार मालावर मात्र येथें आयात जकात आहे व तेथें मात्र माफी अगर नाममात्र आयात जकात आहे ही परिस्थिति झाली आहे. इंग्लंडमधील व्यापारी याबद्दल तक्रार करीत आहेत. करार रद्द केलात कीं, तयार मालावरही तेथें आयात जकात बसेल. या देशाचें नुकसान होईल. दुरुस्तीच्या दृष्टीनें विचार करणार नाहीं, बोलणीं करणार नाहीं, असें ब्रिटननें कधीं तरी म्हटलें आहे कां? मग रद्द कर-

ण्याचा हट्ट कां? काँग्रेसची सूचना म्हणजे वळलेली मूठ आहे व ती ब्रिटनच्या नाकावर मारण्याचा त्यांचा उद्देश आहे, असें म्हणण्यांत कांहीं चूक होणार नाहीं. ( The Congress motion is a clenched fist, and the object is the face of Great Britain. Make no mistake about their attitude. ) मूळ कराराच्या वेळीं हिंदी व्यापाऱ्यांनीं ओटावा परिषदेवर बहिष्कार टाकला होता. निवडणुकीच्या वेळीं या करारांत, साम्राज्यशाहीचा जय आहे असें भासविलें; आतांही कमिटीवर काम करण्यास हा पक्ष तयार नाहीं. त्यांना चौकशी नको; काय झालें हें पहावयाचें नाहीं. त्यांना करार बुडवावयाचा आहे. जिना थोडेसे समजूतदार दिसतात पण ते फसतील. काँग्रेस पक्षाला जहाजच बुडवावयाचें आहे. जिनांना तेंच करावयाचें आहे. मात्र जहाज बुडल्यानंतर जवळ असलेला रबरी ओंडका (Life Buoy) भर समुद्रांत ठेवून त्यावर बसावयाचें आहे !! जगांत व्यापार घटत आहे. अशा परिस्थितींत जो देश हिंदी व्यापाराला उत्तेजन देत आहे, त्याचीच पेठ नाहींशी करावयाची ही मुत्सद्देगिरी नव्हे, योग्य राजकारणही नाहीं, चांगले डावपेंचही नाहींत, शुद्ध मूर्खपणा आहे !!" युरोपियन गटानें टाळया वाजविल्या, पण भाषणाचा परिणाम सरकारी ठरावाविरुद्ध अधिक तीव्र झाला. मि. जेम्ससाहेब चांगला कोटिक्रम करून वाईट शेवट करतात, हाच अनुभव पुन्हां एकदा आला.

मि. जेम्सनंतर श्री. सत्यमूर्तींची सरबत्ती सुरू झाली. इंग्लंड व्यापार बंद करील ही एक गप्प आहे. करारामागें लोकमत किती होतें याचा पुरावा ओटाव्याचे शिलेदार सर षण्मुखं चेट्टी, यांच्या पराभवानें मिळालाच आहे. कराराच्या पूर्वीच ब्रिटननें आयात जकात बसविण्याचें धोरण स्वीकारून ठराव केला होता; व ब्रिटनच्या योजनेंत हिंदुस्थान न आल्यास जकात वाढविण्याची धमकी दिली होती. या स्थितींत, चर्चा करून, मोकळेपणानें देवाण-घेवाण करून, हा करार झाला हें म्हणणें खोटें आहे. करारानंतर सभागृहाच्या कमिटीनें येथील येणाऱ्या आयात मालाचें परिशिष्ट तपासलें नाहीं. त्याचा येथील उद्योगधंद्यावर काय परिणाम होईल हें पाहिलें नाहीं; लोकमत अजमावलें नाहीं. खुद्द कमिटी असें म्हणतें कीं, (" **They had no sufficient time to examine fully that part of the Agreement which deals with preferences on imports into India, yet this is at least as important a part of the Agreement as the**

preferences on our Exports, and one which was causing great uneasiness in Commercial and Industrial circles, as well as amongst the general public throughout the country.") निर्यात मालाला सवलती देवून इंग्लंडनें आपला तयार माल, ज्याचें गिऱ्हाईक कमी होत होतें, त्याला येथील पेठ, सवलती घेवून कायम केली. येथील उद्योगधंद्यांना स्पर्धा उत्पन्न केली. गिऱ्हाइकांसाठीं, उपभोगी वर्गासाठीं (Consumers) अश्रू ढाळतां! काय त्यांच्यासाठीं केलें? भाव पडले, ते सुधारण्यासाठीं काय केलेंत! भाव पडलेले आहेत, ते सुधारत नाहींत, याचा अर्थ या करारानें परिस्थिति सुधारली नाहीं, असा नाहीं कां! १६३ आयात वस्तूंना सवलती मिळाल्या याचा परिणाम त्या त्या वस्तूंच्या येथील उत्पादनांवर झाला नाहीं असें कसें म्हणतां येईल! तसा परिणाम होईल असें १९३४ सालीं सर मोदी म्हणत होतें, आतां ते बदलले आहेत. आतां ओटाव्याच्या सुरांत गावूं लागले आहेत. व्यापारमंत्री सर भोर म्हणाले व्यापारवृद्धी ही खरी कराराच्या यशाची कसोटी आहे. डॉ. मथाई म्हणतात कीं, व्यापाराची वग बदलली यांत कांहीं अर्थ नाहीं, हें चूक आहे;" "अहो, तुमचे ते गुरू नां!" कोणीसे बोलले. "होय, म्हणूनच माझी विचारसरणी अगदी योग्य आहे"–टोला मारून सत्यमूर्ति म्हणाले, "सवलतीच्या योजनेमुळें ब्रिटननें जास्त फायदा मिळविला. योजना नसती तर ब्रिटनचेंच नुकसान झालें असतें, या देशाचें नाहीं. सवलतीच्या वस्तूंचा निर्यात व्यापार या देशाचा रु.४१ कोटींचा व आयात व्यापार रु. १७ कोटींचा आहे असें सांगण्यांत येतें. इंग्लंडमध्यें निर्यात, या वस्तूंची वाढली, ती वाढ रु. २६ लाखांची आहे. पण अन्य देशांत ही निर्यात रु. ५॥ कोटींनीं त्याच वर्षीं कमी झाली. वटव्यापाराच्या दृष्टीनें, व्यापारवृद्धीच्या दृष्टीनें, करारामुळें व्यापार वाढला नाहीं. कराराची वकिली मी करीत नाहीं कोणीही करूं नये, देशाची करावी. देशाच्या दृष्टीनें काय झालें हें पाहिलें पाहिजे. आकड्यांत कांहीं अर्थ नाहीं, असें सोयीस पडेल तेव्हां सांगण्यांत येतें. कृष्ण असत्यें, शुभ्र असत्यें, त्याचप्रमाणें आकड्यांतील असत्येंही असतात. युक्तीनें ते आकडे जमवून वाटेल तें सांगता येतें. वादविवाद, चर्चा करून, शेवट कांहीं नाहीं." उमरखयाम यांचे चरण थोडे बदलून सत्यमूर्ति म्हणाले, "जेव्हां जेव्हां संशय येई। मोदी मथाई यांची ग्वाही। विवाद चर्चा तत्त्व प्रणाली। जेथुन जाई तेथून येई॥" इंग्लंडमधील एकंदर आयात व्यापारापैकीं, ५ टक्के

व्यापारांवर हिंदुस्थानला सवलती मिळाल्या; उलट हिंदुस्थाननें आपल्या आयात व्यापारांपैकीं, इंग्लंडला सवलत मिळाली, तो व्यापार ४० टक्के आहे. करार झाला नसता तर, कांहीं बिघडलें नसतें. लोखंड व पोलादाबाबत करार झाला, त्यानें ब्रिटिश धंद्यांचाच फायदा झाला. 'मोदी लीज' करारानें मोदींचें नांव अमर झालें पण देशाचें नुकसान झालें; आम्हीं ब्रिटनच्या विरुद्ध आहोंत असा आरोप आहे, पण त्यांत काय गैर आहे! आमचें नुकसान न होतां जर इंग्लंडचा फायदा होत असेल तर आमची ना नाहीं. अन्य देशांनीं आपापला आयात निर्यात व्यापार जुळवून घेतला, व त्यायोगें या देशाचा वटव्यापार खचला. अन्य देशांनीं प्रतिकार केला नाहीं, या म्हणण्यांत अर्थ नाहीं इंग्लंड आमच्या मालावर बहिष्कार घालूं शकणार नाहीं, आयात जकातही वाढवूं शकणार नाहीं. नुसत्या दमाला भिण्यासारखें हें सभागृह तरी खास नाहीं. व्यापारी गिऱ्हाईक, कर भरणारें, यापैकीं कोणाचाही फायदा या करारानें झाला नाहीं. यांत राजकारण नाहीं, हा धंदा आहे, फायदा होत नाहीं, उलट नुकसान झालें म्हणून हा करार रद्द होणें जरूर आहे. मैत्री व सद्भावना यांना येथें जागा नाहीं. हा व्यवहार आहे व व्यवहाराच्या दृष्टीनेंच तो केला पाहिजे."

डॉ. डिसोझा हे सरकारनियुक्त सभासद, सेवानिवृत्त आय. सी.एस., कॉफीची लागवड करणारे, १९३२ सालीं या कराराला पाठिंबा देणारे, सभासद होते. यावेळीं त्यांनीं आपला विरोध जाहीर करतांच टाळ्या पडल्या. १९३४ च्या सभागृह कमिटींत ते होते. कमिटीच्या रिपोर्टांत स्वतंत्र मतपत्रिका लिहून, त्यांनीं या करारामुळें दक्षिण हिंदुस्थानांतील तांदूळ, खोबरें, कॉफी यांचा व्यापार पार बुडाला म्हणून स्पष्ट म्हटलें होतें. सयाममधून येणाऱ्या तांदुळावर जकात बसवावी म्हणून, सीलोनमधून येणाऱ्या नारळांवर व खोबऱ्यावर सवलतीची जकात असूं नये म्हणून, त्यांनीं टाहो फोडला; पण हिंदुस्थानांतील तयार मालाला सयाम व सीलोन हे गिऱ्हाईक असल्यामुळें, उद्योगधंदेवाल्यांनीं, वजन मारून, हें होऊं दिलें नाहीं. औद्योगिक फायदा झाला, पण शेतीमालाचा व्यापार बुडाला, व विशेषतः मलबारांत बिकट परिस्थिति झाली. साम्राज्यांतर्गत सवलतीच्या योजनेंत, जर हिंदुस्थान जाईल, तर आपलें आर्थिक स्वातंत्र्य गमावील, ही लॉर्ड कर्झनची भविष्यवाणी खरी झाली. डॉ. डिसोझा यांनीं आपल्या भाषणांत, आपले तांदूळ, कॉफी, नारळ यापासूनचें उत्पन्न नाममात्र झालें, व योजनेला पाठिंबा दिला, व परिणाम आपली

शिल्लक झपाट्यानें कमी झाली, अशी तक्रार केली. बटव्यापार कां वाढला ही कसोटी त्यांनीं लावली. १९३१-३२ सालाशीं तुलना करून, त्यांनीं सांगितलें कीं, " १९३२-३४ सालीं इंग्लंडशीं व्यापार रु. ३·१८ कोटींनी वाढला, पण अन्य देशांशीं ( साम्राज्याबाहेरील ) रु. १४·७७ कोटींनी कमी झाला. १९३४-३५ सालीं इंग्लंडशीं रु.३·४१ कोटींनी वाढला, पण अन्यदेशांशीं रु. १८·९३ कोटींनी कमी झाला. इंग्लंड जास्त घेवूं शकेल, पण घेत नाहीं, याचें कारण वसाहतींत व दक्षिण अमेरिकेतील संस्थानांत ब्रिटिश भांडवल शेतींत गुंतलें आहे म्हणून साहजिक तेथील माल घेणें इंग्लंडला योग्य वाटतें. त्या त्या देशांशीं इंग्लंडचा निर्यात व्यापार असल्यामुळें तसें करणें जरुर होतें. या दक्षिण अमेरिकेंतील संस्थानांशीं व्यापारी तह करतांना व सवलती देतांना, हुंडणावळीचा विचार इंग्लंडनें केला नाहीं. हुंडणावळीमुळें त्यांना आणखी फायदा मिळतो. या देशांनीं व कॅनडा, ऑस्ट्रिया, न्यूझीलंड यांनीं आपलें चलन घसरवून, निर्यात व्यापाराला चालना दिली आहे, तो वाढविला आहे. करारामुळें वसाहतींनीं इंग्लंडशीं आपला व्यापार वाढविला आहे. इंग्लिश भांडवलवाले या देशाचा निर्यात व्यापार वाढविण्याच्या विरुद्ध जबर प्रयत्न करतात." डॉ.डिसोझा यांनीं नंतर उदाहरणें दिलीं. "१९३४ सालीं, तंबाखूची आयात, इंग्लंडमध्यें २८ दशलक्ष पौंडांनीं वाढली; परंतु ही सर्व जादा तंबाखू ऱ्होडेसा, नियासालॅंड, व अमेरिका यांची खरेदी केली. हिंदुस्थानांतून उलट तीन लक्ष पौंड कमीच घेतली. मोहरी १९३४सालीं, इंग्लंडनें २,२५,००० हंडरवेट जास्त घेतली. जादा माल ब्रिटिश मलाया. अन्य वसाहतींतून व डच वसाहतींतून घेतला. हिंदुस्थानांतून ७,००,००० हंडरवेट कमीच घेतला. तीच स्थिति १९३५ सालीं आळशीची झाली. ६५,००० टन या देशाचा माल कमी घेतला व १०,००० टन माल अर्जेन्टाईनपासून जास्त घेतला. जकात परत देण्याच्या पद्धतीमुळें, अर्जेंटाइनचा माल जास्त खपला. मेजर हील, हे पार्लमेंटचे सभासद, अर्जेंटाईनमधील आळशीचे मोठे व्यापारी आहेत, व त्यांनीं उघड उघड तेथून येणाऱ्या आळशीवर जकात असावी असें प्रतिपादिलें. कॉफीची तीच कथा आहे. हा स्वतःच्या जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. १९३२-३३सालीं कॉफीची निर्यात इंग्लंडमध्यें ५२,००० हंडरवेट होती, सालोसाल कमी होत होत १९३५ च्या ९ महिन्यांत ती२९,०००हंडरवेटपर्यंत आली." "पण एकंदर खप इंग्लंडमध्यें वाढला आहे." मि. जेम्स पुटपुटले. " १९३२सालापेक्षां १९३४ सालीं इंग्लंडमध्यें लोक कॉफी जास्त

पिकूं लागलें हें मान्य; पण याचा अर्थ इंग्लिश गृहिणींना अभिरुचि आली एक-दाच होईल; ब्रिटिश व्यापाऱ्यांनीं आमचा माल जादा घेतला असें होत नाहीं. केनिया व ब्रिटीश ईस्ट आफ्रिका येथील कॉफीची निर्यात वाढली. इंग्लंडचें मार्केट हिंदी कॉफीला हळूंहळूं बंद होऊं लागलें. अन्य देशांतील गिऱ्हाइकीही कमी झाली. कॉफी उत्पन्न करणारांत येथें युरोपियन भांडवलवाले आहेत, त्यांनीं आम्हास मदत करून हें सुधारलें पाहिजे. कराराच्या वेळीं इंग्लंडमध्यें हिंदी कॉफीची गिऱ्हाइकी ४॥ कोटी रुपयांनीं वाढेल असें चित्र व्यापारमंत्री यांनीं काढलें होतें. अनुभव असा आला कीं, कांहीं लाखांचें जें गिऱ्हाईक तेथें होतें तेंही थोड्याच दिवसांत संपलें ! ! कॉफीच्या मळ्यांच्या फाटकावर ' ओटावा ' लिहून तें पडीक ठेवणें प्राप्त होईल. मी सरकार-नियुक्त आहे. माझी निष्ठा द्विविध आहे. माझा समाज व नेमणारें सरकार यांत हितविरोध उत्पन्न झाला तर माझें कर्तव्यकर्म समाजाच्या हिताच्या बाजूनें मत देणें, हें आहे." त्यांना आणखी बोलावयाचें होतें पण वेळ संपला म्हणून बसावें लागलें. डॉ. डिसोझा यांच्या भाषणाचा फार परिणाम झाला. ते तळमळीनें बोलत होते. श्रीमान होऊं म्हणून यांनीं कराराला पाठिंबा दिला होता. संपत्ति व व्यापार यांचा क्षय हा कराराचा अनुभव त्यांना मिळाला. परीस म्हणून घेतला व मारक दगड ठरला. मोठ्या पदावर न्यायाधीश म्हणून निर्विकार बुद्धीनें त्यांनीं काम केलें होतें. अनेक निकाल दिले होते. येथें भावना, राग, अश्रू, तळमळ यांच्या कल्लोळांत आपलें मत सरकारविरुद्ध जाणार हें त्यांनीं सांगितलें. प्रेक्षकांच्या गॅलरींत बसलेल्या त्यांच्या सुविद्य पत्नीला त्यांचें भाषण पटल्याचें त्यांच्या चर्येवरून दिसून येत होतें. करारामुळें त्यांच्या कितीतरी आकांक्षा धुळीला मिळाल्या असतील !!

डॉ. डिसोझा यांच्यानंतर, सर ब्राईस बर्ट हे शेतकी संशोधन खात्याचे अधि-कारी बोलले. कॉफीच्या निर्यातीबाबत ते असें म्हणाले कीं, " कॉफी इंग्लंडला जाते व बंदरांत पडून राहते. जेवढी इंग्लंडमध्यें प्रत्यक्ष खपली तिचें प्रमाण वाढलें आहे. १९३२ सालीं एकंदर खप इंग्लंडमध्यें २०,१३५ टन झाला. पैकीं हिंदुस्थानची कॉफी १,२६९ टन खपली. १९३४ सालीं हे आकडे १८,४५१ टन व १,५०९ टन अनुक्रमें आहेत. कोस्टारिका येथील कॉफी मात्र वाढत्या प्रमाणाबर खपली. कॉफीला सवलतीमुळें विशेष फायदा झाला असें नाहीं. केनियाची कॉफी ही जबरदस्त स्पर्धा करते. सर्वच कॉफीवाले अधिक सवलती इंग्लंडकडे मागत आहेत. तंबाखूच्या बाबतींतही तंबाखू बंदरांत पुष्कळ महिने राहते. प्रत्यक्ष हिंदुस्थानां-

तील तंबाखूचा खप इंग्लंडमध्यें १९३१ पासून १९३४ पर्यंत ९·१, ९·४, ९·५, ९·६ दशलक्ष पौंड झाला. नाममात्र वाढला, पण कमी झाला नाहीं, हें ही लक्षांत ठेवलें पाहिजे !! शिवाय हिंदी तंबाखू फक्त चिलमीच्या उपयोगीं असते; विड्यांना तिचा उपयोग नाहीं. तसली तंबाखू जर निर्यात केली तर, जास्त गिऱ्हाइकी मिळेल. सवलतीमुळें निदान ९ दशलक्ष पौंड तंबाखू खपते हा कांहीं लहान फायदा नाहीं. हिंदी शेती मालाची निर्यात इंग्लंडमध्यें फारशी वाढली नाहीं, उलट सवलतींचा फायदा, अन्य वसाहतींनीं मिळविला व आपला व्यापार वाढविला हें विधान खरें नाहीं. चहा, कापूस, कमावलेलीं कातडीं, तयार तागाचा माल या सर्व बाबतींत हिंदुस्थानची निर्यात अन्य वसाहतींपेक्षां इंग्लंडमध्यें जास्त वाढली आहे. कापसाच्या गांठी १९३३ सालीं १,३,३००० खपल्या तर १९३५ सालीं ४,१४,००० खपल्या. अन्य वसाहतींच्या गांठी १९३२सालीं २,०२,००० खपल्या व १९३५ सालीं २,३२००० खपल्या; म्हणजे त्यांची निर्यात जवळ जवळ कायम राहिली· डॉ.डिसोझा म्हणतात त्याप्रमाणें हुंडणावळीचा फायदा अर्जेन्टाईनला झाला नाहीं· १९३३, १९३४, १९३५ या सालांत मुंबईला आळशीचे भाव सरासरीनें ११ पौं. ७ शि. ६ पे, ११ पौं. १७ शि. ६ पे.व ११ पौं. १८ शि. ० पे, असे होते. तर अर्जेंटाईनमध्यें ९ पौं. १५ शि. ० पे., १० पौं. २ शि. ० पे. ९पौं. ८ शि. ० पे. असे होते. यावरून हुडणावळ धरून १३॥ टक्के अधिक सवलत अर्जेन्टाईनला मिळाली असें धरलें तरी तेथें भाव सुधारले नाहींत. हिंदुस्थानांतून जाणारी आळशी इंग्लंडला पुरी पडत नाहीं, म्हणून दुसऱ्या देशांतील घेवून जकात परत दिली तरी त्यायोगें हिंदी मालांवर परिणाम होण्याचें कारण नाहीं. अडीच कोटी रुपयांचा तागाचा तयार माल इंग्लंडमध्यें निर्यात होतो त्यावर जकात नाहीं. उलट अन्यदेशांतून येणाऱ्या या मालांवर २० टक्के जकात आहे. तात्पर्य करार रद्द करून या सवलती घालविणें योग्य नाहीं. कांहीं सवलतींचा फायदा अजून दिसावयाचा आहे. घाई करणें अविचाराचें आहे. कमिटींत साधकबाधक चर्चा होईल, अधिक माहिती मिळेल व नंतरच सभागृहानें वाटल्यास करार रद्द करण्याची नोटीस द्यावी.” बी. दास यांनीं हिंदी व्यापारी संयुक्तसंघाची ( Federation of Indian Chambers of Commerce ) विचारसरणी मांडली. हिंदी व्यापारी अन्य देशांशीं अगर ब्रिटीश वसाहतींशीं व्यापार करूं नये असे म्हणणारे नाहींत. करार रद्द करून इंग्लंड, वसाहती व अन्य देश यांच्याशीं व्यापारी तह करण्याच्या दृष्टीनें बोलणीं सुरू करा-

बीत असें त्यांचें स्पष्ट मत त्यांनीं मांडलें आहे. " जिनांच्या उपसूचनेंत तें प्रविष्ट केलेलें आहे. ब्रिटिश सरकारनें या कराराबाबत हिंदुस्थान सरकारला काय हुकूम दिलेले आहेत ते सरकारनें सांगावें. करार रद्द झाला तर काय होईल ? असा किती व्यापार या देशाचा इंग्लंडशीं आहे ! उलट करारानें इंग्लंडशीं असलेला व्यापार फारसा वाढला नाहीं, अन्य देशांशीं मात्र कमी झाला. आम्हांला अन्य-राष्ट्रांशीं करार करतां येत नाहींत हें दुर्दैव आहे. वसाहती करूं शकतात. जर्मनीनें आपला व्यापार अदलाबदलीवर आणला आहे व ही परिस्थिति १० वर्षें तरी राहील असें डॉ. शाख्टचें मत आहे. नेहमीं हिंदी माल जर्मनींत अधिक जाई व व्यापारी आढावा या देशाचा अनुकूल असे. खुद्द हिंदुस्थानचें ट्रेड कमिशनर श्री. गुप्त म्हणतात कीं, करारानंतर हें उलट झालें. हिंदी कच्चा माल जर्मनी घेईनासें झालें व यामुळें आढावा हिंदुस्थानच्या बाबतींत प्रतिकूल झाला. जर्मनीशीं स्वतंत्र करार कां केला नाहीं ? ओटावा करार करूनसुद्धां इंग्लंड जर्मनीशीं करार करूं शकतें व व्यापाराची जुळवाजुळव करतें. मग या देशाला तो हक्क कां नाहीं ? खुद्द सर अबदुल रहीम–आणि तें कॉंग्रेसवाले नाहींत—यांनीं स्वच्छ म्हटलें आहे कीं, परस्परांच्या हितसंबंधांत जुळणारे व्यापारी करार राष्ट्राराष्ट्रांशीं करण्याचें धोरण सर्वत्र स्वीकारलें जात आहे. या स्थितींत हिंदुस्थाननें तें स्वीकारणें जरूर आहे. करार करून या देशानें आपलें व्यापारी स्वातंत्र्य घालविलें आहे. करारानें हिंदुस्थानचा फायदा झाला व इंग्लंडचें नुकसान झालें असें म्हणणारेही महाभाग या सभागृहांत आहेत ! ! खुद्द इंग्लंडचे येथील ट्रेड कमिशनर म्हणतात, ' करारांतील सवलतींमुळें इंग्लंडचा व्यापार सांवरला व कांहीं बाबतींत जगाचा व्यापार कमी होत असतां इंग्लंडचा वाढला.' कराराबाबत हिंदी व्यापाऱ्यांना विचारलें कां ? करार करतेवेळीं तर जुमानलें नाहींच, आतां अनुभवानें तरी सरकार शहाणे होईल कां ? हिंदुस्थान सरकार हें इंग्लंडचें मुनीम म्हणून वागतें हें अयोग्य आहे. "

जोशी यांचें म्हणणें साम्राज्य विषयक सवलती व साम्राज्य हा एक घटक या दोन अनिष्ट तत्त्वांवर हा करार आधारला असल्यामुळें तो अग्राह्य आहे. साम्राज्यांतीलच देशांचा व्यापार वाढावा या दृष्टीनें हा करार करण्यांत आला. वास्तविक जागतिक व्यापार मंदींत असतांना तो वाढविण्याचा प्रयत्न करण्याऐवजी तो कमी करण्याचाच हा प्रयत्न होता. जागतिक व्यापाराची वाढ संरक्षणाच्या तटबंदी रद्द करून अगर कमी करूनच होणार होती हें तत्त्व सर्वमान्य असून, सर्व राष्ट्रांनीं आयात

जकाती कमी करण्याऐवजीं वाढविल्याच. इंग्लंड हें प्रादेशिकदृष्टया लहान म्हणून संपूर्णपणें स्वावलंबी होणें शक्य नाहीं हें लक्षांत घेऊन साम्राज्य हा एक घटक करण्यांत आला. या रितीनें साम्राज्य जगाच्या व्यापाराच्या दृष्टीनें एक राष्ट्र झालें, एक संघटन झालें. त्याचा परिणाम घातुक झाला. या देशाला अधिक घातुक झाला. व्यापार मंदावला, उद्योगधंदे तेजींत येवूं शकले नाहींत. जगाच्या दृष्टीनें असे गट होणें इष्ट नाहीं. शांतताभंग होण्यास हें कारणीभूत होणें अनिवार्य आहे. जगांतील कच्चा माल पद्धतशीररितीनें वाटला गेला तर शांतता नांदेल असें सर सम्युएल होअर म्हणतात. हा करार म्हणजे त्या योजनेप्रमाणें झालेला एक प्रयत्न आहे. या करारामुळें १९३३ सालीं झालेली जागतिक आर्थिक परिषद अयशस्वी झाली. मोठी व विस्तृत पेठ असणें हें केव्हांहि व्यापारवृद्धीला चांगलें. हिंदुस्थानला या करारामुळें फक्त साम्राज्यांतीलच पेठ राहिली. हिंदुस्थान स्वतंत्र असतां तर त्यानें बिकट परिस्थितींत चलन निर्मूल्य करून निर्यात व्यापार वाढविला असता. अन्यदेशांनी तें केलें. नवीन घटनेंत इंग्रज व्यापाऱ्यांकरितां संरक्षकबंधनें आहेत. मात्र हिंदुस्थानच्या व्यापाराचें संरक्षण करण्याकरितां कांहींहीं नाहीं. या करारापासून प्रत्यक्ष फायदा झाला असें सरकारी सभासदही म्हणत नाहींत, नुकसान झालें नाहीं असें भिनतवारीनें म्हणत आहेत. कराराला नुसती नुकसान–निवारक किंमत (Insurance Value) आहे. येवढयाच कारणाकरितां आम्ही आमचा तात्त्विक विरोध सोडणें युक्त नाही. डॉ. झियाउद्दीनचें गणित उलटया रितीनें होतें. दरसाल रु. ७० कोटी इंग्लंडला हिंदुस्थाननें द्यावयाचें असतात. निदान इतका व्यापारी आढावा इंग्लंड–हिंदुस्थानच्या व्यापारांत हिंदुस्थानला अनुकूल पाहिजे. म्हणजेच ही रक्कम दरसाल आदा होणार. जर हें होत नसेल तर सोनें घालून फेड करणें प्राप्त आहे. महायुद्धांपूर्वी १९१३–१४ सालीं हा आढावा रु.७८कोटींचा होता. पुढें तो रु. ७६ कोटीवर आला. १९३१-३२ सालीं रु. ३४ कोटींवर आला. १९३२-३३ सालीं रु. ९ कोटी, १९३३-३४ सालीं रु. ३३ कोटी व १९३४-३५ सालीं रु. २१ कोटी होता. हा आढावा कमी झाल्यामुळे सोन्याची निर्यात वाढली. १९३४-३५ सालीं रु. ६१ कोटींचें सोनें गेलें व रु. २१ कोटींचा माल आला. आढावा वाढविण्यासाठीं व्यापार वाढविणें जरूर आहे व म्हणूनच ओटावा करार करण्यांत आला. त्यानें थोडासा वाढला आहे व त्याचदृष्टीनें कराराचा विचार होणें जरूर आहे.”

सर गिरजाशंकर वाजपेयी हे सरकारी अधिकारी नंतर बोलले. हे विद्वान

गृहस्थ आहेत. व्यासंगी आहेत, बोलण्यापूर्वी अनेक सभासदांबरोबर त्यांनी खाजगि चर्चा केली होती. 'सर्व्हंट ऑफ इंडिया' या पत्रांत प्रि. गाडगीळ यांची या कराराबाबत लेखमाला येत होती. मीच ती लिहीत आहे असा त्यांचा समज होता, व त्या दृष्टीनें ते माझ्याबरोबर चर्चा करूं लागले तेव्हां, प्रथम ते माझे लेख नव्हत असें सांगून नंतर आमची चलनविषयक दृष्टीकोनाबाबत दोनचार दिवस चर्चा झाली. पक्षाच्या सभेंत शेवटच्या दिवशीं मी व पंडित पंत यांनीच बोलावें व मी चलनविषयक दृष्टीनें कराराच्या परिणामाची छाननी करावी असें ठरलें होतें. मजशिवाय आणखीहि सभासदांशीं त्यांनीं चर्चा करून भाषणाची संपूर्ण तयारी केली होती. ते अस्खलित बोलतात. पण भाषा बरीच बोजड असते. व्यापक दृष्टीकोन ठेवून तपशिलाबरोबर तात्त्विक चर्चाही करितात. त्यांचें भाषण ऐकण्यास सभागृह नेहमीच उत्सुक असतें, ठरावाची चर्चा अविश्वासाच्या व भावनेच्या वातावरणांत होत आहे व जें वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे तेंही भावनापूर्ण आहे अशी तक्रार प्रथम त्यांनीं केली. आपण निर्विकार मनानें मांडणी करणार असून हिंदुस्थानचें हित साधलें कीं नाहीं, याच दृष्टीनें विचार करणार असल्याची ग्वाही दिली. सवलतीच्या वस्तूंची नामावली एका श्लोकांत रचून भाषणाच्या शुभकार्यास त्यांनीं मदत करावी अशी प्रार्थना मिल्टन कवीच्या काव्यपंक्तींत बदल करून केली व काव्याचें अंगही आपणांस आहे असें दर्शविलें. तीन प्रश्न त्यांनीं विचारार्थ मांडले. ( १ ) ओटावा करारानें हिंदुस्थानचें प्रत्यक्ष नुकसान झालें कां ? निदान पुढे होणार आहे कां ? ( २ ) अपेक्षेप्रमाणें व गरजेप्रमाणें हा करार फायदेशीर झाला कां ? ( ३ ) राष्ट्राराष्ट्रांशीं अलग अलग करार करून ( Bilateral Agreements ) जिना म्हणतात त्याप्रमाणें हिंदुस्थानचा व्यापारी आढावा वाढेल कां? करारामुळें किंचित सुधारत असलेली हिंदुस्थानची गिऱ्हाइकी साम्राज्याबाहेरील अन्य देशांनीं हिंदी माल घेण्याचें धोरण स्वीकारल्यामुळें कमी झाली, हिंदी व्यापाराची पेठ मर्यादित झाली असा आरोप नलिनीरंजन सरकार यांचा आहे. सत्यमूर्ति एकंदर व्यापार कमी झाला असें म्हणतात. संयुक्त हिंदी व्यापारी संघ त्याच्याहीपुढे जाऊन असें प्रतिपादितो कीं, आंतरराष्ट्रीय व्यापाराची व हिशोबाची तोंड मिळवणी करणें भाग आहे म्हणून जर्मनी, इटाली, फ्रान्स या देशांनी प्रतिरोधी उपाययोजना, न कळत कां होईना करण्यास सुरवात केली. इटाली व फ्रान्सनें तर आपआपल्या साम्राज्यापुरतें ब्रिटिशांचें अनुकरण करून, सवलतीच्या योजना अमलांत आणल्या. हें सर्व खरें असेल

तर करार अयोग्य आहे हें मान्य. पण व्यापार या देशांशीं कमी झाला याचें कारण अन्य परिस्थिति, चलनविषयक अस्थिरता हेंही असूं शकेल. १९३४–३५ सालच्या आर्थिक पहाणीचा रिपोर्ट राष्ट्रसंघानें प्रसिद्ध केला आहे. कर्जनाकारणी, आयातीवरील निर्बंध, व्यापाराची वग बदलणें या कारणांमुळे सर्वसामान्यपणे जे व्यापारी व आर्थिकसंबंध कच्चा माल धाडणाऱ्या व तो घेवून पक्का माल तयार करणाऱ्या देशांत असतात त्यापासून जर्मनी दुरावला. ( The policy of debt default, import restrictions and redirected trade, has in effect, eleminated Germany from the chain of normal trade and financial transactions connecting the debtor rawmaterial countries with their industrial creditors. ) १९२९ सालापासून जर्मनीनें जकाती वाढविण्यास सुरवात केली. १९३० सालीं जकातीच्या बाबतींत युरोपांतील राष्ट्रांनीं कांहीतरी तडजोड करावी अशी सूचना राष्ट्रसंघानें दिली. जर्मनीनें आणखी जकाती वाढविल्या. १९३१ मध्यें हुंडणावळ नियंत्रित केली. १९३४ सालच्या मे महिन्यामध्ये जर्मनीजवळ एकंदर देण्याच्या ४ टक्केसुद्धा सोनें व परदेशी हुंड्या मिळून नव्हते. १९३०-३१ सालीं जें परकी भांडवल जर्मनींत आलें त्याच्या एकदशांश १९३४ मध्यें आलें. हें सर्व चलनविषयक अस्थिरतेमुळें जर्मनीला करावें लागलें व त्याच कारणाकरितां आयात व्यापार कमी करावा लागला, निर्बंध घालावे लागले. करारामुळे जर्मनीशीं व्यापार कमी झाला हें म्हणणें चूक आहे. आपला एकंदर व्यापार हुंडणावळीच्या दृष्टीनें जुळावा म्हणून जर्मनीनें निर्बंध घालून कमी केला, त्याच कारणाकरितां फ्रान्स व इटालीनें या देशाशीं व्यापार कमी केला. राष्ट्रसंघाच्या सदरहू आर्थिक पहाणीच्या रिपोर्टांत असें स्वच्छ म्हटलें आहे कीं, सुवर्ण–परिमाण ( Gold Standard ) कायम ठेवण्याच्या उद्योगांत १९३४ सालांत युरोपमधील कांही राष्ट्रांना फटके बसले. युनायटेड स्टेटसमधील भांडवलवाल्यांचें युरोपमध्यें गुंतलेलें भांडवल परत जाऊं लागलें. डॉलरची किंमत कमी झाल्यानें अमेरिकेचा निर्यात व्यापार वाढला, यामुळे आंतरराष्ट्रीय हिशोबाची बाकी चुकवितां चुकवितां सुवर्ण–परिमाण ठेवूं इच्छिणाऱ्या राष्ट्रांची तिरपीट झाली. म्हणून आयात मालावर निर्बंध लादून कांहींतरी परिस्थिति सुधारण्याचा त्यांनी प्रयत्न केला. चलनविषयक परिस्थिति भावापुरती व बाह्यता जरी ठीक वाटत असली तरी आर्थिक परिस्थिति या राष्ट्रांची सारखी खालावतच चालली होती. ( The technical monetary position of the Goldblock

countries was strong, but their economic position was weak and became weaker. By tightening their trade restrictions, imports could be heavily reduced and the strain of their balance of payments relieved). या सर्व देशांतील आयात व्यापार वरील परिस्थितींत कमी झाला. फ्रान्सचा १९३४ सालांत १९ टक्के घटला. नेदर्लंडसचा १४ टक्के घटला. हिंदी माल या देशांत एकंदर आयात व्यापाराच्या ३ टक्केपेक्षां क्वचितच जास्त होता. उलट या देशांत युनायटेड स्टेटसच्या आयात व्यापाराचें प्रमाण १२–१५ टक्के होतें, व तें कमी व्हावें म्हणून या राष्ट्रांना आयात मालावर निर्बंध घालावे लागले. हुंडणावळीची अस्थिरता, चलनविषयक अस्थिरता, व आर्थिक अडचणीमुळें या देशांनीं निर्बंध घातले, ओटावा करारामुळे नव्हे. हीं कारणें जर खरीं नसतील तर दुसरीं कोणतीं कारणें आहेत हें चौकशी करून सांगितलें पाहिजे. यासाठी तरी ठराव सभागृहानें स्वीकारावा. नुसता करार रद्द करा येवढयानें जबाबदारी पार पडत नाहीं. करारामुळें या देशाचें नुकसान झालें नाहीं असें माझें मत आहे, करारानें अपेक्षिलेला फायदा झाला कां? नलिनीरंजन सरकार म्हणतात, करारानें परदेशाचीं देणीं देण्याला पुरेल इतका अनुकूल व्यापारी आढावा व्यापार वाढवून दरसाल राहील असें वाटलें होतें तें झालें नाहीं. राष्ट्रसंघाचा पहाणी रिपोर्ट म्हणतो, १९३४–३५ सालांत शेती-मालावर अवलंबून असणारे धंदे—विशेषतः कापडाचें—वाढले नाहींत. व्यापारांत जी वाढ दिसून येते ती विशेषतः उभारणीच्या व पोलाद लोखंडादिक धंद्यांतच (Heavy and Constructional Industries). खुद्द इंग्लंडमध्यें पत वाढवून जें उत्तेजन व्यापारवृद्धीसाठीं दिलें त्याचा परिणाम बांधकामाची वाढ व ज्या धंद्याचें उत्पादन इंग्लंडमध्येंच खपलें, त्या धंद्याची वाढ होण्यातच झाला व निर्यात वस्तूंच्या धंद्यांत वाढ होऊन निर्यात व्यापार वाढेल ही आशा विफल झाली. ही परिस्थिति सर्वत्र असतां करार झाल्याबरोबर व्यापार आपोआप वाढावयास पाहिजे होता हें म्हणणें बरोबर नाहीं. जगभर व्यापार वाढला असतां तर हिंदुस्थानचाही वाढला असता. ज्या राष्ट्राची चलनविषयक परिस्थिति अस्थिर आहे, हुंडणावळीची स्थितिही बेताबाताची आहे त्या राष्ट्राशीं अलग करार करून व्यापार वाढला असतां हें म्हणणें पटत नाहीं. जर्मनीनें इंग्लंडशीं अलग करार केला. जर्मनी जेवढा माल इंग्लंडला धाडील त्याच्या ५५ टक्केच माल इंग्लंडनें जर्मनीला धाडावा असें त्यांत ठरलें. तुर्कस्थाननें इंग्लंडशीं करार केला त्यांत इंग्लंडनें ७० टक्के माल धाडावा असें ठरलें. पण हे करार तरी

हुंडणावळीची स्थिति पाहूनच इंग्लंडला करावे लागले. समजा, असे करार या देशानें जर्मनी, फ्रान्स वगैरे राष्ट्रांशीं केले तर त्याचा परिणाम येवढाच होईल कीं, इंग्लंडपासून जो पक्कामाल—तयार माल—येथें येतो त्या ऐवजी तो या देशांतून येईल; यांत व्यापारवृद्धी कोठें आहे ? देशांतील क्रयशक्ती जोंपर्यंत वाढत नाहीं तोंपर्यंत आयात-निर्यातही व्यापार वाढणार नाहीं. या परिस्थितींत अस्थिर हुंडणावळ असणाऱ्या देशांशीं अलग अलग करार करून व्यापार वाढणार नाहीं. जगभर व्यापार वाढला तर येथेंही वाढेल. साम्राज्य हा एक घटक धरून ही योजना केली होती असा आक्षेप जोशी यांनीं घेतला पण तो चूक आहे. इंग्लंडमध्यें तयार होणारा माल साम्राज्यांत पूर्णपणें खपेल अशी स्थिति कधींही नव्हती. साम्राज्य स्वयंपूर्ण करण्याचें धोरण इंग्लंडच्या हिताचें नाहीं. इंग्लंडला विस्तृत पेठ हवी आहे, अवश्य आहे, पेठ मर्यादित करणें हितावह नाहीं. 'पेठ मर्यादित केल्यास व्यापाराची पेठ बदलतें. भावावर व्यापार न आधारला जातां सोयींवर व अदलाबदलीवर त्याची मदार राहाते. ही परिस्थिति आली म्हणजे गरजवंत राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्राच्या पातळीबरोबर येवून जुळवून घ्यावें लागतें. पदार्थांचे भाव जगभर उतरतात, व्यापार खचतो. कांहीं राष्ट्रांच्या मालाला गिऱ्हाईक नसतें अगर कमी होतें व त्यामुळें वाटेल त्या किंमतीस माल विकावा लागतो व जीं रिणको राष्ट्रें आहेत त्यांची परिस्थिति बिकट होते. हुंडणावळीवर नियंत्रण येतें व कसा तरी माल काढून टाकण्यासाठीं करार करावे लागतात, हें जें सदरहू आर्थिक पाहाणीच्या रिपोर्टांत म्हटलें आहे तें योग्य आहे. असले अलग अलग करार केले म्हणजे हे परिणाम होतात." "ओटावा करार त्याच जातीचा नाहीं कां !" असा पंतजींनीं प्रश्न केला. "होय" वाजपेयी यांनीं उत्तर दिलें. "मग तो त्याज्यच आहे," पंडितजी म्हणालें. "ओटावा करार त्या प्रकारचा आहे म्हणून त्याज्य ठरवून तुम्हीं पुन्हां तसलेच करार करणार म्हणतां हें तर्कशुद्ध आहे कां ? उलट हिंदुस्थानच्या निर्यात व्यापारांपैकीं २५ टक्के इंग्लंडशीं आहे व फक्त १९ टक्के फ्रान्स, जर्मनी, बेल्जम व इटालीशीं आहे. हा करार रद्द करणें याचा अर्थ इंग्लंडशीं फक्त करार नको, अन्य देशांशीं अलग अलग करार चालतील." "सर्व देशांशीं आम्हीं करूं." सत्यमूर्तींनीं सुचविलें. "अलग अलग करारांनीं व्यापार वाढणार नाहीं. जगांतील प्रमुख राष्ट्रांचीं चलनें स्थिर झाल्याशिवाय व्यापार वाढणार नाहीं, असें सेंट्रल बँक ऑफ इंटर नॅशनल एक्सचेंजेसचें मत आहे, व त्याचप्रमाणें आपलें आहे," असें

वाजपेयी यांनीं सांगितलें. " ही चलनविषयक स्थिरता धनको राष्ट्रेंच आणूं शकतील व या दृष्टीनें पाहातां येथील चलन स्थिर करण्याचें श्रेय इंग्लंडच घेवूं शकेल. करार रद्द करण्यापूर्वी करार करणाऱ्यां पक्षांत विचारविनिमय होणें इष्ट आहे. भुलाभाई करार रद्द करा असा सल्ला देतात कारण करार रद्द झाला म्हणजे वकिलांचें काम वाढतें व प्राप्तीही होते ही दृष्टी त्यांची आहे. अनेक मतें व दृष्टीकोन या महत्त्वाच्या प्रश्नाबाबत आहेत ते सर्वांनीं बसून विचार विनिमय करुन मिटवावेत, घाईनें करार रद्द करणें हें अयोग्य आहे."

वाजपेयी यांचें भाषण विचारार्ह झालें. त्यांच्या भाषणांतील मुख्य सूत्र चलनविषयक अस्थिरतेमुळें व हुंडणावळीच्या अडचणींमुळें अनेक राष्ट्रांनीं व्यापार मर्यादित केला हें होतें. हें जर खरें मानलें तर ओटावा करारानेंच हिंदुस्थानच्या एकंदर व्यापारावर प्रतिकूल परिणाम झाला असें म्हणणें बरोबर नव्हतें. वास्तविक ओटावा योजना हीच मुळीं, असलें व्यापारबंदीचें, आयातजकात वाढविण्याचें धोरण सर्वत्र स्वीकारलें गेलें म्हणून इंग्लंडनें तयार करून अंमलांत आणली व हिंदुस्थानला तींत खेंचलें. हिंदुस्थान मोकळा असतां तर त्यानें निरनिराळ्या राष्ट्रांशीं करार करून आपला व्यापार निदान कायम ठेवला असता. या योजनेंत गुंतल्यामुळे अन्य देशांनीं साहाजिकच स्वहिताच्या दृष्टीनें आपापला व्यापार हिंदुस्थानशीं जुळवून घेतला व त्याचा परिणाम या देशाचा निर्यात व्यापार त्या त्या देशांशीं एकंदरीनें कमी झाला. ओटावा करारानें हिंदुस्थानला इंग्लंडचा जास्त किंमतीचा माल घ्यावा लागला. इंग्लंडचा माल जास्ती येऊ लागला म्हणून इंग्लंडला जास्त माल धाडावा लागला व तेथेंहि भाव काय येईल याचा विचार न करतां विकावा लागला. कारण योजनेबाहेर असलेल्या राष्ट्रांत माल कमी खपूं लागल्याबरोबर हा परिणाम होणें अनिवार्य होतें. आयात जकातींनीं जागतिक पेठ मर्यादित होत गेली व ओटाव्यानें हिंदुस्थानच्या मालाला अधिक मर्यादित झाली. आपला व्यापार सांवरण्यासाठीं इंग्लंडनें ही योजना केली व तीच येथील व्यापार कमी करण्यास कारण झाली. अन्य देशांशीं व्यापार कमी झाला म्हणूनच या देशापुरता त्यांच्या त्यांच्या हुंडणावळीच्या अडचणी आल्या व त्या दूर करण्याकरितां त्यांना या देशाचा माल कमी घ्यावा लागला. हुंडणावळीची अडचण ही व्यापार कमी झाल्यामुळें उत्पन्न झाली व तिच्यामुळेंच व्यापार कमी झाला असें नव्हे. गिरिजाशंकर वाजपेयी यांच्या विचारसरणीला उत्तर देण्याचें मजकडे सोंपविलें होतें.

त्यांच्याशीं चर्चा केल्यामुळें त्यांचे मुद्दे मला आधींच माहीत होते. बाजपेयीनंतर स्वामी वेंकटाचलम, ज्यांनीं सर षण्मुखम् चेट्टींचा निवडणुकींत पराभव केला होता, त्यांचें भाषण झालें व त्या दिवसाची बैठक संपली.

चर्चेचा शेवटचा दिवस ता. ३० मार्च हा होता. दोन दिवसांच्या अवकाशांत दोन्ही पक्षांत मतें मिळविण्याची खटपट तीव्रतर होवूं लागली. निरनिराळ्या तऱ्हेनें स्वतंत्र पक्षांतील सभासदांवर पाश पडूं लागले. बिनपक्षीय सभासदांच्या भोंवतीं नाकेबंदी होवूं लागली. चिडाचिडीपर्यंत पण प्रसंग आले. एक सरकारी अधिकारी, जो मुसलमान होता, त्यानें विवेक सोडून मुसलमान सभासदांना वळविण्याचें प्रयत्न सुरू केले. शौकतअल्ली फार चिडले व त्यांनीं त्याला मुसलमानांचें इमान 'खराब' न करण्याविषयीं बजाविलें व पुन्हां जर जिनांविरुद्ध मुसलमानांनीं मतें द्यावींत अशी खटपट केली तर शौकतअल्लीच्या मनगटाची मजा चाखावी लागेल असें सांगितलें!! असफअल्ली, मी, किंबहुना आम्ही सर्वजण, सारखे जागरूक असून खटपट करीत होतो. हिंदुस्थान सरकारची शक्ती, युरोपियन व्यापाऱ्यांच्या युक्त्या, इंग्लंडमधील भांडवलवाल्यांचें आर्थिक सामर्थ्य या तिघांच्या एकजूट झालेल्या आघाडीला आम्हाला तोंड द्यावयाचें होतें. आमची साधनसामुग्री म्हणजे सभागृहांतील वादविवाद, व देशहिताची विचारसरणी. एका दृष्टीनें ती प्रभावी व परिणामकारक, पण कांहीं व्यक्तींना शब्दांचा आवाज मोहवत नाहीं, स्वहित व देशहित निदान सारखेच वाटतें. कांहींना आमच्या बाजूस येण्यास मन सांगत होतें पण त्यांचे पाय कचरत होते. वचनें देत होते पण मतदारांचीं वचनें व इंग्रजांचीं वचनें हीं सारखीच असतात. त्याप्रमाणें घडेल तेव्हांच तीं खरीं मानावयाचीं. या अस्थिर वातावरणांत दोन दिवस गेले. मध्यंतरीं पुन्हां पक्ष प्रमुखांचीं सभा झाली; व त्यांत कॉंग्रेसपक्षांपैकीं मी व पंडितजी यांनीं बोलावें, कॉंग्रेस नॅशनलिस्टांपैकीं लो. ना. अणे यांनी व नंतर जिना यांनीं सर्व विरोधी पक्षांतर्फे बोलल्यावर झाफरउल्ला यांनीं उत्तर द्यावें असें ठरलें. दोन दिवसांत मी आणखी तयारी केली व २० मिनिटांत काय काय मांडावें याचा पूर्ण नकाशा करून तयार होतो. सभागृहांतील पक्ष कचेरींत नेहमींप्रमाणें १०-४५ ला आम्ही जमलो. डॉ. देशमुख यांनीं आपल्याला आज बोलावयाचें आहे असें सांगितलें. त्याबरोबर डॉ. खरे म्हणाले, "मलाही बोलावयाचें आहे." देशमुखांचें म्हणणें मुंबईसारख्या व्यापारी शहाराचे ते प्रतिनिधी, त्यांनीं बोललेंच पाहिजे. व्यापाऱ्यांचे प्रतिनिधी मथुरादास वसनजी बोलले आहेत. शिवाय ज्यावेळीं प्रथम वक्ते पक्षानें

मुक्रर केलें त्यावेळीं डॉ. देशमुख यांनी कळविलें नाहीं. अधिवेशन चालू असतां मुंबईस ये-जा करावयाची हा त्यांचा शिरस्ता होता. एकदम उगवावयाचें व ठरलेली व्यवस्था मोडावयास सांगावयाचें हा पक्षावर व अन्यपक्षांवरही अन्याय आहे, हेंहीं त्यांना समजून देण्याचा नेत्यांनीं प्रयत्न केला. डॉ. खरे यांनीं आपणांस भाषण करण्यास न मिळालें तर आपण गप्प बसणार नाहीं असें बजावलें. पंतजींनीं व मी सांगितलें कीं, "आम्ही बोलत नाहीं." जर दोन्ही डॉक्टर आपली जबाबदारी ओळखत नसतील तर हाच मार्ग पंतजींनीं स्वीकारण्याचें ठरविलें. भुलाभाई जर कडक वागले तर तें योग्य ठरलें असतें. हा एकट्या कॉंग्रेस पक्षाचा प्रश्न नव्हता, तर सर्व-विरोधी पक्षांच्या विचारानें कांहीं गोष्टी ठरल्या होत्या त्या सोडणें योग्य नव्हतें. डॉ. देशमुखांची भाषा व वृत्ति अयोग्य होती हे कष्टानें नमूद करणें भाग आहे. पंतजी निघून सभागृहांत गेले. मी सुचविलें कीं मी बोलत नाहीं; दोन डॉक्टरांपैकीं एकानें बोलावें व पंतजी बोलतीलच. दोन्ही डॉक्टर आपला हेका सोडीनात. तडजोड करीनात. त्या दिवशीं प्रश्नोत्तरें नव्हतीं म्हणून सभा ११ वाजतां सुरू झाली. देसाई मी, व अन्य सभासद संतप्त व त्रासीक मनोवृत्तीनें सभागृहांत आलों. पहिले वक्ते मि. स्टुअर्ट हे बोलले. ते व्यापार खात्याचे चिटणीस होते, पुढें रेल्वेमंत्री झाले व १९३८ सालीं बिहारचे गव्हर्नर झाले. मि. स्टुअर्ट यांचा विशेष हुषार असा लौकिक नव्हता. तथापि जेव्हां बोलत तेव्हां व्यवस्थित बोलत. कोपरखळयाही मारीत. मि. डो, जे पुढें सिंधचे गव्हर्नर झाले ते कांहीं दिवस व्यापारखात्याचे चिटणीस होते. ते बोलण्यांत मगरूर व अहंमन्यता त्यांच्या भाषणांत सारखी दिसे; तशी स्टुअर्ट यांची वृत्ति नव्हती. मि. क्लो, जे पुढें रेल्वेमंत्री होते व आसामचे गव्हर्नर झाले, ते बोलण्यांत अगदीं सरळ, व त्यांची कळकळ व सहिष्णुता सर्वमान्य होती. क्लो, डो व स्टुअर्ट ही त्रयी सरकारी अधिकाऱ्यांत प्रभावी दिसे. मि. स्टुअर्ट यांनीं प्रथम ओटाव्याच्या वेळीं संयुक्त हिंदी व्यापारी संघ याची वृत्ति सरकारविरोधी होती असें सांगितलें. सदरहू संघाचें म्हणणें कीं, "हिंदी प्रतिनिधींनीं ओटावा येथें जावें पण कोणतेंही धोरण अगर योजना, व विशेषतः साम्राज्यविषयक सवलतींची योजना स्वीकारूं नये व ही जबाबदारी पुढें येणाऱ्या लोकमताला जबाबदार असणाऱ्या सरकारवर टाकावी." अर्थात हें म्हणणें सरकारनें मान्य केलें नाहीं. यांत सरकारची काय चूक होती ? सरकारला सहकार्य हवें होतें पण या वृत्तीमुळें सहकार्य अशक्य झालें. करारामुळें व्यापार मंदावला हें खरें नाहीं. अन्यदेशांनीं, प्रतिरोध केला हेंही

खरें नाहीं. अन्य देशांतील बिनसवलतींच्या वस्तूंची ( Non-preferred goods ) निर्यात वाढली आहे. रु. ९·५० कोटींनी हा व्यापार वाढला आहे, सवलतींच्या वस्तूंचा अन्य देशांशीं कमी झाला हें खरें, पण इंग्लंडशीं तो वाढावा हाच हेतू होता. व साध्यही झाला आहे. बिनसवलतींच्या वस्तूंचा व्यापार वाढला याचाच अर्थ अन्य देशांनीं प्रतिरोधवृत्तीनें व्यवहार केला नाहीं; व करारानें हा प्रतिरोध ( Retaliation ) उत्पन्न केला हें खरें नाहीं. अलग अलग करार करून व्यापार वाढेल हा भ्रम आहे. या देशानें धंद्यांना मर्यादित अगर तारतम्यी संरक्षण (Discriminating Protection) देण्याचें धोरण १९२३सालापासून स्वीकारिलें आहे. हें कायम ठेवून निरनिराळ्या देशांनीं व्यापारी करार करून व्यापार वाढविणें अवघड आहे. दोन्ही देशांना जरूर आहे अशाच वस्तूंचा व्यापार वाढणें शक्य आहे व शक्य असेल तरच करार होवूं शकतील. दोन्ही देश करार करण्यास तयार पाहिजेत. फ्रान्सचें उदाहरण पाहातां फ्रान्सला या देशानें कांहीं धाडलें तरी फ्रान्स फक्त सोनें, चांदी व कलाबतूच्या कामाकरितां उपयोगी पडणारी जर धाडूं शकेल. महायुद्धानंतर दरसाल रु. ६५ लाख किंमतीचा हा माल येथें येई. याशिवाय महत्त्वाचा पदार्थ म्हणजे मद्य फ्रान्समधून येई. संरक्षणाच्या धोरणामुळें रु. ६५ लाखांचा हा माल, हल्लीं दरसाल रु. ३ लाखापर्यंतच येतो. जर आज फ्रान्सशीं करार करावयाचा म्हटलें तर फ्रान्स या वस्तू जास्त घ्या असें म्हणेल व या देशाला आयात जकात या मालावरील कमी करावी लागेल. याला या देशाची तयारी आहे कां! हॉलंड संरक्षणाच्यापूर्वी कापड धाडीत असे. संरक्षण कमी करून हॉलंडचें कापड घेण्यास कोण तयार होईल ! नेदर्लंड, ईस्ट इंडीज (जावा, वगैरे) मधून दरसाल रु ९ कोटींची साखर येत असे व तांदूळ जात असे. संरक्षणामुळें येथें साखरेचा धंदा उभारला गेला, वाढीस लागला. आतां तांदूळ धाडून साखर घेण्याची तयारी आहे कां ? स्वीडन रु. ६८ लाखाच्या काडयाच्या पेटया दरसाल पाठवी. संरक्षणामुळें धंदा वाढला व आतां फक्त रु. २०,०००चा हा माल येतो. स्वीडनशीं करार करावयाचा म्हणजे स्वीडन ह्मणेल आगपेटया घ्या. आहे कां तयारी ! बेल्जम पोलाद धाडी. इटाली कापड व कृत्रीम रेशीम धाडी, जर्मनी पोलाद व कापड धाडी, तें सर्व हळुहळू कमी झालें. करार करूं म्हटलें म्हणजे हा माल जास्त घ्या असेंच हे देश म्हणतील, म्हणजे संरक्षक जकाती कमी कराव्या लागतील; व या देशांतील त्या त्या धंद्यांना धक्का बसेल ! कांहीं देशांशीं एकतर्फी करार करणें शक्य आहे, नाहीं असें नाहीं. दक्षिण अमेरिकेंतील

संस्थानें तागाचा माल घेत पण हुंडणावळीच्या अडचणींमुळें तीं कमी घेवूं लागली. जास्त घ्या सांगावयाचें तर बदल्यांत काय ब्राझीलची कॉफी, अर्जेंटाईनची आळशी कां गोमांस घ्यावयाचें ! स्पेनमध्यें कच्चा माल व कातडीं जातात व स्पेनमधून केशर येतें. समजा आपला माल स्पेनमध्यें जास्त खपवावयाचा तर स्पेन म्हणेल जास्त केशर घ्या व केशराचा उपयोग साधू व संन्याशी यांच्या छाटया रंगविण्याकडे विशेष होतो. जास्त केशर आलें म्हणजे लोक संसारनिवृत्त होऊन संन्याशी बनतील!!" येवढें बोलून ते चर्चा निवृत्त झाले!! विनोदामुळें सभागृह जरा उल्हासित झालें.

"जबरदस्त कंपूच्या मागें परमेश्वर उभा असतो असें नेपोलियन म्हणें, पण मीं आशा करतो कीं, न्यायी परमेश्वर आज तरी ही परंपरा सोडील." या वाक्यानें सर होमी मोदी यांनीं आपल्या भाषणास सुरवात केली. सर मोदींचें भाषण थोडक्यांत, चुरचुरीत, मार्मिक व चटका लावून सोडणारें असतें व यावेळींहि तसेंच होतें. "मिशनरी कळकळीनें अनेकांनीं या चर्चेंत भाग घेतला व भाषणें केलीं पण एकही कोंकरूं या गटांतून त्या गटांत जाईल अशी आशा नाहीं. प्रत्येकजण आपण पूर्वग्रह व्याप्त नाहीं, मोकळें आहोंत, असेंच म्हणतो आहे. निदान कांहींच्या बाबतींत तरी ते कायमच मोकळे आहेत व ते कशानेंच भरणार नाहीं ( Not open but vacant ). कांहींचीं मोकळीं मनें दुरुस्तीसाठीं बंद केलीं पाहिजेत असेंहि वाटतें ( Some open minds ought to be closed down for repairs )!! करारानें फायदा झाला कां! रद्द केल्यास नुकसान होईल कां! एवढाच विचार आपणांस केला पाहिजे. माझ्या मतें असाधारण व बिकट कालांतील अल्प संरक्षणाची योजना म्हणजे ओटावा करार होय. सर्वत्र जकातवाढ, हिरशेरशी, सरकारी मक्तेबाजी अशा या अस्थिर व चेपलेल्या जगांत ओटावा योजनेनें संरक्षण झालें." "कांहींतरी बडबडता" एक सभासद बोलले. "येवढाच भाग जर या चर्चेंत माझ्या मित्राचा असेल तर त्यानें स्वतःचें अभिनंदन जरुर करून घ्यावें"—मोदींनीं बार मारला, "ओटावा करार झाला त्यावेळीं १९२९ च्या मानानें जगाचा व्यापार ७४ टक्के पर्यंत आला होता. पृथक् पृथक वस्तूंचा व्यापार या करारानें वाढला कीं नाहीं हें न पाहातां एकंदरीने काय झालें तें पाहूं. १९३२–३३ सालीं निर्यात मालाचा व्यापार रु. १३६ कोटी होता, तो क्रमाक्रमानें रु. १५० कोटी, रु. १५४ कोटी, १९३५–३६ सालीं रु. १६२ कोटींपर्यंत वाढत गेल्याचें

दिसून येईल. सवलतीचा व्यापार इंग्लंडशीं रु. ७ कोटींनीं वाढला. बिनसवलतीचा व्यापार इंग्लंड व अन्य देशांशीं पण वाढला. बिनसवलतीचा व्यापार जर वाढला तर सवलती नसत्या तरी त्याही वस्तूंचा वाढला असतां असें विचारण्यांत येतें; पण बिनसवलतीच्या वस्तूंबाबत हिंदुस्थानची स्थिति डॉ. मथाई म्हणतात त्या प्रमाणें कमी धोक्याची होती. शिवाय ही जी वाढ बिनसवलतींच्या वस्तूंच्या निर्यात व्यापारांत झाली ती जपाननें जादा कापूस खरेदी केला म्हणून झाली. १९३३–३४ मध्यें रु. ११ कोटींचा व १९३४–३५ मध्यें रु. २१ कोटींचा कापूस जपाननें खरेदी केला म्हणून, हीही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. आयात व्यापार रु. १३२ कोटींच्या आसपास या कालांत होता, यांत विशेष फरक झाला नाहीं. पण १९३२–३३ सालीं या देशाचा व्यापारी आढावा रु. ४ कोटींचा अनुकूल होता. याचा अर्थ जागतिक मंदाईचा परिणाम हिंदुस्थानवर पूर्णपणें होवून १९३२–३३ सालीं ही स्थिति प्राप्त झाली होती. निर्यात व्यापार खचला होता. जगभर हीच स्थिति होती. पण करारानंतर हा अनुकूल आढावा १९३३-३४ सालीं रु. ३५ कोटी, १९३४–३५ सालीं रु. २२ कोटी व १९३५–३६ सालीं १० महिन्यांतच रु. २५·८ कोटींपर्यंत गेला आहे. हा आढावा इंग्लंडला द्याव्या लागणाऱ्या वार्षिक देण्यापुरता नसेल, पण तो वाढला आहे; पुरेसा वाढला नाहीं म्हणून कराराला दोष देणें योग्य नव्हे. १९३२ सालीं जगाचा व्यापार १९२९ च्या मानानें ७४ टक्के होता तो १९३४ मध्यें ७७·५ टक्के झाला. हिंदुस्थानचा व्यापार १९२९ च्या मानानें ७५ टक्के होता तो १९३४–३५ सालीं ८६ टक्के झाला. यावरून जगाच्या दृष्टीनेंही येथील व्यापार सावरला एवढेंच नव्हे तर तो वाढलाही. अन्य देशांनीं हुंडणावळीच्या संरक्षणार्थ, संरक्षणाच्या धोरणामुळें, व्यापाराची तोंडमिळवणी करण्यासाठीं कांहीं निर्बंध व्यापारावर घातले; कराराला प्रतिरोध करण्याच्या दृष्टीनें ते घातले नाहींत. करार असून सुद्धां रु. १३० कोटी आयात मालापैकीं रु. ९५ कोटींचा आयातमाल बिनसवलतीनें येतो; त्यांत तें स्पर्धा करूं शकतात, व्यापारवाढ करूं शकतील. करारामुळें व्यापार कमी झाला नाहीं, अन्य-देशांनीं सूडबुद्धीनें कांहींही केलेलें नाहीं. उलट इंग्लंडची महत्त्वाची गिऱ्हाइकी करारानें सुधारली. महायुद्धापूर्वीं निर्यात व्यापाराच्या २३ टक्के व्यापार इंग्लंडशीं होता; १९३०–३१ सालीं २३ टक्के, १९३१–३२ सालीं २७ टक्के, १९३२–३३ सालीं २८ टक्के, १९३४–३५ सालीं ३१ टक्के; याप्रमाणें यांत वाढ

झाली आहे. तेजी व मंदी दोन्ही काळांत इंग्लंडची पेठ येथील मालाला कायम व स्थिर होती. यामुळें आर्थिक गोंधळापासून हा देश बराच बचावला. अनेक देशांचीं चलनें संकटांत आलीं, गोंधळ सर्वत्र उत्पन्न झाला होता. जग अद्यापि योग्य मार्गावर आलें नाहीं. इंग्लंडचें चलन त्यांतल्यात्यांत चांगलें राहिलें आहे व अशा देशांशीं असलेलीं गिऱ्हाइकी तोडणें शहाणपणाचें नाहीं. करारापासून सर्वांनाच सारखा फायदा झाला नसेल, पण या देशाला फायदाच झाला नाहीं, हें असत्य. इतरांना अधिक झाला असेल, पण मुख्य प्रश्न नुकसान झालें कां ? नाहीं. फायदा झाला कां ? होय; हीच वस्तुस्थिति आहे. करार रद्द करून मिळणारा फायदा जाईल व जी अपेक्षा आहे ती फलद्रुप होणार नाहीं. प्रोफेसर घोष यांचें म्हणणें असें आहे कीं, या करारामुळें व अन्य देशांनीं स्वीकारलेल्या व्यापारी धोरणामुळें त्या त्या देशांत आपला व्यापार खालावला; पण आज जरी करार रद्द केला तरी त्यामुळें हे देश आपलें धोरण बदलतील हें निश्चित नाहीं. थोडा व्यापार जे देश तटस्थ राहिले तेथें वाढेल पण तेवढ्यानें इंग्लंडमध्यें कमी होणारी गिऱ्हाइकी भरून निघेल असें नाहीं असें तज्ज्ञांचें मत आहे. ज्या वस्तु हा देश निर्यात करतो, त्यांबाबत या देशाची स्थिति चांगली आहे. अन्य देशांना त्या वस्तू घेणें जरूर आहे. करार रद्द केला तर इंग्लंड सूडबुद्धीनें वागणार नाहीं. त्यांना परवडणार नाहीं हें खरें. ऑस्ट्रेलियानें आपलें चलन ५३ टक्के, न्यूझीलंडनें ५२ टक्के, अर्जेंटाइननें ६४ टक्के, ब्राझीलनें ६९ टक्के याप्रमाणें चलनाची किंमत कमी केली आहे. त्या मानानें हिंदुस्थानच्या चलनाची किंमत कमी झाली नाहीं, व या कारणासाठीं जर या देशांशीं हिंदुस्थानच्या मालाला टक्कर देतां येत नाहीं तर इंग्लंडमधील सवलती सोडून दिल्या तर आर्थिक परिस्थिति कितीतरी कठीण होईल. अलग अलग करार कांहीं ठराविक वस्तूंबाबतच होवूं शकतील. तुर्कस्थानला आपण रु. ३६ लाखांचा माल धाडतो, परत कांहीं घेत नाहीं; कसा व कसला करार करावयाचा ? जेथें शक्य आहे तेथें हिंदुस्थान सरकार बोलणीं करून करार करीतच असतें. करार रद्द करून फक्त जगाच्या चावडीवर हिंदुस्थानला इंग्लंडशीं व्यापार नको कांहीं तडजोड नको, एवढेंच जाहीर करणार आहांत. हें जर नसेल तर माझें म्हणणें बोलणीं करा, विचार विनिमय करा व करार सुधारून घ्या. मला धोतरें अधिक खपवावयाचीं आहेत, मी सत्यमूर्तींना म्हणालो कीं, तुमचा व माझा करार कॉफी व मसाला यांच्या बदल्यांत धोतरें घेण्याचा होता. तुम्ही पुरेशी घेतलीं नाहीत. मला फार कॉफी व

मसाला खूप घ्यावा लागतो; म्हणून करार रद्द करा तर ते म्हणतील, " असें करूं नका एकदम धोतरांचा पुरवठा बंद होईल. आपण करार दुरुस्त करूं. मी अधिक धोतरें घेईन, थोडा समंजसपणा दाखवा. हीच खरी रीत आहे." सभागृहानें टाळ्या वाजविल्या, मोदींची प्रतिभा उत्तेजित झाली. ते बोलते झाले, "समजा तुम्ही आपल्या पत्नीला म्हणाला, आपलें कांही पटत नाहीं. प्रत्येक बाबतींत मलाच हार खावी लागते व तुझाच बरचष्मा राहातो, मी आतां घटस्फोट मागणार; पण घाबरुं नकोस मी पुन्हां तुझ्याशींच लग्न करीन. या विचारांत कांहीं अर्थ आहे कां ? " बोलतांना मोदींची नजर स्त्रियांच्या गॅलरीकडे गेली होती हें सहज दिसत होतें ! ! सभागृहांत हास्यकल्लोळ उठला. "अहो घटस्फोट मागत नाहीं, फक्त त्याची नोटीस देणार आहोंत" सत्यमूर्ति विनोदानें बोलले. " हें जर खरें तर त्या गरीब अबलेला उगाच नोटीस देऊन कां घाबरवितां ? " असा मोदींनी टोला मारला. " तसें केलें म्हणजे लक्ष ताळयावर येईल " जिना मिस्कीलपणें बोलले. " एकंदर जबाबदार लोकांवर इंग्लंडमध्यें जो मानसिक परिणाम होईल तो सोडला तरी व्यापाराची घडी बिघडेल व सर्वत्र अस्वस्थता माजेल. चार लाख गांठी कापूस तेथें खपतो, त्याच्यावर परिणाम होईल. हिंदी व्यापारी संघाचीं मतें येथें सांगण्यांत आलीं. मीही एका मोठया संघाचा अध्यक्ष होतो, आजहि कार्यकारी मंडळावर आहे. मी संघाच्या मतांना अवमानितो असें नाहीं. एका रोग्याला डॉक्टरनें पाण्याबद्दल दक्षता घेण्यास सांगितलें. रोग्यानें पाणी गाळलें. तापविलें; पुनः गाळलें; यां सर्व गोष्टी काळजीपूर्वक करून, शांत चित्तानें मद्य प्राशन केलें. तीच निर्विकार वृत्ति प्रसंगीं व्यापारी वर्गाच्या मताबाबत मी ठेवितों" टाळ्या व हंशा दीर्घकालपर्यंत चालूं होता. "सर्व कांहीं माहीत आहे, फक्त मत देणें अशी स्थिति नाहीं. प्रश्न महत्त्वाचा आहे. शांत चित्तानें विचारविनिमय होणें अवश्य आहे. ४-५ महिन्यांनीं कांहीं बिघडत नाहीं. सर्वत्र महायुद्धाची आरोळी उठत आहे. इंग्लंडशीं मैत्री ठेवण्यांत शांतता व सुरक्षितपणा आहे हें विसरूं नका" असें बजावून मोदी यांनीं भाषण संपविलें. चवदार व खुसखुशीत जेवण झाल्यानंतर जी प्रसन्नता तोंडावर येते तीच प्रसन्नता हें भाषण ऐकल्यानंतर सभागृहांत दिसूं लागली.

मोदी बसतांच पूर्वयोजनेप्रमाणें अध्यक्षांनीं माझें नांव पुकारलें. मोदी बसतांच डॉ. देशमुख व डॉ. खरे दोघेही उभे राहिले. मी बसूनच होतो. एकाचवेळीं एकाच पक्षाचे दोन सभासद उभे राहणें हें पक्षाला कमीपणा आणणारें होतें. मी उठत

नाहीं असें पाहून मार्शलनें अध्यक्षांना देशमुखांचें नांव सांगितलें. कारण देशमूख पुढील रांगेंत बसत व डॉ. खरे मागील रांगेंत बसत. डॉ. देशमुखांचें नांव उच्चारतांच त्यांनीं भाषणांस सुरवात केली. डॉ. खरे रागाने सभागृह सोडून लॉबींत गेले. डॉ. देशमूख यांचें भाषण झाल्यावर अणे यांनीं चर्चेत भाग घेतला. राजकारणाच्या दृष्टीनें या कराराबाबत चर्चा करणें गुन्हा नव्हे असें त्यांनीं स्पष्ट सांगितलें. "साम्राज्यशाहीला या देशाचा विरोध आहे, तथापि या करारानें या देशाचा फायदा झाला आहे कीं नाहीं ही एकच दृष्टि विचारांत घेतली पाहिजे. आंकडे सांगून भाषणांतील खरें रहस्य नाहीसें होतें. आंकडे म्हणजे कांटेरी तारांसारखे आहेत. भाषणाला त्यांचें वेष्टन पडलें म्हणजे त्यांतच श्रोता अडकून पडतो; व आंतील रहस्यापर्यंत पोंहोचत नाहीं. अनेक जणांनी लक्ष आणि दशलक्ष यांचें आंकडे पुन्हां पुन्हां सांगितलें. परिणाम एवढाच झाला कीं, त्याचे आवाज कानांत घुमत आहेत. त्यांतील अर्थ या गर्दीत केव्हांच निसटून गेला आहे." अर्थहीन आवाज काढण्याची बंदी अध्यक्षांनी या सभागृहांत करावी अशीही विनंति अणे यांनी करून अनेक वक्त्यांत भीति उत्पन्न केली ! ! " मोदी यांनीं १९३१-३२ सालीं व्यापारी आढावा काय होता हें सांगण्याचें टाळलें. १९३२-३३ सालीं रु.४ कोटी आढावा होता हें मात्र सांगितलें. १९३१-३२ सालीं हा आढावा रु.३५ कोटी होता, म्हणजे कराराच्यापूर्वी हा आढावा रु. ३५ कोटींचा होता व करार होउन तीन वर्षांच्या अवधींत रु. ३५ कोटींपर्यंत आला नाहीं. १९३५-३६ सालांत रु. २५ कोटी येईल असें सांगण्यांत येत आहे. तात्पर्य रु. २५ कोटीच्या आंत बाहेर हा राहील, वाढणार नाहीं, हें उघड दिसतें. तसेंच १९३१-३२ सालीं साम्राज्यांतील देशांत या देशांतून रुपये ७२ कोटींचा माल गेला व १९३४-३५ सालीं जवळजवळ तितक्याच रकमेचा गेला, हाही व्यापार वाढला नाहीं. फक्त येथें येणारा साम्राज्यांतील देशांचा आयात माल रु. ८ कोटींनीं वाढला व त्यामुळे येथील धंद्यावर वाईट परिणाम झाला हाच काय तो फायदा आम्हास मिळाला ! ! डॉ. मथाई आपल्या रिपोर्टांत म्हणतात सवलतींच्या योजनेचा काय परिणाम झाला हें पहावयाचें असेल तर हिंदुस्थानच्या मालाला इंग्लंडमध्ये काय स्थान प्राप्त झालें हें कळलें पाहिजे. इंग्लंडच्या आयात मालांत जर या देशाचा माल पूर्वीच्या प्रमाणापेक्षां जास्त टक्के येत असेल व बाकी सर्व गोष्टी कायम आहेत, या स्थितींत सवलतीची योजना फायदेशीर म्हणतां येईल. पण ही कसोटी त्यांनीं येथील भाषणांत त्याज्य ठरविली आहे. ते

येथे म्हणतात, ही टक्केवारी फसवी आहे!! मग या फसव्या कसोटीनें कराराची उपयुक्तता मोजणें चुकीचें ठरेल. लिहितांना तज्ज्ञ म्हणून लिहिलें व बोलतांना पाठिंबा देणारें बोलणेंच भाग म्हणून बोलले असावेत!! इंग्लंडशिवाय अन्य देशांनी किती घेतलें हें या कराराच्या विचाराच्यावेळीं गैरलागू आहे असें ते म्हणतात. ही विचारसरणी चुकीची आहे. एकाशीं करार करून व्यापार वाढ झाली पण त्यायोगें इतरांशीं असलेला व्यापार कमी झाला व एकंदर व्यापार कमी झाला तर तो करार अहितकारकच म्हटला पाहिजे हें अगदीं उघड आहे. रु. ७ कोटींनीं अन्यदेशांशीं व्यापार कमी झाला आहे व एकंदरीनें व्यापाराची वाढ झालेली नाहीं. करार अयशस्वी ठरला हें म्हणणें प्राप्त झालें आहे. राष्ट्रसंघाच्या आर्थिक पाहणीच्या रिपोर्टांतून कांहीं उतारे श्री. वाजपेयी यांनीं वाचून दाखविले. खुद्द सदरहू रिपोर्टांतच ओटावा योजनेसंबंधीं खालीलप्रमाणें लिहिलें आहे. 'ओटावा योजना मान्य झाल्याबरोबर परदेशी मालाविरुद्ध बहुशः निर्बंध घालण्यांत आले व एकंदर परिस्थिति अधिक बिकट झाली व थोडया काळांतील माहितीवरून एकंदर व्यापारावर, जागतिक व्यापाराच्या दृष्टीनें किती परिणाम झाला हें आतांच सांगणें शक्य नाहीं. ब्रिटननें आपली पेठ बंद केल्यामुळें व अन्यदेशांनीं जे प्रतिरोधक उपाय योजिले त्यामुळें परिस्थिति कांहीं अंशानें अधिक बिकट झाली व त्याचा एकंदर परिणाम या घटकेपर्यंत व्यापार आकसण्यांत झाला असावा. .( "These consessions were accompanied practically in every case by some raising of the barriers against foreign goods, and it is not possible yet to judge from the statistics of a limited period, during which the crisis has been aggravated, as to the net effect on world trade as a whole. In so far as the aggravation of the crisis was partly due to the closing of British Markets against foreign goods and to the retaliations there by provoked, it is probable that the net effect to date has been restrictive." ) करारामुळें अन्यदेशांनीं प्रतिरोधक उपाययोजना केली हेंही उघड आहे. करारामुळें आमच्या शेतीमालाला इंग्लंडमध्यें सवलती मिळाल्या पण त्याचबरोबर आमचे या बाबतींतील खरे प्रतिस्पर्धी म्हणजे वसाहती त्यांनाही या सवलती मिळाल्या. मग आम्हाला फायदा कोणता झाला ? उलट इंग्लंडचा कल वसाहतींशीं व्यापार वाढविण्याकडेच आहे. अपेक्षेप्रमाणें करार फलद्रुप झाला नाहीं हें सर्वमान्य आहे. घर

विश्वेश्वरअय्या यांचें मत करारानें फायदा झाला नाहीं असेंच आहे. खुद्द प्रो. घोष असें म्हणतात कीं, करारानें आयात व्यापारावर खरा बोजा बसला व निर्यात व्यापाराची वाढ झाली हा भ्रम आहे. ( It secured illusory benefits to our exports in exchange for real burden on our imports. ) या करारांतून देशाची सुटका करून घेतलीच पाहिजे. मोदी यांनीं लग्नाची उपमा घेतली, तीच घेऊन मी असें म्हणतो कीं, हें लग्न आमच्या इच्छेविरुद्ध झालें आहे. यापासून आम्हांस सुखही लाभलें नाहीं. एकंदरींत ही दुःखद घटना आहे. हिचा शेवट झाला पाहिजे. म्हणून हिंदी व्यापार व उद्योग यांच्या वतीनें माझे सन्मान्य मित्र मि. जिना यांनीं सभेचे अध्यक्ष हे ' काजी ' असें समजून त्यांच्यासमक्ष ' तलक ' ' तलक ' ' तलक ' असें त्रिवार म्हणून ही विवाहग्रंथी तोडावी. " अणे बसले पण कितीतरी वेळ टाळ्या पडत होत्या. घटस्फोटाला अनुकूल नसलेला हा सनातनी गृहस्थ, कट्टर हिंदू असूनही, मुसलमानी पद्धतीनें झटपट घटस्फोट करण्यास —निदान राजकारणांतील—मान्यता देतो व तेही एका मुसलमान सद्गृहस्थांकडून करवितो, यावरून त्यांची उदारता व अचूक प्रासंगिकताच स्पष्ट होते ! !

मजूरमंत्री सर फ्रँक नॉईस " यांनीं आतां बोलण्याचें कांहीं उरलें नाहीं " असें म्हणून बोलण्यास सुरवात केली ! ! "प्रत्यक्ष देव जरी माझ्यामुखीं बोलला तरीसुद्धां कांहीं उपयोग होणार नाहीं. देसाई व जिना यांचें वादविवादकौशल्य जरी मला लाभलें, सत्यमूर्तींच्या वक्तृत्वाची जोड जरी मला मिळाली तरी सुद्धां कोणाचें मत मी बदलूं शकेन, अगर हा करार योग्य आहे अशी विरोधी पक्षाची खात्री करूं शकेन, हें अशक्य. तथापि सरकारी बाजू मांडणें जरूर आहे. केवळ व्यापारी दृष्टयाच या कराराकडे पाहाणें इष्ट आहे. पण या संबंधांत इतकें लिखाण, इतका प्रचार, झाला आहे कीं खरोखर कांहींतरी अन्यदृष्टीनें याचा विचार होत असावा. हिंदुस्थान व जपान यांच्यामधील झालेला करार लवकरच संपणार आहे, पण त्याबाबत मात्र कोणी फारसें बोलत नाहीं. जगाचा व्यापार घटत असतां प्रत्येक राष्ट्रानें व्यापारावर निर्बंध घातले. इंग्लंडनें साम्राज्य हें एक घटक करून निर्बंध घातले पण साम्राज्यांत खुला व्यापार ठेवला व ही तडजोड करून कांहींतरी व्यापारवाढ केली. किंबहुना याप्रमाणें सर्व जगानें करावें अशी नमुनेदार योजना केली. या योजनेंत प्रत्येक देशानें आपले उद्योगधंदे नीट चालावे म्हणून जरूर तर संरक्षण द्यावें हें मान्य केलें आहे. हिंदुस्थानला संरक्षक जकाती बसविण्याचा पूर्ण हक्क आहे.

ब्रिटनला सवलती दिल्यानें या देशाच्या उद्योगधंद्यावर वाईट परिणाम झाला नाहीं. एक अल्युमिनियमखेरीज कोणत्याही धंद्याची याबाबतींत तक्रार नाहीं. कोणत्या प्रमाणानें सवलती दिल्या व मुख्य प्रमाण कोणतें ठेवलें व किती ठेवलें हें महत्त्वाचें आहे, व हें लक्षांत धरूनच सर्व बाबतींत मुख्य दर ( Basic ) ठरविण्यांत आले. ज्या वस्तू येथें होतात व ज्या आल्या असतां येथील त्या वस्तूंशीं स्पर्धा करूं शकतील अशांवर आयात जकातीचा दर जास्त ठेवून त्या मानानें इंग्लिश मालाला सवलती दिल्या आहेत. या योजनेनें साबण, खोबरेल तेल वगैरे गोष्टींना संरक्षण मिळालें. परदेशी साबण कमी येऊं लागला आहे. उलट इंग्लंडमध्यें सवलती मिळाल्यामुळें तागाचा तयार माल, लोंकरी गालिचे व घोंगड्या, तसेंच काथ्याचा माल, कमावलेलें व बिन-कमावलेलें चामडें, अशुद्ध लोखंड वगैरे माल जास्त खपूं लागला. १९३४–३५ सालीं हा माल रु. ९ कोटींचा तेथें विकला गेला. करार रद्द झाला तर या मालावर जकात बसेल. मॅग्नेशियम क्लोराइडचा खप केवळ या करारामुळेंच वाढला. हें त्या धंद्यांतील उत्पादकांनींच कबूल केलें आहे. हा माल रु. २६ लाखांचा तेथें खपतो. जोशी म्हणतात जर इंग्लंडनें सवलती रद्द केल्या तर इंग्लंडचा येथें येणारा जो कापड माल आहे त्यावर जकाती बसवून नुकसान भरून काढता येईल. पण त्यामुळें कापड महागेल व गिऱ्हाईकांवर बोजा पडेल. कराराचा काय परिणाम झाला हें पाहून सरकारी रिपोर्टांत असें म्हटलें आहे कीं, इंग्लंडमधून येणाऱ्या ३४५ वस्तूंपैकीं २६३ वस्तूंची आयात या करारानंतर घटली आहे, उलट अन्यदेशांतून येणाऱ्या ३५६ वस्तुंपैकीं २२२ वस्तुंचीच आयात घटली आहे. करारानें गिऱ्हाइकांवर बोजा वाढला नाहीं. प्रत्येक देशाशीं करार करणें जिकिरीचें आहे. व्यापारीतज्ज्ञ बोलावून करावे असें सांगण्यांत आलें. जपानशीं करार करतांना व्यापाऱ्यांना बोलाविलें. दोन्ही देशांचे व्यापारी कांहीं करूं शकले नाहींत. दोन्ही सरकारांनीं शेवटीं करार घडवून आणला. इंग्लंडचे धंदे निराळ्या स्वरूपाचे होऊं लागले आहेत. विशिष्ट प्रकारच्या उत्पादनाकडे ( Specialised classes of goods ) ते वळले आहेत. त्यांचा माल येथील उत्पादनाशीं स्पर्धा करणारा नाहीं. या देशांत तयार होणारा माल हलक्या प्रतीचा आहे. या देशाला स्पर्धा अन्य देशांची आहे, इंग्लंडपासून नाहीं. पोलाद, कापूस, साखर, काड्याच्या पेट्या, कागद, रेशीम, लोकर या धंद्यांतील अनुभव हाच आहे, व हीच गोष्ट टॅरीफबोर्डाच्या कामकाजांत अनुभवास आली आहे. म्हणून इंग्लंड-

पासून भीति नाहीं. ३३ वर्षें या देशांत मी सेवा केली आहे, त्याचें हितसंरक्षण करण्याचा मी प्रामाणिक प्रयत्न केला आहे व त्याच दृष्टीनें मी म्हणतो कीं, हा करार एकदम रद्द करूं नका, विचार करा व जरूर त्या दुरुस्त्या घडवून आणा."

नॉईस यांच्या भाषणानंतर १ वाजून १५ मिनिटें झालीं म्हणून उपहारार्थ सभा तहकूब झाली. पार्टीच्या कचेरींत मी आलों. अनेक सभासद नाराज दिसत होते. डॉ. खरे संतप्त मनःस्थितींत होते. पंतजी पण संत्रस्त होते. "इस ॲटमॉस्फीयरमें हमभी बोलना नही चाहते" असें ते म्हणाले. मी त्यांना सांगितलें, जें झालें त्याची चर्चा जरूर तर पुढें करूं, पण ठरल्याप्रमाणें कॉंग्रेसपक्षाची बाजू मांडणें जरूर आहे. मी बोललो नाहीं, तरी कांहींहि बिघडलें नाहीं. व्यक्तिशः मला कांहींच वाईट वाटण्याचें कारण नाहीं. बऱ्याच चर्चेनंतर त्यांनीं बोलण्याचें मान्य केलें. त्यांना जरूर लागणारीं पुस्तकें, टिपणें सर्व त्यांचीं त्यांना आणून दिलीं. माझींहि टिपणें त्यांनीं मागितलीं तींहि दिलीं. शेंकडों सभांतून मी बोललों. सभागृहांतही मी अनेक वेळां बोलतो, पण काय असेल तें असो भाषणापूर्वी कांहीं काळ अस्वस्थता होते. तिचा भीतीशीं बिलकूल संबंध नाहीं हें जरी खरें, तरी आपल्याकडून संपूर्ण प्रयत्न तयारीच्या दृष्टीनें झालें कीं नाहीं या शंकेशीं निश्चित संबंध आहे असें वाटतें. भाषणांपूर्वी आराखडा तयार करतों, प्रयत्नांत कसूर करीत नाहीं, पण शंभर टक्के आपली तयारी झाली असें कधींही वाटलें नाहीं. भाषणाला उभे राहातांच अस्वस्थता तर जातेच, पोटांत होणारी कालवाकालव बंद पडते व सभेवर नजर फिरवितांच आपलाच प्रांत आहे असें वाटूं लागतें. नवे विचार, नवे दृष्टांत, नव्या कोटयाहि येतात, किंबहुना तिसऱ्या वर्गाच्या तिकीट ऑफिसजवळ जशी उतारूंची गर्दी असते तशी शब्दांची, दृष्टांतांची गर्दी होते व त्यांतून निवड करतां करतां पंचाइत होते हा माझा अनुभव आहे. लोकांना 'हा जास्त बोलला असतां तर बरें' असें वाटेंपर्यंतच वक्त्यानें बोलावें ही माझी दृष्टि आहे. हें सर्व खरें असलें तरी जर भाषण रद्द झालें तर मला खरोखरीच आनंद वाटतो. कर्तव्य म्हणून बोलतांना समरस झालेला दिसतो तरी वस्तुस्थिति तशी नसते. हौसेसाठीं बोलण्याचाच प्रसंग आला तर समरस होण्याचा संभव जास्त हें खरें. प्रस्तुतप्रसंगीं थोडेसें बोलावें असें मला वाटलें होतें व कांहीं चर्चा झाल्यानंतर मी बोलावें असा आदेशही मिळाला, तथापि बोलावें लागलें नाहीं. यामुळेंही मी मनांतल्यामनांत समाधानच पावलों हें सत्य आहे. पार्टीरूममध्यें असतांच अशी बातमी लागली

कीं ३-४ पंजाबी मुसलमान सभासद गडबडले असून ते सरकारच्या बाजूस जाणार. आमचा हिशोब ७३ आमच्या बाजूस व ६५ सरकारच्या बाजूस असा धरला होता. जर ४ फुटले तर ६९ मतें दोन्ही बाजूस मिळतील व अध्यक्ष काय करतील हें उघड होतें. मी व इतर दोघे-तिघे तावडतोब उठलों. सुमारें अर्ध्या-तासानंतर तीन पंजाबी मुसलमान सभासदांना गांठलें. जिनांनीं मला विचारलें कीं, काय परिस्थिति आहे ? त्यांना नवीन घटनांची दखल दिली. सदरहू तिघां सभा-सदांना मी त्यांच्यासमोर नेलें. जिनांनीं त्यांना स्पष्ट विचारलें कीं, 'तुम्हीं काय करणार ?' ते बोलेनात. शेवटीं त्यांनीं शपथेवर सांगितलें कीं, जिनांच्या विरुद्ध मत देणार नाहीं. याचा अर्थ ते तटस्थ राहाणार. पण ते खरोखरच राहातील कां अशी शंका उत्पन्न झाली. लॉबींतून, लायब्ररींतून पंजाब सरकारचे अनेक अधिकारी दिसूं लागले. २॥ वाजतां सभागृहांत चर्चेला सुरवात झाली. पण माझा मोर्चा मी लॉबींत मांडला. आळीपाळीनें सरकारी अधिकारी व प्रतोद व आम्हीं या चार सज्जनांना आळवूं लागलों. एकाला मी शेवटीं सांगितलें कीं, 'तुझ्या हातून तटस्थ राहाणें जमणार नाहीं. तूं निघून गेलास तरच जमेल.' त्यानें मानलें व तो निघून गेला. तथापि तिघे राहिलेच. हे तीन शिलेदार काय करणार याची सारखी भीति होतीच.

सभागृहांत पंतजींची सिंहवाणी गर्जत होती. मोदी यांचें मतपरिवर्तन झालें आहे अशी टीका करून मोदींच्या मतेंसुद्धां हा करार सर्वस्वीं यशस्वी झाला नाहीं. असें आहे तर तो रद्द होणेंच इष्ट आहे असें प्रतिपादिलें. नंतर हा करार कसा झाला यासंबंधीं विवेचन करून इंग्लंडनें धाक दाखवून ओटावा योजना घडवून आणली हें स्पष्ट केलें. "१९२९-३० पासून १९३१-३२ पर्यंत इंग्लंडचा निर्यात व्यापार शें. ६५ टक्के कमी झाला होता व आयात व्यापार फक्त ५६ टक्केच कमी झाला होता. व्यापाराची तोंड मिळवणी करणें जरुर होतें म्हणून ही योजना झाली. उलट १९२९-३० सालापासून हिंदुस्थानचा माल इंग्लंडमध्यें वाढत्या प्रमाणावर निर्यात होत होता, तर इंग्लंडचा माल या देशांत सारखा कमी प्रमाणांत येत होता. व्यापारी आढावा अशा रितीनें हिंदुस्थानला अनुकूल होत चालला होता. सन १९२९-३० मध्यें व्यापारी आढावा रु. ३१ कोटींचा हिंदुस्थानला प्रतिकूल होता. सन १९३०-३१ मध्यें तोंड मिळवणी झाली होती. हिंदुस्थानला कराराची गरज नव्हती. १९३२-३३ सालीं हिंदुस्थानचा इंग्लंडमधील निर्यात व्यापार कमी झाला

हा कराराचा पहिला परिणाम, सन १९३३-३४ मध्यें थोडा सुधारला. तथापि ही जी सुधारणा झाली ती करारामुळें नव्हे. सन १९३४ च्या जागतिक व्यापाराच्या पाहाणी-रिपोर्टांत असें म्हटलें आहे कीं, 'सन १९३३ च्या अखेरीस व १९३४ च्या सुरवातीस उद्योगप्रधान देशांत कच्च्या मालाला मागणी वाढल्यामुळें शेती-प्रधान देशांतील निर्यात व्यापार वाढला.' यावरून जी व्यापार-वाढ झाली ती सर्वत्र झाली. जगाचा व्यापारही सन १९३३-३४ सालीं ४ टक्के वाढला. सन १९३४-३५ सालीं ५ टक्के वाढला. या स्थितींत या देशाच्या व्यापारांत झालेली वाढ सवलतीच्या धोरणाचा परिणाम नव्हे. करारांतील योजनेमुळें इंग्लंडनें कापूस जास्त घेतला हेंही खरें नाहीं. वरील रिपोर्टांत असें म्हटलें आहे कीं, "१९३३-३४ सालीं अमेरिकेंतील कापूस बाजार अस्थिर होता. मोठ्या प्रमाणांत तेथें कापूस मिळणें शक्य नव्हतें," याशिवाय डॉलर हुंडणावळ पाहातां इंग्लंडला हिंदुस्थानांतून कापूस मागविणें स्वस्ताईचें होतें. अमेरिकेच्या कापसाच्या भावापेक्षां तीस टक्के कमी किंमत हिंदी कापसाला इंग्लंडमध्यें येत होती. व्यापार कांहीं नुक-सानीसाठीं कोणी करीत नाहीं. सन १९२१ ते ३० या दहा वर्षांत रु. ४५० कोटींचा माल इंग्लंडनें या देशापासून जास्त घेतला. किती निष्ठुरपणें हें शोषण चाललें आहे! पण मी आणखी बोलत नाहीं. एका हिंदी मंत्र्याने या धोरणानें हिंदुस्थान पांढरा पडला ( Bled white ) असें स्पष्ट म्हटलें आहे. नुसत्या व्यापारांत रु. ४५० कोटी काटले याशिवाय अन्य आर्थिक व राजकीय फायदे इंग्लंडने उठवले ते निराळेच!! हिंदुस्थानच्या व्यापाराचें स्वरूप म्हणजे इंग्लंडकडून येणारा जास्त माल मुकाट्यानें घ्यावयाचा व त्याची फेड करण्याकरितां जगभर माल धाडावयाचा ही परि-स्थिति करारानें बदलली नाहीं. करार दोघांना सारखा फायदेशीर आहे असें जें डॉ. मथाई म्हणतात तें चुकीचें आहे. आयात-निर्यात मालाची तोंडमिळवणी या दोन देशांत करारानें होत नाहीं. उलट तफावत वाढतच आहे. जगाची पेठ घालविणें या स्थितींत हिंदुस्थानला नुकसानकारक आहे. इंग्लंड अन्यदेशांना रुपये ३ चा माल धाडतें व रुपये ४ चा त्यांच्यापासून खरेदी करतें असें प्रमाण आहे. हिंदु-स्थानांत मात्र जास्त माल धाडून कमी माल खरेदी करतें. फक्त हिंदुस्थानच्या व्यापारांतच अनुकूल आढवा इंग्लंडचा आहे. करारानें इंग्लंडचा माल जास्त जास्त आला, तफावत वाढली व अन्यदेशांशीं जें व्यापाराचें स्वरूप या देशाचें होतें तें पार बदललें. त्या त्या देशांनीं प्रतिरोधक इलाज केले. हिंदुस्थाननें हें धोरण स्वीकारावें.

लढ्याची भावना ठेवावी असें मी केव्हांहीं म्हणणार नाहीं. इंग्लंडचें नुकसान व्हावें म्हणून मी कांहीं करणार नाहीं व त्यासाठीं करार रद्द करा असें कोणी म्हणत नाहीं. पण करारानें दोन्ही देशांच्या स्थितींत काय फरक झाला हें पहा. करारानंतर इंग्लंडमधील उत्पादन वाढलें व प्रतिकूल असणारा व्यापारी आढावा यासालीं ३७ दशलक्ष पौंडांनीं अनुकूल झाला. उलट या देशाची स्थिति पहा. रेल्वेचा व्यवहार नुकसानींत आला, ओटावा करारामुळें फ्रान्समध्यें शेंगदाणा कमी गेला व त्यामुळें रेल्वेला वाहतुकीची प्राप्ति कमी झाली असें व्यापारमंत्री यांनींच कबूल केलें आहे. अन्य देशांत भाव सुधारले. येथील भाव सर्व जगांत कमी आहेत. तयार मालापेक्षां कच्च्या मालांचे भाव तर आणखी कमी आहेत. प्रत्येक प्रांतिक सरकार बजेटांत तूट आली म्हणून ओरडतें आहे. सर्व जगभर मंदाई संपून गरीब देशसुद्धां सावरूं लागले आहेत. आमचा देश मात्र जास्त हलाखींत जात आहे. इंग्लंडच्या तयार मालाला येथें आपोआप संरक्षण मिळतें आहे. सवलतीच्या जकातीचा परिणाम अन्य देशांच्या मालापेक्षा इंग्लंडच्या मालावर कमी जकात असा असल्यामुळें या देशाला संरक्षण आपोआपच मिळतें. अन्य देशांचा माल महाग पडतो. उलट सर्व देशांच्या मालावर सारखी जकात बसविली तर येथील धंद्यांना स्पर्धा कमी होईल. ते तेजींत येतील. ब्रिटननें येथील ज्या मालाला इंग्लंडमध्यें सवलत दिली आहे, तो माल इंग्लंड काढीतच नाहीं. तेथील धंद्यांना सवलतीमुळें बिलकुल धोका नाहीं, उलट फायदाच आहे. सर्वत्र स्वावलंबी असावें असें धोरण स्वीकारलें जात आहे. म्हणून ज्या देशांत कच्चा माल मुबलक, त्यांचें भवितव्य उज्वल आहे. प्रामाणिक करार करण्यास हा देश नेहमींच तयार आहे. आर्थिक व राजकीय उन्नती राष्ट्रानें आपली आपणच करावयाची असते."

सर्व विरोधी पक्षांतर्फे समारोप करण्याकरितां जिना हे उभे राहिले तेव्हां सर्वत्र टाळ्या पडल्या. "फडणिसांनी कांही दिवसांपूर्वी राज्यकारभाराची जबाबदारी अमुक अमुक कलमाखालीं सरकारची आहे म्हणून बजेट फेटाळलें तरी शिक्केबाजी करून आम्ही तें पास केलें असें सांगितलें होते" जिनांनी सुरवात केली. "मला तर ते फडणीस वाटतच नव्हते. कारण ही भाषा फडणिसाची नाही. भाडें वसूल करणाऱ्या भय्याची आहे. पण आज व्यापारमंत्री म्हणतात कीं, या ठरावाबाबत हें सभागृह ठरवील तें सरकार मान्य करील. कोठपर्यंत, पांच वाजेपर्यंत, मतनोंदणी होईपर्यंत! नंतर राज्यकारभाराची जबाबदारी शरिरानें येथें, मनानें डाउनिंग स्ट्रीट-

मध्यें, व डोक्यानें वेस्टमिनिस्टरमध्ये राहाणाऱ्या सरकारकडे जाणार हें स्पष्ट आहे!! आमची खात्री होणें शक्य नाही मग भाषणें कशाला केलींत! हा आमचा अपमान आहे. अजून हा करार या देशाच्या हिताचा आहे अशी खात्री माझी पटवा, मी त्याप्रमाणें मत देईन " 'कांहींची खात्री पटविणें अशक्य असें मी म्हणतो' नॉईससाहेबांनीं उठून सांगितलें. " ठीक, निदान कांहीं माणसें तरी विचार करून मत देणार आहेत!! ही दुरुस्ती मला मान्य आहे. कसा करार झाला? कां झाला? १९३१ सालीं इंग्लंडनें सुवर्णचलन सोडलें. तेव्हां इंग्लंडनें वसाहतींना विचारलें कां? या देशाला विचारलें कां? १९३२ सालीं जकाती बसविण्याचा कायदा केला, तेव्हां विचारलें कां? उलट कायदा केला आणि दम दिला कीं, सहा महिन्यांत आम्ही म्हणतों त्या योजनेंत या नाहींतर तुमच्या मालावर जकाती बसवूं. हिंदुस्थान सरकारनें हुकुमाप्रमाणें प्रतिनिधी धाडले. ज्यांना कोणीही येथें महत्त्व दिलें नाहीं, जे प्रमुख व्यापारीही नव्हते, अशांना धाडले. हिंदी व्यापाराचे खरे प्रतिनिधी गेले नाहींत हें सरकारलाही मान्य करावें लागलें. जे गेले त्यांनीं काय केलें? जर योजनेंत शिरलें नाहीं तर नुकसान होईल हाच विचार त्यांना सतावीत होता. ( It was no longer a question of what India stood to gain, but what she stood to lose. ) कराराची किंमत विमा स्वरूपाची, नुकसान प्रतिबंधक व नुकसान निवारक आहे असें व्यापारमंत्री म्हणतात. त्याहीवेळीं तीच वृत्ति व आजही करार रद्द झाला तर नुकसान होईल हीच वृत्ति त्यांच्या भाषणांत दिसते. ओटाव्याच्या योजनेसंबंधीं बोलावयाचें म्हणजे आमच्या प्रतिनिधींनीं घात केला. पहा काय कबुली दिली ती! इंग्लंडचे मुख्य प्रधान यांनीं त्यावेळच्या भाषणांत खालील उद्गार काढले आहेत. " कांहीं वस्तूंबाबत ब्रिटिश मालावर तुम्ही ( हिंदी प्रतिनिधि ) अन्यदेशांच्या मालापेक्षां कमी आयात-दर लावले आहेत हें तुम्हीं इंग्लंडवर कांहीं मेहेरबानी करण्याकरितां नव्हे, अगर साम्राज्यविषयक सवलतींचें तत्त्व मान्य केलें म्हणून नव्हे, तर केवळ हिंदुस्थानच्या हितार्थ तुम्ही केलें असें मला सांगण्यांत आलें आहे, म्हणून कृतज्ञता दाखविणें चूक होईल. परंतु जें इंग्लंडच्या हिताचें आहे तेंच हिंदुस्थानच्या हिताचें तुम्हास आढळलें याबद्दल समाधान मात्र मी व्यक्त करतो. अशाच रितीनें अनेक बाबतींत हिंदी उद्योगधंदे हे इंग्लंडला स्पर्धा करणारे न होतां पूरकच होतील असें आढळून येईल, अशी माझी खात्री आहे. ( I am informed that in respect of

certain classes of goods you have lower duties on British than on foreign products, but this differentiation was as a matter of historical fact made solely in the interest of India, and without any desire to confer a favour on this country or from any belief in the policy of Imperial Preference. I suppose, therefore, that I would be wrong in expressing gratitude for the differentiation, but I cannot refrain from expressing my satisfaction that it has been found to be in the interest of India to do what is undoubtedly in the interest of this country and I am confident that in other directions also, it will be found that Indian Tndustries are complementary rather than competitive with British.") आमच्या प्रतिनिधींनीं खालील तारे तोडले म्हणूनच मुख्य प्रधान वरील प्रमाणें बोलला. ("Theoretically it might seem that preference in the case of protective duties would be excluded altogether; but practically the result has been different. One of the most interesting things about the Indian system of protection is, that it has led directly to what has been in effect if not in intention a preference for Empire goods. In the cases of iron and steel and cotton-piece-goods it has been found that the imposition of a lower duties on goods made in United Kingdom is entirely consistent with Indian interest.") तत्वतः जरी संरक्षित वस्तूंच्या आयातीवर सवलत देणें योग्य नसलें तरी, तशी सवलत दिल्यानें हिंदुस्थानच्या त्या वस्तूंच्या उद्योगधंद्यांना नुकसान न पोहोंचतां त्या त्या ब्रिटिशमालाला उत्तेजन मिळालें ही कबुली घातुक आहे; व वस्तुस्थितीही तशी नाहीं. पोलादाबाबत वस्तुस्थिति तशी नाहीं. १९३० सालीं कापडसंरक्षणाचें बिल ( Textile Protection Bill ) आलें तेव्हां 'इंग्लिशमालावर सवलतीचे दर जर तुम्ही मान्य केले नाहींत तर बिल परत घेऊं' असें पिस्तूल रोखून इंग्लंडला सवलतीचे दर देण्यांत आले. 'जर तुम्ही बिल बदलाल तर तें परत घेईन' अशी धमकी व्यापारमंत्र्यानें दिली होती. हिंदुस्थानच्या हितार्थ इंग्लिश कापडावर सवलतीची जकात ठेवली हें म्हणणें खोटें आहे. कराराच्या वेळीं व्यापार बिघडला होता म्हणून करार केला, आतां सुधारला कां ? नॉईस म्हणाले कीं, कांहीं सुधारणा करणें जरूर आहे. सरकारनें या दृष्टीनें काय

केलें ! " " प्रचार " श्री. जोशी हळूच बोलले. " सरकार कमिटी नेमून कालहरण करूं इच्छितें. कमिटीनें कांहीही शिफारसी केल्या तरी शेवटीं इंग्लंडनें त्या मानल्या पाहिजेत. नाहीं मानल्या तर हा करार चालूंच रहाणार. त्यापेक्षां रद्द करण्याची नोटीस देणें व सहा महिन्यांत निरनिराळ्या देशांशीं–इंग्लंडशींसुद्धां–नवीन करार करणें हेंच योग्य होईल; हा कांहीं वरवरचा प्रश्न नाहीं. ज्या दिवशीं ओटावा करार झाला त्यादिवशींच हिंदी व्यापाराचें जहाज बुडालें आहे–फुटलें आहे–त्यांतूनच कांहीं-तरी काढण्याचा आमचा प्रयत्न आहे. तीन वर्षें करार होऊन झालीं, चांगला कीं वाईट ठरला हें अजून सांगता येत नाहीं हें आश्चर्य आहे. येवढे मोठे व्यापारी येथें आहेत. कराराच्या वेळच्या सभागृह–कमिटींतील अल्पमतवाल्यांनीं हा करार हितावह नाहीं हें स्पष्टपणें सांगितलें होतें. ३१ टक्के व्यापार इंग्लंडशीं आहे तो राखावा म्हणून ६९टक्के व्यापार ज्यांच्याशीं आहे त्यांचें वैर कां संपादन करावयाचें? अन्यदेशांनीं करार झाल्याबरोबर उपाययोजना स्वहिताच्या दृष्टीनें केली. आमचा व्यापार घटला. इंग्लंडशीं करारांत गुंतलों म्हणून अन्यदेशांशीं करार करण्यांत अडचण येत आहे. मुख्य मुख्य माल इंग्लंडनें गुंतवून घेतला मग इतरांशीं करार करतांना त्यांना काय द्यावयाचें हा प्रश्न येतो. हा करार रद्द झाला तरच आम्हीं मोकळे होऊं. चांगले व्यापारी करार अन्य देशांशीं करूं शकूं. आम्हाला सांगण्यांत आलें कीं या करारापासून इंग्लंडचें नुकसान झालें; अरेरे ! अशी स्थिति असेल तर–इंग्लंडवर या करारानें अन्याय होत असेल तर–मग तो रद्दच करणें जरूर आहे. कमिटी नेमा वगैरे बनवाबनवीच्या प्रकारांस सभागृह बळी पडणार नाहीं. इतर वसाहतींची कराराची मुदत सन १९३७पर्यंत आहे, तेथपर्यंत लोंबकळत ठेवण्याचा हा डाव आहे. कमिटी नको, प्रथम करार रद्द करणें जरूर आहे. कमिटीच्या खोड्यांत पडूं नका." असें बजावून जिनांनीं आपलें भाषण संपविलें.

शेवटचा अंक सुरू झाला. चर्चेचा समारोप सरकारतर्फे करण्याकरितां, उत्तरादाखल भाषणाकरितां–सर महंमद झाफरउल्ला, व्यापारमंत्री, उभे राहिले. तीन दिवस झालेल्या चर्चेतील मुख्य मुख्य मुद्यांना त्यांनीं उत्तरें देण्याचा प्रयत्न केला. " इंग्लंडनें करार रद्द करावा म्हणून नोटीस दिली नाहीं म्हणजे तो करार फायदेशीरच आहे असा निष्कर्ष काढणें बरोबर होणार नाहीं. खुद्द इंग्लंडमधील संयुक्त व्यापारीसंघ करार दुरुस्त करा असेंच म्हणत आहे. दम देवून करार घडवून आणला हें खरें नाहीं. प्रतिनिधि गेले, त्यांनीं विचार केला, करार करणें त्यांच्या बुद्धीला

फायदेशीर वाटलें म्हणूनच केला. सरकारनें पूर्वी कमिटी बोलावून कांहीं रिपोर्ट केला, त्याप्रमाणें जर सरकारनें ठराव आणला असता तर सभागृहानें असा आरोप केला असता कीं सरकारनें आपलें मत पक्कें केलें आहे, आतां चर्चेला वाव कोठें आहे ? हो किंवा नाहीं म्हणून मतें नोंदवावयाचीं ! ! आणलेला ठराव हा आरोप टळावा, उपलब्ध माहिती घेऊन कमिटीनें शिफारसी कराव्यात याच हेतूनें आणला आहे. करार केला. त्यावेळीं सवलतीच्या वस्तूंचा व्यापार घटेल असें वाटलें म्हणून केला. बिनसवलतींच्या वस्तूंचा व्यापार वाढला म्हणून करार करणें जरूर नव्हतें हें म्हणणें तर्काला धरून नाहीं. बिनसवलतींच्या वस्तुंवरहि कदाचित करार झाला नसता तर आयात जकात बसली असती. बिनसवलतींच्या वस्तूंचा व्यापार इंग्लंडशीं कमीच झाला आहे. या विचारसरणीविरुद्ध ही विचारसरणी असूं शकेल. अनेक दृष्टीकोन असूं शकतील. आणि त्यांचा परामर्ष कमिटी खास घेईल. तीन वर्षें सरकारनें मिळालेला अनुभव लक्षांत घेवून कांहीं केलें नाहीं हा आरोप खरा नाहीं. करार रद्द करण्याची नोटीस दिली नाहीं हें खरें. तथापि भाताच्या बाबतींत इंग्लंडकडून स्पॅनिश भातावर जास्त जकात बसवून घेतली. थोडी जकात होती म्हणून एकदम भाताची आयात स्पेनमधून वाढली, व येथील मालाला स्पर्धा उत्पन्न झाली. जकात वाढल्याबरोबर स्पॅनिश भात इंग्लंडमध्यें येईनासें झालें. तसेंच शेंगदाणा एकदम मांचुरियामधून इंग्लंडमध्यें येऊं लागला व त्याबरोबर येथील मालाला मागणी कमी झाली. हिंदुस्थान सरकारच्या विनंतीस मान देऊन मांचुरियांतून येणाऱ्या शेंगदाण्यावर १० टक्के जकात इंग्लंडनें गेल्या वर्षी बसविली. कॉफीच्या बाबतींत आमच्याच व्यापाऱ्यांची चूक आहे. कारण त्यांनीं सवलतीचा फायदा घेतला नाहीं. व्यापारी दृष्टीनें कराराची चर्चा अनेक सभासदांनीं केली नाहीं. राजकारण त्यांत घुसडलें. करार केल्यानें व्यापारी स्वातंत्र्य गेलें हेंही खरें नाहीं. साडेचार कोटी रुपयांचें नुकसान करार रद्द केला तर व्यापारी दृष्टीनें येईल; आणि हें भरून काढावयाचें म्हणजे अनेक देशांशीं करार करून, व हे सर्व देश लहानसहान गिऱ्हाइकें आहेत, व्यापाऱ्यांची मदत घेऊन करार करावयाचे म्हणजे या सभागृहानें आपलें कर्तव्य व जबाबदारी सोडण्यासारखें आहे ! ! खरी जबाबदारी या सभागृहाची आहे व ती पार पाडण्यासाठीं योग्य मार्ग म्हणजे कमिटी नेमून चर्चा करून नंतर निर्णय घेणें हाच होय. २।४ महिन्यांनीं कांहीं जास्त नुकसान होणार नाहीं. सन १९३७ पर्यंत तो लोंबकळत ठेवण्याचा यांत डाव नाहीं असें सरकारतर्फें मी सांगतो. या उपर सभा-

गृहाला योग्य वाटेल तें करावें," अशी अखेरची निराशेची भाषा काढून ते खालीं बसले. दीडतास बोलून ते थकले होते, पराभवाची छाया त्यांच्या भाषणावर पडली होती. प्रतोदाकडून येणारी बातमी आनंद देणारी नव्हती. भाषण सुरुवातीस त्यांना कांहीं सभासद जे सरकारनें गटाविले होते, ते सभागृहांतून अदृश्य झाल्याचें वृत्त कळलें होतें. व्यक्तिगत महत्त्वाकांक्षाही ठरावामागें होती. मुसलमान सभासद ५।१० नें त्यांना अधिक मिळते तर ठराव पास झाला असता व हिंदुस्थान सरकारांत त्यांची प्रतिष्ठा वाढली असती असें मत बोललें गेलें होतें. त्यांचें भाषण चालूं असतांच मी व आणखी दोघे कॉंग्रेस सभासद, तीन पंजाबी मुसलमान सभासदांच्या पाळतीवर होतो. मातिन चौधरी पण सावध असून कोंकरें संभाळीत होतें. भाषण संपतांच टाळ्या पडल्या. मतनोंदणीची घंटा झाली. तिघा इस्लामियांची गडबड सुरू झाली. आंत राहातील तर मत आमच्या विरुद्ध देतील, सरकारी अधिकाऱ्यासमोर धीर धरणार नाहींत. मी त्यांना लायब्ररींत नेलें व एक तर हिजरात करा—निघून जा—नाहींतर लायब्ररीच्या गार-ए-हीरांत—महंमद पैगंबर ज्या गुहेंत बसले तिचें नांव—गुपचुप बसा. दारें बंद झालीं म्हणून येऊं शकलों नाहीं असें सांगतां येईल. घंटा बंद झाली. पटकन मी लॉबींत आलो. दार बंद झालें. बुद्धि फिरण्याला आतां संधी नाहीं अशी खात्री झाली व आंत येवून जिनांना जें झालें तें निवेदन केलें. मतनोंदणी झाली व ७० विरुद्ध ६५ मतांनीं जिनांची सूचना पास झाली. टाळ्यांनीं व स्टँपींगनीं सभागृह दुमदुमलें. मतनोंदणीच्या वेळीं क्षणभर विजेचा प्रवाह बंद पडला होता, पण लागलीच प्रकाश झाल्यामुळें प्रसंगांत नाट्य उत्पन्न झालें. आमच्या बाजूनें ब्रह्मी सभासद डॉ. थीन मॉंग व बा सी यु यांनी मतें दिलीं. डॉ. डिसोझा यांनीं जेव्हां आमच्या लॉबींत प्रवेश केला तेव्हां आम्ही स्वागत करून त्यांच्याजवळ कॉफीपानाची मागणी केली!! कलकत्त्याचे व्यापारी प्रसिद्ध सनातनी गृहस्थ वैजनाथ बजोरिया यांनी सरकारतर्फें मत दिलें. तीच गोष्ट अजमीरच्या कोट्याधीश भागचंद सोनी यांनीं केली. सभा संपली. सात वाजून गेलें होतें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं पक्षसभेची सूचना नेत्यांच्या सांगण्यावरून दिली, व सुशोभित व सुप्रकाशित रस्त्यांच्या बाजूच्या हिरवळीवरून गप्पा मारीत मारीत जमावाजमावानें आम्ही परतलों. नव्या दिल्लीला थडग्यांचें नगर (City of Tombs) असें म्हणतात. आज त्यांत एकाची आम्ही भर टाकली होती, फक्त शोकाऐवजी आनंद करीत होतो.

घरीं येतांच भुलाभाईंनीं डॉ. खरे यांनीं पक्षाचा राजिनामा दिला आहे तेव्हां तुम्ही त्यांना भेटा व यांतून कांहींतरी मार्ग काढा असा निरोप धाडला. असें कांहीं तरी होईल असें वाटतच होतें. डॉ. खरे हे जितके भावनावश आहेत तितकेच ते करारीही आहेत हें मला माहीत होतें. दुसऱ्या दिवशीं सकाळींच त्यांच्या बंगल्यांत गेलो. त्यांनी राजिनामा देण्याचीं कारणें सांगितलीं. मी त्यांना झालें तें बाजूला सारून राजिनामा परत घेण्याविषयीं विनंती केली व ती त्यांनीं ऐकली. डॉ.खरे यांचा राजिनामा पक्षसभा भरण्यापूर्वीच परत घेण्यांत आल्यामुळे डॉ.देशमूख यांच्याबद्दल चर्चा करून वेळ घालविण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें नेत्यांनीं ठरविलें व पक्षसभेंत चालू अधिवेशनाचें समालोचन करण्यांत आलें. बजेट फेटाळलें, ओटावा करार रद्द करावा हेंही ठरविलें, अन्य कित्येक प्रश्न लोकमताच्या दृष्टीनें चर्चिले, सरकारचा अनेकवेळां पराभव करून सरकार लोकमताला जुमानीत नाहीं हें जगाच्या दृष्टीस आणलें, हे फायदे कमी होते असें नव्हे. एप्रिलच्या दुसऱ्या आठवड्यांत लखनौला कॉंग्रेसचें अधिवेशन होतें त्यापूर्वी हा पराक्रम झाला असल्यामुळे त्याचा परिणाम कॉंग्रेसच्या भावी राजकारणावर होणें साहाजिकच होतें. एप्रिलच्या ५ व्या तारखेस भुलाभाई यांच्या निवासस्थानीं ऑल इंडिया पार्लमेंटरी बोर्डाची सभा भरली. डॉ.अन्सारी हजर होते. बोर्डावर मी निवडून आलो होतो व श्री.जेधे यांना अधिक सभासद म्हणून घेतले होते. बोर्डापुढे मुख्य विचार प्रांतिक निवडणुकीचा होता. निवडणुकी सन १९३७ च्या सुरवातीस होणार हें ठरलें होतें. कॉंग्रेस, पक्ष या नात्यानें त्या लढविणार हेंही ठरलें होतें. निरनिराळे मतदारसंघ तयार झाले होते. कांहीं किरकोळ बाबी ठरावयाच्या होत्या. प्रांतवार परिस्थितीची माहिती देण्यांत आली.महाराष्ट्रासंबंधीं मी या बाबतींत एक टिपण केलें होतें, त्या आधारानें मतदारसंघ, मतदार वर्गाचें स्वरूप, जातिविषयक विचारप्रवाहांचा संभवनीय परिणाम, मतदान पद्धतीच्या अडचणी, कार्यक्रम, विरोधी उमेदवार व पक्ष, यांची साधनसामुग्री व संघटना, कॉंग्रेसच्या प्रांतिक संघटनेंतील दोषस्थलें व यश मिळविण्याच्या दृष्टीनें कांहीं सूचना यांवर विवेचन केलें. कोठल्याही दुसऱ्या प्रांतांतील बोर्डावरील सभासदानें इतका पद्धतशीर प्रयत्न केला नाहीं म्हणून डॉ.अन्सारींनी अभिनंदनही केलें. त्याचवेळीं मध्यवर्ति असेंब्लींतील कॉंग्रेसपक्षापैकीं कांहींनी प्रांतांत जावें असें सुचविण्यांत आलें. सामान्यतः हें मला मान्य होतें पण मी व जेधे तयार नाही हेंहीं सांगून टाकलें. सन १९३०-३१ व १९३२-३३ च्या चळवळीनंतर ब्राह्मण-

ब्राम्हणेतर वादाचें तीव्र स्वरूप नष्ट झालें होतें. अनेक ब्राम्हणेतर कार्यकर्ते चळवळींत सामील झाले होते. तुरुंगांत एक ठिकाणीं राहून, अनेक गैरसमज उभय जमातींतील कार्यकर्त्यांचे कमी झाले होते. नवी मैत्री उत्पन्न होत होती. एकत्र येण्यानें व एकत्र कार्य करण्यानें अविश्वास कमी होत होता. 'जेधे-गाडगीळ' यांची निवडणूक हे या नवीन् भावनेचें पहिलें यश, पहिलें फळ, होतें. जेधे-गाडगीळ या व्यक्ती नसून एक संयुक्त व सामर्थ्यवान भावना, सामाजिक व राजकीय, बनत चालली होती. ब्राम्हण व ब्राम्हणेतर हे वंशदृष्टीनें, संस्कृतीच्या दृष्टीनें दोन वर्ग नाहींत, आर्थिक हितविरोध यांत नाहीं, असें सूक्ष्म दृष्टीनें पहाणारांस दिसून येण्यासारखें होतें. सह-भोजनाचा व भक्षाभक्ष्यबाबतचा प्रश्न परिस्थितीनें सोडवीत आणलाच होता. बेल-बागेच्या विष्णूशेजारी व टिळकस्मारकाजवळ इराणी हॉटेलें आल्यानंतर तेथें येणारें गिऱ्हाईक तेथील वस्तींतील लोकांचेंच असणार हें उघड होतें. रोटीबंदीचा तट जमिनदोस्त झाला होता. खाण्यापिण्यावरून श्रेष्ठता दाखविणारा भाव आतां उरला नव्हता. तथापि अंतःकरणापासून हे दोन्ही वर्ग एक झाले होते असें मात्र नाहीं. ते व्हावेत हें महाराष्ट्राच्या उन्नतीच्या दृष्टीनें अवश्य होतें. समाजाची रचना जन्मावर आधारली जाणें अनिष्ट, हें समजलें होतें पण त्यापुढें प्रगति होत नव्हती. ब्राम्हणेतर वर्ग श्रमजीवि व ब्राम्हणवर्गही श्रमजीवि होता. श्रमाचें स्वरूप निराळें होतें. समाजाची संपत्ति व संपत्तीच्या उत्पादनाचीं साधनें, ज्या वर्गाच्या हातांत होतीं तो मोठ्या प्रमाणांत भाषेनें, संस्कृतीनें, विचारानें, वर्तनानें, महाराष्ट्रीय नव्हता व अजूनही नाहीं. त्यापैकीं कांहीं भाग या प्रांतांतील जीवनाशीं समरस झाला आहे हेंही खरें, त्यांनीं आपली भवितव्याची पडशी आमच्याच ओसरींत ठेविली आहे, व आमच्या सुखदुःखांत ते वाटेकरी आहेत हें खरें. पण हें प्रमाण अल्प आहे. कॉंग्रेसनें बहुजन समाजाचे वाली हें ब्रीद उघड स्वीकारिलें पाहिजे व त्यांत कोणाचाही रोष आला तरी चालेल, ही वृत्ति स्वीकारणें जरूर होतें. एकदम समाजसत्तावाद स्वीकारा असें कोणीही म्हणत नव्हतें. आर्थिकदृष्ट्या बहुजन समाज व ब्राम्हण वर्ग हे सारखेच दरिद्री होते व आहेत. यादृष्टीनें कॉंग्रेसनें बहुजन समाजाचें खरेंखुरें नेतृत्व स्वीकारून महाराष्ट्रांत वागलें पाहिजे असें माझें मत होतें व हें करावयाचें तर कॉंग्रेसची संघटना व सामर्थ्य यांत बहुजनसमाजाचे कार्यकर्ते येणें, व आणणें जरूर होतें. कॉंग्रेसमधील कार्यकर्ते मोठ्या प्रमाणांत ब्राम्हण वर्गांतील होते, त्यांतील सर्वच कांहीं जातिनिष्ठतेपासून सर्वस्वी अलिप्त नव्हते.

वर्गनिष्ठ दृष्टीकोनही त्यांच्यांत प्रसंगीं दिसून येई. तथापि कॉंग्रेस व सत्यशोधक यांची एकजूट झाल्यास सामाजिक व राजकीय परिणाम चांगले होतील, महाराष्ट्राचें पाऊल पुढे पडेल; नेते व अनुयायी यांच्यांत आपुलकीची भावना उत्पन्न होईल, व हीच यशाची किल्ली आहे अशी माझी विचारसरणी होती व आहे. शरिराचें कातडें व रक्तमांस हें जसें एकजीव, कातडें सोललें गेलें अगर कापलें गेलें तरी तावडतोब आंतूनच नवीन कातडें येतें, तीच स्थिति समाज व त्याचें नेतृत्व यांत असणें इष्ट आहे. नेतृत्व म्हणजे नुसतें कवच नव्हे किंवा शोभा देणारीं पिसें नव्हेत. सामुदायिक जीवनाचा उत्कर्ष व उठाव, भावना व संवेदना, त्यांत असलीं पाहिजे. मलबार हिलवर राहून व त्याला अनुषंगिक भावना व राहाणी ठेऊन भेंडीबाजारांतील जनतेशीं खरेखुरें समरस होणें हें कठीण आहे. वर्गभावना मनाला पटूनसुद्धा संयमित ठेवणें कठीण असतें व ती निर्मूलन करणें तर फारच दुष्कर. निवर्गी व निगर्वी होऊन बुद्धिमंतांनीं बहुजन समाजाच्या अंतःकरणांत शिरावें हा खरा मार्ग पण तो अत्यंत अवघड आहे. बहुजन समाजांतील व्यक्ति शिक्षणानें, संधीनें, सहकार्यानें नेतृत्व स्वीकारतील तर हें कार्य जास्त सुकर होईल हें स्पष्ट आहे. शिक्षण व संधी मिळून सेवेऐवजी स्वार्थाचा रस्ता स्विकारणारेही सर्वत्र समाजांत असतात हेंही खरें. तथापि वरील विचारसरणीनें काम करणें हें योग्य व म्हणूनच तेंच करण्याच्या दृष्टीनें व महाराष्ट्रांतही एकजूट व्हावी व प्रयत्न करण्यास मोकळें असावें म्हणून प्रांतिक निवडणुकीस उभें न रहाण्याचें आम्हीं ठरविलें. पार्लमेंटरी बोर्डातील चर्चेंतहि या विचारसरणीचा थोडा उल्लेखही आला. पार्लमेंटरी बोर्डाच्या सभेनंतर लखनौच्या कॉंग्रेसमध्यें सदरहू बोर्ड रद्द करण्यांत आलें व निवडणुकीबाबतचा सर्व अधिकार कॉंग्रेसनें आपल्याकडे घेतला. हें काम वर्किंग कमिटीनें करण्याचें ठरविलें. अनेक दृष्टींनीं हा निर्णय योग्य होता.

लखनौच्या अधिवेशनांत सर्वत्र विधिमंडळांत झालेल्या कार्याबद्दल व विशेषतः ओटावा करार रद्द करण्याचें सभागृहानें ठरविलें याबद्दल लोक खुष होते. हिंदुस्थानभर वर्तमानपत्रांतून अभिनंदनपरच लिहिण्यांत आलें होतें. सभागृहावर निर्णयाची जबाबदारी सरकारनें टाकली व सभागृहानें राष्ट्रीयवृत्तीस साजेल अशीच ती पार पाडली असें सर्वांचें मत होतें; व त्यादृष्टीनें अधिकारग्रहणाच्या प्रश्नास चालना मिळाली. लखनौच्या अधिवेशनांत या प्रश्नाची चर्चा झाली पण निर्णय घेतला गेला नाहीं हें खरें. तथापि अधिकारग्रहण कॉंग्रेस करणार या दृष्टीनें महंमदी मन

सुबे बांधणारे सद्गृहस्थ संख्येनें वाढूं लागले. लखनौस, काँग्रेसचें पुढील अधिवेशन महाराष्ट्रांत भरावें असें ठरलें. काँग्रेस अधिवेशन संपतांच दिल्लीस आम्हीं परतलों. ता. २१ एप्रिल १९३६ रोजीं दिल्लीचें चालूं वर्षाचें अधिवेशन संपलें. आग्रा, मथुरा, हरिद्वार वगैरे शहरें सहकुटुंब पाहून पुण्यास परतलों. शेवटच्या दिवशीं पक्षाची वार्षिक सभा होऊन पुन्हां प्रतोद म्हणून निवडला गेलों. सभेंत एकंदर अधिवेशनाचें समालोचन करण्यांत आलें व आम्हीं आमची पाठही थोपटून घेतली !! निवडणुकीच्यामागील वृत्तीपासून आम्ही दूर दूर जात होतों. पुन्हां पुन्हां स्तुति करून व करवून करीत असलेलें अल्प, महनीय आहे असें मानीत होतों व भासवितही होतों. परिणाम असा झाला कीं जनता जास्त जास्त सनदशीर वृत्तीची होऊं लागली. कार्यकर्ते निवडणुकींत रस घेऊं लागले, व हें होत होतें हें चांगलें कीं वाईट हें ठरविणारा मी तरी एकटा कोण असें मलाही वाटूं लागलें !!!

———

# १९३६ चें सिमला अधिवेशन

महाराष्ट्रांत कॉंग्रेसचें अधिवेशन होणार या बातमीनें कार्यकर्त्यांत उत्साह वाढला तर कांहींना हें प्रामाणिकपणें संकटही वाटलें. मेच्या पहिल्या आठवड्यांत पुणें येथें प्रांतिकची सभा घेण्याचें ठरलें. राष्ट्रपति जवाहरलाल हे मुंबईस येऊन पुण्यास येणार होते. पुणें येथें त्यांचें अपूर्व स्वागत झालें. शनिवारवाड्यापुढील सभा शिस्त व व्यवस्था यादृष्टीनें अभिनंदनीय झाली व त्याप्रमाणें जवाहरलाल यांनीं बोलूनही दाखविलें. शिरूभाऊ लिमये वगैरे कार्यकर्ते यांना त्यामुळें अधिक उत्तेजन मिळालें. अनेक कार्यकर्त्यांशीं पं. नेहरू यांनीं चर्चा केली. प्रांतिक-सभेच्या निमित्तानें अनेक सभासद नसलेले पण जुने व प्रमुख कार्यकर्ते यांनाहि बोलाविलें होतें. प्रथम अनौपचारिक सभेंत–ज्यांत अन्य कार्यकर्ते सभासद सामील होते, त्यांत अधिवेशन शहरांत अगर खेडेगांवांत भरवावें यावर चर्चा झाली. अनेक कारणांसाठीं अधिवेशन पुणें येथें व्हावें असें मला वाटत होतें. अध्यक्ष श्री. देव यांनीं प्रश्न मताला टाकला. चिटणीस व मी यांनीं मतें मोजिलीं व त्यांत फरक होता. शहराच्या बाजूनें शंभराबर मतें होतीं तर खेडेगांवच्या बाजूनें सुमारें ९० होतीं पण चिटणिसांच्या मोजणींत अगदीं उलट पण आंकडे तेच होते. अध्यक्षांनीं चिटणिसांप्रमाणें निकाल जाहीर केला. मी नियमाप्रमाणें पुन्हां मतें मोजावीं म्हणून मागणी केली. हा प्रत्येक सभासदाचा हक्क आहे. चुकभूल होणें शक्य आहे म्हणूनच हा हक्क सभेच्या कायद्यानें दिलेला आहे. अध्यक्षांनीं त्रागा करून अध्यक्षस्थान सोडून जवळच्या 'लोकशक्ति' कचेरींत गमन केलें. सभेच्या नियमांनां व नीतीला हें सोडून होतें. वातावरण क्षुब्ध झालें. अध्यक्षांचा निकाल तुम्हीं मान्य करा म्हणून कांहीं सद्‌गृहस्थ मलाच सांगूं लागले. मी निकाल अमान्य करण्याचा प्रश्नच नव्हता. माझें म्हणणें मतनोंदणी पुन्हां व्हावी व त्यांत जो निकाल होईल तो मानणेंच मला भाग होतें. माझी खात्री होती कीं, मी केलेली मोजणी बरोबर होती. अध्यक्षांचें वर्तन चूक

होतें, लोकशाहीच्या विरुद्ध होतें. कार्यबिघाड होण्यापर्यंत जाण्याची माझी प्रवृत्ति नाहीं म्हणून प्रांतिकच्या सभेस सुरवात करा असें मी सांगितलें. तेथें या प्रश्नावर समान मतें पडलीं व अध्यक्षांनीं जादा मत देऊन खानदेशांत खेडेगांवीं अधिवेशन भरवावें असा निकाल दिला. निकालानंतरही अनेक किंबहुना बहुसंख्य लोकांना हा निकाल बरोबर नाहीं असेंच वाटलें, पण मी मात्र ज्याअर्थी प्रांतिक सभेनें हा निर्णय घेतला आहे त्याअर्थी तो सर्वांचा निर्णय आहे असें समजून, सर्वांनीं तो पार पाडणें जरूर आहे असें सांगून, प्रथम अधिवेशनाला देणगी म्हणून १०० रुपये जाहीर केले. अधिवेशनाची जागा व अन्य व्यवस्था पाहाण्याकरितां मी कमिटी नेमावी असा ठराव मांडला व तो पास झाला. दुसऱ्या दिवशीं माझ्या घरीं या कमिटीची बैठक भरून कामास सुरवातही झाली. झालेला निकाल बदलून घ्यावा म्हणून प्रांतिकची सभा पुन्हां बोलवावी अशा पत्रकावर सह्या घेण्याचें कामहि कांहींनीं सुरू केलें. मजकडे हे लोक आले असतां, हें तुम्ही बंद करा, हें कार्यनाशक आहे, निर्णय ज्या रितीनें घेतला ती रीत चूक असेल, निर्णयहि कदाचित योग्य नसेल, तथापि, निर्णयानंतर सर्व मतभेद मिटले पाहिजेत व सर्वांनीं आपुलकीनें काम केलें तरच काम होतें असें त्यांना सांगून परावृत्त केलें. वर्तमानपत्रांतून वादविवाद चालू होता. अनेक पत्रें खानदेश व अन्य जिल्ह्यांतून मजकडे आलीं. पण जें ठरलें तें ठरलें, त्यांत बदल करण्यास मी तयार नव्हतों व करणेंहि अयोग्य ठरलें असतें. काँग्रेसचें अधिवेशन व निवडणुकी हीं दोन्हीं कामें लहानसहान नव्हतीं. प्रांताची सर्व शक्ति एकत्रित करणें जरूर होतें. शिवाय कार्यांत कांहींतरी स्थिरता, निष्ठा व विवेक पाहिजे या दृष्टीनें सर्वांनीं निदान प्रमुखांनीं वागणें जरूर होतें. प्रांतिकच्या सभेनंतर अधिवेशनाचें काम अण्णासाहेब दास्ताने यांच्याकडे प्रामुख्यानें होतें. मी व केशवराव यांनीं प्रांतभर दौरा आंखला. भावी निवडणुकीच्या दृष्टीनें कामास सुरवात केली. मतदारांच्या हक्कांबाबत सरकारशीं पत्रव्यवहार करून खानदेशमधील कांहीं लोकांना—जे मतदानास अपात्र ठरविले होते त्यांना—पात्र ठरविण्यांत यश मिळविलें. मे, जून, जुलै, आगस्ट या महिन्यांत नगर, सोलापूर, सातारा, खानदेश या जिल्ह्यांतून तुफानी प्रचार आम्हीं दोघांनीं केला.

ऑगस्ट महिन्यांत ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची बैठक मुंबईस भरली व तेथें निवडणुकीचा जाहीरनामा मंजूर करण्यांत आला. संस्थानी प्रजेच्या भवितव्यतेचा उल्लेख त्यांत प्रथम तितकासा नव्हता. मी एक लहान उपसूचना देऊन तो करून

घेतला. या उपसूचनेनें संस्थानी कार्यकर्ते खूष झाले. खुद्द पट्टाभींनीं नंतर काढलेल्या महाराष्ट्रांतील संस्थानांतील दौऱ्यांत माझ्या उपसूचनेनें चांगलें कार्य झालें असें उद्गार काढले. महाराष्ट्रांत संस्थानविषयक उदासीनता हा आरोप कॉंग्रेसविरुद्ध, नेहमीं करण्यांत येई. त्याचा निकाल लागावा हाच माझा हेतू होता. संस्थानी प्रजेची काळजी करण्याचा देखावा करणारा एक वर्ग आहे. स्वत: त्यांना संस्थानें हवीं आहेत. तीं त्यांना गत पराक्रमाचीं स्मारकें वाटतात. प्रजेची कळकळ ही वरवरची आहे असें अनेक प्रसंगीं दिसूनही आलें आहे. प्रजेची चळवळ सुरू झाली कीं ' ती जातिविषयक आहे, गुंडांची आहे ' असे शेरे मारून याच वर्गाचीं वर्तमानपत्रें खरें स्वरूप प्रगट करतात. पण कॉंग्रेसवर टीका करण्यांत मात्र प्रवीण. त्यांचीं तोंडें या उपसूचनेनें बंद झालीं. या ऑल इंडियाच्या बैठकीपूर्वीं महाराष्ट्रांत भावी निवडणुकीच्या दृष्टीनें कांहीं घटना घडून आल्या होत्या. जूनच्या सुमारास केळकर यांनीं शंकरराव देव यांना भावी निवडणुकीसंबंधीं कांहीं तडजोड व्हावी या दृष्टीनें पत्र लिहिलें व भेटण्याची इच्छा प्रदर्शित केली. जूनच्या १० तारखेस आम्ही भुसावळ येथें कॉंग्रेस अधिवेशनाची जागा नक्की करण्याकरितां जमलों होतों. तेथें हा प्रश्न निघून ५।६ जागा लो. स्व. पक्षाला देण्यास हरकत नाहीं, मात्र हे उमेदवार कॉंग्रेसचे म्हणून उभे राहिले पाहिजेत, कॉंग्रेस शिस्तीस जे जबाबदार; व लो. स्व. पक्षानें कॉंग्रेसच्या सर्व अधिकृत उमेदवारांनाच पाठिंबा दिला पाहिजे, व ह्या सर्व गोष्टी स्पष्टपणें जाहीर झाल्या पाहिजेत. केळकर व देव यांचीं चर्चा होऊन पांच जागा व बाकी सर्वसामान्यपणें मान्य याप्रमाणें तडजोड ठरली. ऑगस्टच्या पहिल्या तारखेस पुण्यास लो. स्व. पक्षाची सभा होती. तींत ही तडजोड मान्य झाल्यानंतर ती जाहीर होणार होती. कॉंग्रेस पक्ष तडजोडीला तयार आहे याचा विपरित अर्थ करण्यांत येऊन १० जागा, १५ जागा पाहिजेत वगैरे प्रचार सुरू झाला. या पक्षाशीं तडजोड म्हणजे बहुजनसमाजाच्या हिताविरुद्ध वर्तन हा माझा सिद्धांत आहे. म्हणून मला ही तडजोड पसंत नव्हती. पण आम्ही तडजोडीला तयार नाहीं, आग्रही आहोंत, हा आक्षेप नको असें शंकररावांचें म्हणणें होतें. तडजोड झाल्यास निवडणुकी सोप्या जातील असा भरंवसा त्यांना होता. मी तत्त्वतः विरुद्ध होतो तथापि बहुमताला मी मान देण्यास तयार होतो. ऑगस्टच्या सभेपूर्वी कांही लो. स्व. पक्षाचे सद्गृहस्थ माझ्याकडे आले व त्यांनी पांच म्हणजे पांचच जागा तुम्ही देणार कां? असें विचारलें. मी सांगितलें की, " केळकरांची अपेक्षा पांचाचीच होती, ती संख्या

देवांनी कबूल केली, त्यानंतर सदर तडजोड डोळ्यापुढे ठेवून आम्ही उमेदवारांची नांवें योजिलीं, काम सुरू झालें. कराराप्रमाणें आम्ही वागण्यास तयार आहोंत त्यांत दुरुस्ती करून संख्या वाढविणें कठीण आहे." सदरहू गृहस्थांनी ता. १ ऑगस्टच्या सभेंत 'गाडगीळ सुईच्या अग्रावरील मातीसुद्धां देण्यास तयार नाहींत' असें सांगून तडजोडीला विरोधक वातावरण उत्पन्न केलें. व शेवटीं त्यांच्या मुंबईच्या पक्षसभेंत डजोड अमान्य झाली व त्याचा दोष कॉंग्रेस कार्यकर्त्यांवर देण्यास कांहीं वर्तमानपत्रांनीं कमी केलें नाहीं !! या घटनेमुळे मुंबईस ऑ. इं. च्या सभेस जमलेल्या प्रांतातील कार्यकर्त्यांनीं एकंदर प्रांतांतील परिस्थितीची माहिती दिली. संभाव्य उमेदवारांबद्दल आम्ही चर्चा केली. अधिवेशन व निवडणूक दोन्हीं कार्यें यशस्वी-रीतीने पार पाडूं असा विश्वासच सर्वत्र दिसत होता. निवडणुक मंडळ स्थापण्यांत येऊन उमेदवार कायम करणें, निवडणुका लढविणें वगैरे गोष्टी निवडणूक मंडळा-वर सोपविण्यांत आल्या. मी, जेधे, देव, रमणीकराय मेहता व मामा देवगिरीकर यांचे हें मंडळ होतें. देवगिरीकर यांनी चिटणीस या नात्यानें काम करून फार मेहनत घेतली.

जूनच्या १० तारखेस आम्हीं भुसावळ येथें जमलों म्हणून वर उल्लेख आला आहेच. फैजपूरला जाऊन आम्हीं जागा पाहिली. संध्याकाळीं भुसावळच्या सभेंत अधिवेशनाला किती विरोध आहे याची कल्पना आली. सरकारचा विरोध उघड दिसत नव्हता. स्थानिक अधिकारी विरोधी दिसले. गांवचे कांहीं लोक विरोधी दिसले. खुद्द कार्यकर्त्यांत दोन तट दिसले. चर्चेच्यावेळीं खानदेशमधील प्रमुख कार्यकर्ते हजर होते. सरकारनें विरोध सुरू केला आहे अशा स्थितींत अधिवेशनाची जागा बदल-णेंच बरें असेंहि कांहीं लोक म्हणूं लागले. ज्यांनीं पुण्याच्या सभेंत खेडेगांवांतच अधिवेशन व्हावें म्हणून हट्ट धरला तेहि डगमगूं लागले. देवगिरीकर मला बाजूला नेऊन म्हणूं लागले कीं "अधिवेशनाची जागा बदलण्यास विद्यमान स्थितींत कोणीही विरोध करणार नाहीं. तुम्हीं पुण्याचें प्रपोजल मांडा, तें मान्य होईल.' मी त्यांना उत्तर दिलें, 'आपण एकदां निर्णय घेतला आहे तो अंमलांत आणण्याचा कमाल प्रयत्न करूं या. जागा बदलणें नामुष्कीचें आहे व सरकारी विरोध आहे तर जरूर फैजपूरलाच अधिवेशन भरविलें पाहिजे." सभेंत मी वरीलप्रमाणें विचारसरणी मांडली व अधिवेशन फैजपूरलाच भरवावयाचें असा निर्णय घेण्यांत आला. वाटेल तो धोका पतकरून हें करावयाचेंच असें ठरलें; सर्वांना उत्साह वाटला. तथापि जुलै व

ऑगस्टमध्यें विरोध चालूं होताच. सिमल्याला जाण्यापूर्वी मी जळगांवास उतरलों. खानदेशचे कलेक्टर अमीनउद्दीन हे कांहीं काळ असेंब्लीचे सभासद होते म्हणून ओळख होती त्यांना जाऊन भेटलो व परवानगीच्या आड कोणकोणत्या अडचणी आहेत तें स्पष्ट सांगा किंवा अधिवेशन भरविण्यास सरकारचा विरोध आहे तें तरी सांगा म्हणजे आम्ही आमचें धोरण ठरवूं. त्यांनीं सरकारचा विरोध नाहीं. फक्त आरोग्याच्या दृष्टीनें कांहीं गोष्टी व्हावयास पाहिजेत एवढेंच सरकारचें म्हणणें आहे असें सांगितलें. मुलाखतीनंतर मी फैजपूरला गेलो. रात्रीं सभा घेण्यांत आली व त्यांत "सरकारचा विरोध आहे हें खरें नाहीं, खुद्द कलेक्टरसाहेब यांनीं मला सांगितलें आहे. तेव्हां सर्वांनीं कांग्रेसचें अधिवेशन यशस्वी करावें" अशी विनंति केली. तेथून मी सिमल्यास आलो.

सिमल्यास आल्यानंतर पहिल्याच दिवशीं नेहमीप्रमाणें पक्षसभा झाली व अधिवेशनांत येणाऱ्या मुख्य मुख्य बाबींचा विचार झाला. या अधिवेशनांतील मुख्य बाब म्हणजे कंपनी कायद्यांतील दुरुस्ती. याशिवाय कॅन्टोनमेंट बिल, आर्य मॅरेज बिल वगैरे बाबीही महत्त्वाच्या होत्या. अधिवेशनाच्या पहिल्या दिवशीं लोकनायक अणे यांनीं महाराष्ट्रांत कांहीं तरी निवडणुकीच्या बाबतींत तडजोड व्हावी अशी आपली इच्छा आहे असें सांगितलें. सरदारगृहांतील लो. स्व. पक्षाच्या सभेस ते हजर होते, तेथें जी अनुदारपणाची व असभ्य भाषा कॉंग्रेसबद्दल व कॉंग्रेस कार्यकर्त्यांबद्दल वापरण्यांत आली ती त्यांना पसंत नव्हती.; तथापि तडजोड व्हावी हें वाटतच होतें. त्यांनीं मला सहा जागा महाराष्ट्रांत लो. स्व. पक्षाला कबूल करा व तडजोड मी घडवून आणतो असें सांगितलें. पूर्वी पांच जागा आम्ही देत होतो फक्त एका जागेचाच प्रश्न होता. मी व जेधे यांनीं विचार करून तें मान्य केलें मात्र बाकीच्या सर्व शर्ती कायम ठेवण्यांत आल्या: पाहिजेत असें सांगितलें. त्यांच्या सांगण्यावरून देवांना तार करून अणे हे मुंबईस येऊन त्यांच्याशीं बोलतील व ही तडजोड पुरी करतील असें कळविलें. देवांनीं पण उलट तार करून मान्यता दिली. अणे यांचे स्नेहसंबंध पुण्यांतील लो. स्व. पक्षांतील मंडळींशीं जुने व दृढ आहेत, तथापि त्यांना त्यांच्या राजकीय स्वरूपाचें संपूर्ण आकलन झालें आहे असें वाटत नाही. अणे हे सज्जन, उदार व सहिष्णु आहेत. या सर्व गुणांचा फारसा प्रभाव पुण्यांतील त्यांच्या स्नेहीमंडळींत नाहीं. कॉंग्रेस आणि गांधी यांचा द्वेष आणि विटंबना या दुचाकीवर बसून राजकारणाचा प्रवास ते

सामान्यतः करतात. त्यालाच अनुसरून कॉंग्रेसच्या अधिवेशनासाठीं निघणाऱ्या स्त्री-स्वयंसेविकादलाबाबत व शिबिराबाबत असभ्य, हीनवृत्तिदर्शक व माणूसकीला काळीमा आणणारी टीका 'राष्ट्रमता'दिक वर्तमानपत्रांत येत होती. पुण्यांतील स्त्रियांनीं सभा भरवून या लिखाणाचा निषेध केला व त्याचीं कात्रणें अणे यांच्याकडे धाडलीं व हें सर्व त्यांना संमत आहे कां म्हणून प्रश्न विचारला. शंकरराव देवांची तार येऊन मी दुसऱ्या दिवशीं त्यांच्या पक्षकचेरींत गेलो तर त्यांनी मला सांगितलें कीं, "मी लो. स्व. पक्षाचा राजीनामा दिला आहे. पुण्यांतील स्त्रियांच्या सभेच्या अध्यक्ष, तुमच्या पत्नी, यांचें पत्र आलें असून कात्रणें आलीं आहेत. जें पुण्यांत सध्या चाललें आहे तें मला पसंत नाहीं. तेव्हां तडजोडीचा प्रश्नच उरला नाहीं." मी चकीत झालो. पुण्यांतील ही घटना मला माहीत नव्हती. तथापि वाईट वाटण्याचें कारण नाही, अधिवेशनाला व निवडणुकीला जबर विरोध मात्र होईल हें तावडतोब जाणलें. अणे यांचा राजीनामा प्रसिध्द मिळाला नाही पण त्यांत लो.स्व. पक्षाच्या सभासदांवर कडक टीका असावी असें मला त्यावेळीं वाटलें. अधिवेशनाच्या दृष्टीनें सरकारी विरोध व या पक्षाच्या लोकांचा विरोध ही युति ठीक नव्हती. अणे यांनीं अधिवेशनाला सर्वप्रकारें साहाय्य करण्याचें आश्वासन दिलें व स्वागत कमिटीचे ते देणगी देऊन सभासदही झाले. अधिवेशनाला मुक्रर केलेली जागा सरकारी अधिकारी मान्य करण्यास दिरंगाई करूं लागले. स्थानिक मूठभर लोकांनींही पुन्हां विरोध करण्यास सुरवात केली. तात्या देशपांडे व अन्य कार्यकर्ते यांचीं पत्रें येऊं लागलीं. कांहींतरी तावडतोब करणें जरूर होतें म्हणून मी कायदेमंत्री सर नृपेंद्र यांना भेटलो. सर्व हकीगत सांगितली. सरकार जर विरोध करणार असेल तर तसें स्पष्ट सांगितल्यास बरें, मग आम्हीही विचार करूं. त्यांनी मुंबई सरकारकडील योग्य अधिकाऱ्यास पत्र लिहितो असें सांगितलें व दुसऱ्या दिवशीं पत्र लिहिल्याचें सांगितलें. देशपांडे यांना बहुतेक अडचण दूर झाली असें मी कळविलें. पत्राचा परिणाम होऊन जागा, पाणी, आरोग्य वगैरे बाबतींत जी खळखळ सरकारी अधिकाऱ्यांनीं चालविली होती ती बंद होऊन अधिवेशनास घेतलेल्या जागेस मान्यता मिळाली. वाहतुक, तार व टपालाचीही चांगली व्यवस्था व्हावी म्हणून त्या त्या खात्यांच्या प्रमुखांना भेटलो. श्री. बेवूर यांनीं तार व पोस्ट ऑफीस यांची व्यवस्था करण्याचें कबूल केलें व त्याप्रमाणें हुकूम सोडले. रेल्वे मंत्री झाफरुल्ला यांना भेटलो, त्यांनीं 'स्वागत कमिटीच्या चिटणिसाचें म्हणणें

ऐकून घेऊन उतारू व माल यांच्या वाहतुकीच्या बाबतींत शक्य ती सोय करावी ' असा हुकूम रेल्वे अधिकाऱ्यांना दिला व त्याची एक प्रत मलाही धाडली. या दोन्ही गोष्टी झाल्यामुळें बऱ्याच मोठ्या अडचणी दूर झाल्या.

या अधिवेशनांतील मुख्य काम म्हणजे कंपनी कायदा दुरुस्त करणें हें होय. दिल्लीच्या अधिवेशनाच्यावेळीं दुरुस्ती बिल मांडण्यांत येऊन तें निवडक कमिटीकडे सोंपविण्यांत आलें होतें. निवडक कमिटीचा रिपोर्ट तयार होऊन अधिवेशनाच्या पहिल्या दिवशीं म्हणजे ता. ३१ ऑगस्ट रोजीं सभागृहाला सादर करण्यांत आला. निवडक कमिटींत काँग्रेस पक्षातर्फे भुलाभाई, सत्यमुर्ति, पंत, स्वामी चेट्टी, अनुग्रह नारायण, हीं मंडळी होती. त्याचप्रमाणें सर मोदी, कावसजी जहांगीर, अखिल दत्त हेही त्या कमिटींत होते. महिनाभर निवडक कमिटीचें काम चाललें होतें. फार मोठ्या व महत्त्वाच्या प्रमाणावर कंपनी कायदा दुरुस्त करण्याचा हा प्रयत्न होता. मर्यादित जबाबदारीच्या तत्त्वांवर व्यापार व उद्योगधंदे करण्याचा उपक्रम फार दिवसांपासून इंग्लंडादिक पाश्चात्य देशांत चालू होता. मर्यादित जबाबदारीमुळें अनेक लोक व्यापार व उद्योगधंद्यांत भांडवल घालूं शकतात. भांडवल, भाग काढून उभारलें जातें व भाग लहान लहान किंमतीचे असल्यामुळें अनेक मध्यम स्थितींतील लोक घेतात. या तत्त्वामुळें व्यापारांत लक्ष घालणारे जास्त वाढतात. मर्यादित जबाबदारीमुळें व्यापारवृद्धीला फार मदत झाली आहे. उद्योगधंद्यांची वाढही याच कारणानें झाली असा इतिहास आहे. भागाच्या दर्शनी किंमतीइतकीच जबाबदारी मर्यादित असल्यामुळें पुष्कळ लोक भाग घेतात. देशांतील भांडवल उद्योगधंद्यांत येतें. तें खेळतें राहतें. व्यापार ही एकाच जातीची अगर गटाची इजाची बाब न राहतां ज्याच्याजवळ योजकत्व—कर्तृत्व आहे—पत आहे—तो अनेक जणांकडून भागरूपानें भांडवल उभें करून धंदा उभारूं शकतो. मर्यादित जबाबदारीच्या कंपन्या या देशांत इंग्रजांचें राज्य सुरू झाल्यानंतर निघूं लागल्या. त्यांच्याबाबत पहिला कायदा सन १८८२ मध्यें झाला. सन १८६७ च्या इंग्रजी कायद्यावर तो आधारला होता. पहिला कायदा झाल्यानंतर त्यांतील दोष सुधारण्याकरितां सन १८८७, १८९५, १९०० व १९१० मध्यें दुरुस्ती कायदे करण्यांत आले. खुद्द इंग्लंडमध्यें अनेक वेळां कंपनी—कायदा दुरुस्त करण्यांत आला. सन १९०८ ला त्याची पुनर्रचना करण्यांत आली; व तो पद्धतशीर निबंध (Code) झाला. सन १९०८ च्या या निबंधाला अनुसरून सन १९१३ मध्यें येथें कंपनी—कायद्याची पुनर्घटना करण्यांत

आली. १९१४ साली पुन्हां दुरुस्ती झाली. सन १९१४ पूर्वी मर्यादित कंपन्यांमध्यें कायद्यानें संचालक मंडळ असावें असें नव्हतें. त्याचप्रमाणें व्यवस्थापक गुमास्ते (Managing Agents) यांच्याकडून कंपन्यांची व्यवस्था व धंदा चाले. हा प्रकार येथें नवीन होता, व त्यांपासून अनेक तोटे होतात असें दिसून आलें व ते दूर करण्याचाही प्रयत्न सन १९१४ मध्यें करण्यांत आला. पण निवडक कमिटीनें केलेल्या शिफारसी मंजूर झाल्या नाहींत. संचालक मंडळ असावें व तें व्यवस्थापक गुमास्ते यांच्यापासून स्वतंत्र असावेत ही शिफारस मंजूर झाली नाहीं. तथापि कायद्यानें संचालक मंडळ प्रत्येक कंपनींत असावें हें मात्र मान्य झालें. संचालकानें कंपनीशीं व्यवहार करून वैयक्तिक फायदा घेणें अयोग्य हेंही तत्त्व मान्य झालें. सन १९१४ नंतर मात्र कंपनी कायद्यांत कांहीं बदल झाला नाहीं. २२ वर्षांत व्यापार वाढला, अनेक उद्योगधंदे अस्तित्वांत आले, पेढ्या निघाल्या, उलाढाली व व्यवहार यांचें प्रमाण वाढलें. लोकमत, व व्यापारी वर्ग, कंपनी कायद्यांत कालानुसार सुधारणा व्हावी म्हणून मागणी करूं लागले. खुद्द इंग्लंडमध्यें हीच परिस्थिति होती. ग्रीन कमिटीनें व्यापक रिपोर्ट केला; भागाबाबत, संचालकांच्या जबाबदारी बाबत, हिशोबाच्या प्रसिद्धीकरणाबाबत, कंपनी नादारींत निघाल्यानंतरच्या व्यवस्थेबाबत, अनेक महत्त्वाच्या शिफारसी सन १९२६ मध्यें या कमिटीनें केल्या व सन १९२९ मध्यें नवीन कंपनी कायदा इंग्लंडमध्यें पास झाला. येथील लोकमताचा परिणाम म्हणून सरकारनें सॉलिसिटर सेन यांना एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन रिपोर्ट करण्यास सन १९३४ मध्यें सांगितलें. सन १९३५ च्या सुरवातीस त्यांनीं आपला रिपोर्ट सादर केला व या रिपोर्टावरच सभागृहापुढील बिल आधारलें होतें.

सेन यांनीं अनेक महत्त्वाच्या शिफारसी केल्या. (१) लबाडीनें व्यापार करणाऱ्या व तकलुपी कंपनीबाबत. (२) प्रास्पेक्टसमध्यें सर्व व संपूर्ण माहिती असावी याबाबत. (३) कंपनीच्या व्यवहाराच्या तपशीलवार हिशोबाच्या प्रसिद्धीबाबत. (४) संचालक मंडळाचीं कर्तव्यें व जबाबदारी. (५) कंपनी नादारींत गेल्यानंतरच्या व्यवस्थेबाबत. (६) व्यवस्थापक गुमास्ते यांबाबत. या महत्त्वाच्या गोष्टींचा त्यांनीं ऊहापोह करून सूचना केल्या. बँका–पेढ्या–बाबतही त्यांच्या रिपोर्टांत शिफारसी होत्या. हा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर सरकारनें संयुक्त हिंदी व्यापारी संघ (Federation of Indian Chambers of Commerce), युरोपियन व्यापा-

त्यांचा संघ, बॉम्बे शेअर असोसिएशन, गिरणीमालकसंघ व इंपिरियलच्या बँक, या सर्वांच्या प्रतिनिधींची एक सल्लागार कमिटी नेमली. कमिटीनें येनच्या रिपोर्टावर चर्चा करून, कांहीं निर्णय घेऊन मत प्रदर्शित केलें. सल्लागार कमिटीच्या बहुतेक सूचना बिलांत समाविष्ट केल्या होत्या. धंद्यांत कोणीहि प्रामाणिक असणार नाहीं, हा एक दृष्टिकोन व सध्याच्या कंपनीच्या कायद्यांत कांहींही सुधारणा नको हा दुसरा दृष्टिकोन होता. या दोहोंत तडजोड करून बिल आणलें होतें. व्यापार व उदीम वाढविण्याच्या दृष्टीनें स्वातंत्र्य हवें होतें पण लबाडी व गुंडगिरी यांना जागा राहूं नये म्हणून कांहीं नियंत्रण पण अवश्य होतें. नियंत्रण व स्वातंत्र्य यांत तडजोड करून इष्ट साधावयाचें होतें. भागीदारांना कंपनीचा व्यवहार कसा चालला आहे हें कळणें जरूर होतें. तर त्याचप्रमाणें उपद्व्यापी भागीदारांकडून कामाला खंड पडूं नये म्हणून तजवीज करणेंहि आवश्यक होतें. कंपनी कायदा दुरुस्तीचें बिल साठ पानांत छापलें होतें. त्यांवर बिल प्रथम मांडतांना दोन दिवस चर्चा झाली. एक महिना निवडक कमिटीनें त्यावर खर्चिला व सभागृहांत १८ दिवस हें महाभारत चाललें. वाटेल त्यानें उठावें, पांच माणसें गोळा करावीं व कंपनी काढावी, कांहीं भांडवल जमवावें, हें बंद करणें अवश्य होतें. किमान भांडवल जमा झाल्याशिवाय कंपनीचा धंदा सुरू करण्याला अवश्य लागणारें परवानगीपत्र ( Certiticate of Commencement ) मिळणार नाहीं असें कलम घातलें. कंपनी काढण्याला लागणारा प्राथमिक खर्च जाऊन किमान भांडवल कंपनीजवळ असलेंच पाहिजे व त्याचें प्रमाण एकंदर विक्रीस काढलेल्या भांडवलाशीं ठरविण्यांत आलें. यामुळें कंपन्या काढणें, प्राथमिक खर्चांत फायदा मारून पुढें कंपनी खलास करणें हें कठीण झालें. तकलुपी कंपन्यांना आळा बसला. भाग घेणारे सामान्य लोक यांच्यांत यायोगानें विश्वास उत्पन्न होण्यासारखा होता. ज्या कंपन्या अस्तित्वांत होत्या त्यांबाबतींत ठराविक परिशिष्टाप्रमाणें हिशोबाच्या व व्यवहाराचा तपशीलवार माहिती द्यावी असें कलम घातलें. रजिस्ट्रारला स्वतःस वाटल्यास अगर माहिती मिळाल्यास, कंपनीकडून हिशोबाबाबत खुलासे मागविण्याचा हक्क देण्यांत आला. लबाडीनें व्यापार केला असें आढळून आल्यास कंपनीवर फौजदारी खटला करण्याचा अधिकार देण्यांत आला. हिशोबावरून कंपनीची परिस्थिति ती कर्जबाजारी असेल तर कंपनीला कोर्टांत अर्ज करून नादार ठरवावी अशी योजना करण्यांत आली. खुद्द कंपनी कायद्यांतच कंपनीच्या अपकृत्यांबाबत

खटला करून दंड करण्याचीं कलमें घालण्यांत आलीं. सेन यांच्या मतें रजिस्ट्रारला अधिक अधिकार द्यावेत असें होतें. तें मान्य करण्यांत आलें नाहीं. कंपनीनें हिशोबाबाबत, व्यवहाराबाबत ठराविक पद्धतीनें लिखाण ठेवावें असें ठरविण्यांत आलें. त्याचप्रमाणे ऑडिटरनें, पुस्तकें ठेविलीं आहेत कीं नाहींत हें पाहून, सर्टिफिकेट द्यावें. ऑडिटरला भागीदारांच्या सभेस हजर राहाण्याचा अधिकार देण्यांत आला. कंपनीचा ताळेबंद ऑडिटरच्या सर्टिफिकेटसह प्रत्येक कंपनीनें वर्तमानपत्रांतून जाहीर केला पाहिजे असें कलम घालण्यांत आलें. अमुक मुदतींत ताळेबंद, तपासणीच्या सर्टिफिकेटसह छापलाच पाहिजे असा निर्बंध घालण्यांत आला. प्रत्येक संचालकाचा हितसंबंध कंपनीच्या धंद्याशीं काय आहे हें स्पष्ट केलें पाहिजे अशी योजना करण्यांत आली. संचालकाची जबाबदारी एखाद्या करारानें ते टाळूं पहात, तें बंद करण्यांत आलें. संचालक मंडळापैकीं निदान ⅔ भागीदारांनीं साधारण सभेंत निवडावेत. त्याचप्रमाणें एकंदर संख्येच्या ⅓ पेक्षां जास्त संचालक-व्यवस्थापक गुमास्त्यांनीं नेमूं नयेत असें कलम घालण्यांत आलें. संचालकाला कंपनीच्या पैशांतून कर्ज घेण्याबाबत मर्यादा घालण्यांत आल्या. नेमणुका करण्याचा संचालक मंडळाचा अधिकारही मर्यादित करण्यांत आला.

सर्व दुरुस्त्यांपैकी व्यवस्थापक गुमास्त्याबाबतचें कलम अत्यंत महत्त्वाचें होतें. गुमास्त्यांमार्फत कंपनीची व्यवस्था पाहाण्याची ही प्रथा बंगाल, उत्तर हिंदुस्थान व मुंबई इलाखा यांत सुरू होण्यास कांहीं विशिष्ट कारणें होतीं. शिलकी पैसा व्यापारांत गुंतवावा असें वाटत असणारा वर्ग पूर्वी नव्हता. उद्योगधंद्यांत भांडवल गुंतवून धोका पत्करण्याची वृत्ति सामान्यतः नव्हती. धंदा सुरू होई; थोडासा रांगता झाला कीं त्याचें रूपांतर भाग काढून मर्यादित जबाबदारीच्या कंपनींत होई. पण ज्यांनी सुरवात केली ते कंपनीशीं करार करून तिचा कारभार पाहात व त्यांना व्यवस्थापक गुमास्ते (Managing Agents) म्हणत. हे गुमास्ते माहीतगार असत. शिवाय त्यांचें भांडवलही कंपनींत भागरूपानें असें. याशिवाय जरूर पडेल तेव्हां कंपनीच्या नडीच्या प्रसंगीं हे लोक स्वतःच्या पतीवर कर्ज काढून कंपनीची नड भागवत. तिला अवश्य लागणारें खेळतें भांडवल पुरवीत. उपयुक्तता, नेतृत्व व संघटन या तिन्ही दृष्टींनीं ही व्यवस्थापक गुमास्तेगिरी एक चांगली प्रथा निर्माण झाली होती. तथापि हिला दुसरीही बाजू होती. कंपनीची प्रत्यक्ष व्यवस्था या लोकांच्या हातांत असल्यामुळे साहाजिकच सर्व कारभारावर

व धोरणावर त्यांचा अमल चाले. भागीदार त्यांच्यापुढे निष्प्रभ ठरत. कंपनीच्या भागापैकीं मोठा भाग या गुमास्त्यांच्या अगर त्यांच्या हस्तकांच्या हातीं असे. खुद्द मुंबईच्या कापड गिरण्यांचे जे व्यवस्थापक गुमास्ते होते त्यांच्या हातांत भागांपैकी सामान्यतः ५० टक्के भाग असत व कांहींच्या हातांत ९० टक्केपर्यंतही असत. तशीच स्थिति कमी जास्त प्रमाणांत कलकत्ता येथील तागांच्या गिरण्यांबाबत होती. या-प्रमाणे अधिकांश भाग हातांत असल्यामुळे व्यवस्थापक गुमास्ते धंद्यावर अधिकार गाजवीत. जे करार कंपनी व गुमास्ते यांच्यांत होत तेही विलक्षण व सर्वतोपरी त्यांच्याच फायद्याचे. कांहीं करार मुदतीचे तर कांहीं बिनमुदतीचे. वंशपरंपरेनें ही व्यवस्था चालावी अशाही स्वरूपाचे होते. अहमदाबादमधील अजित गिरण्याबाबतचा करार तर विलक्षण होता. सदरहू करारांत व्यवस्थापक गुमास्ते कायम, कधी न बदलतां येणारे तर होतेच पण त्यांनाच कायम कोषाध्यक्ष, चिटणीस व माल खपविणारे एजंटही केले होते. दुसऱ्या एका गिरणीच्या करारांत आपण होऊन राजिनामा दिला तरच हे जावेत नाही तर कायम रहावेत अशी व्यवस्था होती. मुंबईतील बहुतेक करारांत भागीदारांपैकीं ¾ भागीदारांनीं बहुमतानें ठरविलें, तरच हा करार रद्द व्हावा अशी व्यवस्था असे. अधिकांश भाग गुमास्त्यांच्या हातांत अगर अधिकारांत असतांना हें होणें जवळजवळ अशक्य आहे हें सहज समजून येईल. अहमदाबादेंतील कांहीं करारांत गिरणी नादारींत गेल्यास या व्यवस्थापक गुमास्त्यांना सरासरीनें जें वार्षिक कमिशन मिळे त्याच्या दसपट रक्कम प्रथम नुकसान म्हणून देण्यांत यावी अशी योजना असे. नादारींत धंदा जाण्यास खुद्द गुमास्ते जरी कारणीभूत असलें तरीं ही उत्तरक्रियेची दक्षिणा त्यांना मिळण्याचा हक्क होताच. हे व्यवस्थापक गुमास्ते नुसते धंद्याचे व्यवस्थापकच नसत. पुष्कळ ठिकाणीं कच्चा माल व तयार माल खरेदीविक्री करणारें दलालही हेंच असत व त्यावर त्यांना कमिशन मिळे. मुंबई शेअर होल्डर्स असोसिएशनचे बरेंच प्रतिनिधी या बिलाच्या चर्चेच्यावेळीं सिमल्यास हजर होते व त्यांनीं अनेकांना माहिती पुरविली; लिखाणें प्रसिद्ध केलीं. त्यावरून पाहतां २७ गिरण्यांबाबत वर लिहिल्याप्रमाणे व्यवस्था असून या गुमास्त्यांना फार मोठ्या प्रमाणांत खरेदी-विक्रीवर दलाली मिळे; व याही रितीनें सर्व व्यवहारावर त्यांचा अधिकार चाले. या शिवाय हे व्यवस्थापक गुमास्ते कंपनीला कर्ज देत व ते सावकार बनत व त्याही दृष्टीनें कंपनीवर त्यांचा कबजा बसे. चालू खर्चाकरितां, अन्य कारणाकरितां रकमेची गरज पडे तेव्हां हे लोक ती भागवीत व आपल्या कर्जाला

तारण म्हणून गिरणीची सामुग्री व उत्पादनहीं लावून घेत. तात्पर्य गिरणी जरी कंपनीची, मालकी जरी भागीदारांची तरी सर्व सत्ता व बहुतेक फायदा यां गुमास्त्यांच्या हातांत जाई हें दृश्य दिसून येई. ऐकेकाळीं योग्य ठरलेली ही प्रथा अजिबात बंद व्हावी असें म्हणणारा एक वर्ग होता. उलट भांडवल कमी अगर धंद्याच्या दृष्टीनें मागासलेलें, धोका पत्करण्यास पैसेवाले तयार नाहींत अशा स्थितींत, उद्योगधंदे वाढावेत या दृष्टीनें ही प्रथा असावी, जरूर तें नियंत्रण घालून तिच्यातील दोष दूर करावेत असें म्हणणारा दुसरा वर्ग होता. उद्योगधंद्यांना लागणारें भांडवल बँका कंपन्यांना देण्यास नाखूष असतात. वैयक्तिक पत पाहून ते देतात. जोपर्यंत बँका याप्रमाणें दृष्टी ठेवून वागत आहेत तोपर्यंत व्यक्तींचें महत्त्व राहाणारच व्यक्तींना कांहीं तरी करभार देणें भाग पडणारच असेंही म्हणणारे कांहीं होते. नुसता व्यवस्थापक संचालक, मॅनेजिंग डायरेक्टर, नेमून भागत नाहीं. मॅनेजिंग डायरेक्टर हा इंग्लंडमध्ये पगारी नोकर असतो. येथें त्याला स्वतःच्या पतीवर कंपनी करितां पैसा उभारावा लागतो. या अधिक जबाबदारीबद्दल अधिक मोबदला मागणें अयोग्य नाहीं अशीही विचारसरणी मांडण्यांत आली. कंपनीला भांडवलाची जरूरी पडली म्हणजे ती भागविण्याची जबाबदारी कांहीं लहानसहान नाहीं. कोटयावधी रुपयांची सोय या लोकांनीं केल्याचीं उदाहरणें चर्चेच्यावेळीं सांगण्यांत आलीं. वाढत्या धंद्याला भांडवल पुरविलें एवढेंच नव्हे तर धंदा बसला असतां, किंवा मंदी पसरली असतां, धंदा चालू ठेवून, धंदा बचावण्याचें कामही या व्यवस्थापक गुमास्ते मंडळींनी केल्याचे दाखले देण्यांत आले. ही व्यवस्थेची प्रथा नसती तर चहाचा धंदा सन १९२७–२८ चे मंदाईच्या काळांत खलास झाला असता. मॅनेजिंग एजंटसूनीं चहा, ताग, कापड, या धंद्यांत प्रशंसनीय कामगिरी केली आहे. आपत्कालीं तोटा सोसून धंदे तगविले, वाढत्या काळांत अधिक भांडवल देऊन त्यांचा विस्तार केला. त्यांच्या पतीवर विश्वास ठेवून शेंकडो लोकांनीं भाग घेतले, पैसा दिला. लोकनाथन् यांनीं आपल्या 'Industrial Organisation in India' या उत्कृष्ट पुस्तकांत या प्रथेची स्तुतीच केली आहे. एकंदरीनें सर्व गोष्टींचा विचार करून सरकारनें तडजोडीची दृष्टी ठेवून बिलाची आंखणी केली होती.

नवीन करार जे होतील त्यांत २० वर्षांपेक्षां जास्त मुदतीचे ते करता येणार नाहींत अशी योजना बिलांत केली होती. जुने करार, नवीन कायदा अंमलांत आल्यापासून २० वर्षें भरतांच ते रद्द होतील अशी व्यवस्था करण्यांत आली.

करारांतील मुदत कांहीही असो, जर या गुमास्त्यांनीं कपट अथवा विश्वासघात केला असें कोर्टानें ठरविलें असेल तर, त्यांना साधारण सभेंत ठराव करून काढून टाकण्याचा अधिकार भागीदारांना देण्यांत आला. मॅनेजिंग एजंटस्‌ना आपली कचेरी भागीदारांच्या खास ठरावाशिवाय बदलण्याचा अधिकार नाहीं असें ठरविण्यांत आलें. नफा न झाल्यास एका मर्यादेपर्यंत मुशाहिरा, नफा झाल्यास त्यांत ठराविक भाग, यापेक्षां जास्त कांहीं मॅनेजिंग एजंटाच्या करारांत त्याच्या प्राप्तीबद्दल असतां कामा नये. जास्त पाहिजे असल्यास भागीदारांच्या सभेनें तें मान्य केल्यासच कायदेशीर व्हावें असें ठरविण्यांत आलें. कंपनीच्या शिल्लकेंतून किती कर्ज या लोकांनीं घ्यावें याला मर्यादा घालण्यांत आली. संचालक मंडळांतील ¾ बहुमतानें मान्यता दिली तरच कर्ज मिळावें, शिवाय वार्षिक ताळेबंदांत या कर्जासंबंधीं सर्व माहिती देण्यांत यावी असेंही ठरविण्यांत आलें. कांहीं मॅनेजिंग एजंटस् अनेक कंपन्यांचीं कामें पाहातात म्हणून एकाच व्यवस्थेखालीं असणाऱ्या कंपन्यांच्या पैशांतून एकमेकांला कर्ज देणें बंद करण्यांत आलें. भागांच्या बाबतींतही अनेक सूचना सरकारकडे आल्या होत्या, त्यांपैकीं कांहींचा समावेश बिलांत करण्यांत आला. भाग व खास भाग कसरीनें विकण्याची सवलत ठेवण्यांत आली. भागांच्या मालकींतील बदल ठराविक वेळांत व्यवस्थापक मंडळानें मान्य केला किंवा नाहीं हें कळविलें पाहिजे असा निर्बंध घालण्यांत आला. खाजगी मर्यादित जबाबदारीच्या कंपन्यांना सुद्धां हिशोबाची व अन्य चोपडीं ठेवणें, ताळेबंद सर्व भागीदारांना वाटणें, हें अवश्यक करण्यांत आलें. कंपनीनें केलेल्या तारणस्वरूपी उलाढाली नोंदल्या पाहिजेत असें ठरविण्यांत आलें. कंपनी नादारींत निघाल्यास त्या संबंधीच्या व्यवस्थेबाबतही अनेक कलमें घालण्यांत आलीं. वेळोवेळीं कंपनीची देण्याघेण्याची व्यवस्था पाहाणाऱ्या अधिकाऱ्यानें—लिक्विडेटरनें—कोर्टाला रिपोर्ट करावा, संचालकानें ठराविक वेळांत सर्व माहिती, देण्याघेण्याचा तपशील या अधिकाऱ्यास पुरवावा, कंपनीच्या सावकारांना वाटल्यास त्यांनीं एक समिती नेमून या अधिकाऱ्याशीं सहकार्य करावें. ज्या कंपन्या येथे धंदा करीत पण अन्य देशीं नोंदल्या असत त्यांना बऱ्याच सवलती पूर्वीं होत्या, त्या कमी करण्यांत आल्या. असल्या कंपन्यांवर कागदपत्रांबाबत, ताळेबंदाबाबत प्रसिद्धी करण्याची जबाबदारी टाकण्यांत आली. तसेंच प्रॉस्पेक्टस येथें प्रसिद्ध केल्याशिवाय त्यांच्या भागांची विक्री गैर ठरविण्यांत आली. बॅंकेचा धंदा करणाऱ्या कंपन्यांवरही

कांहीं निर्बंध घालण्यांत आले. पन्नास हजार रुपये खेळतें भांडवल जमल्याशिवाय धंदा सुरू करण्यास मनाई केली गेली. जमा झालेल्या भांडवलाइतका रिझर्व फंड होईपर्यंत बँकेला झालेला नफा भागीदारांत वाटण्यांत येऊं नये अशी व्यवस्था बिलांत करण्यांत आली. अरिष्ट काळांत बँकेला आपली पत राखता आली नसली तरी योग्य वाटल्यास कोर्टानें नादारींत न काढतां बँकेविरुद्ध येणारे दावे तहकूब करावे व बँकेला पुन्हां पायावर उभें राहतां यावें म्हणून व्यवस्था करावी.

धंद्याच्या भावी यशाचें योग्य निरीक्षण, किमान भांडवल व पुरेसें खेळतें भांडवल मिळेल अशी व्यवस्था या तीन गोष्टींवर धंद्याचें यश अवलंबून असतें. आधुनिक युगांत वैयक्तिक पत जरी महत्त्वाची असली तरी संघटनेच्या दृष्टीनें मर्यादित जबाबदारी हीच प्रथा उपयुक्त व यश देणारी मानली जात आहे. यशाच्याच दृष्टीनें बिलांतील बहुतेक सूचना लोकपक्षानें स्वागतर्हच मानिल्या. खुद्द कॉंग्रेस पक्षानें हें बिल जास्तींत जास्त उपयुक्त करण्याच्या दृष्टीनें निवडक कमिटींत व सभागृहांत, सहकार्य केलें. कंपनीस नफा होवो अगर न होवो, जो माल निघेल त्यावरच दलाली मग तो खपो अगर न खपो, असलें करार कोणींहि योग्य मानणार नाहीं व ते रद्द ठरविणेंच योग्य आहे. संचालक मंडळाची जबाबदारी खरी असावी, नाममात्र नसावी, या दृष्टीनें कॉंग्रेस पक्षानें बऱ्याच उपयुक्त सूचना केल्या. निवडक कमिटींत देसाई, सत्यमूर्ति, पंत ही नामवंत मंडळी होती. मोदीसारखे तज्ज्ञ होते. खुद्द सिमला येथें अनेक हितसंबंधांचे प्रतिनिधी जमून आपापल्या दृष्टीनें बिलांत सुधारणा घडवून आणण्याचे प्रयत्न करीत होते. भागिदारांच्या हिताच्या दृष्टीनें मुंबईचे श्री. कपाडिया हे तर दोन महिने तळ देऊन होते व त्यांचा अनुभव विशेष, कळकळ तीव्र व खटपट अविरत होती. इंग्लिश कंपन्यांचे सल्लागार म्हणून कांहीं प्रतिनिधी व कायदेपंडीत हजर होते. दुय्यम कंपन्या काढून ( Subsidiary ) कंपनी कायद्याचा दुरुपयोग केला असें असल्यामुळें ती परिस्थिति दूर करण्याचे प्रयत्न सभागृह करीत असतां, दुय्यम कंपन्यांचे वाली पण त्यांविरुद्ध खटपट करीत होते. वालचंद हिराचंद यांचे सॉलिसिटर व स्वतः ते कंपनी कायद्याच्या दुरुस्तीनें काय परिणाम होतात हें पाहाण्यासाठीं व जाणण्यासाठीं हजर होते. बिल ६० पानी महत्वाचें व किचकट होतें. सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टावर शेकडों उपसूचना आल्या. कोणत्या मान्य करावयाच्या, कोणाला विरोध करावयाचा, पास झाल्यास त्याचा परिणाम पूर्वी पास झालेल्या उपसूचनांवर

काय होणार ? पुढें आणखी कोणते बदल करावे हें सर्व पाहाणें जरूर होतें· बिल, रिपोर्ट व त्यावर आलेल्या उपसूचना या सर्वांचें निरिक्षण मी करावें व पक्ष निर्णयाच्या दृष्टीनें, उपसूचनांच्या दृष्टीनें, मसुदे बदलावे अगर सुधारावे असें नेत्यानीं सांगितलें. रिपोर्ट सभागृहांत मांडल्यानंतर पक्षसभा घेण्यांत आली. महत्वाचे मुद्दे पक्षसभेपुढें मांडण्यांत आले, चर्चा झाली, निर्णय घेण्यांत आले व त्याला अनुसरून उपसूचना तपासण्यांत आल्या. कायदा करणें सोपें नाहीं याची जाणीव मला या प्रसंगानें झाली. कमीजास्त शब्दानें मानवी व्यवहारांचें वळण बदलतें, नात्यांत फरक पडतो, नफा नुकसानीचे चांगले व वाईट प्रसंग उभे राहातात. मानवी व्यवहार सुरळीत व सुव्यवस्थित व्हावेत म्हणून केलेला कायदा प्रसंगीं उलटें करतो हा अनुभव आहे. संपूर्णपणें नवीन कायदा करणें एका दृष्टीनें सोपें पण दुरुस्ती कायदा, फार किचकट काम असतें. पक्षानें उपसूचना अमान्य केली कीं, त्यांत ज्यांचे हितसंबंध गुंतलेले असत ते तीच उपसूचना अनेक सभासदांकडून देत. कोणी तरी उठे, ती मांडी. दक्षता असली तर ठीक नाहींतर गोंधळांत पासही व्हावयाची. प्रत्येक दिवशीं नृपेन्द्र सरकार व भुलाभाई यांची बैठक होई. बहुतेक काम तडजोडीनें होई. पंतजींची विद्वत्ता व गहन व्यासंग, देसाई यांचा कोर्टातील पाव शतकाचा अनुभव, या सर्वांचा उपयोग होत होता. बहुतेक कलमांवरील चर्चा खेळीमेळीनें होई. अतिरेकी मतें बोलली जात, अतिरंजित भाषा गर्जे, अभिनयाचे हातवारे ललकारत, पण शेवटीं विवेकाचा विजय होई. हिंदी उद्योगधंद्यांना यश देणारी प्रभावी संघटना निर्माण व्हावी असाच हेतू असल्यामुळें व विशेषत: सर नृपेन्द्र यांच्या खेळाडू वृत्तीमुळें बिलाची नौका, अपघात न होतां, महत्त्वाच्या मालमसाल्यासुद्धां तीराला सुरक्षित लागली. सभासद झाला म्हणजे सर्वज्ञ, निदान सर्व प्रश्नांवर मत देण्याचा त्याचा अधिकार हा संकेत जरी योग्य असला तरी त्याच्या मर्यादा विषयपरत्वें सर्वांनीं ओळखिल्या पाहिजेत हेंहि महत्वाचें आहे. चर्चेत कित्येकांनीं—आणि यांत सर्व पक्षांतील लोक होते—न वाचतां, न विचार करतां उपसूचना दिल्या होत्या. सभासदांच्या घरीं अनेक लोक येत, सल्ला घेत व उपसूचना नोटीस ऑफिसांत दाखल होत. पक्षाचा आदेश निघे, त्यांत कोणत्या उपसूचना मांडावयाच्या, कोणत्या नाहींत, कोणास विरोध करावयाचा याचा तपशील असे. असें असूनसुद्धां एक दोन सूचना अनधिकृतरित्या मांडल्या गेल्या. गोंधळांत त्या पास झाल्या. तिसऱ्या वाचनाच्या वेळीं त्या पुन्हां दुरुस्त [illegible]ल्या गेल्या !

७०० वर उपसूचना आल्यानंतर एखाद्या वेळेस असें होणें क्षम्य आहे. तथापि सभासदांनीं ही आपली जबाबदारी जास्त ओळखिली पाहिजे याची जाणीव आम्हांला या चर्चेत झाली. कायदा तयार करणें हेंहि एक शास्त्र आहे. कुंभाराच्या विटा सरळ व रेखीव असल्या तरी गवंडी जर आडूंमाडूं असेल तर भिंत ओळंब्यांत होणार नाहीं व संरक्षणाऐवजीं अंगावर पडून संकट ती व्हावयाची. उत्तम तत्त्वें, उत्तम कल्पना, त्यांची प्रथम सूत्रबद्ध जुळणी व नंतर योग्य काटेकोर शद्बांत त्यांची वीण करून हें कायद्याचें वस्त्र तयार व्हावयाचें. कायद्याची रचना, अव्याप्ति, अतिव्याप्ति, क्लिष्टता व भोंगळपणा या सर्वांपासून अलिप्त पाहिजे; कायदेशास्त्र, कायद्याचें तत्वज्ञान (Theory of Legislation) हें तर माहिती पाहिजे, पण त्याबरोबर त्याच्या पौरोहित्याचें विधी व संकेतही माहिती पाहिजेत. या बिलाची चर्चा होत असतां व मजकडे दिलेलें काम मी करीत असतां अवश्यक असलेली बौद्धिक सामुग्री व सरंजाम मजजवळ नाहीं याची जाणीव मला क्षणाक्षणाला होई. प्रयत्नसाध्य ही गोष्ट होती. सरकारी कायदेखात्याचे चिटणीस मि. स्पेन्स यांनीं मला अनेक ग्रंथांची यादी दिली व अनुभवहि सांगितला. पुढें कांहीं अध्ययन केलें, थोडी भर पडली; पण ती थोडी होती. मेहेनत करून नंतर कुस्ती करण्यासाठीं आखाड्यांत उतरावयाचें हा नेहमींचा क्रम. आमच्या राजकारणांत कुस्ती करतां करतां जी काय मेहनत होईल तीच व मिळेल तोच अनुभव व तीच विद्या असें बरेंच वेळां होतें. हें अगदींच वाईट नसलें तरी सर्वस्वीं चांगलें आहे असें वाटत नाहीं.

वर सांगितल्याप्रमाणें १८ दिवस सभागृहांत बिलावर चर्चा झाली, अनेक कमी जास्त सुधारणा त्यांत झाल्या. शेवटच्या दिवशीं म्हणजे ता. ७।१०।३६ रोजीं ५॥ च्या सुमारास ज्यावेळीं सर नृपेन्द्र ' दुरुस्त बिल पसार करावें ' अशी सूचना मांडण्यास उभे राहिले त्यावेळीं त्यांच्या तोंडावर समाधान होतें. सभागृहांत समाधान होतें. त्यांनी मिळालेल्या सहकार्याबद्दल सर्वांचे आभार मानले. देसाईनी सर नृपेन्द्र यांचें अभिनंदन केलें. पुष्कळच सुधारणा कंपनी कायद्यांत झाली याबद्दल समाधान व्यक्त केलें. युरोपियन गटाचे प्रमुख हडसन यांनीं ' कॉंग्रेस कंपनीच्या मॅनेजिंग एजंटचें ' निस्पृहपणें काम केल्याबद्दल अभिनंदन केलें. झालेल्या चकमकींत आपला पक्ष बराच घायाळ झाला, अनेक वार बसले पण पक्ष नमला नाहीं ( Bloody but unbowed ). तथापि झालेला कायदा मानून युरोपियन व्यापारी वागतील असें आश्वासन दिलें. मोदी यांनी करुण रसप्रधान वक्तृत्व या प्रसंगाला

ठीक नाहीं असें सांगून दोन मिनिटें बोलून हर्षाचें वातावरण निर्माण केलें. ' भागीदार, गुमास्ते, हिशेब तपासनीस, संचालक या सर्वांनीं आपलीं डोकीं दोन महिने सतावून सोडलीं आहेत. यापुढें निदान या टोळ्या कांहीं वर्षे तरी या सभागृहाला छळणार नाहींत अशी आशा करतो. दोन विचारसरणींतील मध्य या बिलानें गांठला आहे. मॅनेजिंग एजंटस् हे सर्वज्ञ, देशहितैषि, देशावर यानीं अनंत उपकार केले आहेत असें म्हणणारा एक वर्ग, व हे लोक डाकू, दरोडेखोर आहेत असें म्हणणारा दुसरा वर्ग, या दोहोंचें न मानतां विवेकानें हें बिल पास करण्याचें श्रेय सर नृपेन्द्र यांचें आहे. अगाध ज्ञान, बारीक सारीक माहिती, दक्षता या गुणांमुळे ते प्रिय झाले आहेत व शरिरानें जर आधीच जाडजूड नसते तर त्याच्यांत पुष्कळ वाढ झाली असें मी म्हटलें असतें; ( If his bulk was not already formidable I would say, that he has added greatly to his stature). " अहो, डोक्यांत वाढीला अजून पुष्कळच जागा आहे " (There is plenty of room at the top ). सर नृपेन्द्र यांनीं खुसखुशीत उत्तर दिलें. मोदी यांनीं सॉलिसिटर सेन यांनीं प्रथम चुकीचा रस्ता स्वीकारिला असें सांगितलें ' पण त्यांना सभ्य व समंजस मॅनेजिंग एजंटस् भेटले, त्यामुळे सेन सुधारले व आता तर ते एक प्रेमळ गृहस्थ झाले आहेत. बंगालमधील वाईट अनुभवानें त्यांचें पूर्वीचें मत बनलें होतें पण आतां त्यांनीं तें बदललें आहे; आमच्यांत त्यांना आतां स्थान आहे. कॉंग्रेस व अन्य पक्ष यांनीं पक्षबंधनें बाजूस सारून चर्चा केली व मतें दिलीं त्यामुळे पुष्कळ वेळां एकाच लॉबींत नरडीचा घोट घेणारे, गळ्याला गळा लाऊन गप्पा मारतांना आढळले. आमचे गळे कापल्याबद्दल विरोधी पक्ष सरकारचें अभिनंदन करीत आहे. सद्हेतूनें कापले म्हणून मीही त्या अभिनंदनांत सामील होतो!! बसलेल्या वारामुळे कांहीं रक्त निघालें आहे; तथापि मी विरोधकांनी केलेल्या पापाबद्दल उदार होऊन क्षमा करीत आहे!! " मोदींच्या भाषणानें १८ दिवसांचा कंटाळा गेल्यासारखें वाटलें. बिलाचें तिसरें वाचन पास झालें. कांहीं तरी सत्कृत्य केलें हीच भावना मनांत ठेऊन सभासद घरीं गेले. दोन टेकड्या चढून व उतरून जाईपर्यंत रात्रीं आम्हास १०वाजले. बोलण्याची भूक १८ दिवसांत मेली होती पण झालेल्या परिश्रमानें अन्नाची भूक चांगलीच वाढली होती. काखेंतील कागदांचें प्रचंड ओझें फेकून, त्याबरोबर मनाचाही भार हलका केला व मध्यरात्रींपर्यंत Gangater Club नें गाण्याचा व खाण्याचा धुमाकूळ घातला.

या अधिवेशनांत दुसऱ्या एका महत्त्वाच्या प्रश्नाच्या विचारास सुरवात झाली. वाढती मोटारवाहतूक व त्यामुळें होणारे रेल्वेवाहतुकीवरील परिणाम या संबंधींची चर्चा अनेक ठिकाणीं सुरू झाली होती. मजूर मंत्री नॉईस यांनीं ता. ३ सप्टेंबर रोजीं या संबंधांत मांडलेलें बिल निवडक कमिटीकडे सोपवावें म्हणून सूचना केली. बिलांत दोन गोष्टींचा विचार होता. सुरक्षितता व सोय या दृष्टीनें नियंत्रण व नियमन, व हें करण्याकरितां योग्य संघटना. सर फ्रँक यांनीं धंद्यांतील नुकसानकारक चढाओढ व त्यापासून होणारे दुष्परिणामही सांगितले. पक्षाच्या सभेंत बिल लोकमत अंदाजण्यासाठीं धाडावें अशी उपसूचना द्यावी असें ठरलें व त्याप्रमाणें मी उपसूचना दिली. माझ्या आधीं २।३ सभासदांचीं भाषणें झालीं होतीं. माझ्या भाषणांत मोटार वाहतुकीस नियमन पाहिजे, नुकसानकारक स्पर्धा कमी करणें जरूर आहे हें स्पष्ट केलें. तथापि या धंद्यांत लाखो लोक गुंतले आहेत, त्यांचें म्हणणें ऐकून घेणें इष्ट आहे. खुद्द धंदासुद्धां संघटित होऊं लागला आहे. वाहतुकींत स्पर्धा सुरू झाल्याबरोबर रेल्वेनीं तिसऱ्या वर्गाच्या सोयींकडे लक्ष देण्यास सुरवात केली. नियमन व नियंत्रण यांचें तात्त्विक विवेचन करून त्यांतील साध्य व साधन याचा प्रपंच केला. भाषणाच्या तयारीस गोखले राजकीय व आर्थिक संशोधन संस्थेतर्फे प्रसिद्ध झालेलें एतद्विषयक वाङ्मय फार उपयोगीं पडलें. गाडगीळ व गोगटे यांनीं महाराष्ट्रांतील सहा जिल्ह्यांतील मोटारवाहतुकीसंबंधीं संशोधन करून निरिक्षणात्मक रिपोर्ट प्रसिद्ध केला होता. त्यांतील माहिती उद्बोधक होती. तिचाही पूर्ण उपयोग करण्यांत आला. भाषणाचा परिणाम म्हणजे सर फ्रँक नाईस यांनीं उपसूचना मान्य केली. झालेल्या भाषणांना उत्तर देतांना, माझें भाषण वादविवादास विशेष रितीनें मदत करणारें झालें ( Specially helpful contribution to the debate ) असें सांगून खाजगीरितीनें स्तुतीहि केली. खुद्द अध्यक्ष यांनीं सभा संपल्यावर लॉबींत भेट झाली तेव्हां भाषण फारच चांगलें झालें असें सांगितलें. त्याचें बरेचसें श्रेय वर उल्लेखिलेल्या वाङ्मयालाच दिलें पाहिजे. या प्रसंगीं व पुढेंही अनेक वेळां या मंदीरातर्फे प्रसिद्ध झालेले लेख, पुस्तकें, संशोधन वृत्तान्त वगैरे उपयोगीं पडले. प्रि. गाडगीळ यांना मी अनेकवेळां त्रास देई व तेही जितकी माहिती देतां येईल तितकी देत. पक्षकचेरीचें काम चांगलें संघटित व्हावें व सर्व विषयांची माहिती जमविण्यांत यावी, संकलित व्हावी, सभासदांना ती मिळावी या दृष्टीनें याच प्रसंगीं अनेक सूचना मी पक्षापुढें ठेविल्या. जें कार्य

गोखले संशोधनमंदीर करीत आहे, त्याच प्रकारचें पण विशिष्ट धोरणानें कचेरीचें स्वरूप व काम असावें असा माझा अभिप्राय होता. अर्थात चांगलीं माणसें व उत्कृष्ट साधनसामुग्री जमवावयाची म्हणजे पुष्कळ पैसा पाहिजे हेंही खरें. वार्षिक शंभर रुपये पक्षाची वर्गणी होती, तीही वेळेवर व संपूर्णपणें न देणारे अनेक सभासद होते. अर्थात् हें लिहिणें कित्येकांना पसंत पडणार नाहीं. हें लिखाण निरिक्षणात्मक आहे. गौरवाबरोबर न्यूनता दाखविली पाहिजे; दोषस्थलें असतील तींही दाखविलीं पाहिजेत. तीं कशीं टळतील हेंही शक्य असल्यास सांगितलें पाहिजे. पक्षसंघटना, कार्यक्षमता, राजकारणांत प्रभावी व्हावी या दृष्टीनें व्यक्ती-प्रमाणें पक्षानेंही प्रसंगाप्रसंगानें आत्मनिरिक्षण केलें पाहिजे. परंतु अनुभव असा येतो कीं, दोष नाहींतच हें सिद्ध न झालें तर तें अपरिहार्य होतें असें दाखविण्यांत सर्व बौद्धिककौशल्य खर्च करण्यांत येतें. भुलाभाई यांना माझी विचारसरणी अनेकवेळां पटे व ते त्यादृष्टीनें प्रयत्नही करीत. पक्षाच्या कचेरीचा खर्च मोठा असे, त्याचा बराच भाग ते उचलीत. श्री. पट्टणी, बेडेकर वगैरे चांगली मंडळीं आम्ही पक्षकचेरीच्या कामासाठीं घेतलीं. पण तीं टिकलीं नाहींत व पक्षाचें काम कचेरींत तरी, आदेश छापणें व सभेचीं फिरतीं वाटणें एवढेंच होऊन बसे. कामाचा व्याप, उरक व कार्यक्षमता या दृष्टीनें युरोपियन गटाची कचेरी नमुनेदार होती. ग्रंथालय, संशोधक, वृत्तान्त-पंडित, सर्व तऱ्हेची सोय व माणसें त्यांच्या-जवळ असत. देशांतील युरोपियन व्यापारीसंस्था या पक्षाला हजारों रुपयांनीं मदत करीत. सभासद आपला बहुतेक वेळ सभागृहाच्या कामासाठीं खर्च करीत. अनेक युरोपियन सभासदांना मतदार संघाकडून जरूरती आर्थिक मदत मिळे. हिंदी संयुक्त व्यापारी संघाची कचेरी दिल्लीस आल्यानंतर मात्र आम्हाला माहिती मिळविण्याच्या दृष्टीनें फार मदत झाली व हें श्रेय त्या संघाचें चिटणीस मुल्हेरकर यांनाच दिलें पाहिजे.

कॅन्टोन्मेंटच्या कारभाराबबातच्या बिलाबद्दल पूर्वी उल्लेख येऊन गेला आहेच. निवडक कमिटीचा रिपोर्ट अधिवेशनाच्या सुरवातीस सभागृहापुढें ठेवण्यांत आला. पुढें ३ दिवस चर्चा होवून ता. २२।९।३६ रोजीं तें बिल पास झालें. सिलेक्ट कमिटींत जी तडजोड झाली होती तिनें लष्कर हद्दींतील नागरिक संघ ( All-India Cantonment Association ) याचें समाधान झालें होतें. उलट लष्करी खात्याला झालेली तडजोड नको होती. वर्षभर सदरहू रिपोर्ट पडून होता व ज्यावेळीं सदरहू रिपोर्ट विचारांत घ्यावा म्हणून मि. टॉटनहॅम यांनीं भाषण केलें

त्यावेळेस झालेली तडजोड सरकारनें स्वीकारली आहे व जर ती विरोधी पक्षाला नको असेल तर सर्व बिल परत घेण्यास सरकार उत्सुक आहे. तडजोडींत किती साधलें होतें याची जाणीव लष्कर हद्दींतील नागरिकांना होती व बिल पास करावें म्हणून त्यांच्या तारा येत होत्या. उलट पक्षाच्या सभेंत बिल पाहिजे तितकें समाधानकारक नाहीं म्हणून विरोध करावा असें पंतजींचें म्हणणें होतें. सिलेक्ट कमिटींत माझ्यामुळें तडजोड झाली होती. मी महत्त्वाचा प्रश्न उभा केला. सरसहा विरोध करण्याचें धोरण पक्षानें कधींच सोडलें होतें. ज्यांचा संबंध बिलाशीं येतो ते झालेल्या तडजोडीमुळें खूष होते. शिवाय पक्षातर्फे मला कमिटींत नेमल्यानंतर मी तडजोड केली व तिला पक्षांतील सदरहू कमिटीवरील सर्व सभासदांनीं मान्यता दिली होती. एक वर्ष रिपोर्ट पडला होता तेव्हां कोणी विरोध दर्शविला नव्हता. या स्थितींत मी केलें तें पक्षानें मानणें अगदीं योग्य होतें. तथापि जर पक्षाला अमान्य असेल तर तसा निर्णय घ्यावा पण त्याचा परिणामही काय होईल याचा विचार पक्षानें करावा. केलेल्या तडजोडीला मान्यता द्यावी, बिलाला पाठिंबा द्यावा व कांहीं बाबतींत उपसूचना द्याव्यात व माझ्या सल्ल्यानें त्यावर मतनोंदणी मागावयाची कीं नाहीं हें ठरवावें असा निर्णय पक्षानें घेतला. मात्र भाषणांत विरोध दर्शविण्यास मुभा असावी असें ठरलें. चर्चेंत मुख्य भाषणें दोनच झालीं. टॉटनहॅम व मी यांचीं. माझ्या तासावर केलेल्या भाषणांत मूळ बिल व त्यांत कमिटीनें केलेल्या सुधारणा यांचें पूर्ण विवेचन होतें. चांगलें व अधिक चांगलें यांत शत्रुत्व नाहीं. जी वस्तुस्थिति या बिलानंतर उत्पन्न होईल, त्यांतूनच नवीन प्रगतीचें चैतन्य उत्पन्न होईल. जेवढें पाहिजे होतें तेवढें मिळालें नाहीं म्हणून जें मिळालें तें टाकलेंच पाहिजे अशी परिस्थिति नाहीं. कलमवार चर्चेंत पंतजींनीं भाग घेऊन सर्व बिलाला वास्तविक विरोध आहे तथापि तडजोडीमुळें आम्ही ते मान्य करतो, संपूर्ण लाडू मिळत नसेल तर अर्धा घेणें योग्य नाहीं असें आपलें मत सांगितलें. टॉटनहॅम यांनीं जर बिल नको असेल तर सरकार मागें घेण्यास तयार आहे असें ताडकन उठून सांगितलें. कलमवार चर्चेंत मतदानाच्या हक्काबाबत मी उपसूचना मांडली, सरकारनें ती स्वीकारिली व तीन दिवसांच्या चर्चेनंतर बिल ता. २२-९-३६ रोजीं पास झालें. देशांतील सर्व लष्करी छावण्या असलेल्या कॅन्टोन्मेन्ट्समध्यें लोकप्रतिनिधी असलेलीं बोर्डें स्थापन झालीं. जो भाग मुलकी लोकांचा आहे त्याला बझार एरिया म्हणून त्याचा कारभार लोकनियुक्त प्रतिनिधी कमिटीनें

चालवावा व त्या कमिटीचा अध्यक्ष लोकप्रतिनिधींनीं निवडावा व तोच बोर्डाचा उपाध्यक्ष असावा. अधिकार, संघटना यांत तर सुधारणा झालीच पण नोकरवर्ग लष्करी अधिकाऱ्यांतून न घेतां पब्लीक सर्व्हिस कमिशनमार्फत घ्यावा असेंही ठरलें. बिल पास झाल्यानंतर ऑल इंडिया कॅन्टोन्मेन्ट असोसिएशननें ठराव करून माझे आभार मानले व पुढें तर दोन वर्षे मला अध्यक्ष निवडलें. लाहोरमधील एका अनामिक गृहस्थानें पत्रानें आभार मानून त्यांत रु. ५० च्या नोटा धाडल्या. ते परत करणें शक्य नसल्यामुळें पक्षाला मी दिले.

या अधिवेशनांत ऋणकोला सावकारी तुरुंगाबाबत ठेवण्यासंबंधींचें जें कलम ५१ सि. प्रो. कोड मध्यें आहे त्यांत दुरुस्ती करणारें बिल पास झालें. जर ऋण-कोनें आपली मालमत्ता लबाडीनें व सावकारांना बुडविण्याकरितां तबदील केली नसेल तर त्याला तुरुंगांत कर्जफेडीकरितां ठेवूं नये अशी दुरुस्ती करण्यांत आली. शेतकऱ्यांना सर्व परिस्थितींत तुरुंगापासून मुक्तता असावी अशी माझी उपसूचना होती. मुंबई इलाख्यांत अनेक जिल्ह्यांत शेतकरी ऋणविमोचन कायद्याप्रमाणें ही व्यवस्था आहे.तीच सर्वत्र करावी हा उद्देश होता. कर्जाबद्दल तुरुंगांत ठेवणें हें रानटी संस्कृतीचें लक्षण आहे.सन १८७९ सालीं जेव्हां दक्षिणेंतील शेतकरी ऋणविमोचन कायदा झाला त्यावेळच्या सरकारी अधिकाऱ्यांचा दृष्टीकोन कसा होता हें सभागृहाच्या दृष्टीस आणलें. (The proposed abolition of imprisonment for debt had his concurrence as a measure which if found to work satisfactorily in a limited area may be advantageously extended at some future date to all India.) ५७ वर्षे तो कायदा होऊन झालीं तरी सरकार स्वस्थ आहे हें शेतकऱ्यांच्या कळवळीचें लक्षण नव्हें. गृहमंत्री यांनीं शेतकरी व बिगर शेतकरी ऋणको, असा फरक करण्याचें नाकारलें, प्रामाणिक ऋणकोला तुरुंग नसावा. अप्रामाणिक ऋणकोला त्यापासून सुटका नसावी अशी त्यांची विचारसरणी होती. तथापि गृहमंत्री यांनीं प्रांतिक सरकारांना माझ्या उपसूचनेचा विचार करण्याबाबत सांगून त्यांचीं मतें मागविण्याचें आश्वासन दिलें व त्यामुळें उपसूचना नापास झाली. तथापि माझ्या उपसूचनेवर झालेल्या चर्चेमुळें वातावरण बरेंच गरमागरम झालें. शेतकऱ्यांचे वाली कोण, धनको समजाचे चहाते कोण, हें पुन्हां एकदां स्पष्ट झालें.

बिनसरकारी बिलांत मुख्य स्थान या अधिवेशनांत आर्य मॅरेज व्हॅलिडेशन बिलाला होतें. हें बिल अनेकजणांनीं दाखल केलें होतें. परंतु मुख्य चालक

घनःश्याम गुप्त हे होते. डॉ.खरे यांच्या नांवावर तें प्रथम बॅलटमध्यें आलें. त्यांनीं तें मांडिलें. सिलेक्ट कमिटीकडे सोपविण्याच्या वेळीं अनेकांनीं विरोध केला. सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट या अधिवेशनाच्या सुरवातीस मांडण्यांत आला. ता. २२।९।३६ ला तो चर्चेस निघाला. सदरहू बिल तावडतोब पास व्हावें म्हणून शक्य तेवढे प्रयत्न करण्यास मला गुप्तजींनी सांगितलें. अनेक उपसूचना आल्या. बिलांतील मुख्य गोष्ट म्हणजे आर्यसमाजी म्हणून ज्यांचीं लग्नें झालीं असतील अगर होतील तीं बेकायदा समजूं नयेत; मग वधू अगर वर लग्नापूर्वी भिन्न जातीचे अगर भिन्न धर्माचे कां असेनात. पंजाबमध्यें अनेक भिन्न जातियांमध्यें लग्नें झालीं होतीं. आर्यसमाज जाती मानीत नाहीं, पण लग्नाच्या बाबतींत वारसाचा प्रश्न उपस्थित झाल्यास प्रतिलोमविवाह म्हणून कांहीं लग्नें बेकायदेशीर ठरण्याचा संभव होता. शिवाय भिन्न जातीयांत लग्नें होणार व तीं व्हावींत आणि तीं कायदेशीर ठरावींत असें प्रामाणिक व प्रागतिक मतही या बिलामागें होतें. मुसलमान सभासदांना प्रथमतः यांत कांहींच गैर वाटलें नाहीं. कायदेमंत्री सर नृपेन्द्र यांच्याशीं बोलणें करून सरकारला मान्य असतील तेवढ्याच उपसूचना कॉंग्रेसपक्ष सुचवील व त्यामुळें लवकर काम आटोपून हें बिल पासही होईल अशी व्यवस्था पण केली. पण सनातनी बजोरिया यांनीं आर्यसमाजी हिंदू नाहींत असें ठरविण्याच्या उद्देशानें अनेक उपसूचना आणिल्या, लांबलांब भाषणें केलीं. मुसलमानांचा संशय जागृत केला. अणे यांनींही सद्बुद्धीनें पण प्रसंग न जाणतां अनेक आक्षेप घेतले. परिणाम असा झाला कीं चर्चेंत हिंदू–मुसलमान, शुद्धी, तबलिक, आक्रमण असे नाना प्रश्न उपस्थित झाले. आर्यसमाजी याची व्याख्या करावी, निदान एक वर्ष तरी लग्नापूर्वी त्यानें आर्यसमाजाचे सभासद असावे असें कलम घालण्याचा प्रयत्न झाला. मुसलमान, पण संस्कृत पंडीत उमरअली यांनीं मनुस्मृतींतून वाक्यें काढून, या बिलानें वर्ण संकर होऊन हिंदूधर्म बुडेल म्हणून भीति व्यक्त केली ! ! तर हिंदू, पण अरबी पंडीत, डॉ.भगवानदास यांनीं 'मुसलमानाची' व्याख्या करणें कठीण आहे असें अरबी धर्मग्रंथांतील उतारे वाचून दाखविले. अणे यांनीं व्याख्या करावी व लग्नाच्या वेळीं असणारे वधूवर हे प्रामाणिकपणें आर्यसमाजी असावेत असें प्रतिपादिलें. महंमुद याकूब यांनीं तें मान्य केलें व लग्नाकरितां मुसलमान स्त्रिया आर्य होण्याचा संभव आहे, व तें या बिलानें कायदेशीर होईल, तें टळावें म्हणून आपण उपसूचना दिली असल्याचें सांगितलें. माझ्या भाषणांत हिंदू, मुसलमान यांची

व्याख्या करणें कठीण. जे या कायद्याप्रमाणें आर्यसमाजी म्हणवतील व लग्नें करतील, त्यांचीं लग्नें कायदेशीर व्हावींत. आर्यसमाज हा हिंदूंचा आक्रमक भाग आहे, त्याला हिंदू जातींतून वगळणें चुकीचें आहे; वयांत आलेल्या स्त्री पुरुषांना पसंत पडेल त्याच्याशीं लग्न करण्यास कायद्याची अडचण असूं नये. सर नृपेन्द्र यांनीं व्याख्या करणें अशक्य आहे असें सांगितलें. पंजाबमध्यें दोन मुसलमानांतील पक्ष एकमेकांस मुसलमान नाहींत, हें ठरविण्याचा प्रयत्न करीत असतात व दोघेही कुराणाचा आधार घेतात ! ! महंमद याकूब यांची उपसूचना सरकार स्वीकारणार नाहीं असें स्वच्छ बजावलें. आमच्यापैकीं अनेकांनीं कारण नसतां भाषणें केलीं. शीख, मुसलमान, सनातनी, सुधारक या सर्वांनीं कहर केला. ता. २९।९।३६ ला बिलाचें कलमवार वाचन संपलें नाहीं. पुन्हां ता. ९।१०।३६ ला चर्चा सुरू झाली. मुसलमान सभासद म्हणूं लागले, या बिलानें, मुसलमान व ख्रिस्ती धर्मांतील स्त्रियांना लग्नापुरतें आर्य समाजी बनवून इस्टेटी लाटण्याचा हा हिंदूंचा डाव आहे. डॉ. भगवानदास यांनीं धर्मशास्त्र, समाजशास्त्र यावर एक निबंधच वाचला. बिलाऐवजीं धर्मव्यवस्था, चातुर्वण्य, मुसलमानी समाजव्यवस्था यावरच व्याख्यानें झडूं लागलीं. शौकतमीयांनीं प्रत्येकानें आपापला धर्म पाळून दुसऱ्याच्या धर्माविषयीं आदर दाखवावा असें गंभीरपणानें सांगितलें. सहिष्णुता म्हणजे अन्याय सहन करणें नव्हे. (लाकुम दीनाकुम लीया दीन) महमद याकूब यांनीं आपली उपसूचना मांडली, "लग्नापूर्वी हिंदुधर्माव्यतिरिक्त कोठल्याही धर्माचें वधू अगर वर अगर दोघेही असले तरी लग्नाच्या वेळीं ते दोघेहि आर्यसमाजी असले म्हणजे तें लग्न कायदेशीर समजावें." अशी बिलांत योजना होती. याकूबसाहेबांची उपसूचना 'लग्नापूर्वी' या शब्दापासून 'तरी' या शब्दापर्यंत भाग गाळावा अशी होती. याचा अर्थ अन्य धर्मीयांपैकीं कोणीं आर्यसमाजी होऊन लग्न करूं लागला तर या कायद्यानें तें कायदेशीर होतें तें टळावें. उपसूचनेला असफअली यांनीं विरोध केला, पण शौकत-अली, तबलीकचे प्रणेते नारंग, यांनीं पाठिंबा दिला. कृष्णकांत मालवीय यांनीं लग्नाला प्रेम पाहिजे, तें असलें म्हणजे इतर कोठल्याही गोष्टीची अडकाठी नसावी असें मत प्रदर्शित केलें. मुसलमानांना भीति वाटण्याचें कारण नाहीं. अनेक हिंदूंनीं मुसलमान, ख्रिस्ती, ज्यू, मुलींशीं लग्नें केलीं आहेत. उलट मुसलमानांनींही हिंदु मुलींशीं लग्नें केलीं आहेत. यांत धर्माचा काय प्रश्न आहे ! हिंदी मुसलमानांनीं फक्त देवाचें घरच पाहिलें आहे, देव पाहिला नाहीं. लग्न ही वैयक्तिक बाब. आवडी

निवडी ठेवणें योग्य आहे. मुसलमानांनीं कसें वागावें याबाबत पंडितजींनीं सांगितलें कीं, " तो मेल्यानंतर मुसलमानांनीं त्याला आपला म्हणावें व हिंदूंनीं आपला म्हणून त्याला अग्निसंस्कार द्यावा " (मुसलमानात बा झमझम शोयादो हिंदू बिशोजनाद). ही सहिष्णुता शौकतमियांना पसंत नव्हती. त्यांनीं सांगितलें कीं, " धर्म बदलला कीं मुसलमान व्यक्ती मेली असें समजलें पाहिजे." ' खसकम शुद, जेहान पाक '–कमी घाण जग अधिक पवित्र. लग्नाकरितां धर्म बदलणें ठीक नाहीं. मुसलमान धर्म बदलूं लागले तर त्यांना कोण प्रतिबंध करणार ? पण हे बिल पास करणें म्हणजे धर्मांतराला उत्तेजन देणें आहे म्हणून आपला विरोध असल्याचें जाहीर केलें. या वादविवादांत वेळ संपला व बिल पुढील अधिवेशनांत गेलें. त्यांत काय झालें ते यथाक्रम येईल. चर्चेनें, प्रसंग न ओळखिल्यानें, हिंदु हिताचें बिल लवकर पास झालें नाहीं व जसेंच्या तसेंही झाले नाही. ' सनातन धर्म कीं जय ' हेंच त्याचें कारण होय !!

आगामी निवडणुकीसंबंधीं सर्वत्र खळबळ चालली होती. अनेक प्रांतांतून सरकारी अधिकारी काँग्रेसविरुद्ध प्रचार करीत आहेत म्हणून तक्रारी होत होत्या. सरकारनें निवडणुकींत तटस्थ राहाण्याबद्दल सर्व सरकारी अधिकाऱ्यांना ताकीद द्यावी असा ठराव काँग्रेस पक्षातर्फे मांडण्यांत आला. दोन दिवस चर्चा झाली पण मतनोंदणीपर्यंत वेळ आली नाहीं. ठरावाला याकूब यांनीं उपसूचना सुचविली कीं सरकारविरुद्ध जे या निमित्तानें चळवळ करतील त्यांचाही बंदोबस्त सरकारनें करावा ! ! याकूब राजनिष्ठा दाखविण्याचा एकही प्रसंग, लागू अगर गैरलागू, वायां घालवीत नसत. प्रांतवार सरकारी अधिकारी कसे वागत आहेत हें दाखविण्याच्या दृष्टीनें डॉ. खानसाहेब, पंडित पंत, शेट गोविंददास, मौलाना फजलूल हक्क वगैरेंनीं अनेक उदाहरणें दिलीं. सरकारी अधिकाऱ्यांच्या बदल्या, गुप्त सर्क्युलरें, काँग्रेसविरुद्ध पक्षसंघटना करण्यास गव्हर्नर यांनीं केलेले प्रयत्न निवेदन करण्यांत आले. ग्रिफिथनें तर, काँग्रेसच्या जुलुमापासून रयतेचें संरक्षण करण्याकरितां सर्व कांहीं केलें पाहिजे असें जवळ जवळ सांगितलें !! गृहमंत्री यांनीं दिलेलीं उदाहरणें अतिरंजित आहेत, सरकारी अधिकारी तटस्थ आहेत. जर निवडणुकीच्या निमित्तानें काँग्रेसनें सरकारविरुद्ध प्रचार केला तर सरकार स्वस्थ बसणार नाहीं असें बजाविलें. अनेक ठिकाणीं हद्दपाऱ्या सुरू झाल्या होत्या. प्रमुख प्रमुख कार्यकर्ते पकडण्याचें धोरण उघड दिसत होतें. चर्चेच्यावेळीं दिलेलीं उदाहरणें खोटीं आहेत

एवढेंच म्हणून भागणार नव्हतें. उघड चौकशीची मागणी पण करण्यांत आली. बंगालमध्यें सरकारी नोकर वर्ग प्रजापार्टीविरुद्ध खटपट करीत होते. जमीनदारांना संघटित करण्याचे प्रयत्न बिहारचा गव्हर्नर करीत होता. सर्वत्र कॉंग्रेसपक्षाविरुद्ध सरकारी अधिकारी सर्व प्रांतांत प्रयत्न करीत होते. ते अखेरपर्यंत चालूंच होते, तथापि ठरावावर जी दोन दिवस चर्चा झाली त्यामुळें थोडा आळा बसला व व अगदीं उघड उघड होणारे प्रयत्न थंडावले असें पुढे आढळून आलें.

नेहमींप्रमाणें याही अधिवेशनांत अनेक तहकुबीच्या सूचना करण्यांत आल्या. गव्हर्नर जनरलनें बऱ्याच येऊं दिल्या नाहींत. दोन महत्त्वाच्या, चर्चेस आल्या. एक ब्रिटिश कापडावरील जकात सरकारनें कमी केली त्याबाबत व एक चलनविषयक धोरणाबाबत. लीज–मोदीं करारांत दोन वर्षेपर्यंत ब्रिटिश कापडावर किंमतीच्या २५ टक्के जकात असावी, पण जर जादा बसविलेली जकात कमी झाली तर ही जकात २० टक्के व्हावी. दोन वर्षानंतर किती जकात ठेवावी हा प्रश्न सरकारनें पुन्हां विचारांत घ्यावा. १९३४ च्या मार्चांत हा करार असेंब्लीनें मान्य केला पण सर्व देश विरुद्ध होता. १९३४ अखेर इंग्लंड व हिंदुस्थानांत (Indo-British Agreement) एक करार झाला, अर्थात हिंदुस्थान सरकारनें तो लोकमताला न जुमानितां केला. त्यांत अशी शर्त होती कीं, संरक्षक जकात इतक्या बेतानें आयात मालावर ठेवावी कीं, तसल्याच हिंदी मालाला योग्य किंमत यावी व जेव्हां जेव्हां एखाद्या धंद्यास संरक्षण देण्याचा प्रश्न उपस्थित होईल व चौकशीसाठीं टॅरीफ बोर्ड नेमलें जाईल त्यावेळीं बोर्डापुढें आपली बाजू मांडण्यांचा हक्क इंग्रज धंदेवाल्यांना राहील (The Government of India further undertakes that measure of protection to be afforded shall be only as much and no more than would equate the prices of imported goods to the fair selling prices for similar goods produced in India and when a question of the grant of substantive protection to an Indian industry is referred for inquiry to a Tariff Board, the Government of India will afford an opportunity to any industry concerned in the United Kingdom to state its case and answer the case presented by other interests.) या कराराचा सरळ अर्थ हिंदी धंद्याना संरक्षण मिळावें कीं नाहीं, हा प्रश्न इंग्रज धंदेवाले यांच्या मर्जीवर राहाणार. इंडो–ब्रिटिश कराराबाबत १९३५ च्या दिल्ली अधिवेशनांत तहकुबीची सूचना येऊन सरकारचा पराभव झाला होता. त्यास न

जुमानितां सरकारनें टॅरीफ बोर्ड नेमिलें. रामस्वामी मुदलीयार, अलेक्झांडर मरे, फजल रहिमतुल्ला हे सभासद होते. त्यांनीं ब्रिटिश कापडावरील जकात ५ टक्क्यांनीं कमी करावी अशी शिफारस केली होती व सरकारनें तावडतोब ती अंमलांत आणली होती, म्हणून तहकुबीची सूचना मांडण्यांत आली होती. इंडो–ब्रिटिश कराराच्या तहकुबीच्या वेळीं व्यापार मंत्री यांनीं असें सांगितलें होतें कीं, 'चौकशी करणारे आम्ही, हिंदुस्थान सरकार, आम्हाला योग्य वाटेल त्यांच्याकडून चौकशी करणार, जें ठरऊं तें आम्ही ठरऊं आणि जर जकात कमी करण्याचें ठरलें तर तें काम कायदेमंडळ करील." ( "The inquiry will be our inquiry, ordered by our–selves entrusted to those whom we cousider suitable to carry out investigation. Thirdly, the conclusions will be our conclusions, and lastly if the substantive level of protection granted by the legislature is to be reduced, it is the Legislature that will reduce the level of protection.") हें आश्वासन बाजूला सारून सरकारनें जकाती कमी केल्या. वास्तविक टॅरीफ बोर्डाच्या शिफारसी नेहमींप्रमाणें बिलांत प्रविष्ट व्हावयाच्या व तें बिल सभागृहापुढें यावयाचें. तसें झालें असतें तर बोर्डाच्या शिफारसी चुकीच्या आहेत हें सहज दाखविता आलें असतें. पण सरकारनें वाममार्ग पत्करून जकाती कमी केल्या. झालेल्या चर्चेंत मोदी यांनीं भाग घेतला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. चेट्टी, पंत, यांनीं भाषणें केलीं. जेम्स, रॅमसे स्कॉट यांचीं भाषणें झालीं. अध्यक्ष यांना आम्हास मतनोंदणी हवी आहे आमच्या पक्षापैकीं जास्त कोणी बोलणार नाहीं असें काँग्रेस पक्षांनीं सांगितलें होते. सरकारतर्फे झाफरुल्ला यांनीं भाषण केलें व त्यांत जकात कमी केल्यास माल जास्त येईल व उत्पन्न वाढेल अशी विचारसरणी मांडली. वास्तविक धंद्याला संरक्षण द्यावयाचें त्यावेळीं, जकातीच्या उत्पन्नाचा विचार करणें अप्रस्तुत आहे. बिल मांडून दर कमी कां केलें नाहींत या प्रश्नाला उत्तर देतां आलें नाहीं. त्यांचें भाषण झाल्यानंतर 'प्रश्न मतास टाका' म्हणून मागणी केली. त्यावेळीं ५ वाजून ४५ मिनिटें झालीं होतीं. अजून फडणीस ग्रिग यांना बोलावयाचें होतें. त्यांना परवानगी दिली व ते १५ मिनिटें बोलले म्हणजे ६ वाजून जात होते व सूचना चर्चेंतच विराम पावत होती ( Talked out ). सरकारला पराभव नको होता. सरकारची बाजू मांडली गेली होती. अनेक पक्षांचे वक्ते बोलले होते. प्रश्न योग्य रितीनें चर्चिला गेला होता.

मतनोंदणी घ्यावयास पाहिजे होती. चर्चातहकुबीची सूचना (Closure) अध्यक्षांनीं विचारांत घेण्याचेंच नाकारिलें. ती मतास टाकली असती तर पास झाली असती व मूळ तहकुबीची सूचना पण पास झाली असती. अध्यक्षांनीं ग्रिग यांना बोलण्यास सांगितलें. त्याबरोबर सर्वत्र धिक्कार करण्यांत आला व शेम शेमच्या आवाजांत कॉंग्रेस, कॉंग्रेस नॅशनॅलिस्ट पक्षांतील सर्व व कांहीं स्वतंत्र पक्षांतील सभासद सभागृह सोडून गेले. फडणिसानें ६ वाजेपर्यंत रिकाम्या बाकांना उद्देशून भाषण केलें व अधर्म करून पराभव टाळला. तथापि सरकारची नीति जगजाहीर झाली.

तथापि या घटनेंतून दुसरीच घटना अकाल्पितपणें निर्माण झाली. शेम शेम ओरडत बहुसंख्यांक सभासद सभागृह सोडून गेले, यामुळें अध्यक्ष दुखावले गेले. त्यांनीं दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. ३।९।३६ ला फडणिसाला बोलून दिलें हें योग्य केलें असें सांगितलें. अध्यक्षांचा निकाल अप्रिय असला तरी तो ऐकला पाहिजे व त्या दृष्टीनें अध्यक्षांची प्रतिष्ठा राखण्याकरितां आपण शक्य तेवढे प्रयत्न करूं असें त्यांनीं बजाविलें. जर अध्यक्ष पसंत नसेल तर अविश्वास दाखविण्याचा नियमाप्रमाणें जो मार्ग आहे त्याचा अवलंब सभासदांनीं करावा व जर मी अध्यक्ष सभागृहाला नको असें वाटत असेल तर जागा खालीं करण्यास मी तयार आहे असें त्यांनीं निक्षून सांगितलें. अध्यक्षांच्या या वर्तनाबाबत, ज्याला खुलासा करावा असें वाटत असेल त्यानें करावा, असेंहि त्यांनीं सांगितलें. ता. ४ ९ ३६ रोजीं भुलाभाई यांनीं एक महत्त्वाचें भाषण त्यावर केलें. "निदर्शन करून सभात्याग केला, यांत गैर कांहीं नाहीं. उलट अन्य सभागृहांतून व विधिमंडळांतून पूर्ण विचार करून अशीं निदर्शनें करण्यांत येतात व सभात्याग सभासद करितात. येथें अध्यक्षांचें रुलींग—अगर निर्णय—अन्यायाचें वाटलें म्हणून सहजस्फुर्तीनें निषेध दाखविण्याकरितां—राग दाखविण्याकरितां—सभासद सभा सोडून गेले यांत गैर कांहीं नाहीं. यांत अध्यक्ष या व्यक्तीचा अपमान बुद्धिपुरस्सर करावा हा उद्देशच नव्हता. फक्त निषेध दिलेल्या निर्णयाचा करावयाचा होता. व्यक्तिशः अध्यक्ष गुणानें कितीहि मोठे असले तरी सामान्य सभासदांनाही कांहीं हक्क आहेत. अध्यक्षांचा निर्णय मान्य करणें याचा अर्थ तो बरोबर आहे असें मानणें नव्हे. वर्तन निर्णयाबरहुकूम असलें पाहिजे हें ठीक पण सद्सद्विवेकबुद्धि दुसऱ्याच्या हातीं द्यावी असें नाहीं. (No man may surrender his judgment to another, however eminent he may be.) कोर्टसुद्धां आपला निकाल अंमलांत आणील, पण

त्यामुळें व्यक्तीला जो आपलें मत सांगण्याचा अधिकार आहे, तो जात नाहीं हें तत्व इंग्लंडमध्यें मान्य केलें आहे. ( While the judgment of a Tribunal may be enforced against a person, it does not involve the privation of his personal liberty of judgment to differ from that Tribunal and to express that difference in the most unmistakable language. ) निर्णय मानणें ही एक गोष्ट आहे. तो बरोबर आहे हें म्हणणें निराळें. प्रत्येक व्यक्तीला आपलें मत बरोबर आहे हें सांगण्याचा हक्क आहे हें उमगलें पाहिजे; हा नुसता सहिष्णुतेचा प्रश्न नाहीं. सभात्याग हा एक मतविरोध दाखविण्याचा मार्ग आहे. यांत अध्यक्षांचा व्यक्तीगत अपमान करावा असा उद्देश नसतो व नव्हताही; पण जें एकंदर घडून आलें, जी घटना झाली व जिची परिणती अध्यक्षांच्या निर्णयांत झाली, त्या घटनेंतील अन्यायाविरुद्ध निषेध करण्याचा हेतू होता. ( Active protest against the incidents taken as a whole. ) सभागृहांत कोण बसतात व कोण जातात हें अध्यक्षाला पहाण्याचें कारण नाहीं असें जें अध्यक्षांनीं सांगितलें आहे तें अयोग्य आहे. सभागृह प्रतिनिधींचें आहे. जर तें प्रातिनिधिक नसेल तर तें नियमाप्रमाणें व अनेक निर्णयाप्रमाणें चालूं ठेवणें गैर आहे. या दृष्टीनें सभागृहांतून बहुसंख्यांक सभासद सोडून गेल्यानंतर ती सभा बंदच करावयास पाहिजे होती. अमूक निर्णय अध्यक्षांनीं द्यावा हें आम्हांला सांगतां येणार नाहीं. पण योग्य निर्णय द्यावा म्हणून चर्चा करिता येईल, सल्ला देतां येईल असें आम्हांस सांगणें जरूर आहे. ( It is not in us to ask you to come to a particular judgment, but it is undoubtedly in us to influence you, to advise you and to argue before you, so that you may come to a right judgment in all public matters.) सरकारनें केलेल्या वर्तनाबद्दल सरकारला शासन द्यावयाचें होतें. केलेलें वर्तन अधर्म मार्ग स्वीकारून सरकार योग्य ठरवूं पाहात होते. सभेच्या नियमांचा दुरुपयोग सरकार करीत होतें व तें होवूं नये म्हणून आम्हीं आपणांस सूचना देत होतो. पण आपण निर्णय देऊन सरकारचा पराभव टाळलात. आपण पक्षपात केलात असें कोणीं म्हणत नाहीं. आपण तटस्थ आहांत हें मान्य आहे. तथापि कोणता पक्ष कोणता हेतू धरून वागत आहे व नियमांचा दुरुपयोग करीत आहे हें पाहाण्याचें आपलें कर्तव्य आहे. फडणिसांना कांहींहि नवीन सांगावयाचें नव्हतें, फक्त वेळ काढून मतनोंदणी टाळावयाची होती. असल्या वर्तनानें सरकार, सभागृहाचें

काम फार दिवस करूं शकणार नाहीं. खोटेपणाचें प्रायश्चित मिळेल. तुमच्या निर्णयाबद्दल आदर आहे पण तो निर्णय बरोबर आहे हें मान्य नाहीं, मान्य करण्याचें कारण नाहीं. जें आम्हीं केलें तें आमच्या दृष्टीनें, सद्सद्विवेक बुद्धीच्या दृष्टीनें व आमच्या लोकांच्या दृष्टीनें योग्यच होतें. ( We feel that while we respect your judgment, we are not bound to agree with it and we feel that we have done right by ourselves we have done right by our conscience and we have done right by those who look to us for protection.)" मृदु भाषा, मृदु वाणी व पोलादी विचारसरणी एक तास-पर्यंत सभागृहाला ऐकवून भुलाभाई खालीं बसतांच सभागृहाचें वातावरण एकदम बदलून गेलें, तें गंभीर झालें; उपहाराकरितां सभासद उठले, पण झालेल्या भाषणाची लज्जतच त्यांना अधिक समाधान देत होती !! अध्यक्षांवर काय परिणाम झाला हें सांगणें कठीण, पण पुन्हां असा प्रसंग उद्भवला नाहीं हें खरें.

चलनविषयक धोरणाचा निषेध करण्याकरितां तहकुबीची सूचना ता.८-१०-३६ रोजीं कॉंग्रेसपक्षातर्फे अनंतशयनम् आयंगार यांनीं मांडली. थोडक्यांत त्यांनीं या प्रश्नाचा इतिहास सांगितला. सन १९२७ साली इंग्लंडनें सुवर्ण परिमाण सोडलें. त्याच सुमारास सरकारनें हुंडणावळीचा दर १ रुपयास १ शिलिंग ६ पेन्स ठरविला; तो या देशाला नुकसानकारक आहे असें एकमतानें या देशानें सांगितलें तरी सरकारनें जुमानलें नाहीं. व्यापारी आढावा या देशाचा प्रतिकूल होत चालला. या देशांत येणारें सुवर्ण बंद होऊन उलट प्रवाह सुरूं झाला. १९३१ सालीं इंग्लंडनें पुन्हां सुरू केलेलें सुवर्ण परिमाण सोडून दिलें. तरीसुद्धां रुपयाचा संबंध इंग्लंडमधील स्टर्लिंगशीं ठेविलाच. सोन्याशीं चलनाचा कायदेशीर संबंध तोडून अनेक देशांनीं आपलें चलन कमी किंमतीचें करून आपला निर्यात व्यापार वाढविला. हिंदुस्थानांतील चलन मात्र हुंडणावळीच्या दृष्टीनें जखडून टाकून हिंदुस्थानचा निर्यात व्यापार जो वाढला असता, तो सरकारच्या या धोरणानें वाढला नाहीं. जी गोष्ट इंग्लंड, फ्रान्स, इटाली, बहुतेक दक्षिण अमेरिकेंतील संस्थानें यांनीं केली ती येथील सरकारनें जाणून बुजून केली नाहीं. कारण त्यांत या देशाचें नुकसान असलें तरी इंग्लंडचा फायदा होता. ओटावा करार व चलन-विषयक दक्षता घेऊन इंग्लंडनें स्वतःचा व्यापार सावरला व या कामीं हिंदीहित बळी दिलें ही गोष्ट स्पष्ट होती. सुवर्ण परिमाण सोडल्यानें इंग्लंडचें हितच झालें

ही गोष्ट खुद्द कीन्स जे प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ आहेत, त्यांनीं मान्य केली आहे. बेकारी कमी झाली, त्यांवर होणारा खर्च अंदाजापेक्षां कमी झाला, वस्तुगत दृष्टीनें वेतन-वाढ (Real Wages) झाली, राहणीचा खर्च कमी झाला, उत्पादन खर्च कमी झाला व निर्यात व्यापार वाढला. हे सर्व परिणाम सन १९३१ मध्यें सुवर्ण परिमाण सोडलें म्हणून झाले असें त्यांनीं नमूद केलें आहे. प्रसिद्ध आंतरराष्ट्रीय अर्थशास्त्रज्ञ पॉल इन्झीग यांचेंही मत चलनाचा व सुवर्णाचा संबंध तोडल्यानें, देशांतील, उत्पादन खर्च कमी होतो व त्यामुळें निर्यात व्यापार वाढून शेवटीं किंमती सुधारतात. तहकुबीच्या चर्चेंत रुपयाची किंमत हुंडणावळीच्या दृष्टीनें वाढत आहे व त्यामुळें व्यापार कमी होत आहे हें केलेलें विधान फडणीस मान्य करण्यासच तयार नव्हते. त्यांचें म्हणणें, सन १९३१ मध्यें रुपयाची किंमत बरीच कमी झाली होती, ती सुधारली व क्रयशक्तीच्या तुलनेनें पाहातां, हुंडणावळीच्या दृष्टीनें पाहतां, विद्यमान किंमत जास्त आहे असें नाहीं. सर्वत्र चलनें सुवर्ण परिमाणापासून ढळलीं म्हणूनच आंतरराष्ट्रीय व्यापारांत जकाती, संरक्षणें, हिस्सेरशी वगैरे गोष्टी आल्या व तो खचला, व आतां पुन्हां हिंदुस्थाननें जर आपलें चलन निर्मूल्य केलें तर जी घडी पुन्हां व्यापारांत बसूं लागली आहे तीही बिघडेल !! तात्पर्य हिंदुस्थाननें इंग्लंडसाठीं व जगासाठीं जें आहे तें मान्य करावें हा त्यांचा अर्थ होता. पंतजींनीं चलनविषयक धोरण या देशाच्या हिताविरुद्ध कसें आहे हें स्पष्ट केलें. सर्व देश जसे वागले तसें हिंदुस्थाननें वागून नुकसान टाळावयास पाहिजे होतें. रुपायाचा व स्टर्लिंगचा संबंध तोडलाच पाहिजे ( Rupee must be delinked from the Sterling) व हुंडणावळीचा दर ठरविण्याची मोकळीक असली पाहिजे. कांहीं इंग्रजांचें मत तसेच असल्याचें त्यांनीं फडणिसांच्या निदर्शनास आणिलें. फडणिस ताठर; त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, जें झालें तें योग्य होतें, चुकीचें असलें तरी जी पुन्हां घडी बसली आहे ती बिघडविणें इष्ट नाहीं. व्यापार पूर्वी बुडाला असेल पण आतां सुधारूं लागला आहे. तात्पर्य सत्तेनें व स्वार्थानें फडणिस मदांध झाले होते. प्रश्न मतास टाकला, समसमान मतें पडलीं व अध्यक्षांनीं परंपरेला अनुसरून विद्यमान परिस्थितीच राहावी म्हणून, विरुद्ध मत देऊन सूचना नापास केली !! साहेब स्वार्थासाठीं परंपरा धरतो, मोडतो व दोन्हीं वेळां तात्त्विक भूमिकेनें तें केलें हें सांगतो. परंपरा धरून अगर मोडून स्वार्थावर निखारा ठेवण्याची कला त्याला माहीत नाहीं. सभेच्या परंपरेपेक्षां राष्ट्राचें हित अधिक आहे हें मानण्यास

सर्वच तयार असतात असें नाहीं. निस्पृहता व निःस्वार्थ व्यक्तिगत बाबतींत असावा, राष्ट्रासाठीं, समाजासाठीं, जें कांही केलें जातें तें मूळतःच निस्वार्थी असतें हें इंग्रज जाणतो, आम्हांस अद्यापि शिकावयाचें आहे.

या अधिवेशनांत ता. २१।९।३६ रोजीं व्हॉईसरॉय लॉर्ड लिन्लिथगो यांचें दोन्हीं विधिमंडळांतील सभासदांपुढें भाषण झालें. सरकारी स्वागत समारंभ व तत्सम सर्व समारंभ यांवर कॉंग्रेस पक्षानें बहिष्कार घातला होता. गव्हर्नर जनरलच्या भाषणाबरही बहिष्कार घालून त्या दिवशीं, तेवढ्या वेळेपुरतें गैरहजर राहण्याचा कॉंग्रेस पक्षाचा विचार आहे, तो त्यानें बदलावा अशा अनेक सूचना अनेक अधिकाऱ्यांकडून पक्षांतील प्रमुख व्यक्तींकडे आल्या. लॉर्ड वेलिंग्डन व कॉंग्रेस यांच्यांत भांडण होतें. वेलिंग्डन यांनीं गांधीजींचा अपमान केला होता पण नवीन व्हॉईसरॉयांना संधी दिली पाहिजे, निदान भाषण पहिलेंच होतें, ऐकण्यास काय हरकत आहे वगैरे विचार जबाबदार अधिकाऱ्यांनीं खाजगी रीतीनें नेते, उपनेते व अन्यप्रमुख सभासद यांच्याजवळ प्रगट केले. ता. १९।९।३६ ला पक्षाची कार्यकारी मंडळाची सभा हॉटेल सेसीलमध्यें भुलाभाईंच्या खोलींत भरली होती, त्यांत या प्रश्नाचा विचार झाला. चर्चेत मी व आणखी १।२ सभासदांना हजर राहूं नये असें प्रतिपादिलें तर बाकीच्या सभासदांनीं हजर राहावें असें आपलें मत असल्याचें सांगितलें. शेवटीं अखेरचा निर्णय नेत्यावर सोंपविण्यांत आला. झालेली चर्चा नेहमींप्रमाणें गुप्त ठेवण्यांत यावयास पाहिजे होती. परंतु दुसऱ्या दिवशींच्या वर्तमानपत्रांतून कॉंग्रेस पक्ष गव्हर्नर जनरलच्या भाषणास हजर राहणार अशी बातमी आली व हा निर्णय कार्यकारी मंडळाचा आहे असेंही छापलें होतें. ता.२०।९।३६ ला रविवार होता तथापि अनेक सभासदांनीं याबद्दल तक्रार केली म्हणून ताबडतोब त्याच दिवशीं संध्याकाळीं लॉंगवूड हॉटेलमध्यें पक्षाची सभा होऊन, चर्चा होऊन, 'हजर राहूं नये, असें ठरलें!' तथापि निर्णयापेक्षां, पक्षाच्या कार्यकारी मंडळांत झालेले निर्णय बाहेर फुटावे हें गैर आहे व याचा विचार व्हावा म्हणून मी सूचना मांडली. शेवटीं ज्या सभासदाच्या निष्काळजीपणानें हें झालें त्यानें दिलगिरी व्यक्त केली व हें प्रकरण मिटलें. लोकशाही युगांत राजकारण जाहीर वक्तृत्वावर जरी मुख्यतः अवलंबून असलें तरी कांहीं गोष्टी प्रकट न करण्यांत शहाणपण असतें हेंही खरें. राजकारणांत वावरणाऱ्या माणसाला नेहमीं अगदीं 'आंतील बातमी' काढण्याचें व सांगण्याचेंही वेड असतें. लोकशाहीच्या

राजकारणांत प्रसिद्धीला श्वासोच्छ्वासाइतकेंच महत्त्व आहे, पण तो जोरानें होऊं लागला म्हणजे प्रकृति ठीक राहत नाहीं, तीच गोष्ट प्रसिद्धीची आहे. प्रसंगीं कुंभक करून तो दाबून धरून शक्ति उत्पन्न करतां येते. तीच गोष्ट आगाऊ प्रसिद्धी न देतां, योग्य क्षणाला, योग्य प्रसिद्धी देऊन, जास्तींत जास्त परिणाम करतां येतो. बातमीदार यांच्याशीं सख्य ठेवणें राजकारणांत इष्ट व हितावह असतें; तथापि तेथेंही सावधानता ठेविली पाहिजे. निदान राजकारणांत 'नवीन प्रवेश करणारांना,' बातमीदारांपासून सावध रहा असा इषारा देणें गैर नाहीं. हुषार बातमीदार अगर वृत्तपत्रप्रतिनिधि यांचें कौशल्यच गुप्त बातम्या काढण्यांत असतें. जाहीर चर्चा व जाहीर समारंभ यांची वर्णनें, समालोचनें, परीक्षणें करणें हें तर महत्त्वाचें आहेच पण पडद्याआड काय झालें व काय चाललें आहे हें जाणण्यांत अधिक महत्त्व आहे हें खरें. बातमी फुटली नसती तर नेत्यांनीं कदाचित् भाषणास हजर राहाण्याचें ठरविलें असतें व कदाचित् सरकार व कॉंग्रेस यांतील तेढ कमी झाली असती. बातमी फुटली, त्याचा परिणाम भावनेच्या दृष्टीनेंच झाला व पक्ष गैरहजर राहिला. विसंगती टळली, मला तरी त्यावेळीं बरें वाटलें. 'असें झालें असतें तर असें झालें असतें' हें भविष्यवादी विचार मागाहून करण्यांत बुद्धीला बरें वाटतें, पण त्यांत अर्थ नाहीं. निश्चयानें माणसानें जर योग्य असेल तर घडवून आणलें पाहिजे. अयोग्य असेल तर तितक्याच निश्चयानें तें टाळलें पाहिजे. पक्षाच्या सभेंत ज्यांनीं कार्यकारी मंडळाच्या सभेंत हजर रहावें असें प्रतिपादिलें होतें, त्यांनींच हजर राहूं नये असें सभेचें वातावरण पाहून सांगण्यास सुरवात केली याचेंच मला जास्त वाईट वाटलें. निर्णय मान्य करणें निराळें व मत मांडणें निराळें. प्रामाणिकपणाला यांत संपूर्ण वाव आहे. लोकशाही म्हणजे व्यक्तीगत मत व सामाजिक वर्तन यांतील समन्वय होय. येंबायेंबानें तळें होतें मग येंबाचें व्यक्तित्व उरत नाहीं, तसेंच प्रत्येकानें मत मांडून पक्षाचा निर्णय होतो, तो सामुदायिक, तोच पक्षाचा संकलित विचार, व तो झाला म्हणजे मग व्यक्तिगत मत हें अप्रस्तुत होतें. या क्रियेंत लोकशाहीची शक्ति व सामर्थ्य आहे व यांतच तिचा दोषही आहे.

याही वेळेस आम्ही लॉंगवूड रेंज मध्येंच राहिलों होतों व आमच्या टोळीबाज ( The Gangsters ) क्लबाचा कार्यक्रमहि या खेपेस पूर्वीप्रमाणेंच होत असे. दर रविवारीं आम्ही एकत्र जेवूं व त्यावेळेस कोणीतरी बाहेरचा सभासद 'अवमानित पाहुणा' ( Guest of Dishonour ) म्हणून बोलावीत असूं.

आठवड्यांतील पांच दिवसांत केलेले श्रम (!) याप्रमाणें विश्रांति व करमणूक करून परिहार करीत असूं. दररोज सभासद जरी सभागृहांत वेळेवर हजर नसले तरी संध्याकाळीं सात वाजतां नियमानें बहुतेक सभासद माल रोडवरील 'कुटाळ कोपऱ्या' जवळ ( Scnadle Point ) हजर असत. सिमल्यांत मोटारींना सरसहा परवानगी नाहीं. मालरोड व लक्कडबाजार यांजकडून येणारे रस्ते ज्या ठिकाणीं मिळतात तेथें रुंदट जागा बरीच आहे; व त्या शंभर यार्डाच्या रस्त्याच्या दोन्हीं बाजूस मोठीं दुकानें व हॉटेलें आहेत. तेवढ्या जागेंत उत्तम पोषाख करून नर-नारी यावेळेस हिंडत असतात व रात्रींच्या विजेच्या लखलखाटांत हें दृश्य न पाहातां घरीं बसावें असें वाटणारा प्राणी विरळाच असतो. पुस्तकाच्या दुकानीं तींच तींच पुस्तकें रोज बघ, तेच तेच फोनो पाहा, त्याच त्याच वस्तूंचा भाव विचार, याप्रमाणें करणारे अनेक स्त्री-पुरुष असतात. दुकानदारही समंजस; गिऱ्हाईक माल पाहाण्यासाठीं येत नसून, नटून थटून आलेल्या 'ती' गिऱ्हाईकांना पाहाण्यास येतें हें जाणूनही सभ्यतापूर्वक माल दाखवितात, दर सांगतात, घेतलें नाहीं तरी रागावत नाहींत, सर्व कांहीं संकेतानुसार चालतें. 'यस्मिन् देशे यदाचारः' या सनातन धर्माप्रमाणें आम्ही आमचा संध्याकाळचा वेळ तेथेंच बहुशः घालवित असूं. आमचें वैशिष्ट्य म्हणजे द्राक्षें हातांत घेऊन खात खात हिंडणें हें होतें. प्रथमतः आम्हीं कुतूहलाचा विषय होतो पण 'एम. एल्. ए.' ही गोष्ट करतात हें पाहून तींत कांहीं असभ्यता नाहीं असें समजून अनेक जण तसेंच करूं लागले; व या फॅशनच्या जगांत ही एक फॅशन प्रसृत करण्याचा मान आम्हीं पटकाविला!! या संध्याकाळच्या वेळीं जर कोणीं परदेशस्थ इसम या जागीं आला तर हा देश दरिद्री आहे असें त्याला खरें सुद्धां वाटणार नाहीं. पोषाखांत सर्वच प्रागतिक; स्त्रियांनीं तर थोड्या बोलण्यांत जसें शहाणपण तसेंच कमींतकमी आच्छादनांत जास्तींत जास्त सभ्यता असा संकेतच करून टाकलेला दिसे!! रिक्शा ओढणारे कुली व कचेरींतील पट्टेवाले सोडले तर सर्वच पुरुष साहेबी पोषाखांत, भाषा साहेबी चालीची. कांहीं आर्यसमाजी व कांहीं कट्टर मुसलमान सोडले तर सर्वांचीं शिरोभूषणें साहेबी थाटाचीं. मोसमांत सिमला म्हणजे गंधर्व नगरी म्हटलें तर अयथार्थ नाहीं. ईश्वर हा मोठा नष्ट आहे व आनंद फार वेळ निरपेक्ष रितीनें मानवाला उपभोगूं देत नाहीं. याच सिमल्यांत मालच्या खालच्या रस्त्यांत दारिद्र्य त्यानें बसविलें आहे. एका एका खोलींत पांच पांच माणसें तेथें राहातात. या ठिकाणाला मी

'कुलीकोपरा' ( Colley Point ) म्हणे. तेथेंच आर्यसमाजाचें मंदीर आहे. त्यांत अनेक वेळां सभा भरत हरिजन संमेलनें भरत, व त्याठिकाणीं आम्हीं भाग घेत असूं; व 'वरच्या माल वर' ( Upper Mall ) केलेलें पाप खालच्या 'माल वर' ( Lower Mall ) कांहींतरीं काम करून फेडलें असें समाधान मानीत असूं. 'वरच्या मालवर' मानस सरोवर ( Cafe-de-Manas-Sarowar ) यांत हंसाप्रमाणें उत्कृष्ट पदार्थही खात असूं व खालच्या मालवरील उघड्यावर तळलेल्या हॉटेलांतील 'पकोड्यावरही' ताव मारीत असूं. याप्रमाणें समत्व उत्पन्न करून आमची ही योगधारणा चालत असे. बरेंच गाजलेलें हें अधिवेशन ता. १६-१८-३६ ला संपलें व लागलीच आम्हीं पुण्यास परतलों. कॉंग्रेस अधिवेशन व निवडणुका हीं दोन्हीं कार्यें आम्हाला आव्हान देत होतीं.

## : 'काँग्रेस झिंदाबाद' :

पुण्यांत सर्वत्र निवडणूक व काँग्रेसचें अधिवेशन याशिवाय कार्यकर्त्यांना विषयच नव्हता. फैजपूर काँग्रेसला उघड व गुप्त विरोध चालूंच होता. सरकारी विरोध संपला होता. काँग्रेस कार्यकर्त्यांतील विरोध त्यांच्यांतील आत्यंतिक काँग्रेस निष्ठेमुळें काँग्रेस अधिवेशन यशस्वी करण्याच्या प्रयत्नांत परिवर्तित झाला. तथापि जो पक्ष, जे वर्ग, जे महाभाग काँग्रेसनें निवडणुकी लढविण्याचें ठरविल्यामुळें रागावले होते, दुखावले होते, त्यांचा विरोध सुरू झाला. निवडणुका जिंकण्याकरितां, मुद्दाम काँग्रेस महाराष्ट्रांत बोलाविली आहे येथून आक्षेप घेण्यास सुरवात करून, मंडपाला तट्टे कमी पडले येथपर्यंत दोष दाखविणें हाच उपक्रम टीकाकारांनीं सुरू केला. गेल्या चाळीस वर्षांत काँग्रेस अधिवेशन महाराष्ट्रांत झालें नव्हतें, तेव्हां साहजिकच कांहीं मंडळींनीं सर्वत्र सहकार्य मिळेल अशी अपेक्षा केली होती; पण पक्ष संघटित झाल्यानंतर व निवडणुकीसारखें यादवी लावणारें मुसळ उत्पन्न झाल्यानंतर काँग्रेसचें राजकारण सर्वत्र सर्वप्रिय होईल ही आशा करणें व्यर्थ होतें. केवळ आदरबुद्धीनें एका प्रसिद्ध व्यक्तीकडे आमचे एक कार्यकर्ते गेले, त्यांनीं थोडी रक्कम देणगी म्हणून दिली व ती जाहीर होतांच लागलीच आपण काँग्रेसच्या अधिवेशनाची जबाबदारी घेतली नाहीं. लोकांनीं गैरसमज करून घेऊं नये म्हणून वर्तमानपत्रांतून खुलासा केला. वास्तविक जबाबदारी प्रां. काँ. कमिटीची व ती जबाबदारी सर्व काँग्रेस कार्यकर्त्यांच्या साहाय्यानेंच पार पडावयाची होती. विरोध नसावा, व सर्वत्र सहकार्य मिळावें म्हणून सौजन्यानें केलेल्या कृतीचा विपर्यास होत होता. काँग्रेस अधिवेशनासाठीं स्वयंसेविकांचें दल काढण्याचें ठरलें होतें त्यावर 'त्रिकाळ' व 'राष्ट्रमत' यांतून असभ्य टीका होत होती. पुण्यांतील एक तालीमबाजीचा अभिमान मानणारे गृहस्थ सेविकांचे शिबीर निघाल्यास आपण मोडून टाकूं व या 'अनीति' पासून स्त्रियांना वाचवूं अशी उघड धमकी देत होते. पुण्यांत आल्यावर

हें शिबीर उघडण्याचा समारंभ शनवारवाड्यापुढें व्हावयचा होता. मला अध्यक्षस्थान देण्यांत आलें. सभा उधळून लावण्याची धमकी देण्यांत आली होती. मी माझ्या प्रास्तविक भाषणांत ज्यांना समारंभ उधळून लावावयाचा असेल त्यांनीं 'मृत्युपत्र' करून मग हा उद्योग करावा असें सांगितलें. सभेचें वातावरण एकदम बदललें. समारंभ बिनअडथळयानें पार पडला. माझ्या भाषणांत अधिवेशन यशस्वी होईलच पण निवडणुकाही कॉंग्रेस जिंकणार व जे विरोधक पक्ष आहेत त्यांचें 'शिरकाण' होईल हें निश्चित समजा असें सांगितलें. या भाषणावर पुष्कळ टीका झाली. पण कॉंग्रेसच्या अधिवेशनांत अडथळा आणण्याची छाती कोणाचीही झाली नाहीं. आमच्यांतील कांहीं कार्यकर्त्यांना हें माझें भाषण पसंत पडलें नाहीं. हृदय परिवर्तनाची वाट ते अद्यापीही पाहात आहेत !!

आक्टोबर अखेर निवडणूक मंडळाची सभा 'नवाकाळ' कचेरींत भरून महाराष्ट्रांतील जागांचे उमेदवार कायम करण्यांत आले. आम्हीं शिफारस केलेले एक खेरीज करून सर्व उमेदवार वर्किंग कमिटीनें मान्य केले व ते जाहीर करण्यांत आले. महाराष्ट्रांत निवडणूक करणें सोपें नव्हतें. जितके हितसंबंध जुळवून घेतां येतील तितके घेण्याचा प्रयत्न केला होता. तत्त्वाला मुरड घालावी लागली. हवीं असलेलीं कांहीं माणसें उभें राहाण्यास तयार नव्हती. नको असलेलीं माणसेंही कांहीं ठिकाणीं स्थानिक परिस्थिति विचारांत घेतां उभीं करावीं लागलीं. तथापि महाराष्ट्रांतील परिस्थिति सर्व दृष्टींनीं विचारांत घेतां जास्तीत जास्त प्रयत्न करून निर्दोषता आणण्याचा आम्हीं सर्वांनीं प्रयत्न केला होता. नांवें जाहीर झाल्यानंतर निवडणुकीची व्यवस्था सुरूं होऊन सर्वत्र प्रचारकार्य सुरूं झालें. चार महिने एखादी मोहीम चालावी असें हें काम चाललें.

आक्टोबरमध्यें पुन्हां दिल्लीस जावें लागलें. डेहराडून येथील सरकारी कॉलेजांत जे उमेदवार घेतात त्यांच्या मंडळांत ( Interview Board ) असेंब्लींतील एक सभासद असतो. या वर्षीं मला विचारण्यांत आलें होतें. नेत्यांच्या अनुमतीनें तें मी मान्य केलें. उमेदवारांचीं निवडणूक, त्यांना विचारावयाचे प्रश्न, लायकीची कसोटी वगैरे बाबतींत बरेंच लिखाण सरकार परिक्षक मंडळांतील सभासदांना पुरवितें व तें वाचून परत करावयाचें असतें. तें सर्व 'गुप्त' ( Confidential ) असतें. तें सर्व वाचलें व एक नवीन माहिती मिळाली व तिचा उपयोगहि मुलाखती घेतांना केला. जी निवड होते त्या बाबतींत जी टीका होते ती बरीच

अवास्तव आहे हें अनुभवानें कळून आलें; त्याचबरोबर कांहीं प्रांतांतील उमेदवारांना जास्त संधी मिळते व तें कां हेंही कळलें. धोरण ठरविण्याइतकेंच धोरण अंमलांत आणणें महत्त्वाचें आहे. किंबहुना लोकशाही यशस्वी व्हावयाची असेल तर प्रत्यक्ष राज्यकारभार चालविणारा अधिकारी वर्ग अत्यंत कार्यक्षम व अव्वल दर्जाचा प्रामाणिक असला पाहिजे. मंत्रीमंडळें वारंवार बदलतात. म्हणून परंपरा व सुसंगति राखण्याचें कार्य या वर्गाकडे येतें. राजकारणांतील धकाधकीमुळें व परिवर्तनानें जर वारंवार कारभारांत फरक पडूं लागला तर समाजाच्या जीवनांत निश्चितपणा राहाणार नाहीं. सर्वत्र तोल राहावा या दृष्टीनें या वर्गाचें महत्त्व आहे. उत्कृष्ट निवड होणें अत्यंत जरूर असतें. गुणांपेक्षां जन्माकडे पाहून जेथें सामाजिक प्रतिष्ठा ठरविली जाते तेथें अशी निवड कठीण. प्रांतिक, धर्मविषयक, जातिविषयक हक्क जेथें सांगितले जातात व ते स्वीकारिले जातात त्या ठिकाणीं तर आणखी कठीण. परिक्षक मंडळावर काम करीत असतांना मिळालेला अनुभव अनेक दृष्टींनीं महत्त्वाचा होता. निवडणूक मंडळावर काम करीत असतांना आलेला अनुभवहि कमी महत्त्वाचा नव्हता. राजकारणाच्या सोयींसाठीं केलेली निवड सोयीस्कर ठरतेंच असें नाहीं. त्याचप्रमाणें अनेक हितसंबंधांचीं सोय व्हावी म्हणून केलेली निवड कारभाराच्या सोयीची होते असेंही नाहीं. येवढें नमूद करण्यास कांहींच हरकत नाहीं.

निवडणुकीच्या दृष्टीनें आणखी कांहीं घटना घडून आल्या. जी. आय्. पी. रेल्वे कामगारसंघाची वार्षिक सभा ता. ३१-१२-३६ ला मनमाड येथें माझ्या अध्यक्षतेखालीं भरली. रेल्वेकामगारांना दोन प्रतिनिधी मुंबई असेंब्लीला निवडण्याचा अधिकार होता. कामगावर्गांत अनेक पक्षोपपक्ष होते. तथापि सदरहू सभेंत झाबवाला यांच्या उमेदवारीस मान्यता देण्यांत आली, ते पुढें निवडूनही आले व काँग्रेसपक्षाला त्यांचें सहकार्य लाभलें. दुसरी घटना उमरावती येथील राजकीय परिषद होय. तिचें अध्यक्षपद मला देण्यांत आलें होतें. डॉ. शिवाजीराव पटवर्धन यांच्या आग्रहावरून मी तें स्वीकारलें. ब्राम्हण—ब्राह्मणेतर प्रश्नाबावत आम्हीं महाराष्ट्रांत जी गोष्ट केली तसेंच कांहींतरी वऱ्हाडांत व्हावें अशी अनेकांची इच्छा होती. जेधे यांनीं पूर्वीं त्या दृष्टीनें प्रयत्न केला पण जमलें नाहीं. या परिषदेचें महत्त्व त्यादृष्टीनें होतें. परिषद चांगली झाली पण वरील दृष्टीनें कांहीं उपयोग झाला नाहीं. तेथील काँग्रेस पक्षानें प्रतिसहकार पक्षाशीं तडजोड करून जागांची वांटणी केली, व ही गोष्ट श्री. बियाणी यांनीं करून आपली निवडणूक निश्चित करून घेतली. ही तड-

जोड पुढें कशी विघातक झाली व तिचे तेथील राजकारणावर काय परिणाम झाले हें सांगण्याचें कारण नाहीं. जी गोष्ट अणे येथें करूं शकले नाहींत ती त्यांनीं तेथें युक्तीनें करून घेतली. मुख्य प्रश्न सुटला नाहीं. राजकारण संकीर्ण झालें, कॉंग्रेसचें राजकारण तेथें धनवान् वर्गाच्या हातीं गेलें व त्याचे परिणाम जे व्हावयाचे तेंच झाले. राजकारणांत मूलतः एक असलेले वर्ग ऐतिहासिक कारणानें भिन्न झाले असले तरी व्यापक बुद्धी ठेऊन, पूर्वग्रह दूर सारून, प्रसंगीं धोका पत्करून एक केले पाहिजेत, एका संघटनेंत आणले पाहिजेत. बहुजन समाजाचा विरोधक वेदघोषी अगर विद्यावंत पण दरिद्री वर्ग हा नाहीं, तर समाजांतील संपत्तीच्या साधनांचीं मालकी ज्यानें आपल्या हातांत ठेऊन पैशाच्या जोरावर जसा वाटेल तसा व्यवहार करून वरील दोनहीं वर्गांना दारिद्यांत ठेवण्यास कारणीभूत होतो तो वर्ग आहे. आम्हीं येथें हें ओळखून वागलों व तेथेंही हें व्हावें अशी आमची इच्छा होती म्हणून मी व जेधे दोघेही उमरावतीस गेलो. त्याचा उपयोग काय झाला हे वर आलेंच आहे.

निवडणुकीचे तुफानी दौरे सुरु झाले. प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें खोती वीस वर्षांत नष्ट व्हावी म्हणून ठराव केला होता. शेतकरी वर्गासंबंधीं काय कार्यक्रम हवा यांत वरील गोष्टींचा समावेश केला होता. प्रांतिकनें नेमलेल्या कमिटींत मी होतो. कमिटीनें सर्वत्र हिंडून माहिती गोळा करून टिपणें केलीं होतीं. अखेरच्या चर्चेच्या वेळीं, खोती नष्ट करण्याची शिफारस अनिवार्य आहे, आवश्यक आहे म्हणून मी ती सुचविली; कमिटींतील अन्य सभासदांनीं मान्य केली. सर्व रिपोर्ट प्रांतिक कमिटीनें मान्य केला होता. रत्नागिरी येथील एका नामवंत नागरिकानें, मुंबई प्रां. कॉं. कमिटीच्या एका अधिकाऱ्याला 'खोती नष्ट करावी हा कार्यक्रम कॉंग्रेसला मान्य आहे कां?' असें विचारलें; व त्या सद्गृहस्थानें वास्तविक हा प्रश्न महाराष्ट्राचा असतां परस्पर आम्हांस न विचारतां कॉंग्रेस कार्यक्रमांत तो नाहीं असें उत्तर दिलें व हा पत्रव्यवहार छापला गेला. कॉंग्रेसला सहानुभूति असून खोती-प्रश्नामुळें विरोध होत आहे असा रिपोर्ट आमचे कार्यकर्ते रत्नागिरीहून धाडीत होते. विशेषतः महाराष्ट्र प्रांतिकनें नेमलेल्या कमिटीनें योग्य चौकशी न करतां, अपुऱ्या माहितीवर रिपोर्ट लिहिला ही तक्रार फार जोरानें करण्यांत येत होती. चौकशीअंतीं तिच्यांत कांहीं तथ्य होतें असें आढळून आलें. नोव्हेंबर १९३६ च्या सुरवातीस एक आठवडा मी व जेधे रत्नागिरीपैकी चिपळूण, संगमेश्वर, देवरुख,

रत्नागिरी, देवगड, मालवण, वेंगुर्ले हा भाग हिंडलो. ४।५ सभा एकेका दिवशीं होत. खोतीशिवाय दुसरें महत्त्वाचें असें कार्यकर्त्यांना व अन्य लोकांना वाटेना. उमेदवारही माखूष दिसत होते. खोती चांगली आहे तर आमची खात्री करा, हिंदुस्थानभर ती होऊ दे. तीनशें वर्षे ती आहे, पूर्वजांनीं श्रम करून ती संपादिली, तर मग इंग्रजांचें राज्यही दोनशें वर्षे आहे, मग आपण त्याविरुद्ध कसें ? सामाजिक अन्याय, राजकीय अन्याय, यांविरुद्ध उपाययोजना करण्यास मुदतीची हरकत नाहीं. मुदतीचा कायदा राजकारणांत नाहीं. बिनश्रमानें मिळविलेली संपत्ति, पूज्य सनातन धर्माप्रमाणें पाप आहे. राजकीय गुलामगिरीबरोबर आर्थिक व सामाजिक गुलामगिरीही नष्ट व्हावयास पाहिजे या चालीवर माझें वक्तृत्व चालूं होतें. सर्व सभेंतून आम्हीं विरोधकांना बोलण्यास वाव देत होतों. अन्य पक्ष हें करीत नव्हते; किंबहुना त्यांच्या प्रचाराच्या सभा क्वचितच होत. खोतीविरुद्ध बोलत असतांना बहुजन समाजांतील लोक सुखी होत तर वरच्या वर्गातील संतापत. चिपळूण येथील सभेंत एका विरोधी वक्त्यानें ' मी मृत्युपत्र करून आलों आहे व आतां बोलतो ' असा टोमणा मारला. ' व्यवस्थित लिहिलें आहे ना ? नाहींतर पश्चात् अर्थाविषयीं कोर्टदरबार करावा लागेल ' मी परत कोटी केली. वक्त्याचा निम्मा नूर कमी झाला. खुद्द विरोधी उमेदवार श्री. करंदीकरही फारसे बोलूं शकले नाहींत. अनेक सभांतून गडबड व गोंधळ माजविण्याचा प्रयत्न झाला पण कोठेंही तो यशस्वी झाला नाहीं. रत्नागिरीस झालेल्या सभेंत २॥ तास मी बोललो व एकप्रकारें विक्रम केला. एक शब्द किंचित् अश्लीलसा उच्चारिला गेला पण लागलीच त्याबद्दल दिलगिरी व्यक्त केली. अध्यक्ष श्री. शेटे यांनीं सदरहू भाषणाबद्दल फारच अभिनंदन केलें. परंतु परिणामाच्या म्हणजे मतांच्या दृष्टीनें विशेष उपयोग होत होता असें वाटेना व त्याचें कारण उमेदवार गुळमुळीत बोलत, उलट आंबेडकर पक्षाचे उमेदवार खोती नष्ट व्हावी असें प्रतिपादूं लागले व त्यांचा प्रचार परिणामकारक होऊं लागला. त्यांच्या मोठाल्या सभा होऊं लागल्या.वास्तविक खोती नष्ट व्हावी हा कार्यक्रम महाराष्ट्र प्रां. कॉं. कमिटीनें मान्य केला होता. डॉ. आंबेडकरांच्या जाहीरनाम्यांत त्याचा उल्लेखही नव्हता; पण प्रचार करतांना त्याची उपयुक्तता पटल्याबरोबर त्याप्रमाणें प्रचार सुरु झाला. खोती नष्ट करणार म्हणून तो वर्ग व त्याचे सगेसोयरे विरुद्ध, व कुळे यांच्यांत कॉंग्रेसचे उमेदवार गुळमुळीत बोलतात, वास्तविक त्यांना खोती हवीच आहे.

असा प्रचार सुरू झाला व त्यामुळें तेही विरुद्ध जाऊं लागले. खुद्द काँग्रेसमधील अनेक कार्यकर्ते नाराज व नाखूष अशी परिस्थिति रत्नागिरींत आढळून आली. तथापि अप्पासाहेब पटवर्धन यांच्याबरोबर आठ दिवस हिंडून अनेक आक्षेप दूर केले. ज्या भागांत खोतीचा संबंध येत नव्हता तेथें अर्थात् प्रचार अत्यंत यशस्वी झाला.

रत्नागिरीनंतर सातारा, ठाणें, कुलाबा, पुन्हां रत्नागिरीचा उत्तरभाग, पुणें जिल्हा यांत आम्ही हिंडलों व प्रांतिकची वार्षिक सभा झाल्यानंतर पश्चिम खानदेश घेतला. खानदेशमध्यें दहा दिवस हिंडून काँग्रेस अधिवेशनास चला म्हणून सर्वत्र प्रचार केला व फैजपूर येथें अधिवेशनास आलों. अधिवेशनास खानदेशमधील शेतकरीवर्ग कल्पनेबाहेर आला होता. सर्व महाराष्ट्रांतून हजारो प्रेक्षक आले होते. खेडेगांवांतील पहिलें काँग्रेसचें अधिवेशन या दृष्टीनें पहातां, तें यशस्वी झालें म्हणून एकमतानें कौल मिळाला. अपेक्षेबाहेर माणसें आलीं म्हणून दोन दिवसांत अधिवेशन संपविण्यांत आलें. तथपि मुख्य महत्त्व जे ठराव पास झाले त्यांत होतें. होणाऱ्या सार्वत्रिक निवडणुकीच्या दृष्टीनें शेतकऱ्यांच्या बाबतचा एक कार्यक्रम तयार करून तो ठरावाच्या रूपानें मांडण्याचें भाग्य मला लाभलें. सदरहू कार्यक्रमांतील बहुतेक भाग महाराष्ट्र प्रां. कॉं. कमिटीनें नेमिलेल्या कमिटीच्या रिपोर्टाला जुळणारा होता. मध्यंतरीं प्रांतिकच्या वार्षिक सभेंत रत्नागिरींतील कार्यकर्त्यांनीं खोती नष्ट व्हावी हा भाग जर बदलला नाहीं तर निवडणुकींत यश मिळणार नाहीं म्हणून बजाविलें म्हणून तेवढा भाग ठराव करून रद्द केला होता. दुर्दैव म्हणजे प्रांतिकच्या सभेंत खोती नष्ट करावी याच कार्यक्रमावर निवडणुकींत यश येईल अशी माझी विचारसरणी बहुसंख्यांक सभासदांना मान्य असून मी आपला विरोध परत घेतला. काँग्रेसच्या अधिवेशनांत ठराव मांडतांना मुद्दाम खोतीबद्दलचा भाग या ठरावांत नाही हें मी सांगितलें, आशा ही कीं, कांहीं उपयोग व्हावा. निवडणुकीच्या दृष्टीनें फैजपूर येथें पास झालेला शेतकऱ्यांच्या हितसंबंधाचा ठराव फारच उपयुक्त ठरला. अर्थात् रत्नागिरींत फारसा उपयोग झाला नाहीं हें सांगण्याचें कारण नाहीं; काँग्रेसच्या अधिवेशनानंतर प्रांतभर उत्साहाची लाट उसळली. अधिवेशन यशस्वी झाल्यानंतर त्यांत गुंतलेले सर्व कार्यकर्ते निवडणुकीच्या कामीं खपूं लागले.

पुन्हां एकदां देश कोणाच्या मागें आहे हें ठरावयाचें होतें. तीन कोटींवर मतदार देशभर होते. खेड्यापाड्यांतून, वाडी–वस्तींतून, दऱ्याखोऱ्यांतून हे सर्वत्र पसरले होते. शहरांतून प्रचार करणें एका दृष्टीनें सोपें होतें. ग्रामीण भागांत अनेक

अडचणी असतात व त्यांनाही तोंड द्यावें लागतें. काँग्रेसचे कार्यकर्ते दिवसरात्र खपत होते. निवडणूक मंडळाची मध्यवर्ती कचेरी देवगिरीकर यांच्या देखरेखीखालीं अहोरात्र खपत होती. महाराष्ट्रांत जर नुसतें बहुमत नव्हे तर प्रचंड बहुमत काँग्रेसला मिळालें तरच पुढील काँग्रेसकार्य सुकर होणार होतें. महाराष्ट्रांत विरोधक संघटित, पैसा व वर्तमानपत्रें त्यांच्याजवळ विपूल, प्रचाराला सभ्यतेच्या मर्यादा असाव्यात हें मानण्याचें मानसिक दौर्बल्यही त्यांच्यांत नव्हतें, अशा थाटांत ते होते. सरकारी नोकर व खुद्द मोठे मोठे अधिकारी काँग्रेसविरोधी प्रचार युक्तियुक्तीनें करीत होते. प्रांतवार दौरे मोठमोठ्या पुढाऱ्यांचे चालूंच होते. आमच्या प्रांतांत पंडीत नेहरू यांनीं तुफानी दौरा काढून वातावरण कमालीचें उत्साही करून दिलें. मी, देव व जेधे यांना अक्षरशः विश्रांती नव्हती. दुर्दैवानें मोटार अपघातांत देव सांपडले, जखमी झाले, तरीसुद्धां ते स्वस्थ बसले नाहींत. ब्राह्मणेतर असा पक्ष निवडणुकीस उभा नव्हता, तथापि कांहीं व्यक्ती उभ्या होत्या. कांहीं चांगल्या वागल्या पण कांहींनीं जेधे यांच्या विरुद्ध गलिच्छ प्रचार केला. त्या सर्वांना तोंड देण्यांत आलें. लोकशाही स्वराज्य पक्षानें अनेक उमेदवार उभे केले होते, किंबहुना जेवढे उमेदवार काँग्रेस विरोधी होते त्यांच्याशीं या पक्षानें अधिकृत, पुरस्कृत, नमस्कृत कोठल्या तरी दृष्टीनें नातें जोडलें होतें. सपिंड नसला तर बांधव, तोही नसला तर समानोदक, कोठेंतरी नातें लावावें हीच दृष्टी या पक्षाची होती. काँग्रेसला विरोध करण्यासाठीं पूर्वपरंपरा सोडली, जुने द्वेष प्रेमांत रूपांतर करून नवी दोस्ती जोडली. ' हिंदु धर्म महारोग आहे ' म्हणणाऱ्यांचा आशिर्वाद घेऊन 'सनातन धर्म की जय' म्हणण्यास कमी केलें नाहीं. निवडणुकीच्या दृष्टीनें अनेक उमेदवार जरी या पक्षाचे उभे होते तरी पुण्याच्या जागेसाठीं उभे केलेले उमेदवार अण्णासाहेब भोपटकर हे निवडून यावेत म्हणून मुख्य खटपट होती. खुद्द केळकर यांनीं मीच उभा आहे असें समजून लोकांनीं खटपट करावी व मतें द्यावींत असें बोलूनही दाखविलें होतें. होत असलेल्या प्रचारामुळें पुण्याच्या निवडणुकीस विलक्षण महत्त्व आलें. माझें मत, आपण सर्वत्र सारखा प्रयत्न करावा, जास्तींत जास्त जागा मिळवाव्यात. पुण्याची जागाही मिळेल, पण तिला महत्त्व देऊन, साधनसामुग्री व कार्यकर्ते प्रमाणाबाहेर तेथें खर्चू नये. तथापि कांहीं घटना अशा झाल्या कीं, माझें मत मी बदललें. सन १९३७ च्या जानेवारींत कांहीं कार्यकर्त्यांनीं जेधे मॅन्शनमध्यें पाहिलवानांची सभा घेतली. सभेंत झालेलीं भाषणें एखादा दुसरा शब्द सोडल्यास कोठल्याही तऱ्हेनें आक्षेपार्ह

नव्हती. बोललेले वक्ते सर्व कांहीं कॉंग्रेसचे कार्यकर्ते नव्हते. त्यांच्या बोलण्या-बद्दल कॉंग्रेसपक्ष जबाबदार नव्हता. निःपक्षपाति बुद्धीनें व शांत चित्तानें विचार करतां श्री. बागडे यांच्या भाषणांत कांहीं आक्षेपार्ह नव्हतें. एक उत्कृष्ट निवडणुकीचें वक्तृत्व असें तें होतें. श्री. मोरे यांच्या भाषणांतील एक द्व्यर्थी वाक्य सोडलें तर कांहींच तक्रार करण्यासारखें नव्हतें. तथापि व्यंजनेनें तें आक्षेपार्ह व असभ्य मानलें तरी त्यापेक्षां अनेक पटीनें व उघड असभ्य प्रचार 'त्रिकाळा' दी वर्तमानपत्रें कॉंग्रेसच्या उमेदवारांबद्दल करीत होतीं. सदरहू सभेंत झालेलीं भाषणें विकृत स्वरूपांत छापून, पुण्यांतील कॉंग्रेसविरोधी पत्रांनीं आपली सत्यप्रियता शाबीत केली. 'ज्ञानप्रकाशां'त आलेल्या भाषणाच्या हजारों प्रती फुकट वाटण्यांत आल्या. एक आठवडा महाराष्ट्रांत या सभेनें कारण नसतां खळबळ उडविली. सर्वांत जास्त व विषारी टीका माझ्यावर होत होती. मी व जेधे या सभेच्या दुसऱ्या दिवसांपासून पुणें जिल्ह्यांत हिंडत होतो. पांच दिवसांनीं परत पुण्यास आलो तर बहुतेक कार्यकर्ते आमच्यावर नाराज. फैजपूर कॉंग्रेसनें उत्पन्न झालेला परिणाम या सभेनें गेला असें म्हणण्यासही कांहींनीं कमी केलें नाहीं. 'लोकशक्ती'नें दिलगिरीही व्यक्त केली. खुद्द आमचा उमेदवार कष्टी व साशंक झालेला दिसला. पक्षावर जणुं काय वज्राघात झाला आहे असेंच सर्वांना वाटूं लागलें. मुंबईंतील कांहीं स्नेही, पण राजकीय विरोधक, यांनीही विरोधी लिहून प्रकरण अधिक बिकट केलें. आम्हीं पुण्यास परत येईपर्यंत तरी दिलगिऱ्या व खुलासे थांबवावयास पाहिजे होते. 'काकांना सार्वजनिक आयुष्यांतून उठवून लाविलें' म्हणून एका कॉंग्रेसेतरानें सभेंत बढाईही मारली. केशवराव तर एकंदर प्रकार पाहून उद्विग्न झाले. दोन दिवस शांत चित्तानें सर्व टीका वाचल्या, विचार केला. पुण्यांतील उमेदवार श्री. बापूसाहेब गुप्ते यांचे व माझे वैयक्तिक संबंध लक्षांत घेऊन मनाशीं योजना ठरविली.

निवडणुकीस उरलेले पंधरा दिवस पुण्यांत घालवावयाचें हे नक्की ठरविलें. शहरांतील पूर्वभागांत योजनापूर्वक सभा ठरविल्या. पश्चिम भागांत प्रत्येक पेठेंतील महत्त्वाच्या माणसाची जातीनें गांठ घ्यावयाची याप्रमाणे ठरविलें. हरिजनांनीं कॉंग्रेस पक्षास सर्वत्र मतें द्यावीं म्हणून डॉ. आंबेडकर यांना भेटलो. तथापि त्यांना खुद्द कॉंग्रेस पक्षानें विरोधी उमेदवार उभा करून आव्हान दिल्यामुळे ते चिडले व शेवटीं शेवटीं जेवढे धर्मदृष्ट्या, सामाजिक दृष्ट्या व राजकीय दृष्ट्या प्रतिगामी पण कॉंग्रेस विरोधी अशा उमेदवारांना मतें द्यावीं असा फतवाच जणूं त्यांनीं काढला

होता; व हा सर्व गोंधळ निवडणुकीच्या आधीं ५।६ दिवस झाला. हरिजन मतें सुमारें १० होतीं व एकठा मतदान पद्धतीमुळे या मतदारांनीं विशिष्ट उमेदवारांना मतें एकवटून दिल्यामुळे, खानदेश, सातारा, नगर, पुणें वगैरे जिल्ह्यांत काँग्रेसच्या कांहीं उमेदवारांना अपयशही आलें. निवडणुकीपूर्वीं काँग्रेसनें महाराष्ट्रांतील हरिजन जागा लढवूं नयेत व हरिजनांनीं आपलीं मतें प्रागतिक काँग्रेस उमेदवारांनाच द्यावींत या पायावर तडजोड होत होती. तसें झालें असतें तर राजकारणाला निराळें वळण लागलें असतें. माझे तडजोडीचे प्रयत्न योग्य माणसांना विचारूनच चालले होते व ते बंद करावे असें मला नंतर सांगण्यांत आलें. मी बंद केले. महाराष्ट्रांतील पक्षोपपक्ष, मतदार संघाची परिस्थिति व स्वरूप याचें अपुरें ज्ञान असणाऱ्या मुंबईच्या व्यक्ती व त्यांचें राजकारण या गोष्टीला जबाबदार आहेत. निर्णय देणारी व्यक्ती याच लोकांच्या सल्ल्यावर अवलंबून राहिली ही दुर्दैवाची गोष्ट होती. तथापि पुण्यापुरतें तरी जमतें कां पाहावें म्हणून डॉ. आंबेडकरांना मी भेटलो व पुष्कळ प्रयत्न केला. माझें म्हणणें मान्य केलेत तर उत्कृष्ट होईल व तुमचें औदार्य दिसेल, न केलेत तर मी रागावण्याचें कारण नाहीं (If you do this it will be magnificint and generous, if you don't I cannot have any grievance against you ) असेंही लिहिलें. त्यांनीं जाहीरपत्रक काढून भोपटकरांना पाठिंबा दिला. त्यांना हें करणें भाग पडलें कां इष्ट वाटलें हें त्यांनाच माहीत; तथापि पुण्यांतील मतदार संघांत पांच हजारावर मतदार हरिजन होते. गाजलेल्या जेधे मॅन्शनमधील सभेनंतर भोपटकरांच्या कार्यकर्त्यांनीं पत्रकें काढून जातिनिष्ठेनें मतें द्यावींत, असा प्रकार उघड उघड सुरू केला. 'संग्राम' पत्रानें असभ्य, अश्लील व अयोग्य प्रचारांत विक्रम करून आपलें नांव अजरामर केलें. त्वेषानें केलेला जातिनिष्ठ प्रचार पाहून त्याचे दूरवरचे परिणाम लक्षांत घेऊन 'आहेरे' व 'नाहीरे' हे शब्द वर्गकलहाचे निदर्शक अशीं प्रचाराचीं नाणीं म्हणून निवडणुकीचें व्यवहारांत सोडली. दुःखी व दरिद्री, भुकेलेले व दडपलेले यांची एक जात 'नाहीरे', सत्ता व संपत्ति, प्रतिष्ठा व मान्यता, सर्व कांहीं साधनें ज्यांच्याजवळ आहेत, अशी 'आहेरे' ही दुसरी जात, यामध्यें हा लढा आहे. ज्यानें त्यानें आपापल्या जातीचा कैवार घेणाऱ्या पक्षाला मतें द्यावींत असा प्रचार सुरू केला. पूर्वभागांतील सभा तुफान होऊं लागल्या. पश्चिम भागांतून चाललेला प्रचार परिणामकारक होऊं लागला. केळकर घरोघर हिंडत. मी व जेधे हिंडू लागलों. प्रतिष्ठित माणसाप्रमाणें न्हाव्याची

सलूनमध्यें, घोब्यांची त्याच्या दुकानांत, पानपट्टीवाल्यांची त्यांच्या दुकाना-समोर गांठ घेऊन 'आमच्या'ला मतें द्या म्हणून सांगत होतो व जात काय याची जाणीव देत होतो. भोपटकर यांच्याही सभा होत पण कॉंग्रेसच्या सभेचें स्वरूप मोठें व होणारे परिणामही निराळे. पूर्वभागांतील सभा संपल्यावर निवडणुकीपूर्वी चार दिवस शनीच्या पाराजवळ प्रचंड सभा झाली. शेवटचा वक्ता मी होतो. भाषणाच्या शेवटीं ' जातीवंत दरिद्र्यानों, दडपलेल्या जीवांनो, एकटें दुकटें मत देण्यास येऊं नका, मुकाट्यानें येऊं नका. तुम्ही अनंत काल अन्याय सहन केला, तुम्हास न्याय देण्यास कॉंग्रेस प्रतिज्ञाबद्ध आहे. प्रल्हादाला कढईत टाकला तरी तो 'नारायण' म्हणून घोषणा करी डोंगरावरून फेकला तरी 'नारायण' म्हणून घोषणा करी, समुद्रांत टाकला तरी ' नारायण ' म्हणून घोषणा करी. त्याची श्रद्धा अढळ व घोषणाही अढळ. त्याचप्रमाणें दिंडी दिंडीनें या. एवढें बोलतांच 'कॉंग्रेस कॉंग्रेस' असा जयघोष सर्व श्रोतृवर्गानें केला. 'हाच जयघोष करीत या'. सभा संपली. या सभेंतील श्रोते पश्चिम भागांतील होते. अपेक्षेप्रमाणें परिणाम झाला. कार्यकर्ते पश्चिम भागांत सभा घ्या असें म्हणुं लागले. सभाही झाल्या. विरोधी पक्षातर्फे सरकार दरबारीं अर्ज झालें कीं, सभाबंदी व्हावी, निवडणुकीला जमावानें येऊं नये कारण दंगे होतील. दंगे व गडबड करणारे लोक कॉंग्रेसचे नाहींत असें पोलीसांना पूर्ण माहीत होतें. शेवटीं फिरतीवर गेलेला गोरा कलेक्टर आल्याबरोबर त्यानें निवडणुकीच्या दिवशीं जमावानें पोलिंग स्टेशनवर जाण्यास बंदी केली. हरिजनांपैकीं अनेक कार्यकर्ते नाखूष होते व मोठ्या प्रमाणांत हरिजन मतदारवर्ग मतें देण्यास आला नाहीं. अनेकांना मी व जेधे भेटलों, व आम्हीं आमचें म्हणणें त्यांच्यापुढें मांडलें होतें. निवडणुकीच्या १।२ दिवस आधीं सर्व कार्यकर्त्यांत यशाबद्दल पूर्ण विश्वास उत्पन्न झाला. सोन्या म्हसोबाजवळ सभा जर घेतली गेली व गाडगीळ जर बोललें तर ते जिवंत जाणार नाहींत म्हणून धमकीही तेथील कार्यकर्त्यांना देण्यांत आली होती. ही सभाही झाली. दगडफेक झाली. ' दगडानें भोपटकरांच्या मतांची हंडी फुटली ' अशी कोटीही केली. कांहींही दुखापत न होता मी जिवंत राहिलो ! ! मनांत योजल्याप्रमाणें पुण्यांतील निवडणुकीचा आवेग वाढत होता व जें स्वरूप येईल म्हणून अपेक्षिलें होतें तें येत होतें. या घाईत असतांना सोलापूर व सातारा या जिल्ह्यांत ३।४ दिवस हिंडून आलो. केशवराव जेधे यांना नगर जिल्ह्यांत आल्यास 'काटा काढूं' म्हणून धमकी दिली होती म्हणून ते नगर जिल्ह्यांत ३–४

दिवस हिंडून आले. करमाळे, बार्शी, माढे वगैरे भागांतील विरोध दौऱ्यानें खलास झाला. अनेक जिल्ह्यांतून तारावर तारा येत पण पुण्यांतील पानिपत सोडून जाणें कठीण होऊन बसलें होतें.

शेवटीं ता. १७-२-३७रोजीं निवडणुक झाली. विरोधकांना वाटलें, १००-२०० मतांनीं जिंकलें. कार्यकर्त्यांचे रिपोर्ट ऐकले, माझ्या दूतांनींही रिपोर्ट आणले होते व हिशोब करून पांच हजार मतांनीं बापूसाहेब निवडून आले असा माझा अंदाज मी सांगितला. दुसऱ्या दिवशीं स्त्रियांच्या जागांची निवडणुक झाली. सर्व जिल्ह्यांतून रिपोर्ट आले व महाराष्ट्रांत कॉंग्रेसचे उमेदवार यशस्वी होणार हे निश्चित झालें. निवडणुकी होईपर्यंत दिल्लीच्या अधिवेशनांस हजर राहावयाचें नाहीं असा आदेश सर्व सभासदांना पूर्वीच नेत्यांनीं दिला होता. दहाही जिल्ह्यांत हिंडून चार महिनें अहोरात्र आम्ही खपलों होतों. दादरच्या सभेंत सांगितल्याप्रमाणें "इंग्रजानें घटना देऊन पाणिनीनें जसा श्वन्, युवन्, मघवन् यांना एका सूत्रांत घालून चमत्कार केला होता, तसाच चमत्कार 'टाईम्स,' 'तटणीस' व 'तात्या' यांना एका ठिकाणीं आणून कॉंग्रेस विरोधाला जुंपलें होतें." या परिस्थितींत सहन करावे लागलेले आघात, शांत चित्त ठेऊन ऐकाव्या लागलेल्या विकृत टीका या संपल्या म्हणून हायसें वाटलें व आतां दिल्लीस विश्रांति मिळणार म्हणून आनंद वाटला. ता. २०-२-३७ ला आम्हीं दिल्लीस जाण्यास निघालों. स्टेशनवर अनेक इष्टमित्र हजर होते बापूसाहेब गुप्ते म्हणाले, 'निकालाची तार घरच्या कीं, सभागृहाच्या पत्त्यावर पाठवूं.' मी उत्तर दिलें, 'तुम्ही निवडून आलात, तारेची आवश्यकताच नाहीं; तरी बारा आण्याचें पेढे आतांच द्या.' या विश्वासांत व कृतकृत्यतेच्या समाधानांत आम्हीं निघालों. सर्व देशभर हीच परिस्थिति होती. आमच्या सभागृहांतील सामर्थ्य, आम्हाला देशांत असणाऱ्या पाठिंब्यावर होतें. आम्ही देशाच्या सामर्थ्याचें, ध्येयाचें व प्रयत्नांचें प्रतीक होतो; एका यंत्राचे, एका संघटनेचे भाग होतों. निवडणुकीचें महत्त्व या दृष्टीनें होतें व त्याच दृष्टीनें असेंब्लीच्या कामाशीं संबंध होता. सभागृहांतील कार्य व संदेश मतदारसंघांत पोहोंचविणें व मतदार-संघांतील भावना, विचार व अपेक्षा सभागृहापर्यंत पोहोंचविणें हें दुहेरी कार्य आम्हीं करीत होतों. हेंच आमचें कर्तव्यकर्म होतें.

साल मजकूरचें दिल्ली अधिवेशन ता. २५ जानेवारी १९३७ रोजीच सुरु झालें होतें. कॉंग्रेसपक्षाचे सभासद सर्वत्र निवडणुकींत गुंतले होते म्हणून हजर

नव्हते. बहुतेक सर्व सभासद ता. २३।२।३७ पर्यंत येऊन पोहोंचले. ता. २३।२।३७ पर्यंत कोठलेंही महत्त्वाचें काम सरकारनें काढलें नाहीं. विमा बिल फक्त दाखल करून निवडक कमिटीकडे सोंपविण्यांत आलें होतें. आर्य मॅरेज बिल तहकुब करण्यांत आलें होतें. सिमला अधिवेशनांत जर ऋणकोनें आपली इस्टेट अप्रामाणिकपणें तबदील केली असेल तर त्याला सावकारी तुरुंगांत पाठविण्यांत यावें; प्रामाणिक पण कर्ज देण्यास असमर्थ ऋणकोस सावकारी तुरुंगापासून माफी असावी असा फरक दिवाणी काम चालविण्याच्या कायद्यांत (Civil Procedur Code) करावा असें बिल आलें होतें, व तें पासही झालें होतें. त्याचप्रमाणें ज्याचें वेतन अगर पगार दरमहा रु. १०० पेक्षां कमी असेल तर सदरहू वेतन अगर पगार दिवाणी कोर्टानें सावकारी देण्यापायीं जप्त करूं नये अशा अर्थाचें बिल पण सिमला अधिवेशनांत आलें होतें. विद्यमान कायद्याप्रमाणें रु. ४० वर पगार असल्यास अर्धा जप्त करण्यांत येई. यामुळें गरीब ऋणको हे हताश होत. वादविवादाच्या वेळीं ही मर्यादा रु. १०० असावी असें आमच्या पक्षानें स्पष्ट केलें होतें व आमचा पक्ष गैरहजर होता तरी सरकारनें रु. १०० ची मर्यादा असावी अशी दुरुस्ती मान्य केली. त्याचप्रमाणें धनकोला फार तर २४ महिने रु. १०० वरील पगाराचा जेवढा भाग असेल त्याचा निम्मा जप्त करतां येईल, त्यानंतर तें कर्ज फिटलें असें समजलें जाईल, हेंही कलम मान्य करण्यांत आलें. त्याचप्रमाणें एकदां २४ महिने निम्मा पगार जप्त झाला असेल तर पुढील १२ महिने सदरहू ऋणकोचा पगार कोणालाही जप्त करतां येणार नाहीं अशीही योजना सदरहू बिलांत होती तीही मान्य करण्यांत येऊन हें गरिबांच्या दृष्टीनें अत्यंत उपयुक्त असलेलें बिल आम्हीं येण्यापूर्वीच पास झालें होतें. कोर्टाच्या बेअदबी बाबत सन १९२६ मध्यें कायदा होऊन कमाल शिक्षा ६ महिने ठरविण्यांत आली होती. त्यापूर्वी शिक्षेला मर्यादा नव्हती. सदरहू कायद्यांत हायकोर्टें व अन्य वरिष्ठ–कोर्टें यांचा उल्लेख नसल्यानें हायकोर्टाला वाटेल तेवढी शिक्षा देतां येते असा लाहोर हायकोर्टानें निर्णय दिला होता. म्हणून नवीन बिल आणून कोर्टाच्या बेअदबीबद्दल कमाल शिक्षा सहा महिने हें कलम सर्व कोर्टांना लागू करण्यांत यावें अशी सरकारी योजना होती. हेंही बिल पास करण्यांत आलें होतें. त्याचप्रमाणें रेल्वे बजेट मांडण्यांत येऊन त्यावरील सर्वसाधारण चर्चाही आम्हीं येईपर्यंत संपली होती.

ता. २३।२।३७ ला आमच्या पक्षाची सर्वसाधारण सभा झाली. त्यांत,

झालेल्या निवडणुकीच्या संबंधींच सर्वजण चर्चा करीत बसले. सर्व प्रांतांतील हकीगत समजून आली. सभागृहाच्या कामाकडे कोणाही सभासदाचें लक्ष नव्हतें. निवडणुकीचे निकाल २।४ दिवसांत लागावयाचे होते. मुंबई युनिव्हर्सिटीच्या मत-दारसंघाच्या निवडणुकींत कॉंग्रेस पक्षातर्फे श्री. मुनशी निवडून आले हें त्यादिवशीं तेथील वर्तमानपत्रांत आलें त्यादिवशीं एका दक्षिणि संस्थानाचे दिवाण मला म्हणाले, ' हें काय झालें ' मी उत्तर दिलें, ' हें कांहींच नाहीं, उद्यां पुण्यांत सुद्धां हजारो मतांनीं कॉंग्रेस उमेदवार निवडून आल्याचें तुम्हांस कळेल, व त्याचप्रमाणें सर्व महाराष्ट्रभर व देशभर." 'काय, भोपटकर पडणार! अहो ब्राह्मण पडणार! म्हणतां तरी काय?' ते म्हणाले. मी उत्तर दिलें. 'होय, ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर ही आमची दृष्टी नाहीं तुमची दिसते; मला खेद वाटतो, हें अवनतीचें लक्षण आहे.' ते रागावलेले दिसले. त्याच रात्रीं दहा वाजतां श्री. बापूसाहेब गुप्ते निवडून आल्याची तार आली. अनेक तारा आल्या. रात्रभर तारा घेणें व बक्षिसें देणें हेंच चालू होतें. १।२ दिवसांत बिहार, ओरिसा, मध्यप्रांत, मद्रास, संयुक्तप्रांत, महाराष्ट्र–मुंबई यांतून कॉंग्रेसचें बहुमत झाल्याचें जाहीर झालें. बंगाल, सरहद्द प्रांतांतून कॉंग्रेसपक्ष संख्येनें अन्य कोणत्याही पक्षापेक्षां मोठा असल्याचें दिसून आलें. निदान मुंबई प्रांतांत कॉंग्रेसला बहुमत मिळणार नाहीं अशी खात्री मुंबई सरकारची होती. कारण बहुसभासदी मतदार संघ, एकवटून मत देण्याची प्रथा व उपस्थित असलेले पक्षोपपक्ष व त्याहीपेक्षां कांहीं पक्षांबाबत सरकारला वाटत असलेलें महत्त्व, हेंच या खात्रीचें कारण होतें. पुणें म्हणजे महाराष्ट्र व ' केसरी ' पक्ष म्हणजे पुणें. त्यानें कॉंग्रेसला विरोध केला म्हणजे सर्व महाराष्ट्र कॉंग्रेसविरुद्ध आहे असें सरकार समजे. आमच्या निवडणुकीच्या वेळीं थप्पड बसली होती. पण उमेदवार व्यक्तिगत दांडगे होते म्हणून असें झालें असा सरकारी अभिप्राय होता. पण प्रांतिक निवडणुकींत सरकारचे डोळे उघडले, व अशी गप्प आहे कीं, पुण्याचा निकाल ऐकून हिंदुस्थान-मंत्री लंडन येथें सर्दच झाले. खरें कांहींही असो, एवढी गोष्ट निश्चित कीं, सरकारचा अदमास महाराष्ट्राबाबत चुकला. अन्यप्रांतांतही अदमासाबाहेर कॉंग्रेसला बहुमत मिळालेलें पाहून दिल्ली हदरली. सर्वत्र ' कॉंग्रेस झिंदाबाद ' हें वातावरण उत्पन्न झालें.

ता. २३।२।३७ रोजीं सभागृहांत कॉंग्रेस पक्ष हजर राहिला. पक्षाच्या गैर-हजेरींत सभेच्या कामकाजासंबंधीं कांहीं नवीन नियम सरकारनें करून सभेपुढें

विचारार्थ मांडले होते. अर्थात, त्यावेळीं कोणीं फारशी चर्चा केली नाहीं व सरकारनें ते अंमलांत आले म्हणून जाहीर केलें. त्याबाबत तहकुबीची सूचना पहिल्या दिवशीं देण्यांत आली पण अध्यक्षांनीं ती नामंजूर केली. बदललेले नियम अर्थात सभासदांच्या हक्कांवर नियमन करणारे होते. पूर्वी वाटेल तेवढे प्रश्न एका सभासदाला एका दिवशीं विचारतां येत. नवीन नियमानें फक्त पांच प्रश्न विचारण्याचा त्याचा हक्क आहे असें ठरविण्यांत आलें. कॉंग्रेस पक्षांतील सभासदांनीं जेवढे प्रश्न विचारले, जेवढे उपप्रश्न विचारले त्यामुळे अधिकारीवर्ग बेजार झाला होता. ही दररोजची उलट तपासणी त्यांना असह्य झाली म्हणून प्रश्नांची संख्या मर्यादित करण्यांत आली; व खातेवार दिवस ठरविण्यांत येऊन त्या दिवशीं त्या खात्यासंबंधींच प्रश्नोत्तरें व्हावींत असाही नियम करण्यांत आला. प्रश्नांची संख्या याप्रमाणें मर्यादित करून सर्व सभासदांना न्याय मिळेल अशी व्यवस्था करण्याचा सरकारचा उद्देश आहे असें सरकारातर्फे गंभीरपणें सांगण्यांत आलें. सर्व वेळ कॉंग्रेस पक्षाचे सभासद घेतात व इतरांना कांहीं वेळ मिळत नाहीं ही तक्रार थोडी खरी होती, पण ते निमित्त करून सरकारानें सर्वांवरच अन्याय केला. कॉंग्रेस पक्ष नसे तेव्हां साधारणपणें दिल्ली अधिवेशनांत तीनशेंपर्यंत प्रश्न विचारले जात, उपप्रश्न तर एखाद्या दिवशीं एखादा दुसरा. कॉंग्रेस पक्ष आल्यापासून प्रश्नांची संख्या हजारावर गेली व उपप्रश्नांची सरबत्ती म्हणजे एका इंग्रज अधिकाऱ्यानें म्हटल्याप्रमाणे 'संकटांची घटका'च ( Hour of Hell ) दररोज सरकार पक्षाला वाटे. देशांत होणाऱ्या अन्यायाला वाचा फुटे, कुलंगडीं बाहेर येत, सर्व कारभारावर प्रकाश पाडण्याचा प्रयत्न होई. हें अर्थात् सरकारला नको होतें. प्रत्येक कृत्य उघड होईल, त्याची चर्चा होईल ही भीति अधिकाऱ्याला वाटते तर त्यामुळें नागरिक हितसंरक्षण होतें असें प्रतिनिधींना वाटतें. प्रसिद्धी व टीका यांना लोकशाहीचा जीवनरस म्हटलें पाहिजे,त्याशिवाय लोकशाही जगूं शकत नाहीं (Criticism and Publicity are the life blood of Democracy ) विद्यमान हिंदुस्थान सरकारला हें विष वाटत होतें. प्रश्न नामंजूर करुन, त्यांची संख्या कमी करुन तहकुबीच्या सूचना जादा अधिकारांत नामंजूर करून नाना उपायांनीं, सरकार आपल्या कारभारावरील टीका टाळूं पाही व तोंडानें सनदशीरपणा व लोकशाहीबद्दलचा कैवार हा मंत्र म्हणण्यास कमी करीत नसे !! बदललेल्या नियमांवर तहकुबीची सूचना नामंजूर करण्यांत आल्यामुळें वादविवादही टळला, पराभव टळला.नियम मात्र अंमलांत आले.

ता. २३ व २४ फेब्रुवारी या दोन दिवशीं रेल्वेच्या मागण्यावर चर्चा झाली. अनेक कपाती सुचविण्यांत आल्या. अखिल दत्त यांनीं कपात सुचवून सर्व साधारण धोरणावर टीका केली. " रेल्वेचें धोरण, या देशांतील व्यापार व उद्योगधंदे यांचें हितसंरक्षण व्हावें या दृष्टीनें नसतें. कारभार उधळपट्टीचा असतो. सन १९२० पासून तीन कमिट्या खर्च कमी करावा म्हणून नेमण्यांत आल्या, पण कांहीं परिणाम झाला नाहीं. सन १९१३-१४ मध्यें रेल्वे नोकरांना पगार सरासरी माणशीं रु. २२१ होता. १९३३-३४ सालीं ही सरासरी रु.५१५ झाली, जवळ जवळ अडीच पट वाढ झाली. एकंदर उत्पन्नापैकीं ५४ टक्के पगार-वाटणींत जातात अशी त्यांनीं तक्रार केली, रेल्वे चालविण्याचा खर्च ( Operating Ratio ) सन १९१३-१४ मध्ये ५२ टक्के होता, १९२०-२१ सालीं तो ६६ टक्के झाला, १९३०-३१ सालीं ७३ टक्के झाला. याचा परिणाम रेल्वे नुकसानीची बाब झाली. पहिली गोष्ट म्हणजे पगार कमी केले पाहिजेत. योग्य काटकसर करून रु. १६ कोटी दरसाल रेल्वेच्या खर्चांत बचत करणें शक्य आहे," असें त्यांचें म्हणणें त्यांनीं मांडलें. श्रीप्रकाश यांनीं कपातीच्या सूचनेला दुजोरा देतांना वरच्या वर्गाच्या हिताकडे रेल्वे लक्ष देते, तिसऱ्या वर्गाच्या उतारूंकडे बघत नाहीं अशी टीका केली. उत्कृष्ट सोय केलेले पहिल्या व दुसऱ्या वर्गाचे डबे रिकामे असतात व तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत बसण्यास जागा नसते. विषमतेचें उदाहरण म्हणून आपल्या भागांत तिसऱ्या वर्गाच्या स्त्रियांच्या डब्यावर (Female), स्त्रियांच्या इंटरच्या डब्यावर ( Women ) व स्त्रियांच्या दुसऱ्या वर्गाच्या डब्यावर (Lady ) अशा निरनिराळ्या पाट्या असल्याचें सांगितलें !! प्रो. रंगा यांनीं काटकसरीच्या नांवाखालीं १,१६००० खालचा नोकरवर्ग मागील सात वर्षांत कमी केल्याची तक्रार केली. कारभारांतील लांचलुचपतीबद्दल तक्रार करण्यासही त्यांनीं कमी केलें नाहीं.

उत्तर देतांना रेल्वेमंत्री म्हणाले, " एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन वाहतुकीचे दर ठरविण्यांत येतात. वाहतुक वाढावी म्हणून कांहीं ठिकाणीं खास सवलती देण्यांत येतात. कांहीं बंदराबंदरांतून समुद्रमार्गें माल नेणें परवडतें व ती वाहतुक रेल्वेला मिळावी म्हणून खास सवलती रेल्वे देते. कांहीं शहरें, कलकत्ता-मुंबईसारखीं, नुसतीं देशांतून जाणाऱ्या व येणाऱ्या मालाची उठाव करणारींच बंदरें नाहींत, तर तेथें मोठमोठाले कारखाने आहेत. देशांतील कच्चा माल तेथें जातो व

पक्का तयार होऊन देशभर विकला जातो. म्हणून त्या शहरांत जाणाऱ्या व येणाऱ्या वाहतुकीस खास दर ठेविले आहेत. याचा अर्थ परदेशी व्यापाराला उत्तेजन देण्यासाठीं हें केलें आहे असा नव्हे, अन्य देशांत परदेशीं जाणाऱ्या मालाला खास सवलती असतात. पण तोच माल त्याच बंदरांत स्थानिक उपयोगासाठीं जात असेल तर जास्त दर असतात व हें धोरण सर्वत्र मान्यता पावलेलें असतांना सुद्धां, येथें तसें होत नाहीं. फैजपूर काँग्रेसच्या वाहतुक-भागाच्या दोन चिटणीसांनीं (श्री. दास्ताने व श्री. साठे यांनीं) रेल्वे खात्यानें केलेल्या व्यवस्थेबद्दल पत्र धाडून आभार मानिले आहेत ही एकच गोष्ट सरकारच्या निःपक्ष-पाती धोरणाची साक्ष देण्यास पुरेशी आहे. कोठलाही राजकीय भाव मनांत न धरतां हें केलें आहे." 'अहो तुम्हाला या धंद्यांत फायदा झाला,' एक सभासद ओरडले. "निदान फायद्यांकडे लक्ष ठेऊन सरकार कारभार करतें इतकें तर खरें" रेल्वे-मंत्री यांनीं उत्तर दिलें. तिसऱ्या वर्गाच्या सोयीबद्दल आपण शक्य तेवढी दक्षता घेत आहोंत असें आश्वासन दिलें. शेती माल, कोळसा याबाबत सवलतीचे दर देण्यांत आले असल्याचें सांगून त्यामुळे हिंदी कोळसा सिलोनला जाऊं लागला अशी माहिती दिली. "कारभार उधळपट्टीचा आहे ही गोष्ट खरी नाही. घसारा (Depreciation) जर वगळला तर पूर्वी खर्चाचें प्रमाण १९१३-१४ सालीं ५२ टक्के होतें तें १९३०--३१ सालीं ५९ टक्के होतें, १९३४--३५ सालीं ५५ टक्के झालें व १९३६-३७ सालीं ५३·४ टक्के होईल, अशी माहिती दिली. घसारा धरून प्रमाण वाढलें आहे हेंही खरें नाहीं. युद्धापूर्वी हें प्रमाण काढतांना ते घसारा धरीत नसत, त्यामुळें श्री. दत्त यांची दिशाभूल झाली आहे. सन १९२४--२५ ते २९--३० या काळांत घसारा धरून वार्षिक सरासरी ६३·५ टक्के होती. सन १९३२--३३ मध्ये ७१ टक्के प्रमाण होतें. सन १९३६-३७ मध्यें ८७·३ येईल. यावरून थोडा काळ जरी हें प्रमाण वाढलें असलें तरी आतां ही स्थिति राहिली नाहीं. सर्व तऱ्हेनें दक्षता घेण्यांत येत आहे. सोयी वाढविण्यांत येत आहेत. यांत पक्षबाजीला जागा नाहीं" असें बजावून रेल्वेमंत्र्यांनीं भाषण संपविलें. कपात सूचना नापास झाली.

खर्चावर योग्य नियंत्रण असावें म्हणून युरोपियन गटानें एक कपात सुचविली. ती मांडतांना सर लेस्ली हडसन यांनीं माहितीपूर्ण भाषण केलें. "खातेवार खर्च-प्रमाणावर हिशोब, (Cost Accounting) व काळजीपूर्वक अंदाज हे आर्थिक

सुस्थितीचे आधार आहेत. सर्वत्र या बाबतींत सारखेपणा पाहिजे. त्याचप्रमाणें चालू खर्च व भांडवली खर्च यांत योग्य विभागणी पाहिजे. सन १९२४-३४ या दहा वर्षांत भरमसाट भांडवली खर्च केला, त्याचा परिणाम चांगला झाला नाहीं. कर्ज वाढलें, रु. १५० कोटी कर्जाची भर पडली व तेंही कर्ज जास्त व्याजानें घ्यावें लागलें. ज्या कामीं हा खर्च झाला त्या बाबी उत्पन्नाच्या न ठरतां, वार्षिक बोजाच त्यायोगें वाढला. पांच वर्षे वाटेल तसा खर्च करून कर्ज केलें, नंतरच्या पांच वर्षांत अदूरदृष्टीनें काटकसर केली. वाघिणी, इंजिनें हीं कमी केलीं. योग्य दुरुस्ती व नवें-जुनें करणें हेंही पुरें प्रमाणावर केलें नाहीं. रु. २१·६६ कोटींवरून सन १९३३-३४ मध्यें इंजिनावरील खर्च रु. १७·३२ कोटींवर आला. रु. १०·६३ कोटींवरून वाघिणीवरील खर्च रु. ७·९२ कोटींवर आला. याचा परिणाम असा होईल कीं, लवकरच मोठ्या प्रमाणावर या कामीं खर्च करावा लागेल. दिवस बरे असले कीं, वाटेल तसा खर्च कर व वाईट दिवस आलें कीं वाटेल तेथें काटकसर कर हें धोरण गैर आहे. यामुळें व्यापारावर वाईट परिणाम होतो. चांगले दिवस आले कीं, कांहीं पैका शिलकी टाकावा व वाईट दिवस आले कीं, या शिलकींतून खर्च करावा व सामान्यतः खर्चाचें प्रमाण सारखें राहील असें धोरण असावें. त्याचप्रमाणें रेल्वेचे अंदाज नेहमीं चुकतात व शेवटीं गोंधळ होतो म्हणून दर महिन्यास परिस्थिति पाहून खर्च जुळवून घेतला पाहिजे. नाहींतर अंदाजलेला खर्च, अंदाजलेली जमा येत नसतां, चालूंच ठेवावयाचा व सालअखेर बिकट परिस्थिति उत्पन्न करावयाची हें चांगलें नाहीं. नवीन नेमिलेल्या वेजवूड कमिटीनें हें सर्व ध्यानांत घेऊन सूचना कराव्यात," असें सांगून हडसन यांनीं आपलें भाषण संपविलें. बी. दास यांनीं या कपातीला पाठिंबा दिला. जोशी यांनीं रेल्वे हिशोबाच्या बाबतींत दोन कमिट्या आहेत पण त्या नियंत्रण करूं शकत नाहींत असें सांगितलें. स्टँडिंग फिनॅन्स कमिटी फॉर रेल्वेज व पब्लिक अकौन्ट कमिटी या दोन्ही सभागृहानें निवडलेल्या असतात. पण खर्चावर जसें नियंत्रण ठेवावयास पाहिजे तसें त्या ठेवूं शकत नाहींत असा अनुभव आहे. फाजील प्रमाणांत भांडवल वाढविणें हा मोठा दोष रेल्वे-कारभारांत दिसून येतो अशी तक्रार संतानम यांनीं केली. केवळ मूठभर उतारूंकरितां प्लॅटफॉर्म बांधणें, चैनीसाठीं उत्कृष्ट डबे तयार करणें, थोड्या अधिकाऱ्यांच्या सोयीसाठीं गाड्या वाढविणें वगैरे कामें करून खर्च वाढविला जातो. कांहीं ठिकाणीं विजेची रेल्वे करून खर्च वाढविला आहे. कांहीं ठिकाणीं

अन्यत्र स्वस्त बीज मिळत असतां ती न घेतां स्वत: रेल्वेनें उत्पन्न करण्याचा कारखाना काढून खर्च वाढविला आहे. प्रत्येक नवीन काम इंजिनिअर्स पुढें मांडतात व ६–७ टक्के नफा होईल असें सांगतात व शेवटीं अनुभव असा येतो कीं, सर्व प्रकरण नुकसान देणारें निघतें. रु. ६२ कोटी नुकसान रेल्वे-कारभारांत गेल्या कांहीं वर्षांत आलें आहे व तें भरून काढण्यासाठीं कांहीं मार्ग नाहीं म्हणून तें बुडींत म्हणून काढावें अशीही सूचना सरकार करीत आहे. रेल्वेचा कारभार चांगला काटकसरीचा असतां तर हे ६२ कोटी रुपये सर्व साधारण राज्यकारभारासाठीं मिळाले असते. सालोसाल हें देणें वाढत गेलें व आतां हें संपवून टाकावें असें मान्य झालें तर रेल्वेचा कारभार काटकसरीचा होणार नाहीं व सर्वसाधारण राज्यकारभार मात्र रु. ६२ कोटींना मुकेल. तसेंच वरच्या वर्गांचे उतारूं, असलेल्या डब्याच्या मानानें पुष्कळ कमी असतात व खर्च मात्र तितकाच होतो व नुकसान होतें. उलट तिसऱ्या वर्गांचे उतारूं नियोजित संख्येपेक्षां जास्त असतात व त्यामुळें अधिक उत्पन्न, कमी खर्च करून या वर्गाकडून मिळतें या विधानाची चौकशी व्हावी. खरी काटकसर यांत होण्यासारखी आहे. तसेंच वरच्या अधिकाऱ्यांचे पगार कमी केले पाहिजेत. जास्तींजास्त लोकांचीं सोय हें ध्येय त्या दृष्टीनें योग्य योजना व व्यवस्थित हिशोब या तीन गोष्टी अगदीं अवश्य आहेत. " अशी विचारसरणी संतानम यांनीं मांडली. चॅपमन मॉर्टीमर यांनीं सरकारच्या उधळपट्टीच्या कारभारापासून युरोपियन व्यापाऱ्यांचा फायदा झाला नाहीं असें सांगून कपातीस दुजोरा दिला.

सरकारतर्फें सर राघवेंद्रराव यांनीं उत्तर दिलें. राव हे रेल्वेचे मुख्य फडणिशी अधिकारी होते. मोठे सभ्य, फार थोडे बोलणारे व अत्यंत हुशार असा त्यांचा लौकिक होता. त्यांनीं सुरवातीस "काटकसर करणें हें योग्य आहे असें सांगितलें, सन १९३०-३१ व १९३६-३७ या दोन वर्षांतील व्यवहारांची तुलना केली. दोन्हीं सालांत उत्पन्न रु. ९५ कोटी झालें, खर्च मात्र १९३६-३७ सालीं रु. ५॥ कोटींनीं कमी येईल. दोन्हीं सालीं घसारा खर्च सारखाच असून व्याजापायीं सालमजकुरीं रु, २ कोटी कमी खर्च होत आहे व एकंदरीनें सन १९३०-३१ सालापेक्षां १९३६-३७ सालीं सरासरीनें रु. ७ कोटी खर्च कमी होत आहे. शिलकी माल १९२९–३० सालीं रु. १७ कोटींचा होता. सन १९३५-३६ अखेर रु. ९॥ कोटींचा होता. सन १९३० मध्यें वरच्या वर्गाचे ( Gazetted ) अधिकारी २ हजार होते, १९३६ सालीं १८०० झाले. सन

१९३० मध्ये खालच्या दर्जाचे नोकर ७,५८००० होते, १९३६ साली ६,५७००० झाले. सरकारी अंमलाखालीं ३२००० मैल लांबीची रेल्वे आहे. रु. ८०० कोटी भांडवल गुंतविलें आहे. एवढया प्रचंड कारभारांत १८०० अधिकारी म्हणजे जास्त संख्या आहे हें म्हणणें योग्य नाहीं. साल मजकुराच्या व्यवहाराची सन १९२४-२५ च्या परिस्थितीशीं तुलना केली तर ५ कोटींनीं उत्पन्न कमी, रु. ३ कोटींनीं खर्च कमी, रु. ७ कोटी व्याज जास्त म्हणजे रु.१२कोटींनीं परिस्थिति वाईट झालेली दिसते. पण याचें कारण सन१९३०-३१ मध्यें नवे-जुने व दुरुस्ती करण्यांत मोठया प्रमाणावर खर्च करावा लागला. नव्या लाईनी उघडल्या. जुन्या सुधारल्या व तशी मागणी देशभर होती. तथापि १९३६-३७ सालपर्यंत योग्य दक्षता घेऊन व्याजीं भांडवल जें सन १९२९-३० मध्यें होतें तेथपर्यंतच सालमजकुरीं आणण्यांत आलें आहे. फाजील वाढ त्यांत झाली आहे हें खरें नाहीं. "चांगल्या व वाईट दोन्हीं काळांत खर्चाचें प्रमाण सारखें असावें ही नीति मला पसंत नाहीं. उत्पन्नाच्या मानानें खर्च असावा. मात्र चांगल्या काळांत कांहीं रक्कम हातांवेगळी काढून शिल्लक ठेवावी हें मान्य आहे" असेंहि त्यांनीं सांगितलें. "उत्पन्न रु. १०३ कोटी होतें व तें रु. ८३ कोटीपर्यंत आल्या-नंतर जादा काटकसर करणें अवश्य झालें" असें त्यांनीं प्रतिपादिलें. "खर्चप्रमाण हिशोबपद्धति ( Cost accounting ) चांगली पण कांहीं बाबतींत ती करणें कठीण आहे. नोकरवर्गावर खर्चापैकीं निम्मा खर्च होतो, तेथे ही पद्धति शक्य नाहीं. तथापि त्या दृष्टीनें दुसरी एक गोष्ट करतां येण्यासारखी आहे. प्रत्येक नोकर किती काम करतो हें पहावयाचें. व त्या मानानें असलेले सर्व नोकर पाहिजेत कीं काय हें ठरवावयाचें. या कार्यप्रमाण पद्धतीचा ( Job-Analysis ) स्वीकार करणें योग्य होईल. जेथें खर्चप्रमाण—हिशोबपद्धतीनें हिशोब ठेवणें शक्य आहे तेथें सरकार तें करीत आहे व त्यांत जास्तींत जास्त शास्त्रीयता आणण्याचा प्रयत्न चालू आहे. खर्चावरील नियंत्रणाच्या दृष्टीनेंही महिना महिना अंदाजिलेली जमा व अंदाजिलेला खर्च व प्रत्यक्ष जमा व प्रत्यक्ष खर्च हे तपासले जातात व जशी परिस्थिति असेल त्याप्रमाणें खर्च कमी जास्त करण्याबद्दल सूचना देण्यांत येतात. १९३५-३६ सालीं अंदाजी खर्च रु. ५२·५० कोटींचा होता व प्रत्यक्ष खर्च रु. ५०·७५ कोटी झाला. हें याच धोरणामुळें झालें. खर्चावर नियंत्रण हवें असेल व तें परिणामकारक हवें असेल तर तें कमिटयांकडून होणार नाहीं. योग्य नियंत्रण

रेल्वेबोर्ड करीतच असतें. कांहीं विशिष्ट सोयीचे डबे ( Air-conditioned ) केले आहेत. जर त्यांपासून नुकसान होत आहे असें आढळून आलें तर सरकार ते रद्द करील. सोय व फायदा हे दोन हेतू धरूनच कारभार चालला आहे. हें खातें व्यापारी धोरणानेंच चाललें आहे. दक्षता असेल तरच व्यापार फायद्याचा होतो म्हणून झालेली टीका स्वागतार्ह आहे. रेल्वे बोर्डाला कोणी जनावरांचा गोठा म्हटलें, कोणी पांजरपोळ म्हटले, कोणी एकानें याला जुलूम करणारें मंडळ ( Star-Chamber ) म्हटलें, व शेवटीं एकानें ' गाढव ' पण म्हटलें. नेहमीच लाथा दिल्या तर गाढवसुद्धां चांगलें काम करण्याचें नाकारील; म्हणून मधून मधून त्याच्यापुढें गाजरें धरलीं व दिलीं तर चांगलें कामही तें करील." या प्रमाणे आपल्या भाषणाचा विनोदी शेवट केला. पण वस्तुस्थितीवर कांहीं परिणाम झाला नाहीं. कपातीची सूचना पास झाली व नेहमीचे विरोधक हिंदी व युरोपियन सभासद एका लॉबींत तेवढ्यापुरते आले ! !

रेल्वेचा कारभार काटकसरीचा व कार्यक्षमतेचा व्हावा म्हणून तज्ज्ञामार्फत चौकशी करून सूचना मागविण्यांत याव्यात असा सूर मागील सालीं सत्यमूर्तींनीं आपल्या एका भाषणांत काढला होता. त्यावेळीं या देशांतीलच मंडळी सदरहू चौकशी कमिटींत असावी असें त्यांनीं म्हटलें नव्हतें. या गोष्टीचा फायदा घेऊन सरकारनें एक कमिटी मि. वेजवुड यांच्या अध्यक्षतेखालीं नेमली व तींत सर्व गोरे नेमले या गोष्टीचा निषेध करण्याकरितां रेल्वेबोर्डाच्या मागणींत कॉंग्रेस पक्षातर्फे कपात सुचविण्यांत आली होती. एका रुपयानें अगर नाममात्र रकमेनें ती कमी व्हावी अशा स्वरुपाची सूचना देऊन पुढें कोणत्या गोष्टीची चर्चा करावयाची आहे. हें द्यावयाचें असतें. चुकीनें ही मागणी एका रुपयापर्यंत कमी करावी अशी सूचना देण्यांत आली, व तिला इन्कार कपातीचें (Refusal of Supplies) स्वरूप आलें. त्याबरोबर अध्यक्षांनीं विशिष्ट गोष्ट चर्चितां येणार नाहीं; सर्व साधारण धोरण चर्चिलें पाहिजे असा निकाल दिला व तो योग्य होता. ' मागणी एका रुपायानें कमी व्हावी ' या ऐवजी चुकून ' मागणी एक रुपयापर्यंत कमी व्हावी ' असे शब्द पडले आहेत ' असें सांगितलें. ही चूक दुरुस्त करण्याची परवानगी सर्व सभागृहाने दिली तेव्हांच वादविवाद सुरू झाला. दक्षता घेतली नाहीं म्हणजे कशा अडचणी उत्पन्न होतात याचा हा एक अनुभव आमच्या सभासदांना मिळाला. कपातीची सूचना श्री सत्यनारायण सिंह यांनीं मांडली. सर गझनवी

यांनी कामिटी नेमावी म्हणून मागणी केली. पण त्यावर खुष्कीच्या वाहतुकीचा तज्ज्ञ नाहीं व हिंदी तज्ज्ञ नाहीं म्हणून कपातीच्या सूचनेला पाठिंबा दिला. मि. वेजवूड हे दक्षिण आफ्रिकेंतील रहिवाशी आहेत, त्यांना नेमून आमची टिंगल केली आहे व याला कारण फडणिसाचा खवचटपणा होय असें मी. दास यांनीं सांगितलें. सत्यमूर्तीच्या सूचनेचा हा विपर्यास आहे अशी तक्रार केली. गिडने यांनीं सर्व रेल्वेबोर्ड रद्द करावें व सर्व कारभार कंपन्याकडे द्यावा म्हणजे, खर्च कमी होईल, भागीदारांना नफा जास्त मिळेल. झाफरुल्लाखान—जे खरोखर 'Suffer-all-I-can' आहेत—यांच्या जाचांतून आपली जमात मुक्त होईल असें सांगितलें. तथापि कपातीला पाठिंबा जाहीर केला. भुलाभाईनीं ज्या मुद्यावर चौकशी करावी म्हणून ठरविण्यांत आलें होतें त्यांचें विवेचन केलें. " हिंदी लोक लायक आहेत पण त्यांना परकी सत्तेनें दाबून टाकलें आहे. परकी अंमलामुळें बुद्धीचा व कार्य-क्षमतेचा नाश होत आहे. चौकशीचा उद्देश परदेशी भांडवल जें रेल्वेंत गुंतलें आहे त्यावर फायदा कसा मिळेल हाच आहे व त्याच दृष्टीनें चौकशी होईल हें उघड आहे. त्याचप्रमाणें रेल्वे व अन्य खुष्कीची वाहतुक यांत जुळवणुक करून परदेशी मोटारवाल्यांचें कल्याण कसें होईल, त्यांचा माला कसा खपेल, निदान त्यांचें नुकसान होणार नाहीं हेंही साधण्याचा उद्देश आहे. रेल्वेची आर्थिक व्यवस्था फायदेशीर होईल अशा तऱ्हेनें तिची पुनर्घटना करावयाची हा एक चौकशीचा मुद्दा आहे. याचा सरळ अर्थ आतापर्यंतचा कारभार नालायकीचा झाला असा आहे. तथापि या पुनर्घटनेंत सुद्धां इंग्लिश व्यापार कसा वाढेल हें पाहण्याचाच हेतू आहे. हिंदी मनुष्य कमिटीवर नाहीं अशी तक्रार वास्तविक दुय्यम स्वरूपाची आहे. कारभार कोणाच्या हितासाठीं आहे हा मुख्य प्रश्न आहे. हिंदुस्थान सरकारचे सर्व कार्यकारी सभासद जरी हिंदी झाले, पण कारभाराचें धोरण जर हिंद-विरोधी असेल, अगर त्यांना ठेवावें लागत असेल तर त्या हिंदीकरणाचा काय उपयोग ? खरी सत्ता पाहिजे आहे. व्यापारी धोरणानें रेल्वेचा कारभार चालावा हें ठीक. इंग्लंड कधीं जर्मन तज्ज्ञांना बोलावून इंग्लंडमध्यें जर्मन व्यापार कसा वाढेल याबद्दल उठाठेव करीत नाहीं. मग येथेंच कां ? आमचा कारभार आमच्या हितार्थ आम्हींच चालविला पाहिजे. " येणेंप्रमाणें भाषण करून देसाई यांनीं सभागृहाला योग्य कल्पना दिली.

सत्यमूर्ति यांनीं आपला विश्वासघात फडणिसानें केला अशी तक्रार केली.

पब्लिक अकौंटस् कमिटींत तज्ज्ञ नेमावे ही सूचना करण्याची जबाबदारी स्वतःची आहे हें त्यांनीं मान्य केलें. ते पुढे म्हणाले, “ रेल्वेच्या अव्यवस्थित कारभारासंबंधीं फडणिस सदरहू कामिटींत शिवराळ भाषेंत बोलत. कांहींतरी करून यांत सुधारणा झाली पाहिजे असें ते म्हणत. मी बनलो व म्हणालो, ‘ कमिटी नेमा ’ लागलींच त्यांनी सदरहू कमिटीकडून एक अगर अनेक तज्ज्ञांची कमिटी नेमून या प्रश्नाचा विचार करावा, अशी सूचना पास करून घेऊन कमिटीच्या रिपोर्टांत ती दाखल केली. बाजवी खर्च व योग्य हिशोब ठेऊन निदान रु. ३ कोटींनीं रेल्वेचें उत्पन्न वाढेल असें आमचें मत पडलें. म्हणून चौकशी कामिटीनें कोठलीही खर्चाची बाब सर्वसाधारण राज्यकारभाराकडे न टाकतां हल्लींच्याच व्यवस्थेंत काटकसर सुचवून हें घडवून आणावें असेंहि चौकशी कामिटीस सुचविण्यांत यावें असें आम्ही नमूद केलें. फडणिसाशीं बोलतांना मी म्हणालो, ‘कमिटी नेमा व त्यांत एक हिंदी आर्थिक तज्ज्ञ नेमा’. फडणिस म्हणाले ‘ कामिटी वगैरे कांहीं नको एक तज्ञ नेमला म्हणजे ठीक काम होईल. ” फडणिस ग्रिग म्हणाले, “ असें संभाषण झालेंच नाहीं, हें सर्व काल्पनिक आहे. ” सत्यमूर्तींनीं सांगितलें, “ दोहोंपैकीं खरे कोण हें सभागृहानें ठरवावें. ” अध्यक्षांनी खाजगी संभाषणाचा उल्लेख करणें गैरकायदा आहे असें सांगितलें. सत्यमूर्तींनीं तक्रार केली कीं, “ मी कमिटीच्या शिफारसीवर सही केली आहे म्हणून ती कां केली हें सांगितलें पाहिजे. संभाषणांत फडणिस म्हणाले, कणखर तज्ज्ञ, जो कोणाचें आहारीं न जातां काटकसर सुचवील असा नेमणें ठीक होईल. मग कमिटी कां नेमली ? हा विश्वासघात कां केला ? एक कणखर तज्ज्ञ नेमून कां चौकशी करीत नाहीं ? कामिटी नेमण्याची जबाबदारी कोणाची ? रेल्वेमंत्री कीं फडणीस ? एकमेकांच्या तोंडाकडे कां पाहतां, बोला, याला कोण जबाबदार ? तज्ज्ञ गेला कमिटी आली. एकही हिंदी त्यांत नाहीं ! ! व जो तज्ज्ञ म्हणून नेमला तोहि दक्षिण आफ्रिकेंतील गोरा ! ! जर ही घटना रेल्वेमंत्री झाफरुल्ला खान यांच्या इच्छेविरुद्ध झाली असेल तर,त्यांनीं कपातीच्या बाजूनें मत द्यावें. व राजीनामा द्यावा ” अशी मागणी करून सत्यमूर्ति बसले. साहेबाशीं रहस्य केलें म्हणजे कसा गोता खावा लागतो याचें प्रत्यंतर सत्यमूर्तींना चांगलेंच आलें. फडणिसाशीं मैत्री करण्याचा फायदा पुढेंही अशाच तऱ्हेनें त्यांना मिळाला तो यथाक्रम कळेलच सर्व पक्ष सत्यमूर्तींवर नाराज होते, पण त्याचबरोबर फडणिसांवरही नाराज होते. सर कासवजींनीं सांगितलें कीं, ‘ हिंदी इसम

न नेमून एक अपमान केला व दक्षिण अफ्रिकेंतील गोरा नेमून दुसरा अपमान केलात. आम्हीं नेमस्त, सरकारला वारंवार बजावीत होतों. पण सरकारनें जुमानलें नाहीं. दक्षिण आफ्रिकेची वागणूक या देशाशीं कशी आहे हें सरकारला माहीत आहे. आमच्या भावना दुखाविल्या गेल्या आहेत. नेमस्तांचें ऐकलें नाहीं याचा परिणाम चालूं निवडणूकींत सरकारला चांगलाच दिसून आला. अजून तरी आमचें ऐका, असा इशारा देऊन भाषण संपविलें. " कॉंग्रेस झिंदाबाद " म्हणून सर्वत्र आरोळ्या झाल्या. श्री. अणे यांनीं दक्षिण अफ्रिकेतील रेल्वेमार्ग थोडा व कारभार कार्यक्षमतेचा नाहीं असा अनुभव असतां, तेथील गृहस्थ तज्ज्ञ म्हणून नेमला जावा याबद्दल आश्चर्य प्रगट केलें. उत्तर देतांनां रेल्वेमंत्री म्हणाले, ' तज्ज्ञ नेमणें जरुर होतें. इंग्लंडमधील तज्ज्ञ मिळणें शक्य नव्हतें म्हणून आफ्रिकेंतील तज्ज्ञ नेमला. जीव जात असेल तर वाटेल त्या डॉक्टरचें औषध घ्यावें हा धर्म आहे ' अशी कोटी केली. ' तो नेमला नसतां तर हिंदी रेल्वे खलास झाल्या असत्या कां ? ' एकानें प्रश्न केला. त्यास उत्तर न देतां ' लोकप्रतिनिधि सत्यमूर्ति व अन्य सभासद यांनीं तज्ज्ञ मागितला, तो व आणखी एक गृहस्थ यांची कमिटी सरकारनें नेमली, लोकमताला मान दिला. " असा कांगावा करुन रेल्वेमंत्री खालीं बसले.

वास्तविक रेल्वेमंत्री यांच्या भाषणानंतर मतनोंदणी व्हावयास पाहिजे होती. त्यांचें भाषण होण्यापूर्वी चर्चा तहकुबीची सूचना पण आली होती. पण तिच्यावर सभागृहाचें मत अजमावलें नव्हतें. या घटनेचा फायदा घेउन कांहीं सभासद पुन्हां बोलले. परिणाम असा झाला कीं, सरकारला पुढील चर्चेला उत्तर देण्याची संधी मिळाली नाहीं. नियमाप्रमाणें रेल्वेमंत्री दोनदा बोलूं शकले नाहींत. पंतजींनीं रेल्वेमंत्र्यांची हजेरी घेतली. रेल्वेकारभाराची तपासणी करण्याकरितां परकी तज्ज्ञ आणण्याचें कारण नाहीं. शिवाय तपासणीचा हेतू नुसती काटकसर हा राहाणेंच शक्य नाही. अनेक हितसंबंधाचे विचार त्यांत येणार व त्यांची माहिती नसणाऱ्या इसमाकडून योग्य तपासणी होणें शक्य नाही. रेल्वे व अन्य वाहतुक यांच्यांतील सहकार्य वाढविणें व स्पर्धा दूर करणें हें सर्व देशांत चालूं आहे, पण तेथे कोणी परदेशी तज्ज्ञ बोलावून हा प्रश्न सोडवीत नाहींत. रेल्वेवरील उत्पन्न १९३३ च्या पूर्वीच्या २० वर्षांत ११० टक्के वाढलें तर खर्च त्याच अवधींत २३० टक्के वाढला. हा वाढता खर्च कमी करावयाचा, वाहतुकीचे दर वाढविले तर व्यापार मंदावतो, परकी नोकर आणले तर खर्च वाढतो. तावडतोब [illegible] नोकरवर्ग हिंदी

झाला पाहिजे. भांडवली खर्च वाढला, व्याज वाढलें, हे सर्व प्रश्न राजकारणापासून अलिप्त नाहींत.परकी तज्ज्ञ चौकशी करून कांहीं सूचना करील व सरकार त्या योग्य म्हणून म्हणेल, तें कसें मान्य व्हावें? 'भावना आणूं नका' म्हणून सरकार म्हणतें. हिंदी मनुष्य न नेमण्यांत राजकीय हेतू सरकारचा नव्हता तर काय होतें! प्राप्ती कराच्या चौकशीसाठी परकी तज्ज्ञ, रेल्वेसाठीं परकी तज्ज्ञ आणला. काय या देशांतील सर्व बुद्धीमान माणसें खलास झालीं? काय झालें तरी काय?" पंतजी गरजले कपातीचें भविष्य नक्की झालें. डॉ. डिसोझा यांनी विरोध केला पण तेही फार बोलूं शकले नाहींत व कपात बिनविरोध मंजूर झाली.

कंपन्यांच्या हातून कारभार काढून सरकारनें सगळ्या रेल्वेंचा कारभार आपल्या हातीं घ्यावा ही लोकांची मागणी नेहमींची होती. तिची चर्चा व्हावी म्हणून कॉंग्रेस पक्षातर्फे आणखी एक कपात सुचविण्यांत आली. १९३६ सालीं जवळ जवळ एकमतानें सभागृहानें ठराव करून कंपन्यांचा कारभार जेथें जेथें असेल तेथें तेथें तो काढून घ्यावा असें सरकारास सुचविलें होतें. सरकारनें या प्रश्नाचा विचार चालूं आहे असें सिमल्याच्या अधिवेशनप्रसंगीं सांगितलें होतें व अधिवेशन संपतांच लोकमतास न जुमानितां बी. एन्. डब्ल्यू. रेल्वे व एस्. एम्. रेल्वे याबाबत नोटीसा न देतां त्यांचा कारभार कंपन्यांकडे आणखी ५ वर्षें चालूं ठेवण्याचा निर्णय जाहीर केला. कपातीवर भाषण करतांना मोहनलाल सक्सेना यांनीं दाखविलें कीं, कंपनी भागीदारांना बी. एन्. डब्ल्यू. रेल्वेच्या प्राप्तीतून १६ ते १९ टक्के नफा देत आहे. नोकरांच्या मुलांच्या खर्चाकारितां कंपनी नाममात्र खर्च करतें; कारभारांत लांचलुचपत फार आहे, उतारूंच्या सोयींकडे लक्ष देण्यांत येत नाहीं. प्रो.रंगा यांनीं सांगितलें कीं, 'सर्व रेल्वे लाइनी सरकारकडे आल्या म्हणजे देखरेख खर्च वाचेल, कारभारांत सारखेपणा येईल, उतारूंच्या सोयींकडे जास्त लक्ष पुरविण्यांत येईल, हिंदी नोकरवर्ग वाढेल, रेल्वेचा कारभार जास्त फायदेशीर होईल. वास्तविक कंपनीमार्फत कारभार हिंदुस्थानांत नको आहे, हितावह नाही, ही गोष्ट पूर्वी सर चार्लस इन्स, जे पूर्वी रेल्वेमंत्री होते, त्यांनीं मान्य केली होती व या पद्धतीचें समर्थन करणें शक्य नाहीं असेंही त्यांनीं सांगितलें होतें. ( The existing system of Company management in India, cannot be logically defended ) तथापि सरकारनें ती चालूंच ठेविली होती. गजनवी यांनीं या व्यवस्थेची तरफदारी केली. " व्यवस्था उत्तम राहाते, वहातुकीचे दर कमी

आहेत " "गाड्यांना वेगही कमी, मनुष्य त्यापेक्षा जास्त वेगानें चालते, " गिडने यांनीं माहिती दिली. गझनवी फारच स्तुति करूं लागले, सभासदांनीं त्यांची टिंगल करण्यास सुरुवात केली. " दर कमी आणि डबे? " " अगदी छोटे " एक सभासद ओरडला. 'ते बरे, गर्दी तरी कमी होते.' गझनवींनीं उत्तर दिलें. अर्धा तास विनोद, विरोध यांनीं सभागृहाची करमणूक झाली. बिपिन बिहारी बर्मा यांनीं कंपन्यांच्या आर्थिक परिस्थितीवर प्रकाश पाडला व सरकारनें कारभार हातीं घेण्यांत नुकसान नाहीं असें आंकडेवार दाखवून दिलें. चर्चेला उत्तर देतांना झाफरुल्ला म्हणाले, 'दोन्ही रेल्वे सरकार घेणार आहे पण कांहीं वर्षांनीं. तावडतोब न घेण्यास अनेक कारणें होती. बी. एन. डब्ल्यू. रेल्वे ताब्यांत घेऊन जास्त सोयी केल्या तर गुंतलेल्या रकमेवर नाममात्र व्याज येईल. सरकारी कारभार सुरूं झाला कीं, पुष्कळ सुधारणा कराव्या लागतील; व खर्च वाढेल व उत्पन्न तेंच राहील. उत्पन्न वाढेल हें खरें नाहीं. व्यापारी दृष्टीनें हें फायदेशीर होणार नाहीं. या कंपनीच्या भांडवलापैकी $\frac{1}{3}$ भागिदारांचें भांडवल असून बाकीचें कर्जदस्त ( Debentures ) काढून जमविले आहे व त्यावर ३ ते ५ टक्के व्याज द्यावें लागतें. आहे हीच स्थिति उत्पन्नाची व खर्चाची ठेविली तर ही कंपनी घेणें ठीक होईल. पण सरकारी अंमल सुरूं झाला कीं, खर्च वाढेलच ! ! कराराकडे पाहातां रु. १० कोटी द्यावें लागतील पण याशिवाय अन्य बाबींबद्दल द्यावे लागणारे पैसे लक्षांत घेतां रु. १३·८ कोटी द्यावे लागतील. म्हणजे रु. १३·८ कोटींवर काय व्याज पडेल हें पाहिलें पाहिजे. ही रक्कम सरकारला काय व्याजानें मिळेल हें पाहातां सन १९३७ अखेर कमी व्याजानें सरकारला रक्कम मिळेल अशी खात्री वाटेना म्हणून, कंपनीशीं ५ वर्षे मुदतीचा नवीन करार सरकारनें केला. तो काय आहे हें जाहीर केलें आहे. करार झाल्याबरोबर सरकारनें अनेक सूचना केल्या आहेत. आतां उतारूंच्या गाड्या वेळेवर जातात, वेग वाढविले आहेत, टाईम टेबलांत योग्य सुधारणा केल्या आहेत. " " त्यांना कोणी जुमानीत नाहीं, व प्रत्येक गाडी निदान दोन तास लेट असतें" पंतजी बोलले. ' प्रयत्न चालू आहेत ' रेल्वे मंत्री बोलले. ' दर कमी केले आहेत, कामाचे तास नियमित असावेत असें कंपनीला कळविलें आहे. रेल्वे सरकार घेणारच आहे फक्त ५ वर्षांचा प्रश्न आहे; आणि या मुदतीअखेर जबाबदार सरकार या देशांत असेल तें हें काम करीलच. मद्रास व सदर्न मराठा रेल्वेबाबत परिस्थिति थोडी निराळी आहे. या रेल्वेबरोबर

साऊथ इंडियन रेल्वे पण घेणें इष्ट होईल. तिच्या कराराची मुदत सन १९४५ साली संपतें, म्हणून पहिल्या रेल्वे कंपनीचा करार आठ वर्षांनीं वाढविला असून सन१९४५ अखेर दोन्ही कंपन्यांचा कारभार सरकार आपल्या हातांत घेईल. एक आधीं घेऊन एक मागाहून घेणें अडचणीचें होतें म्हणून असें करण्यांत आलें आहे. आतांच केलें असतें तर साऊथ इंडियन कंपनीच्या भागीदारांस बोनस देऊन त्यांच्या खुषीनें हें शक्य होतें. कारण करारांतील मदत संपली नव्हती. मद्रास व सदर्न मराठा रेल्वे कंपनीशीं नवीन करार केला त्यांत सरकारला रु. १५ ते २० लाख दरसाल अधिक मिळतील अशी व्यवस्था आहे. फेडरल रेल्वे ॲथॉरिटी तोपर्यंत अमलांत येईल, व संयुक्त हिंदुस्थान सरकारच हें काम योग्य प्रकारें करील त्यांचें धोरण काय राहील हें कोण सांगणार!" "तुमचें धोरण सांगा" असा एकाने सवाल केला. "ज्यायोगें फायदा होईल तें करणें विद्यमान स्थितींत सरकारनें कारभार देऊं नये, हेंच योग्य आहे. भावी सरकारला अन्याय होवूं नये म्हणूनही हेंच योग्य आहे" असें सांगून त्यांनीं आपलें भाषण संपाविलें. कपात पास झाली.

हिंदुस्थानांत इंजिनें तयार करावींत म्हणून अनेक वेळां पूर्वी ठराव झाले होते शेवटचा ठराव सन १९३५ मध्यें झाला होता. सरकार थंड होतें म्हणून कॉंग्रेस पक्षानें त्याबाबत कपात सुचवून चर्चेला चालना दिली. "ब्रिटिश अंमल कायम राहावा, सैन्याच्या वाहतुकीच्या दृष्टीनें उपयोगी पडाव्यात म्हणून रेल्वे काढल्या. हा हेतू अनेक ब्रिटिश राजकारणी पुरुषांनीं उघड बोलून दाखविला आहे. डलहौसी याचा उद्देश ब्रिटिश भांडवल व ब्रिटिश योजक येथे यावेत व त्यांनीं फायदा कमवावा हा होता असें त्याचे चरित्रकार हंटरसाहेब यांनीं उघड म्हटलें आहे. कालांतरानें परिस्थिति बदलली, रेल्वेचें प्रयोजन बदललें, तथापि महत्त्वाची सर्व सामुग्री इंग्लंडमधूनच आणली जाई. सन १९१४-१८ च्या महायुद्धांत रेल्वे सामुग्री व इंजिनें हिंदुस्थानांत व्हावींत असें सरकारला वाटूं लागलें. सन १९२१ मध्यें सरकारनें इंजिनाबाबत टेंडरें मागविण्यास सुरवात केली पण हिंदुस्थानांत हें काम करणारी कंपनी नव्हती. टाटा कंपनीला जें संरक्षण व जसें संरक्षण पाहिजे होतें तसें मिळालें नाही. रेल्वेला लागणारी कांहीं सामुग्री जमशेटपूरलाच होऊं लागली पण इंजिनें मात्र झाली नाहींत. सभागृह अनेकवेळां ठराव करीत असे पण सरकारनें कांहींही केलें नाहीं" या सगळा इतिहास काझमी यांनीं कपातसूचना

मंडळांना सांगितला. " नुसते देशी बॉयलर घेतले तर १६ टक्के नुकसान होतें असें सरकारचें म्हणणें होतें. हें नुकसान फार नव्हतें, ते सोसून देशी धंद्यांना उत्तेजन द्यावयास पाहिजे होतें. महायुद्धानंतर इंग्लंडनें जें धोरण स्वीकारिलें त्याला विरोध करण्याची छाती येथील सरकारची नव्हती म्हणूनच येथील धंदे वाढले नाहींत " असा आरोप कासमी यांनी केला. युरोपियन गटाचे एक सभासद विदरिंग्टन यांनी विरोध केला. ते म्हणाले, " इंजिनें करणें सोपें काम नाहीं, यांत फार प्रगति झाली आहे. अनेक तज्ज्ञ लागतील, मोठें भांडवल लागेल, आपली गरज थोडी; त्यामानानें गुंतवावें लागणारें भांडवल फार. समजा जास्त उत्पादन केलें तर परदेशी गिऱ्हाईक पाहावें लागेल व तेथें आपणांस स्पर्धा, करता येणार नाहीं. म्हणून या भानगडींत या देशानें व सरकारनें पडूं नये. " असा पोक्त उपदेश त्यांनीं केला!! गिडने यांनीं पाठिंबा दिला व ते म्हणाले कीं; " विदरिंग्टन यांचे म्हणणें स्वार्थी आहे व खरें नाहीं. त्यांना वाटतें आम्हाला कांहीं समजत नाहीं. माझें उत्तर असें आहे कीं, आम्हाला सर्व कांहीं समजतें. १६ वर्षें सरकार थापा मारीत आहे, वचनें देत आहे व मोडींत आहे. सरकार गुन्हेगार आहे. गेल्या वर्षीं इंजिनें येथे करणें फायदेशीर नाहीं येथपर्यंत सांगण्यांची मजल सरकारनें गांठली आहे. एकदां पेनिनसुलर लोकोमोटिव्ह कंपनी सरकारनें घेतली व शेवटीं तिचें रूपांतर वाफेच्या सांगाडे तयार करणाऱ्या फॅक्टरींत केले ! ! गेलीं ८० वर्षें परदेशांतून इंजिनें मागविलीं जात आहेत. कांहीतरी सरकारनें करावें; कां ब्रिटिश मालच घ्यावयाचा ( Buy British ) असें सरकारचें धोरण आहे ? मला वाटतें सरकारजवळ अजून कांही शहाणपण आहे. " "ही समज चुकीची आहे" कांहीं काँग्रेस पक्षांतील सभासद ओरडले. " कांहीं राष्ट्रीयत्वाचा ओलावा आहे हें सरकारनें दाखवावें " गझनवी यांनी विरोध केला. कृष्णकांत मालवीय यांनीं युरोपियन गटाचें धोरण बदलल्याचें दाखवून दिलें. " मागील सालीं गटाचे पुढारी हडसन यांनीं इंजिनें या देशांत व्हावींत व सुरवातीस इंग्रज कारागीर आणावेत असें सांगितलें होतें. आतांच हा फरक कां झाला हें जाणणें जरूर आहे. इंग्लंडमध्यें शस्त्रनिर्मिति सुरू झाली आहे. इंग्लंडला आतां हें करूं देणें हितावह नाही हें जाणून हा विरोध होत आहे. कोणता धंदा सुरवातीपासून फायदेशीर होतो ? नुकसानींतूनच कापडाचा, लोखंडाचा, पोलादाचा वगैरे धंदे या देशांत उत्पन्न झाले व आज चांगल्या स्थितींत आहेत. देशांत स्वयंपूर्णता पाहिजे. केवळ व्यापारी दृष्टी देशानें ठेवतां कामा नये. "

उत्तर देतांना झाफरुल्ला म्हणाले, " निदान दरसाल २०० इंजिनांची मागणी असेल तर कारखाना फायदेशीर होईल. ६० इंजिनें काढून जरी सुरुवात केली तरी दरसाल ६० इंजिनें रेल्वे घेईल याची खात्री नाहीं. या कारखान्यांत नुकसान टळावें म्हणून, मोटारी वगैरे गोष्टी तयार कराव्यांत असेंही सांगण्यांत येणें शक्य नाहीं. दरसाल छोट्या व मोठ्या लाईनींसाठीं सरासरीनें ३६ इंजिनें लागतात. शिवाय विजेनें कांहीं गाड्या चालतात त्यामुळें जरूरीपेक्षां जास्तच इंजिनें सध्यां सरकारजवळ आहेत. सरकारनें जरी इंजिनें तयार केलीं तरी कंपनीच्या लाईनींवर तीं घ्यावींत असा आग्रह सरकारला करतां येणार नाही निदान त्यांना व्यापारी किंमतीस तीं द्यावीं लागतील. सरकार देशी धंद्यांना उत्तेजन देत नाही हें खरें नाही संरक्षण देवून सरकार उत्तेजन देतें. या धोरणामुळेच वाघिणी ( Waggons ) तयार करण्याचा धंदा येथें फायदेशीर होवूं लागला. ४४७२ वाघिणींची जरूर आहे म्हणून या सर्व आम्ही येथील कारखानदारांकडून घेणार आहोंत. गेल्या वर्षी ७५० घेतल्या. पुढील दोन वर्षांत ४००० घेणार आहोंत. तात्पर्य सुमारें ११००० वाघिणींपैकीं फक्त ८५० परदेशांतून घेतल्या गेल्या. हिंदी धंद्याबद्दल सरकारला काळजी नसती तर तीं हें झालें नसतें. रेल्वेनें पुरस्कार केला नसतां तर हा धंदा चालला नसता. याच धंदेवाल्यांना फायद्याची आशा असती तर त्यांनीं इंजिनें करण्याचा कारखाना काढला असता. खुद्द टॅरीफ बोर्डानें असाच अभिप्राय दिला आहे कीं, पुरेसें गिऱ्हाईक नाहीं म्हणून संरक्षण देण्यांत अर्थ नाहीं. संरक्षक जकाती बसवून संरक्षण दिलें तर ५ वर्षेंपर्यंत देशाला नुकसान सोसावें लागेल व त्या मुदतीनंतर होणारी प्रगति केलेल्या त्यागाच्या मानानें अपुरीच होईल. या अभिप्रायानंतर या प्रश्नाचा निकाल लागला आहे असेंच मानलें पाहिजे. सर्व गोष्टी याच देशांत कराव्यात, व्यापारी दृष्टीनें सरकारनें पाहूं नये हें म्हणणें ठीक. पण सर्व कच्चा माल परदेशांतून आणावाच लागेल. ' इंग्लंड उद्योगप्रधान देश आहे, तेथें तें फायदेशीर होतें. गिडने महाशय आज राष्ट्रीय भूमिकेंत आहेत. ठीक आहे सरकार दूरदृष्टीनेंच विचार करीत आहे. ते आतां म्हातारे झाले आहेत. ज्या कंपनीचा उल्लेख त्यांनीं केला तिला सरकारनें मदत केली पण फायदा झाला नाही. " रेल्वेमंत्र्यांच्या भाषणांत सारखा अडथळा होत होता. सारख्या चकमकी होत होत्या. जणूं काय इंजीन गरम राहावें म्हणून कोळसेच टाकण्यांत येत होते !' पण येवढ्यानें इंजिनानें गती घेतली नाहीं व कपात बहुमतानें पास झाली.

तिसऱ्या वर्गाच्या उतारूंच्या हालाबाबत स्वतंत्र पक्षाचे गियासुद्दीन यांनीं कपात सुचवून चर्चा सुरूं केली. गर्दी, घाण, अपमान, अव्यवस्था वगैरेबाबत अनेक गोष्टी सांगून हाल दूर करण्यास विनंति केली. विशिष्ट सोयींचे ( Air-conditioned ) डबे करून गरिबांचे हाल दूर कसे होतील ? फ्रान्सची राणी मेरी अँन्टानिटीनें लोक उपाशी कां राहातात ? केक्स कां खात नाहींत असें विचारलें असें सांगतात. आमचे मंत्री सदरहू राणीसारखे आहेत. 'अहो त्यांना दाढी आहे,' एक उद्गारला. तिसऱ्या वर्गात हाल होतात तर जास्त सुखसोयींच्या डब्यांतून कां जात नाहीं ? असें ते विचारतात. त्यांनीं तिसऱ्या वर्गातून प्रवास करावा म्हणजे हाल कळतील.' गियासुद्दीनच्या भाषणानंतर जोशी यांचें भाषण महत्त्वाचें झालें. ते म्हणाले, 'गेलीं पंधरा वर्षें मी याबाबत बोलत आहे पण बोलण्याची जरूरी आजही कायम आहे. तिसऱ्या वर्गाच्या उतारूंकडून रेल्वेला चालूं सालीं रु. २६ कोटी उत्पन्न झालें व पहिल्या व दुसऱ्या वर्गाच्या उतारूंकडून २ कोटी. सन १९३५-३६ मध्यें तिसऱ्या वर्गाचे ४९ कोटी उतारूं होते तर वरच्या दोन वर्गाचे फक्त ४५ लाख. संख्येनें दसपट व उत्पन्नानेंही १३ पट उत्पन्न देणाऱ्या या वर्गाच्या उतारूंचे कसे हाल होतात हें पाहिलें म्हणजे संताप येतो. तिसऱ्या वर्गाच्या उतारूंच्या सोयींसाठी, वरच्या वर्गाच्या सोयींसाठीं जो खर्च येतो, त्याच्या १३ पट तरी व्हावयास पाहिजे. वागणुकींत कांहींतरी माणुसकी पाहिजे. दोन्हीं वर्गाचीं विश्रांति-दालनें पहा, भोजनशाला पहा, सर्वत्र विषमता व अन्याय आहे. वरच्या वर्गाचीं तिकिटें वाटेल तेव्हां मिळतात, तर तिसऱ्या वर्गाच्या उतारूंचे हाल कल्पनातींत याबाबतींत होतात. संख्येच्या मानानें तिकीट देण्याच्या खिडक्या करावयास पाहिजेत. गाडींत गर्दी तर विचारूंच नका. प्रवास करणारे उतारूं व डब्यांची संख्या व जागेचें प्रमाण पाहातां किती अन्याय आहे तो पहा. १२ उतारूंमागे १ जागा हें प्रमाण पहिल्या वर्गाचें पडतें, ९० उतारूंमागें १ जागा हें प्रमाण दुसऱ्या वर्गाचें पडतें व ४०० उतारूंमागें १ जागा हें प्रमाण तिसऱ्या वर्गाचें पडतें !! दृश्य असें दिसतें कीं, पहिल्या वर्गाचे डबे रिकामे, दुसऱ्या वर्गाचे बेतानें भरलेले व तिसऱ्या वर्गाचे डबे उतारूंनीं कोंबलेले !! वरच्या वर्गाचे उतारूं लांब पल्ल्याचे प्रवासी असतात हें खरें. पहिल्या वर्गाचा उतारू १८० मैल, दुसऱ्या वर्गाला उतारू ६० मैल, व तिसऱ्या वर्गाचा उतारू ३५ मैल सरासरीनें प्रवास करतो. लांबच्या प्रवासाला जागा जास्त पाहिजे हें मान्य

करूनसुद्धां असें दिसतें कीं, पहिल्याच्या सहा पट गर्दी तिसऱ्यांत असते व दुसऱ्याच्या दुप्पट गर्दी तिसऱ्यांत असते. १२ माणसांना १ संडास हें प्रमाण वरच्या वर्गांत तर ३०-४० माणसाला १ हें तिसऱ्या वर्गांत!! प्रवासांत वरच्या वर्गाची चौकशी करण्यासाठीं रेल्वेचे अधिकारी दक्ष पण तिसऱ्या वर्गाची कोणी चौकशीही करीत नाहीं. कित्येक तीव्रगतीच्या गाड्यांना तिसऱ्या वर्गाचे डबेही नसतात!" "तिसऱ्या वर्गाच्या गाडया १३ पट जलद चालाव्यात असें कां मागत नाहीं?" रेल्वेमंत्री बडबडले. 'माझे आंकडे चूक असले तर रेल्वेमंत्री यांनीं दाखवून द्यावेत. मुसलमान अल्पसंख्यांक म्हणून त्यांचें संरक्षण करण्यास रेल्वेमंत्री व सरकार कसें दक्ष असतें? येथें बहुसंख्यांक व जास्त उत्पन्न देणाऱ्या वर्गावर अन्याय होतो याची जाणीव सरकारनें ठेवावयास हवी." जोशी याच्यानंतर अनंत शयनम् अयंगार यांनीं आठ दिवस तिसऱ्या वर्गाच्या उतारूंनीं प्रवास करूं नये व संप करावा म्हणजे सरकारचे डोळे उघडतील असा उपाय सुचविला. अझरअली यांनीं रेल्वेवर खाण्याचे पदार्थ महाग मिळतात म्हणून तक्रार केली. बडेभाई शौकतअली म्हणाले, "सर्वजण बिचाऱ्या रेल्वेमंत्र्यावर तुटून पडले आहेत. दिवसा विश्रांति नाहीं, रात्रीं झोंप नाहीं, अशा तिसऱ्या वर्गाच्या उतारूसारखा अगर प्रामाणिक बिनातिकिटाच्या प्रवाशासारखा त्यांचा चेहरा झाला आहे!! कांहींतरी त्यांना उत्तेजन दिलें पाहिजे. मी अनेक देशांत प्रवास केला आहे. पण येथील रेल्वेप्रवास जास्त सुखसोयींचा आहे. पॅरीस ते नॉईस प्रवास करीत असतां माझ्या दोन्ही बाजूस दोन तरुण स्त्रिया होत्या. खुशाल माझ्या मांडयांना उशा समजून निजल्या. मला मात्र रात्रभर झोंप नाहीं. ही स्थिति आल्हाददायक खरी पण झोंप मिळाली नाहीं हेंही खरें. (प्रचंड हास्य) रात्रींच्यासाठीं म्हणून निराळे डबे पाहिजेत. तशी व्यवस्था युरोपमध्यें असते. उन्हाळ्यांत तिसऱ्या वर्गांत पंखे पाहिजेत. संडास मोठे पाहिजेत. माझी तर गैरसोयच होते. सरळ शिरतांच येत नाहीं. माझा आकार जरा निराळा आहे हें खरें, पण माझें प्रमाण धरून सुधारणा केली पाहिजे!! रात्रीं तिकिटें तपासणें हें सभ्यतेस सोडून आहे. योग्य सोयीं केल्या पाहिजेत, मोठया पगारवाल्या नोकरांचा पगार कमी केला पाहिजे."

गझनवी यांनीं, गाऱ्हाणीं दूर होत आहेत, कांहीं अतिरंजित आहेत, असें सांगितलें. त्यांच्या भाषणाची गती सारखी कुंठीत होत होती. मधें मधें सभासद त्यांना अडवीत तथापि त्यांची गाडी जें सांगावयाचें होतें त्या मुक्कामाला न जातां,

वेळ संपल्यामुळें थांबली. या प्रवासांत विनोदामुळें कंटाळा वाटला नाहीं. उत्तर देतांना रेल्वेमंत्री म्हणाले, " सरकार कांहींच करीत नाहीं हें खरें नाहीं. नुसते आंकडे देऊन भागणार नाहीं. पहिल्या वर्गाचा उतारू ८ पट भाडें देतो म्हणून ८ पट संडास त्याला असावेत हें म्हणणें गैर आहे. तिसऱ्या वर्गाच्या सोयी अवश्य त्या प्रमाणांत अद्याप झाल्या नाहींत हें खरें. पण सारखे प्रयत्न चालू आहेत असें जोशी यांना मी सांगूं इच्छितो. जी. आय्. पी. रेल्वेनें नवे तिसऱ्या वर्गाचे डबे केले आहेत; त्यांत निजण्यासाठीं सोय केलेली आहे. सर्व नोकरवर्गानें सभ्यतेनें, अदबीनें वागून सर्व उतारूंना मदत केली पाहिजे असे हुकूम सोडले आहेत. खास प्रवासासाठीं डबे तयार केले असून त्यांत स्नानगृह, स्वयंपाकगृह यांची पण व्यवस्था करण्यांत आली आहे. गर्दी असेल तेव्हां अधिक डबे जोडणें, जोड गाड्या सोडणें हें चालूं झालें आहे. तिसऱ्या वर्गाच्या जागा आतां राखून ठेवतां येतात. गाडी येण्यापूर्वी तिकीटें द्यावींत असे हुकूम दिले आहेत. गाड्यांचे वेग वाढविले आहेत. दर कमी केले आहेत. " ' मोटारीमुळें हें केलेंत ' एकजण बोलला. ' कमी करूं नये असें म्हणणें आहे कां ! चौकशी अधिकारी महत्त्वाच्या स्टेशनांवर नेमण्यांत आले आहेत. ' सभ्यतेला मोल नाहीं पण ती प्रेम मिळवते, ' ' सभ्यतेनें उतारूं समाधान पावतात ' वगैरे वाक्यें दररोज नोकरांच्या डोळ्यांपुढें राहावींत अशी व्यवस्था आहे. " ' अहो, या किस्यांतील म्हणी; काय त्यांचा उपयोग ? पुरें कीं ही थट्टा "–कांहीं सभासद म्हणाले, " अडाणी उतारूंना तुम्हीं मार्गदर्शक व्हा, हें वचन ४ जानेवारीला दिलें. ' ' आजचा संदेश सांगा '– एक आवाज. " जरा थांबा, सांगतो. तुमचा पगार बहुतेक तिसऱ्या वर्गाकडून येतो म्हणून तुमची मदत मिळण्याचा त्यांचा हक्क आहे. ' "रेल्वेमंत्री संकल्प सांगते झाले. "तुमचा पगार गरीब हिंदी लोकांकडून येतो." सत्यमूर्तींनीं तीर मारला. ' सभासदांचा भत्ताही त्यांच्याकडून येतो ' उलट तीर रेल्वेमंत्री यांनीं मारला. ' आमचें कर्तव्य आम्हीं करतों ' सत्यमूर्ति खालच्या आवाजांत बोलले. " मीही तेंच करतो व असें आश्वासन देतो कीं, शक्य तेवढा अधिक पैसा तिसऱ्या वर्गाच्या सोयींसाठीं खर्च करीन. " एवढें म्हणून रेल्वेमंत्री यांनीं आपलें भाषण संपविलें. आश्वासनाचा परिणाम कांहीं झाला नाही. कपात मंजूर झाली.

रेल्वेचे प्रमुख अधिकारी हिंदी असावेत ही मागणी अगदी जुनी होती. वरच्या जागां ५० टक्के हिंदी लोकांना द्याव्यात असें फार पूर्वी ठरलें होतें.

सन १९२४ मध्यें कमिशननें रेल्वेमधील वरच्या जागांपैकीं, ७५ टक्के हिंदुस्थानांतून भराव्यात व २५ टक्के इंग्लंडमधून भराव्यात. अशी शिफारस केली होती. हिंदीकरण करून खर्च कमी होणार होता हें माहीत असून सुद्धां वरील शिफारशीप्रमाणें सरकार वागत नव्हतें. या बाबतींत गुलाम नारंग यांनीं कपात आणून चर्चा सुरु केली. योग्य व लायक हिंदी लोक असतांना त्यांना सरकार घेत नाही म्हणून त्यांनीं तक्रार केली. नीलकंठदास यांनीं दुजोरा देतांना सांगितलें कीं रु. ५०० वर कोणालाही पगार नसावा. हिंदीकरण म्हणजे हिंदी लोकांना जास्त पगार हा अर्थ नव्हे.. सर्व खात्यांत हिंदी लोक नेमले गेले पाहिजेत. उत्तर देतांना रेल्वेमंत्री म्हणालें, " ज्यांचे पगार रु. ३०च्या खालीं आहेत त्यांच्यासाठीं एकंदर वेतन रकमेपैकीं रु. ८ कोट खर्च होतो. ज्यांचे पगार ३१ ते ५० रुपयांच्या दरम्यान आहेत त्यांच्यावर रु. ६ कोटी खर्च होतो व रु. ५०–१०० पर्यंत ज्यांचा पगार आहे त्यांच्यावर रु. ८ कोटी खर्च होतो, रु. १०१ते रु. ५०० पर्यंत ज्यांचा पगार आहे त्यांवर रु. ७ कोटी; मिळून रु. २९ कोटी वेतनावर खर्च होतात. रु. ५०० च्या खालीं पगार असणारे गोरे अधिकारी थोडे आहेत."
' १८५६ लोकांना रु. ३·२२ कोटी पगार मिळतो व ६,७४,९३६ लोकांना रु. ३३ कोटी पगार मिळतो, हें खरें कां?' असफअलींनीं खोचक प्रश्न विचारला. लक्ष न देतां रेल्वेमंत्री पुढे म्हणाले, " रु. २९ कोटींत बचत शक्य नाहीं. या लोकांचा पगार वाढवावा कीं नाहीं हें सांगूं इच्छीत नाहीं. तो कमी होऊं नये याबद्दल एकमत आहे. आतां वरच्या अधिकाऱ्यांचें वेतन पहा. रु. ५०१ ते १००० पर्यंत पगार असणाऱ्यांना रु. १·२५ कोटी, रु.१००१ ते २००० पर्यंत पगार असणाऱ्यांना रु. १·२५ कोटी, रु. २००० च्या वर पगार असणाऱ्यांना रु. ५० लाख एकंदर रु. ३ कोटी. यांपैकीं ४० टक्के रक्कम हिंदी अधिकाऱ्यांना मिळते, तींत तर कमी करतां येत नाहीं. राहिलेल्या रु. १·८० कोटींत फार तर रु.३० लाख व तेंही हळूं हळूं कमी करतां येतील, नवीन भरतींत सर्व हिंदी घेतले तरीही फारशी बचत होणार नाहीं. ' ' अहो, पगाराचें प्रमाण सर्वत्र कमी करा.' शौकतअली मधेंच म्हणालें. ' हा स्वतंत्र प्रश्न आहे. सरकार काटकसर करीत आहे, वरच्या वर्गाच्या जागा ६ टक्के, मधल्या वर्गाच्या १२ टक्के व हलक्या वर्गाच्या १४ टक्के याप्रमाणें कमी केल्या आहेत. वरच्या वर्गाच्या जागा अधिक कमी करणें शक्य नाहीं. काटकसरीला तेथें वाव नाहीं. कोणीही अधिकारी असो;

गोरा अगर हिंदी; कांहीं जागा आवश्यकच आहेत. प्रत्येक रेल्वेला एजंट पाहिजेत, बिभाग-अधिकारी पाहिजेत, फार तर बिभाग मोठा करुन थोडया जागा कमी करतां येतील. त्यापेक्षां कारकून अधिक प्रमाणांत कमी करतां येतील. हिंदीकरण ठरलेल्या धोरणाप्रमाणें होत आहे. सन १९३५--३६ मध्यें जे वरच्या वर्गाशाठीं नवीन अधिकारी घेतले त्यांत हिंदी लोकांचें प्रमाण ७८ टक्के पडतें." "गेल्या १७ वर्षांत गोरे अधिकारी १७·५ टक्के प्रमाणानें कमी झाले म्हणजे तेवढ्याच प्रमाणांत हिंदीकरण झालें हें खरें कां ?' असफअलींनीं प्रश्न केला. 'ही दृष्टी चुकीची आहे; वस्तुस्थिति अशी आहे कीं, सरकारच्या देखरेखीखाली असलेल्या रेल्वेमध्यें सन १९२४--२५ मध्यें हिंदी अधिकारी २८ टक्के होते व हें प्रमाण सन १९३५--३६ मध्यें ४४·५ टक्के झालें. काटकसर करतांनासुद्धां याच ठरलेल्या प्रमाणांत केली पाहिजे हें विसरून चालणार नाहीं. रु. ५०० खालील सर्वत्र पगार वाढविले तर सरासरीनें एकंदर वेतन रक्कम रु. ४३ कोटी होईल. रु. ५०० वरील पगार सर्वत्र कमी केले तरी आजच्या परिस्थितींत रु. १३ कोटी आणखी भर या वाढीनें पडणार आहे. हा पैसा कोठून आणणार ? हिंदीकरण ठरलेल्या पद्धतीप्रमाणें होत आहे एवढेंच मी सांगू इच्छितो" रेल्वेमंत्री खालीं बसले. सत्यमूर्तींना बोलावयाचें होतें. पण अध्यक्ष परवानगी देत ना. ज्यावेळीं बोलण्यासाठीं कोणींच उभें राहिलें नाहीं, त्यावेळीं रेल्वेमंत्री उत्तर देण्यास उभें राहिलें, याचा अर्थ चर्चा संपली असाच अध्यक्षांनीं घेतला व तो योग्य होता. पुष्कळ मुद्दे रेल्वे-मंत्र्यांच्या भाषणांत उत्पन्न झाले होतें व त्यांना उत्तर देणें जरूर होतें पण हें होऊं शकलें नाहीं. चर्चा जर पद्धतशीरपणें व योजनेनें झाली असती तर हें शक्य होतें' सालमजकुरीं चर्चेकडे कोणाचेंहीं लक्ष्य नव्हतें. सार्वत्रिक निवडणुकी झाल्या होत्या, सर्वत्र व सर्वांचें लक्ष प्रांतांत काय होणार याकडे लागलें होतें.

नारंग यांची कपातसूचना पास झाल्यानंतर जातवार नोकऱ्या योग्य प्रमाणांत मिळत नाहींत म्हणून एक मुसलमान सभासद खा. ब. पिराचिया यांनीं एक कपात सूचना मांडली. त्यांचें म्हणणें, "सन १९२९--३० मध्यें रेल्वेंत मुसलमान नोकर १,८२,३४९ होते ते १९३६--३७ सालीं १,५५,४३९ झाले आहेत. त्या सालीं एकंदर नोकरवर्गाशीं प्रमाण २२·३ टक्के होतें तें आतां २१·८ टक्के झालें आहे. हा मुसलमानांवर अन्याय आहे. लायख मुसलमान मिळत नाहीत हें खरें नाहीं, आधींच मुसलमान कमीच घेण्यांत येतात,

नोकरींत त्यांच्यावर अन्याय होतो. त्याच गुन्ह्याबद्दल मुसलमान नोकर बडतर्फ होतो, हिंदू दंडावर सुटतो. प्रमाणांत बढती मुसलमानांना मिळत नाहीं, हा हक्कच सरकार मान्य करीत नाहीं. फक्त नोकरींत घेतांना प्रमाण, पुढें नाहीं हाही अन्याय आहे. प्रत्येक ग्रेडमध्यें जातवार हिस्सा ठरवा. पगाराच्या बट रकमेंत तर मुसलमानांचा हिस्सा ५ टक्केपेक्षां जास्त नाही." नौमान म्हणाले "सरकार मुसलमानांना वचनांवर झुलवीत आहे. तेरे वादेपर जीये हम् तो ये जान झूट जाना। की खुषीसे मरना जाते अगर ऐतबार होता। (वचनांवर विश्वास ठेवीत नाहीं म्हणून बरें, नाहीं तर विश्वास ठेऊन नुसत्या आशेच्या आनंदानेंच मेलो असतो.)" हा शेर म्हणून पुन्हां सरकारवर विश्वास टाकलाच!! "फक्त ९५ मुस्लिम अधिकारी आहेत, एकंदर अधिकारी १८४९ आहेत. हें प्रमाण ५ टक्के पडतें; तें २५ होण्यास चालू धोरणानें एक हजार वर्षें लागतील. मधल्या दर्जाचे अधिकारी ८०९० आहेत, त्यांत मुसलमान फक्त ४०८ म्हणजे ५·०४ टक्के आहेत. एका वर्षांत हें प्रमाण ·२६ नें वाढलें असें सांगण्यांत येतें. या वेगानें निदान ८० वर्षें तरी २५ टक्के प्रमाण होण्यास लागतील. कोठल्याही महत्त्वाच्या जागीं मुसलमान अधिकारी नाहींत. मुसलमानांचें प्रमाण पूर्ण होईपर्यंत दुसऱ्या जातींचे लोक भरती करूं नये अशी माझी मागणी आहे. बिहारमध्ये रजिस्ट्रेशन खात्यांत मुसलमानांची संख्या प्रमाणापेक्षां जास्त होती, त्यावेळी हिंदु कार्यकारी सभासदानें मुसलमान सदरहू खात्यांत घेणें बंद करून हिंदूंचें प्रमाण वाढविलें. तेंच धोरण सरकारनें स्वीकारावें." "युरोपियनांची भरती चालू ठेवावी कां?' एकानें प्रश्न केला. 'जरूर तर तीही बंद करावी.' असें उत्तर देऊन नौमान खालीं बसले. अनवर-अल-अझिम यांनी मुसलमानांना न्याय दिला नाहीं तर अल्ला तुम्हाला पाहून घेईल असा शापही दिला!! मुसलमानांनी वक्तृत्वानंतर शीख वक्तृत्व सुरू झालें. संतसिंग म्हणाले, "हिंदी खिश्चन, लोकसंख्येच्या १·३ टक्के आहेत; शीख १·६टक्के आहेत व अँग्लो-इंडियन ·७ टक्के आहेत. रेल्वेच्या नोकरवर्गांत शीखांना जवळ जवळ स्थानच नाहीं. खिश्चन व अँग्लो इंडियन यांना लोकसंख्येच्या मानानें जेवढें असावयास पाहिजे त्यापेक्षां अनेकपटीनें आहे. मुसलमानांना योग्य जागा मिळाव्यात, पण त्या हिंदूंच्या काढून न देतां, हे दोन वर्ग आहेत व ज्याना अधिक मिळालें आहे त्यांच्या काढून द्याव्यात हें न्याय्य होईल. शीखांची मागणी पण मान्य झाली पाहिजे." इशाक शेट, जे मद्रासी मुसलमान आहेत, त्यांनीं तक्रार

केली कीं, मुसलमान म्हणून सर्व फायदा पंजाबी मुसलमानच घेतात!! जागा भरण्याच्या जाहिराती दक्षिणेंतील वर्तमानपत्रांत देतसुद्धां नाहींत. भाई परमानंद यांना चर्चेत भाग घेणें अर्थात हिंदू हितार्थ भाग पडलें. ते म्हणाले, "मुसलमानांची सोय व्हावी म्हणून सरकारनें अधिकारी नेमला; त्यानें रिपोर्ट केला; त्याची अंमलबजावणी होत आहे. खुद्द रेल्वेमंत्री मुसलमान, ते अत्यंत दक्ष आहेत. हिंदूंच्या तक्रारी माझ्याकडे येतात; मी त्यांना सांगतो, नाईलाज आहे; सरकारी धोरण एका जातीला सवलती देण्याचें ठरलें आहे. चालू रेल्वेमंत्री आल्यापासून दसरी दाखल झालेल्या केसस त्यांनीं काढून, हिंदूंना दूर करून, बडतर्फ करून, सारख्या गुन्ह्यांना सारखी शिक्षा दिली आहे. एवढा उत्कृष्ट मंत्री असतां त्याविरुद्ध तक्रार करणें योग्य नाहीं. एकंदर पगारांत मुसलमानांना ५ टक्के प्राप्ति आहे अशी तक्रार आहे, तर असें करा. हिंदू तिकिटें, मुसलमान तिकिटें करा. कोण जास्त प्रवास करतो तें पहा, मग पगाराची वाटणी करा. मिळूं लागल्याबरोबर भूक वाढली व आतां सर्वच ताट पाहिजे असा आक्रोश सुरू केला आहे. आम्ही गप्प आहोंत हें खरें? पण आमच्यावर अन्याय होत नाहीं असें नव्हे. संयुक्त प्रांतात १४ टक्के मुसलमान असतां ५० टक्के पोलीस मुसलमान आहेत. मग हिंदूंनीं तेथें लोकसंख्येप्रमाणें मागणी कां करूं नये! पण जातवार नोकऱ्या आम्हाला नकोत. मी जातिनिष्ठ आहे; पण आक्रमक नव्हे. संरक्षक दृष्टीनें, लायकीनें, नोकरी मिळावी; लायकीनें बढती मिळावी हेंच योग्य" वेळ संपल्यामुळें भाईजींचें भाषण थांबलें. डॉ. डिसोझा यांनीं मुसलमानांची ओरड व्यर्थ आहे असें सांगून लोकसंख्येच्या प्रमाणांत पगार वाटणी करणें किती मूर्खपणाचें आहे हें सोदाहरण दाखवून दिलें. डॉ. झियाउद्दीन म्हणालें, ' जर फायद्याचा विचार न करतां इंजिनें येथें व्हावींत असें म्हणतां तर लायकीचा विचार फारसा न करतां जातवार नोकऱ्या लोकसंख्येचें प्रमाणांत मिळाव्यांत हें गणित योग्य आहे!!" उत्तर देतांना रेल्वेमंत्री म्हणाले, ' ग्रेड ग्रेडमध्ये प्रमाणांत नोकऱ्या मिळाव्यात याचा विचार चालू आहे. व त्याप्रमाणें करण्याचें ठरलें तर मुसलमानांना न्याय मिळेल असें अश्वासन मी देतों.' त्याबरोबर कपात सूचना परत घेतली गेली; जणूं कांहीं ठरलेंच होतें!!

रेल्वेचें उत्पन्न मोटार वाहतुकीमुळें कमी होत होतें व त्या दृष्टीनें कांहीं उपाय योजावेत म्हणून सन् १९३३ मध्यें सरकारनें एक परिषद बोलाविली

होती. मिचेल व कर्क यांनीं पण या बाबतींत विस्तृत रिपोर्ट केला होता. जवळ जवळ १५००० मैल लांब रस्ते रेल्वे-लाईनींना समांतर असून मोटारींना योग्य असे होते. त्यावरील मोटार वाहतुकीवर नियंत्रण घातल्याशिवाय रेल्वेचें नुकसान थांबणार नव्हतें. हा सर्व प्रश्न चर्चिला जावा म्हणून स्वतंत्र पक्षातर्फे एक कपात सूचना मांडण्यांत आली. रेल्वे व मोटार या दोन्ही वाहतुकीच्या साधनांत सहकार्य होणें जरूर आहे. ही गोष्ट सहज पटण्यासारखी होती. वाहतुकीचा हा प्रश्न नुसते रेल्वे अधिकारी व मोटारवाले यांच्याच सहकार्यानें सुटणारा नाहीं. तो राष्ट्रीय प्रश्न आहे व त्याचा विचार व्यापक भूमिकेवरूनच व्हावयास पाहिजे. एकंदर रेल्वेचें धोरण, प्रांतिक गरजा, औद्योगिक महत्त्व या सर्व गोष्टींचा विचार करणें जरूर होतें. जलमार्गांच्या वाहतुकीचाही समावेश या प्रश्नांत अवश्य होता पण चर्चा रेल्वे खात्यांतील बाबीसंबंधीं असल्यामुळे तें करणें शक्य नव्हतें. तथापि चर्चेंत सर्व प्रश्नांचा, सर्व दृष्टींनीं ऊहापोह झाला. रस्ते नियंत्रित केले तर प्रांतिक सरकारांचें उत्पन्न बुडणार होतें, न केलें तर मध्यवर्ति सरकारच्या रेल्वेचें उत्पन्न घटत होतें. मोटारींमुळे सोय वाढली. वाहतुक स्वस्त झाली. कमी काळांत प्रवास होऊं लागला, मालाची वाहतुक पण सोयीची झाली. या सर्व गोष्टी नजरेपुढें ठेवून चर्चा झाली. रेल्वे कारभार मागासलेला आहे; तो आधुनिक केला पाहिजे जास्त सोयी केल्या पाहिजेत, त्याशिवाय उत्पन्न वाढणार नाहीं हाही दृष्टीकोन मांडण्यांत आला दोन्ही पद्धतींच्या वाहतुकींत सहकार्य व जुळणी घडवून आणणें सर्वांना हितावह आहे असें जवळ जवळ सर्व पक्षांनी प्रतिपादिलें. सरकारतर्फे रेल्वे-मंत्री व व्यापारमंत्री यांनीं भाषणें केलीं. सरकार मोटार वाहतुकीचें नियंत्रण व नियमन करण्याकरितां लवकरच नवें बिल आणणार आहे असें सांगण्यांत आलें. रेल्वेकारभार शक्य तेवढा सुधारण्याचे प्रयत्न चालूं आहे असें रेल्वेमंत्रीं यांनीं सांगितलें, तथापि युरोपियन गट, मुसलमान ऊर्फ स्वतंत्र पक्ष, स्वतंत्र सभासद, काँग्रेस पक्ष कोणाचेंच समाधान त्यांच्या भाषणानें झालें नाहीं. तथापि मतनोंदणीच्या वेळीं युरोपियन गट सरकारच्या बाजूस गेला पण तेवढयानें सरकारचा पराभव टळला नाहीं. रेल्वे बजेट मांडलें त्यावेळीं काँग्रेस पक्ष हजर नव्हता, सामान्य चर्चेच्या वेळीं पण हजर नव्हता तरी मागण्यांच्या वेळीं हजर असल्यामुळें अवश्य व महत्त्वाच्या सर्व प्रश्नांवर चर्चा झाली व त्यांत आमच्या पक्षांतील सभासदांनीं यथायोग्य भागही घेतला.

सन १९३७-३८ सालचें अंदाजपत्रक ता. २७।२।३७ रोजीं सायंकाळीं ५ वाजतां फडणीस ग्रिगसाहेब यांनीं मांडलें. त्यांनीं सुरवातीस दुःखद गोष्टी आपणास सांगाव्या लागतील म्हणून सांगितलें. सन १९३५-३६ सालचे पक्के हिशोब सांगतांना दुरुस्त अंदाजापेक्षां शिल्लक कमी राहिली असेंही त्यांनीं सांगितलें. रु. २७ लाख प्राप्ती कर अधिक आला, रु. २६ लाख व्याज खातीं वाढले. परंतु ही सर्व वाढ रु. २७ लाख मिठाच्या करांत कमी आले व रु. ६१ लाख जकातींत कमी आले व त्यामुळें सर्व निकाली लागले. व्यापाऱ्यांना कर कमी होईल ही खोटी आशा विरोधी पक्षानें पोरकटपणें मतें दिलीं म्हणून उत्पन्न झाली व त्यामुळें हें घडलें ( Due to light-hearted votes given by the Party Opposite ) असें सांगतांच सभागृहांत एकदम गडबड उडाली. सदादक्ष सत्यमुर्ति यांनीं 'पोरकटपणें मतें दिलीं' ही भाषा असभ्य व अशिष्ट आहे म्हणून फडणिस यांना हे शब्द परत घेण्यास सांगावें अशीं विनंति अध्यक्षांना केली. अध्यक्षांनीं फडणिसास तसें करण्यास सांगितलें. फडणिस म्हणाले, 'मला दुसरी एखादी योग्य शब्दरचना दिसत नाहीं' अध्यक्षांनीं सुचाविलें कीं, "एक वेळां मत देऊन' असें म्हणा. फडणिस म्हणालें, "त्यांतून योग्य अर्थ निघत नाहीं.' सत्यमूर्ति म्हणाले, 'प्रथम त्यांनीं सभागृहावर झाडलेला शिंतोडा पुसला पाहिजे, शब्द परत घेतलेच पाहिजेत.' अध्यक्षांनीं शब्द परत घेण्याविषयीं आज्ञा केली. तथापि फडणिस लवकर ते करीनात, वातावरण गरम झालें. शेवटीं म्हणालें, 'शब्द परत घेतो. याच क्षणांत दुसरा शब्द मला सुचत नाहीं.' पण पुन्हां म्हणालें कीं 'अविचारानें मतें दिलीं ( Unconsidered vote ) ही शब्दरचना योग्य आहे कां ?" "नाहीं, हेही असभ्य आहेत." कित्येक सभासद बोलूं लागले व आपसांत कुजबूज सुरू झाली. अध्यक्षांनीं सांगितलें कीं, "भाषण चालू असतां आपसांत सभासदांनीं संभाषण करूं नये.' फडणिसाचा निषेध करणें जरूर आहे तेव्हां काय करावें याचा निर्णय काँग्रेस पक्षाच्या प्रमुखांनीं १।२ मिनिटांत घेऊन सर्व पक्ष सभात्याग करून बाहेर पडला. फडणिसाचा नूर पालटला पण त्यांचें भाषण चालूंच राहिलें. "सन १९३६-३७च्या दुरुस्त अंदाजांत उत्पन्न रु.१·७८ कोटींनीं घटलें व खर्च रु. २५ लाखांनीं वाढला व एकंदर परिस्थिति बजेटांत अंदाजल्या प्रमाणें रु. ६ लाख शिल्लक न राहातां रु. १·९७ कोटी तूट सालअखेर येईल अशी माहिती दिली.

उत्पन्नाचे अंदाज जास्त धरले ही चूक मान्य केली. संरक्षक खात्यांत अंदाजापेक्षां रु. ६५ लाखांनीं खर्च कमी झाला. व्याजखातीं रु. २५ लाख खर्च कमी झाला. सर्व साधारणपणें विचार करतां रु. १·९७ कोटींचीं तूट आली हें सत्य आहे. तेव्हां प्रांतिक सरकारें, जीं आतां स्वायत्त होणार आहेत, त्यांना काय रकमा द्याव्यात याचा विचार करणें जरूर झालें आहे. जी परिस्थिति नेमीयर निवाड्यांत गृहीत धरून वांटणी सुचविली होती, ती राहिली नाही. सर्व पश्न पुन्हां तपासला पाहिजे" असें सांगितलें. सन १९३७—३८ च्या अंदाजाबद्दल बोलतांनां ते म्हणालें, "कांहीं उत्पन्नाच्या बाबी प्रांतिक होणार व त्यामुळें रु. ३·७६ कोटी उत्पन्न मध्यवर्ति सरकारचें घटणार हे लक्षांत घेऊन रु. ७९·९९ कोटी उत्पन्न अंदाजलें आहे. हे अंदाज करतांना संपत आलेल्या वर्षांतील खातेवार अनुभव लक्षांत घेऊनच हिशोब केला आहे. खर्च रु. ८६·४१ लक्ष अंदाजला आहे. या अंदाजांत अर्थात् रेल्वेचें अंदाज—जमा अगर खर्च—हे समाविष्ट केले नाहींत हें उघड आहे. होणारे घटनात्मक फरक व त्यांचे परिणाम लक्षांत घेऊनच हे अंदाज केले आहेत. संरक्षण खात्यावरील खर्च मागील वर्षाइतकाच धरला आहे. त्यांतून बर्मा वेगळा झाला व त्यामुळें सन १९३७–३८ सालांत रु. १·२४ कोटी खर्च कमी होईल म्हणजे संरक्षक खात्यावर रु. ४३·६१ कोटी खर्च होईल." बर्मा वेगळा निघाल्यामुळें खातेवार फरक कसे होतील हें सांगून उत्पन्न कसें उभारावयाचें ठरविलें आहे, त्याचे माग (Ways and means) नंतर थोडक्यांत सांगितले व उत्पन्नाच्या बाबींचें विवेचन केलें. दीड--दोन कोटी रुपयांची तूट म्हणजे विशेष नाहीं. देशांत व बाहेर शांतता राहिली तर बजेटांतील परिस्थिति भिण्यासारखी राहाणार नाहीं. प्राप्तीकर वसूल करण्यांत बरीच कसूर होते. त्या कामीं अधिक दक्षता घेण्यांत येईल असें सांगून पुढील सालीं साखरेवरील अंतर्गत जकात (Excise) दीड रुपया होती ती हंडरवेट मागें दोन रुपये होईल व त्यापासून रु. १·१५ कोटी उत्पन्न वाढेल असा आपला अंदाज असल्याचें सांगितलें. परदेशी साखरेवर पूर्वी इतकीच जकात राहील, त्यांत फरक होणार नाहीं. त्याचप्रमाणें चांदीवरील जकात औंसामागें एक आणा वाढविला असून त्यापासून रु. ५० लाख अधिक येतील व याप्रमाणें १९३७--३८ सालीं अंदाजिलेली रु. १·५८ कोटींची तूट भरून येऊन रु. ७ लाख अंदाजी शिल्लक राहील असा हिशोब मांडला. बर्मा निराळा होणार म्हणून अडीच कोटी रुपये द्यावे लागत असून प्रांतांना साडेसहा कोटी रुपये

द्यावयाचें ठरविलें आहे. हें सर्व लक्षांत घेतां व हें करूं शकतों याचा अर्थ देशाची परिस्थिति सुधारत आहे, असा निर्वाळा दिला व भाषण संपविलें. साखरेवरील जकात वाढवून सुरवातीस दिसून असलेला कडवटपणा कमी न होतां जास्तच वाढला असेंच सभागृहाचें मत दिसून आलें. अणे यांनीं अध्यक्षांना विचारलें, " फडणिसांनीं आक्षेपाई शब्द परत घेतले ? " अध्यक्षांनीं जाहीर केलें कीं, " त्यांनीं ते बिनशर्त परत घेतले आहेत, दुसरी शब्दयोजना उद्यां ते सांगतील; व ती योग्य असल्यास घालण्यांत येईल. काँग्रेस पक्षाचें आतांच पत्र आलें आहे; त्यांत त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, सभात्याग, अध्यक्षाच्या निर्णयाविरुद्ध नाहीं. " फडणिस म्हणाले, ' सभागृहावर असा आरोप अगर आक्षेप करण्याचा माझा उद्देश नव्हता व तसा अर्थही माझ्या वाक्यांतून निघत नाहींत.' 'उद्देश नसेल, पण सदरहू शब्दानें तसा परिणाम झाला व माझा निर्णय असा आहे कीं, योग्य शब्द तुम्ही सुचविला नाहीं तर सदरहू शब्द गाळण्यांत येतील.' फडणिस नंतर अध्यक्षांच्या कानाशीं लागले व अध्यक्षांनीं सांगितलें कीं, 'पोरकटपणें याऐवजीं 'आशावादीपणानें' ( Optimistically ) हे शब्द फडणिस घालूं इच्छितात व मला हे योग्य दिसतात व त्याप्रमाणें बदल होईल. " त्या दिवशींचें सभेचें काम संपलें.

बजेटावर सर्वसामान्य चर्चा ता. २ व ३ मार्च रोजीं झाली. युरोपियन गटाचे प्रमुख हडसन यांनीं पुन्हां प्राप्तिकरावरील जादा भाव अगर पट्टी (Surcharge) कमी केली नाहीं म्हणून असमाधान व्यक्त केलें. प्राप्तिकर योग्य रीतीनें वसूल होत नाहीं म्हणून तक्रार केली. परिस्थिति ठीक नाहीं. संरक्षक जकातीमुळें व जकातीमुळें व्यापाराची घडी बदलत आहे व एकंदर जकातीच्या प्रश्नाचा विचार व्हावा अशी मागणी केली. " जकातीच्या धोरणामुळें गिऱ्हाइकाला जादा किंमत द्यावी लागते. जकातीचें उत्पन्न कमी झालें असें फडणिस म्हणतात. याचा अर्थ खप, गिऱ्हाइकी कमी होत आहे. लहानमोठीं घड्याळें, नभोवाणी उपकरणें, या कांहीं चैनीच्या वस्तू नाहींत. तथापि त्यांच्यावर ५० टक्के किंमतीगत जकात आहे, साखरेवर वाढविलेली अंतर्गत जकात जबर असली तरी अयोग्य नाहीं. गिऱ्हाइकाला साखर पूर्वीच्याच भावांत मिळेल. तकलुपी कारखाने कमी होऊन साखरेचा धंदा भरभक्कम पायावर उभा राहील." सर महंमद यामीनखान यांनीं पोलादी मालाचे भाव वाढले आहेत तरी त्यावरील जकात कमी करावी. टाटा कंपनी जर योग्य

दरानें माल देत नसेल तर हें सरकारनें केलें पाहिजे ! ! नकली रेशमाची आयात सरकारी धोरणानें वाढत आहे व हें धोरण चुकीचें आहे; यामुळें ५० हजार विणकर बेकार झाले आहेत " अशी माहिती दिली. कुलधर छालिया यांनीं असें सांगितलें कीं, " साखरेवरील जकातवाढ म्हणजे नफ्यावर कर नसून उत्पादनावर कर आहे; नफा होवो, न होवो, ही जकात काढलेल्या सर्व मालाबद्दल द्यावी लागते. याचा परिणाम लहान लहान कारखानदार जे मुख्यत्त्वेंकरून बंगाल, बिहार संयुक्तप्रांत व आसाममध्यें आहेत त्यांच्यावर होईल. हा धंदा नुकताच उभा राहात आहे, यावेळीं असला कर बसवून व तो वाढवून हा धंदा बुडविणें योग्य नाहीं. लहान कारखाने हिंदी भांडवलावर चालले आहेत; मोठे कारखाने इंग्लिश भांडवलावर व त्यांना मदत करावी म्हणूनच ही वाढ झालेली दिसते. बजेटांतील तूट भरून काढण्याकरितां पगार कपात १० टक्के केली असती तर भागलें असतें. गारिबांवर कर लादणें अयोग्य आहे. अफूचा खप वाढत आहे, त्यास सरकारनें आळा घातला पाहिजे. आसाम प्रांतांतून मध्यवर्ति सरकार जास्त उत्पन्न मिळवतें व देतांना मात्र अन्याय करतें. सन १९२१ ते ३१ या अवधींत ४८ कोटी रुपये या प्रांतांतून घेतले व फक्त रु. १२·०७ कोटी सन १९३१–३६ या अवधींत दिलें. सव्वा कोटी रुपये पेट्रोलकर म्हणून आसाम प्रांत देतो व रु. २५ लाख प्राप्तीकर देतो, पण आमच्या प्रांतिक बजेटांतील तूट मात्र कायम आहे, व नेमीयर निवाड्यांतही न्याय मिळाला नाहीं." सर अबदुल हमीद हे सरकारनियुक्त सभासद म्हणाले, " संरक्षणाचें धोरण स्वीकारलें म्हणून साखरेवरील जकातीपासून येणारें उत्पन्न बुडालें. अंतर्गत जकातीनें तें सर्व भरून निघत नाहीं. वाढलेल्या जकातीमुळें नामवंत कारखाने राहातील, शेतकऱ्यांना त्यांच्या उसास योग्य किंमत मिळेल. गिऱ्हाइकाला साखर पूर्वीच्याच भावांत मिळेल. फार चांगली योजना फड-णिसांची आहे. जातीय तंटे सर्वत्र वाढत आहेत. देशांतील जनतेनें मतें देऊन कोणावर विश्वास आहे हें प्रगट केलें आहे. शांतता व सुव्यवस्था, नवीन येणारीं प्रांतिक सरकारें राखतील " अशी आशा प्रकट करून आपलें भाषण संपविलें.

तुटीचीं तीन कारणें म्हणजे अपेक्षेपेक्षां कमी उत्पन्न झालें, बर्मा निराळा झाला, व नेमीयर निवाडा अशीं फडणिसांनी दिलीं. त्यांचा सविस्तर विचार डॉ. बानर्जी यांनी केला. " उत्पन्न कमी झालें याचें कारण इटालीविरुद्ध व्यापारबंदी केली हें एक आहे. जागतिक मंदी आली. त्याचे परिणाम टळावे म्हणून जी

उपाययोजना सरकारनें केली ती कमी केली म्हणून उत्पन्न कमी झालें. बर्मा निराळा केला तो इंग्रजांनी आपल्या फायद्याकरितां. तो निराळा केला म्हणजे तो ब्रिटीश भांडवलाला अधिक काल कुरण मिळेल म्हणूनच केला. लहान लहान नवीन प्रांत करून खर्च वाढविला व त्यामुळे जुन्या प्रांतावर नेमियर अवॉर्डनें अन्याय केला आहे. साखरेवरील वाढीमुळे शेतकऱ्यांचें हित होणार नाहीं. त्यांच्या मालाला गिऱ्हाईक कमी होऊन किंमत कमी मिळेल असें मत सर राघवाचार्य यांनीं प्रदर्शित केलें आहे. "हे सद्‌गृहस्थ हल्लीं साखरेच्या धंद्यांत नोकर आहेत," फडणिस म्हणाले. "प्रत्येकाला बाजू घेण्याबद्दल कांही तरी मिळतेच" सर कासबर्जींनी फडणिसाला सुनविलें. डॉ. बानर्जी पुढे म्हणाले, "ही जकातवाढ करून मोठा प्रश्न उपस्थित केला गेला आहे. फडणिस खुला व्यापार तत्त्वाभिमानी आहेत व आपलें मत आमच्यावर लादूं पहात आहेत. कर आणि संतोष एकच असणें शक्य नाहीं. प्रेम आणि विवेक कधीं एकत्र सांपडला आहे कां ? (सर्वत्र हास्य) हा देश अतिशय दरिद्री आहे व बसणारे कर पुन्हां गरीबांवरच बसत आहेत हें धोरण आमूलाग्र बदललें पाहिजे." कैलासबाबू जातीय तंटयाबाबत बोलूं लागले तेव्हा बजेटाबद्दल बोला असा इशारा अध्यक्षांनीं दिला. "या गरीब देशावर खिस्ती धर्माबाबत खर्च कां ? हें खातें कशासाठी आहे ? लाखो रुपये आमच्या या खात्यावर कां सरकारनें खर्च करावेत ? हलवाईकीं दुकान दादा का फत्ते हा ( हलवायाच्या मालावर आजोबांचें श्राद्ध ). जणूं कांहीं हिंदू व मुसलमान धर्म हे दोन पुरे नाहींत म्हणून हा तिसरा आणला आहे. देवाला पुढे करून चालविलेलीं दुष्कृत्यें पचनीं पडणार नाहींत, देव प्रायाश्चित्त देईल." देवावरून कैलासबाबू एकदम नोकऱ्यावर आले व बिहारी लोकांना नोकऱ्या मिळत नाहींत म्हणून तक्रार केली. संतानम् म्हणाले, "हें बजेट नाहीं तर नोकरशाहीच्या कंपनीचा वार्षिक अहवाल आहे. नोकरांचा पगार तूट असो वा शिल्लक असो चालूंच आहे. तूट आली तर कर्ज काढा, कर वाढवा पण पगार कमी करूं नका. जनतेचें काय होतें याचा कोण विचार करतो ? एखादा जमीनदार वागतो तसें हें सरकार वागतें. कर वसूल करण्यापलीकडे कांहीं विशेष कर्तव्य आहे हें जाणत नाहीं, निष्क्रियतेच्या धोरणानें देशाचा नाश झाला आहे. माझ्या मतदार संघांतील स्त्रियांनीं, आपल्या अंगावरील सर्व सोनें जादूने नाहींसें व्हावें तसें झालें आहे म्हणून, फडणिसाचे आभार मानण्यास सांगितलें आहे. (प्रचंड हास्य) सोनें विकून लोकांनीं फायदा मिळविला असें

फडणिस म्हणतात. त्यांनीं या स्त्रियांना हें समजावून सांगावें. सर्व भाग दरिद्री झाला आहे. खायला नाहीं म्हणून सोनें विकलें आणि फडणिस म्हणतात फायदा उठवला ! ! आतां मंगळसूत्रेंसुद्धां सोन्याचीं नाहींत. अंतःकरणांत रुतलेल्या खंजिरा-चेंच मंगलसूत्र करण्याची वेळ आली आहे. त्यांचे पति पण फडणिसावर खूष आहेत. देण्यापायीं जमीनी गेल्या, सावकारांनीं ताब्यांत घेतल्या, कटकट गेली ! ! शेतकऱ्यांच्या पतीबाबत केलेले कायदे थोतांड आहेत. फडणिसाला खेडेगांवाची माहिती शून्य आहे. मंदीनें देश उध्वस्त झाला, सरकारनें कांहीं केलें नाहीं, फडणिस पोरकटपणें म्हणतात कीं, कच्च्या पदार्थांच्या किंमती वाढल्या आहेत." "हे शब्द सभ्य आहेत कां?" फडणिसांनी प्रश्न केला. "होय, हे व्यक्तीला उद्देशून आहेत, सभागृहाला उद्देशून नाहींत" अध्यक्षांनीं सटकावलें. संतानम यांचा भडिमार पुन्हां सुरू झाला. "सन १९२९ च्या मानानें या देशांत पदार्थांचे भाव कमी झाले आहेत. सन १९२९ मध्ये सूचक अंक १०० धरला तर सन १९३५ नोव्हेंबरमध्ये तो ६५.२ होता व सन १९३६ नोव्हेंबरमध्यें ६६ आहे. एका वर्षांत नाममात्र वाढ झाली आहे. उलट एका वर्षांत इंग्लंड-मध्ये ही वाढ ७२.५ पासून ८५.८ पर्यंत गेली, जपानमध्यें ८८.१ पासून ९२.६ पर्यंत गेली; अमेरिकेंत ८३.४ पासून ८५.८ पर्यंत गेली. चीनमध्येंसुद्धां ९८.९ पासून १०८.१ पर्यंत गेली. फडणिसाच्या अयोग्य धोरणामुळें मंदी येथें कायम झाली व याचें मुख्य कारण म्हणजे हुंडणावळीचा दर १८ पेन्स ठेवला हें होय. जर हिंदुस्थानची स्थिति सुधारली असती तर जकातीपासून कमी उत्पन्न आलें नसतें. लोकांची क्रयशक्ति कमी झाली म्हणूनच आयात माल कमी झाला, व जकातीचें उत्पन्न कमी झालें. निर्यात व्यापार वाढला याचा अर्थ रुपयाची किंमत हुंडणावळीच्या दृष्टीनें कमीच आहे अशी एक थाप फडणिसानें मारली. वस्तुस्थिति अशी आहे कीं, आयात मालाच्या फेडीत निर्यात माल सर्वस्वी गेला नाहीं. आयात मालांत मोठा हिस्सा रेल्वे व अन्य खात्यांच्या मागणींचा आहे, जनतेचा हिस्सा वाढलेला नाहीं. उलट निर्यात माल जास्त गेला याचें कारण हिंदुस्थानला दरसाल ७५ ते १०० कोटी रुपये परदेशांचे द्यावे लागतात, ते देण्यास आतां सोनें शिल्लक नाहीं म्हणून व नादारी टळावी म्हणून जास्त माल धाडून बाकी चुकती केली, पत राखली, परिस्थिति सुधारली, व्यापार तेजींत आला, हें खरें नाहीं. बर्मा वेगळा झाला, उत्पन्न रु. ६.६१ कोटींनीं कमी झालें

खर्च मात्र रु. १·०४ कोटींनीं कमी झाला. उत्पन्नाच्या मानानें खर्च कमी व्हावयास पाहिजे, तें झालें नाहीं. याचा अर्थ संरक्षक खात्यावरील खर्च कमी झालेला नाहीं; वाढलेलाच आहे. अन्य देशांत सरकारें नाना उपाय योजून मंदीला तोंड देतात, व्यापार सावरतात, उद्योगधंदे बुडूं देत नाहीत. येथिल सरकार बेफिकीर आहे. पिळवणुकीच्या धोरणाविरुद्ध सर्व देशानें निवडणुकींत स्पष्ट मत दिलें आहे. नवी आशा, नवें क्षेत्र, आमच्या पुढे आहे. आम्हीच आतां कांहींतरी करून दाखवूं तुमचे दिवस भरल." अशी ताकीद देवून संतानम् यांनी आपलें साधार व सावेश भाषण संपविलें.

भाषणाच्या सुरवातीस साल मजकुराच्या बजेटांत ग्रामसुधारणेसाठीं रक्कम खर्ची घातलेली नाहीं या गोष्टीचा उल्लेख करुन मी म्हणालो, "सन १९३५ पासून काँग्रेसने ग्रामोद्धाराची चळवळ सुरूं केल्याबरोबर सरकारनें सन १९३५–३६ व सन १९३६–३७ मध्यें दरसाल रु. १ कोटविर ग्रामोद्धारावर खर्च केले; व ते खर्च करतांना काँग्रेसचें वजन खेडे–विभागांतून कमी व्हावें हाच उद्देश होता. काँग्रेसला सर्वत्र निवडणुकींत जय मिळाला हें पाहातांच ही खर्चाची बाब यंदा कमी करण्यांत आली आहे. जनतेबद्दलची ही सरकारची सहानुभूति आहे." कांहींतरी विधायक सूचना म्हणून १० टक्के पगार कपात करणें योग्य आहे व काँग्रेसनें रु. ५०० पेक्षां जास्त पगार असूं नये हें जें धोरण मान्य केलें तें योग्य आहे या दृष्टीनें विवेचन केलें. "प्रत्येक देशांत श्रमजीवि मजूर व कारकून यांच्या वेतनांत कांहीं प्रमाण आहे; त्याचप्रमाणें किमान पगार घेणारा कारकून व कमाल पगार घेणारा सरकारी अधिकारी यांच्याही प्राप्तींत प्रमाण आहे. निरनिराळ्या देशांतील हीं प्रमाणें पाहातां येथील प्रमाण मात्र अमर्याद आहे. दक्षिण आफ्रिकेंत किमान पगारी कारकून सालीना १४० पौंड मिळवितो व कमाल पगारी अधिकारी १६०० पौंड मिळवितो. ब्रिटनमध्यें माणशीं वार्षिक उत्पन्न ९३ पौंड, मजुराची मजुरी सरासरी १०० पौंड, कारकुनाचा पगार ९५ पौंड व कमाल पगारी अधिकाऱ्याची वार्षिक प्राप्ती ३०००पौंड, कॅनडा वार्षिक उत्पन्न माणशीं ५१८ डॉलर, मजूरी ९५५ डॉलर, कारकुनाचा पगार ६८० डॉलर व कमाल पगारी अधिकारी १०,००० डॉलर मिळवितो. अमेरिकेंत माणशीं वार्षिक उत्पन्न ६७६ डॉलर, मजूरी १७७५ डॉलर, कारकुनाचा पगार ११४० डॉलर, कमाल वेतनी अधिकारी १०००० डॉलर मिळवितो. जर्मनींत वार्षिक माणशीं उत्पन्न ८०० मार्क, मजुरी १७५० मार्क,

कारकून १७०० मार्क, श्रेष्ठ अधिकारी२२९००मार्क. जपानमध्यें वार्षिक माणशीं उत्पन्न ११८ येन, मजूरी ५०० येन, कारकून ४८० येन, श्रेष्ठ अधिकारी ६,५०० येन, हिंदुस्थानांत सरासरी माणशीं उत्पन्न रु. ७४, साधारण मजूरी रु. २४०–ही सुद्धां अधीकच रक्कम होते तथापि ती धरली आहे– कारकुनाचा पगारचा रु.३६०, व सर्वांत जास्त पगार असलेला सरकारी अधिकारी रु. ४८००० मिळवतो. किमान पगारी कारकून व कमाल पगारी अधिकारी यांच्या वार्षिक प्राप्तीचें प्रमाण एकमेकांशीं निरनिराळया देशांत पडतें तें असें. दक्षिण आफ्रिका १:११, ब्रिटन १:३२, कॅनडा १:१७, अमेरिका १:९, जर्मनी १:१३, जपान १:१४, हिंदुस्थान १:१३३. दरमहा रु. ५०० कमाल पगार धरला म्हणजे हें प्रमाण १:१७ असें पडतें. ब्रिटनपेक्षां कमी पण बाकी सर्व देशापेक्षां जास्त. यावरून रु. ५०० पगार म्हणजे कांहींतरी कॉंग्रेसची कल्पना आहे असें नाहीं; अन्य देशांतील परिस्थिति पाहूनच हें योग्य ठरतें. जर लायक माणसें या देशांत नसतील तर जास्त पगार देणें कदाचित् योग्य ठरेल. पण तशी वस्तुस्थिति नाहीं. सरकारी नोकरींत असणाऱ्यापेक्षां बाहेरच लायख लोक जास्त आहेत. (टाळ्या) या लठ्ठ पगारामुळें येथील राज्यकारभार फारच खर्चाचा आहे. नुसत्या मुंबई इलाख्यांत रु. १४·५० कोटी खर्चापैकीं रु.५·३७ कोटी पगार वाटण्यांत जातात. यापैकीं ज्यांना वार्षिक रु. २००० च्या वर आहे त्यांच्यापायीं रु. २·०२ कोटी खर्च होतात म्हणजे एकंदर खर्चाचा १/७ !! हें प्रमाण धरून सर्व हिंदुस्थानांतील मोठ्या पगारी अधिकाऱ्यांच्या पगारापायीं रु. ४० कोटी दरसाल खर्च होत असले पाहिजेत असें अनुमान काढलें तर तें चुकीचें नाहीं. हिंदी व गोऱ्या अधिकाऱ्यांना एवढा पगार देऊन जनतेसाठीं काय राहणार, त्यांचें दारिद्र्य कसें कमी होणार ! व्यापार उदीम कसे सुधारणार ! बेकारी कशी कमी होणार ! मी हिंदी व गोरा अधिकारी असा फरक करीत नाहीं. दोघांनाही लठ्ठ पगार घेण्याचा नैतिक अधिकार नाहीं. समान दर्जाच्या नांवाखालीं हिंदी अधिकारी जनतेला लुटीत आहेत. अपरिग्रह, अप्रसिद्धी व आज्ञाधारकपणा हीं उत्तम सेवकाचीं लक्षणें मानलीं आहेत. हिंदी पोशाखांत हिंदी अधिकारी राहिले तर त्यांची प्रतिष्ठा कमी होणार नाहीं. किंबहुना अधिकारी साधे वागलें तर सर्वत्र साधी राहणी वाढेल. २० टक्के लोक ज्या देशांत अर्धपोटीं राहातात त्या देशांतील अधिकारी वर्गाला एवढा पगार देण्यांत यावा हें असह्य आहे, अनैतिक आहे.”

भाषणानंतर सरकारनियुक्त दोघेतिघे हिंदी सनदी नोकर ( I. C. S. ) यांनीं

माझ्याशीं लॉबींत वादविवाद केला व त्यांना मिळणारा पगारही अपुराच आहे अशी तक्रार केली !! खेदाची गोष्ट कीं, त्यांची दृष्टी संपूर्ण अहिंदी होती. देशावर प्रेम नव्हतें असें नव्हे; पण परंपरेने त्यांना विशिष्ट दृष्टी व विशिष्ट ध्येयें दिलीं होतीं; कमी पगार म्हणजे कमी लायकी असा समज व समीकरण होतें; म्हणून त्यांच्या मनांत भीति असावी; दोन तासांच्या चर्चेनंतरसुद्धां आम्हीं असेंच्या असेंच राहिलों. एकमेकांचे दृष्टिकोन बदलूं शकलों नाहीं. सरकारच्या बाजूनें श्री.नगरकर यांनीं भाषण केलें. कॅ. लालचंद यांनींही केलें व दोघांनींही बजेट उत्तम आहे आपलीकडे विशेष सांगितलें नाहीं. अविनाश लिंगम् चेट्टी यांनीं आर्थिक परिस्थिति सुधारली नाहीं म्हणून सांगून पगारकाट करावी असें सुचविलें. लाला शामलाल म्हणाले, " सर्व अधिकारी देश दरिद्री आहे असें म्हणतात. एक मिशनरी आमच्या गांवीं थंडीच्या दिवसांत आला व म्हणूं लागला, 'फार थंडी पडली आहे, तुम्हास कपडे मिळाले पाहिजेत ' त्यावर जमलेल्या मंडळींपैकीं एकानें सांगितलें, ' अहो, पाद्रीबुवा, तुमच्या अंगावर दोन व खाकेंत दोन अशीं चार ब्लँकेटें आहेत, त्या-पैकीं तीन आम्हाला द्या. म्हणजे तीन माणसांची थंडी मागेल ' पाद्री म्हणतो, तें शक्य नाहीं, देवाचा संदेश सांगण्याचें काम मला करावयाचें आहे; हींच ब्लँकेटें कमी आहेत. ( सर्वत्र हास्य ) ' तुमच्या पगारांतील थोडा भाग द्या ' असें म्हटल्याबरोबर केवढा राग तुम्हांला आला. देशाचें दारिद्र्य तुमच्यामुळें आहे. कार्य-क्षमतेच्या नांवाखालीं जबर पगार घेऊन देशाचें अनहित तुम्हीं केलें आहे. लोकांना पिण्यास पाणी नाहीं, खाण्यास अन्न नाहीं, पांघरण्यास वस्त्र नाहीं, ही स्थिति फार वेळ ठेवण्यापासून धोका आहे हें नीट समजा." आयंगार व स्वामी चेट्टी यांनींही माझ्या पगारकपातीच्या सूचनेला अनुमोदन दिलें. किंबहुना माझ्यानंतर सर्व भाषणांतून या प्रश्नाचा मोठ्या प्रमाणांत ऊहापोह झाला. शास्त्रीयदृष्टीनें मांडणी केल्यामुळें लठ्ठ पगाराचें समर्थन करणें सरकारी वक्त्यांना कठीण झालें. आंकडे व माहिती अमान्य करणें शक्य नव्हतें. मथुरादास वसनजी यांनीं प्रांतिक स्वायत्तता ही महागाईची गोष्ट होणार असून एकंदर जनतेवर करवाढ होईल असें सांगितलें. संरक्षण खात्यानें सर्वच खर्च चालूं उत्पन्नांतून न करतां, ब्रिटननें जसें कर्ज काढून संरक्षण खात्यावर खर्च केलें त्याप्रमाणें हिंदुस्थान सरकारनें करावें असें सुचविलें व नाणें बाजारांतील परिस्थिति पण अनुकूल आहे अशी माहिती दिली.

चर्चेच्या दुसऱ्या दिवशीं सर महंमद याकूब यांनीं सांगितलें कीं, "जगभर

मंदाई खलास झाली पण येथें ती चालूच आहे, बजेटांत तूटच आहे. स्थायी फडणिसी कमिटी आहे, पण तिच्यापुढें विशेष कांहीं ठेवण्यांत येत नाहीं;" गिडने यांनीं बजेटाला उद्देशून बायबलांतील वाक्यें उच्चारलीं, त्याचें विडंबन केलें. Wherewith shall it be balanced unless its salt be sugared and silvered अशी शर्करामिश्रित गोळी देऊन फडणिसानें कारभार चालविला आहे अशी तक्रार केली. अँग्लोइंडियनांची संख्या सरकारी नोकरींतील २५५१ जी सन १९३२ मध्यें होती ती सन १९३६ मध्यें २०७२ झाली म्हणून तक्रार केली व पार्लमेंटचा उद्देश सरकार पार पाडीत नाहीं म्हणून मागील सालाप्रमाणें आरोप केला. जोशी यांनीं फडणिसानें मागील दोन वर्षे प्राप्तीवरील जादा कर कमी करून अगर माफ करून उत्पन्न कमी करून घेतलें, व आतां तूट आली म्हणून ओरड चालविली आहे असें ठणठणितपणें सांगितलें. "प्रांतिक स्वायत्तता येणार हें माहीत होतें, बर्मा निराळा होणार हेंही माहीत होतें, असें असतांना सुद्धां कर कमी केले ही चूक त्यांनीं केली. जकातीचे अंदाज चुकले हे एका अर्थी बरें झालें; फडणिस जरा बेतानें बोलूं लागले आहेत. स्वतःची खात्री म्हणजे सत्य मानणारा व स्वतःविषयीं गर्व बाळगणारा फडणिस म्हणजे राष्ट्राची एक आपत्ति आहे. यंदा तूट आली म्हणून बेतालवृत्ति कमी होऊन थोडें शहाणपण ते शिकतील. स्थायी फडणिसी कामिटीचे अधिकार नियंत्रित करण्याचा नवा डाव फडणिसांनीं मांडला आहे. 'योजना, मग तिच्यावरील खर्च बजेटांतून असो, पुरवणी देणगीनें असो, अगर एखाद्या बाबीवरील खर्च कमी करून त्यांतून केलेला असो, कमिटीनें मंजूर करावयाची, व एकदा मंजूरी या कमिटीनें दिल्यानंतर जर योजनेंत विशेष बदल झाला नसेल तर, मंजुरीपेक्षां अधिक लागणारा खर्च मंजुरीसाठी पुन्हां या स्थायी कमिटीकडे ठेवण्याचें कारण नाहीं' ही फडणिसांची सूचना प्रतिगामी आहे. स्थायी कमिटीचे हक्क कमी करण्याचा डाव आहे. पहिल्या मंजुरीच्या वेळीं जेवढी चर्चा होईल तीच. पुढे वाटेल तेवढा खर्च करावा व योजनेंत बदल नाहीं असें म्हणून कमिटीच्या मंजुरीशिवाय वाटेल तेवढा खर्च करण्यास मोकळीक असावी हा सरळ उद्देश आहे. फडणिस मोठा उद्योगी मनुष्य आहे, उद्यां पब्लिक अकौंटस कमिटीचे हक्कसुद्धां मर्यादित करण्यास कमी करणार नाही. 'सभागृहानें दक्षता घेतली पाहिजे." डेराइस्माईलखानचे नबाब अहमद नवाजखान ही एक विनोदीमूर्ति आहेत. त्यांनीं होणारा खर्च व देण्यांत

येणारा पगार हा कमीच आहे अशी तक्रार केली !! ते पुढे म्हणाले, "ब्रिटिशामुळें या देशांत शांतता आली, कायदा आला. मोंगलापासून ब्रिटिश सत्ता येईपर्यंत बंडें, क्रान्त्या, दंगे हाच इतिहास आहे." "हें विषयाला सोडून आहे" एक आवाज निघाला. "विषयाला धरून बोला" अध्यक्षांनीं निर्णय दिला. "ब्रिटिश अधिकाऱ्यांना पगार कां जास्त द्यावा लागतो याचीं कारणें मी सांगतो आहे," वृद्ध नबाब बोलले. "पण त्यासाठीं महमद गिझनीचा इतिहास सांगण्याचें कारण नाहीं," अध्यक्षांनीं गंभीरपणें सांगितलें. नबाब पुढें म्हणालें, "पोस्ट, तारायंत्रें, बिनतारी संदेश, टेलिफोन, बँका, हवाईदल, कितीतरी गोष्टी या सरकारनें दिल्या आहेत." "उपासमार, दारिद्र्य, बेकारीही पण" श्री. प्रकाश यांनीं यादी पुरी केली. नबाबसाहेब आणखी ब्रिटिश राजसत्तेचें गुणगान गाऊं लागलें पण वेळ संपला व त्यांनीं तान अर्धीच सोडून दिली. मि. सेल, संयुक्त प्रांतांतील सनदी नोकर, यांनीं सांगितलें कीं, "मी तीस वर्षें या देशाची सेवा केली आहे. आमच्यापैकीं कांहींनी तीन तीन पिढ्या सेवा केली आहे. लवकरच प्रांतांत प्रधान-मंडळें येतील व त्यांना सनदी नोकरांचें सहकार्य अवश्य लागेल व तें मिळेलही. म्हणून आमची निंदा करूं नका. पांच वर्षांत आमच्या नोकरीचा सर्व प्रश्न तपासला जाणार आहे. थोडी सहिष्णुता दाखवाल तर बरें होईल." अणे यांनीं साखरेवरील जकातीवर आक्षेप घेतला. विषवृक्ष जरी लावला असला तरी तो स्वतःच कापून टाकण्यापुर्वी विचार करावयास पाहिजे. साखरेचा धंदा नुकताच उभा राहिला आहे. तो मारण्याचा प्रयत्न फडणिसानें करूं नये. पूर्वी रु. १६–१७ कोटी साखरेपायीं परदेशीं जात ते आतां वाचूं लागले. अनेक कारखाने झाले. मजुराना काम मिळालें. हजारों शेतकऱ्यांच्या मालाला गिऱ्हाईक मिळालें. जकातीकडे निव्वळ उत्पन्नाच्या दृष्टीनें पाहाणें योग्य नाहीं. जकात खातीं वसुली खर्च सन १९३१–३२ मध्यें रु. ९० लाख होता तो सन १९३६–३७ मध्यें रु. १·३५ कोटींपर्यंत गेलेला आहे. तशीच वाढ अन्यखात्यांतून झाली आहे; एकंदर वसुली खर्च रु. ३·०६ कोटी होता तो रु. ३·७० कोटींपर्यंत गेला आहे. तो कमी व्हावयास पाहिजे. सिमल्याच्या पायीं होणारा खर्च अनावश्यक आहे. संरक्षण खात्यावरील खर्चही कमी व्हावयास पाहिजे." सर कावसजी जहांगिर यांनी बर्मा निराळा झाला म्हणून होणारें नुकसान बजेटांत दाखविलेलें आहे, त्यापेक्षां जास्त नुकसान होईल असें सांगून ते म्हणालें, "साखरेचा धंदा नांवारुपास आला असतां, त्याला बाधेल असें कृत्य करणें अयोग्य आहे. नालायक व

अकार्यक्षम कारखाने निकाली निघावेत हा हेतू आहे असें सरळ फडणिस म्हणतात. खुद्द ब्रिटनमध्यें अनेक धंद्यांतील अनेक कारखाने कार्यक्षम नसतात, म्हणून ते जावेत, निकाली निघावेत, म्हणून तेथील सरकार असले अयोग्य उपाय करीत नाहीं. प्राप्तीवरील कर चुकवितां येणार नाहीं म्हणून जरुर ती उपाययोजना झाली पाहिजे. विरोधीपक्षाचे नेते यांना कर चुकविण्याच्या बाबतींत विशेष माहिती आहे." "कायद्याच्या मर्यादेंत राहून हें करण्याचा तुम्हाला हक्क आहे" भुलाभाई बोलले. (टाळ्या व हास्य) "कायदेशीरपणें चुकविला तर माझी हरकत नाहीं फक्त बेकायदेशीरपणें जो करील त्याला करतां येऊं नये." काबसजींनीं उत्तर दिलें व वेळ संपल्यामुळें अशिल व वकील यांची चकमक संपली ! !

पंतजींचें सभागृहांतील शेवटचें भाषण सुरूं झालें. ते म्हणाले, "फडणिसांचें पहिलें बजेट बेफिकीरवृत्तीचें होतें, दुसरें 'सुस्थिति आली' म्हणून थाप मारणारें होतें, व यंदाचें 'चांगले दिवस येतील' ही खोटी आशा दाखविणारें आहे. चांगले दिवस येतील पण फडणिसानें ३ वर्षे केलेली घाण काढून टाकल्यानंतरच. सभ्य भाषेंत या वर्षीच्या बजेटाचें वर्णन करणें अशक्य आहे." "मलाही तें अशक्यच झालें." फडणिस मध्येंच बोलले. "फडणिसाला आपल्या अपत्या-बद्दल इतका तिटकारा वाटतो कीं, त्याचें बारसेंसुद्धां होऊं नये असें त्यांना वाटतें." "बाराव्याचाही पण समारंभ नको" एक आवाज निघाला. "हें बजेट जंगली आहे. उत्पन्नाच्या रकमेपैकीं ६३ टक्के संरक्षण खात्यावर ज्यांत खर्च होतात त्याला दुसरें काय नांव द्यावें ? बजेटांत संरक्षक खात्यावरील खर्च कमी दाखविला आहे. बर्मा वेगळा करून रु. १·०४ कोटी अधिक वाचवितां आले असते ते धरले व एडन निराळें झालें त्याबाबत रु. २० लाख कमी व्हावयास पाहिजेत ते धरले म्हणजे एकंदर खर्च रु. ४७·१८ कोटी होतो. म्हणजे मागील सालापेक्षां रु.१·८३ कोटीनें जास्त आहे. इंग्लंडमध्ये उत्पन्नाच्या १५ टक्के खर्च संरक्षण खात्याबर खर्च होतो, कॅनडांत ९ टक्के, ऑस्ट्रेलियांत ४ टक्के इंग्लंडच्या जगभर पसरलेल्या साम्राज्याकरिता आम्ही कां खर्च करावा? गेल्या वर्षी एकंदर खर्चापैकीं सभागृहाच्या मंजुरीसाठी ४८ टक्के खर्च मांडण्यांत आला, यंदा सन १९३७-३८ मध्यें हें प्रमाण ४६ वर आलेलें दिसतें. हा काय भावी स्वराज्याचा नमुना ? राजकीय खात्याचा खर्च वाढलेला आहे व खाजगी प्राथमिक शाळांना देण्यांत येणारी मदत कमी करण्यांत आलेली दिसते. सन १९३६ च्या इंग्लंडच्या बजेटांत रु.७० कोटी

शिक्षणासाठीं, रु. २० कोटी आरोग्य व विमा, रु. २० कोटी व्यापार व उद्योग, रु. १॥ कोटी पशुसंवर्धन, रु. ३ कोटी शेती सुधारणा व रु. ६० लाख शेतकी शिक्षणासाठीं खर्चीं टाकण्यांत आले आहेत. याशिवाय दुधाचा धंदा वाढावा, साखरेचा धंदा वाढावा म्हणून रु. २॥ कोटींची सोय केली आहे. रु. ६० कोटी स्थानिक स्वराज्य संस्थांना देण्यांत आले आहेत. येथें काय करण्यांत आलें ! पैसे नाहींत हें खरें नाहीं. प्राप्तीकरावरील जादा कर कां कमी केला ! श्रीमंतांची सोय पाहिली व गरिबांची साखर महाग केली. प्राप्तीकरावरील जादा कर माफ करून फडणिसांनीं मूर्खपणें आपत्ति आणवली व आतां बेफामपणें वागत आहेत." अध्यक्षांनीं 'अवधीं दोन मिनिटें राहिलीं आहेत.' असें सांगितलें. पंतजी म्हणाले, "हीं दोन मिनिटेंही मी सरकारला दान देतो. ज्यावेळीं वरील कर कमी केले त्यावेळीं प्रांतिक बजेटांतून तूट होती. १९३१–३२ सालीं एकंदर प्रांतिक तूट रु. ५ कोटी होती. १९३५–३६ सालीं मुंबई, मद्रास, पंजाब सोडले तरी तूट रु. २ कोटी होती. प्रांतांनीं कशी बचत करावी ? प्रमुख अधिकाऱ्यांचे पगार मध्यवर्ति सरकार ठरविणार व ते द्यावे मात्र प्रांतांना लागणार. प्रांतांत तूट, जकातीचें उत्पन्न घटत आहे, असें असून फडणिस म्हणतात ' सुस्थिति व सुकाळ ' येत आहे !! निर्यात व्यापार वाढला, अंतर्गत व्यापार वाढला, पण प्राप्तीवरील कराचें उत्पन्न कमी झालें याचा काय अर्थ होतो ? मिठावरील उत्पन्न रु. ५० लाख कमी झालें याचा काय अर्थ होतो ? गरीबांना मीठ घेण्याला पुरेशी क्रयशक्ति नाहीं. भाव सुधारले असें फडणिस म्हणतात. सन १९३६ च्या रिझर्व बँकेच्या अहवालांत पदार्थांचे भाव स्थिर राहिले असें लिहिलें आहे. सर्वत्र युद्धाचें वातावरण दिसत आहे. यावेळीं धोरणानें व मुत्सद्दीपणानें वागावयास पाहिजे. तें घडत नाहीं. झडतीचा दिवस (Day of reckoning) येत आहे, जाब द्यावा लागेल, व त्याबरोबर स्वातंत्र्याचाही दिवस येत आहे आणि त्याबरोबर सुस्थितीचा व सुखाचाही." (दीर्घकाल टाळ्या).

उत्तर देतांना फडणिसांनीं, सभासदांनीं परस्परविरोधी टीका केली म्हणून टिंगल केली. संरक्षणाच्या धोरणानें उत्पन्न कमी झालें म्हणून सांगितलें. ब्रिटिश राज्यापासून पिळवणूक झाली हे आरोप खोटे आहेत व ते कधींही बंद होणार नाहींत असा त्रागा केला. " परदेशीं फक्त ४५ ते ५० कोटी रुपयांपर्यंतच भरणा करावा लागतो." " अहो, यंग रिपोर्टमध्यें ही रक्कम रु. ७८ कोटी सांगितली आहे " आयंगार म्हणाले, " कांहीं व्याजाची रक्कम तेव्हांपासून कमी झाली

आहे. निर्यात व्यापार वाढतो आहे, पदार्थांचे भाव वाढत आहेत असा अभिप्राय 'इंडियन ट्रेड जर्नल'चा आहे." "रिझर्व बँकेचा रिपोर्ट खोटा कां?" पंतजींनीं प्रश्न केला. "सर ऑसबर्न स्मिथ यांचा रिपोर्ट चुकीचाच मानला पाहिजे" सत्यमूर्ति म्हणाले. (त्याबरोबर प्रचंड हंशा उसळला.) स्मिथ हे रिझर्व बँकेचे प्रमुख व फडणिसांचें व त्यांचें भांडण जगजाहीर होतें. "पण सदरहू रिपोर्टावर फडणिसीखात्याचे चिटणीस मि. निक्सन् यांची सही आहे" पंतजींनीं माहिती पुरविली. फडणिस सर्द झाला. त्याने तो मुद्दा सोडला. "ब्रह्मदेशाकडून येणाऱ्या वार्षिक कर्जफेडीच्या रकमेंत थोडासा गोंधळ आहे हें मला मान्य आहे. त्यांतील कांहीं भाग रेल्वेकर्जफेडीचा आहे हें खरें आहे. तो उणे करावयास पाहिजे. तसें न झालें तर फेडनिधींतूनच ही रक्कम काढल्यासारखी होते. अमेरिकेंत प्रे. रूझवेल्ट यांनीं जें धोरण स्वीकारलें तें स्वीकारावें म्हणून सांगण्यांत आलें. ४० टक्के नाण्यांची—चलनाची—किंमत कमी करावी कां? कंपन्यांच्या नफ्यावर, प्राप्तीवर, वारसासंपत्तीवर, भयंकर करवाढ तेथें केली गेली तशी करावी कां? रु.४००० कोटी गरिबांना मदत करण्यासाठीं खर्च केले जातात तसें करावें कां? हजारों एकर जमीन तेथें नापीक टाकली, तें करावें कां? पैसा कोठून आणणार? खर्च कमी करावयाचा म्हणजे संरक्षक खात्यावरील; तें शक्य नाहीं. पगारकाटही शक्य नाहीं. प्रांतिक सरकारांनीं वाटेल तर त्यांच्या अधिकारांतील नोकरांचे पगार कमी करून पाहावेत. साखरेवरील करवाढ योग्य आहे. विजयराघवाचार्य यांची टीका म्हणजे नोकराची टीका आहे." "तुम्हीसुद्धां ब्रिटिश लोकांचें हित पाहतां व पगार मात्र आमचा घेतां; निदान विजयराघवाचार्य ज्यांचा पगार घेतात त्यांचेंच हित पाहातात" सत्यमूर्तींनीं टोला मारला. "साखरेला किंमतीच्या मानानें २५० टक्के संरक्षण मिळालें आहे; यापुढें अधिक मागणें अयोग्य आहे. स्थायी फडणिसी कमिटीचे अधिकार मी मर्यादित करीत नाहीं. जोशी यांचा समज चुकीचा आहे. पण जोशी हे नेहमींच हात घालून पोवळें उठवीत असतात. बेफाम भाषणांना मी उत्तर देत नाहीं. निवडणुकीचा तो प्रतिध्वनि आहे. मी किती तरी सौजन्यानें बोललों. ही कमी बेफिकीर वृत्ति व जास्त 'पोरकटवृत्ति' सभागृहाला पटेल." जातां जातां नांगी मारून फडणिसांनीं भाषण संपविलें व साधारण चर्चाही संपली.

जकातीच्या धोरणाबाबत युरोपियन गट फार वर्षांपासून नाराज होता. बजेटांतील संधी साधून, कपात सूचना करून त्यांनीं चर्चेला तोंड पाडलें. केवळ उत्पन्ना-

साठीं जकात हें एक धोरण व देशी उद्योगधंद्यांना संरक्षण मिळावें म्हणून बसवि-ण्यांत आलेली जकात हें दुसरें धोरण. सुरवातीस उत्पन्नासाठीं जकाती (Revnue Tariff) किंमतीवर ५ टक्के याप्रमाणें असत; पुढें २५ टक्केपर्यंत त्यांची वाढ झाली. नंतर त्यांत जादा जकात म्हणून भर पडली. ही जादा जकात आपत्काला-पुरती म्हणून बसविली पण पुढें ती कायमच झाली. एकंदर परिणाम म्हणजे जका-तींत वाढ झाली व तिचें निव्वळ उत्पन्नासाठीं हें स्वरूप राहिलें नाहीं. याप्रमाणें मुख्य तक्रार मि. जेम्स यांनीं आपल्या भाषणांत केली. चालू क्षणाला कांहीं वस्तूंवर ५० टक्केपर्यंत जकात आहे. कापूर, खोदकाम, कांहीं विशिष्ट कापड, विजेचें सामान, दागिने, चाकू, कात्र्या, वगैरे यांवर ५० टक्के आयात जकात आहे, ती अयोग्य आहे अशी तक्रार केली. सन १९२३च्या पूर्वींच्या पांच वर्षांत ही जकात सरासरी १७॥ टक्के असे. सन १९३१-३१मध्यें जकातीचें उत्पन्न रु. ३१कोटींपर्यंत गेलें, तथापि पुढें ५० टक्केपर्यंत वाढ होऊनसुद्धां हल्लीं उत्पन्न कमी कमी येत आहे. १९३५-३६ सालीं रु. २५ कोटी उत्पन्न आलें. जागतिक उत्पादन सन १९२९ च्या प्रमाणांत आलें आहे, परंतु आंतरराष्ट्रीय व्यापार मात्र त्या प्रमाणांत आला नाहीं. तो पूर्वीपेक्षां १/५ ते १/४ पर्यंत कमीच आला आहे. या देशाचें धोरण काय असावें हें ठरविण्याच्या दृष्टीनें सरकारनें चौकशी करावी. जकाती कमी केल्यास व्यापार वाढेल हें स्पष्ट आहे. युरोपियन व्यापारी मंडळींचें मत असें आहे कीं स्वयंपूर्णता हें ध्येय योग्य नाहीं. ज्या वस्तू येथें होत नाहींत अगर स्वस्त होत नाहींत त्यांच्या आयातीवर जकाती कमी व्हाव्यात. ज्या येथें होतात त्यासुद्धां परदेशांतून येऊं द्याव्यात म्हणजे स्पर्धा होऊन त्यांच्या धंद्यांत अधिक कार्यक्षमता उत्पन्न होईल. मात्र त्यांना अयोग्य स्पर्धा उत्पन्न होणार नाहीं एवढी काळजी घ्यावी. परस्परांना पसंत पडेल अशी व्यवस्था अन्य राष्ट्रांच्या बाबतींत करावी." बी. दास यांनीं, चौकशी करावी, या सूचनेला पाठिंबा दिला व सोन्याच्या निर्यातीवर जकात ठेवावी; सर्वच प्रश्न आमूलाग्र तपासावा असें प्रतिपादिलें. सर होमी मोदी म्हणाले, "जकातीपासून मोठें उत्पन्न सरकारला होत असल्यामुळें हा प्रश्न बिकट झाला आहे. एकीकडे धंद्यांना संरक्षण पाहिजे तर दुसरीकडे देशाला उत्पन्न पाहिजे आहे. शेती-मालावरील जकातीचा बोजा कमी व्हावयास पाहिजे आहे व गिऱ्हाइकालाही माल स्वस्त मिळाला पाहिजे. या सर्वांचे हितसंबंध सुखकरपणें जुळवून आणणें सोपें काम नाहीं. नुसता तज्ज्ञ नेमून चौकशी करून भागणार नाहीं. याकडे सारखें लक्ष

ठेवून जकातीबाबत सल्ला देणारी कायम कमिटीच नेमणें योग्य होईल. इंग्लंडमध्यें तशी कामिटी ("Import Duties Advisory Committee") आहे. तज्ञांवर आयात कर बसवावा असें दास यांनीं मध्येंच सुचविलें. मी म्हणतो, " त्यांच्यावर अंतर्गत जकात बसवावी व त्यांच्या वजनावरसुद्धां (प्रचंड हास्य) संरक्षक जकाती रद्द करण्यात अशी मि. जेम्स यांची इच्छा नसावी. जनतेची क्रयशक्ति वाढवावी कशी हा मुख्य प्रश्न आहे. पण वादविवादांत श्रीमंतांची राहाणी कशी सुधारेल ? त्यांनीं गिळंकृत केलेली संपत्ति कशी बाहेर निघेल हाच प्रश्न महत्त्व पावलेला दिसतो. श्रीमंतांना दारु, तंबाखू व अन्य व्यसनें लावून, त्या त्या मालांचा खप वाढवा म्हणजे उत्पन्न वाढेल असें कांहीं म्हणतात. माझें मत असें आहे कीं, त्यांवरील जकाती कमी करा कीं किंमती कमी होतील, खप वाढेल व उत्पन्नही वाढेल." " अहो तुमचा अनुभव काय आहे ? " एकानें प्रश्न केला. " जकात नव्हती तेव्हांही मद्य आणि तंबाखू मी घेत होतो; जकात बसल्यावरही घेत आहे आणि जर जबर जकात बसली तर विचार करावा लागेल, " " मग ताडी घ्या ". सत्यमूर्ति लगेच बोलले. " प्रत्येक स्वदेशी वस्तूप्रमाणें ती डोकें फिरविते. ( Like everything Swadeshi it goes to my head. ) नुसती जकात कमी करणें हा प्रश्न नाहीं. संरक्षित धंद्यांना मारणें हाही उद्देश जेम्सचा नाहीं. जास्तींत जास्त शास्त्रिय दृष्टी ठेऊन जकातीचें धोरण देशी धंद्यांना बाध न येतां उत्पन्न वाढेल या दृष्टीनें कसें असावें हा मुख्य प्रश्न आहे. ". डॉ. डिसोझा यांनीं शेतीच्या साधन-सामुग्रीवर, जनतेला लागणाऱ्या आरोग्यविषयक वस्तूंवर, ज्ञानसाधनांवर, प्रगतींच्या साधनांवर, धंद्यांच्या उभारणीस लागणाऱ्या यंत्रादी सामुग्रीवर व कच्च्या मालावर आयात जकात नसावी अगर कमी असावी असें सांगितलें. अन्य देशांत उद्योगधंदे वाढत आहेत तर येथें उलट होत आहे अशी त्यांनीं तक्रार केली. ग्रामीण भागांतील लोकसंख्या वाढत आहे हें इष्ट नाहीं. त्यामुळें शेतीवर भार जास्त पडतो. सन १९२१ मध्यें हजारीं २९१ जमीन नसलेले शेती कामगार होते ते १९३१ सालीं हजारीं ४०७ झाले हें प्रगतीचें लक्षण नव्हें. म्हणून उद्योगधंदे वाढले पाहिजेत व त्याबाबतींत योग्य तें धोरण स्विकारलें पाहिजे ही विचारसरणी मांडली. सत्यमूर्ति यांनीं कपातसूचनेस विरोध केला. " हा प्रश्न तपासण्याची ही वेळ नाहीं. जेम्सचा उद्देश सरळ आहे. त्यांना खुला व्यापार पाहिजे आहे व तीच गोष्ट फडणिसाकाही करावयाची आहे. कांहीं लोकांच्या चैनीच्या

वस्तूंवरील जकात कमी व्हावी असें कांहींना वाटतें. मोदी दोन्हीं बाजूनें बोलत आहेत. गिऱ्हाइकांची बाजू आज ते घेतांना दिसतात. गिऱ्हाइकांची बाजू जर आम्हीं घेतली कीं संरक्षण नाहींसें होईल हें ते विसरतात. आतांच जेम्स म्हणतात कीं कांहीं धंद्यांना संरक्षण देण्याची जरुरी नाहीं. जकातीच्या धोरणानें लहानसहान धंदे वाढीस लागले आहेत तेही मारण्याचा जेम्सचा विचार दिसतो. चौकशी करून हाच परिणाम होणार असेल तर ती चौकशीच नको." चॅपमन मॉर्टिमर म्हणाले, "विशिष्ट जकात ठेवावी; सर्वसाधारणपणें किंमतीवर जकात ठेऊन व्यापार मंदावला आहे. किंमती वाढल्या म्हणजे उत्पादक बेतानें उत्पादन करतात. कारण गिऱ्हाइक कमी होतें. सन १९२१-२२ मध्यें जकातीपासून रु. ३४ कोटी उत्पन्न झालें म्हणजे एकंदर हिंदुस्थानसरकारच्या उत्पन्नापैकीं १६ टक्के. त्यावेळीं जकातीचा दर ११ टक्के होता. १९२२-२३ सालीं जकात १५ टक्के झाली व उत्पन्न रु. ४१ कोटी झालें. आज जकातीचें उत्पन्न रु. ४५ कोटी असून दर साधारणपणें २५ टक्के आहे. यावरून उत्पन्न वाढलें असलें तरी त्याचें कारण दर वाढला आहे व व्यापार कमी झाला आहे हें उघड दिसतें. यावरून कांहीं वस्तूंवर हल्लींचा दर जास्त आहे म्हणून त्यांची आयात कमी, जर दर कमी केला तर आयात वाढेल व आयात कराचें उत्पन्नही वाढेल. या सर्व प्रश्नांची योग्य चौकशी व्हावी एवढीच आमची मागणी आहे."

फडणिसांनीं सरकारतर्फे उत्तर देतांना मद्य, तंबाखू व अन्य चैनीचे पदार्थ यांवर कमी कर बसवून, श्रीमंतांना व्यसनी करून जगवावें व उत्पन्न वाढवावें हा एक थट्टेचा भाग आहे, असें सांगून हा देश बराच कालपर्यंत कृषिप्रधान राहिला पाहिजे ही सत्यमूर्तींची विचारसरणी बरोबर आहे असें प्रतिपादिलें. तें पुढे म्हणाले, "हिंदी उद्योगधंदेवाल्यांना जास्त जास्त संरक्षण पाहिजे आहे, मग सरकारी उत्पन्न कमी झालें तरी हरकत नाहीं. जकातीपासूनचें उत्पन्न ही एक महत्त्वाची बाब आहे. सरकारनें दक्ष राहिलें पाहिजे. जास्तीत जास्त व्यापार व जास्तीत जास्त उत्पन्न हें तत्त्व ठीक पण तसें घडत नाही. या सर्व वादांत गिऱ्हाइकाला कोणी विचारीतच नाही. त्याचें नांव काढणें पाप समजलें जातें. जकात मग ती निव्वळ उत्पन्न स्वरूपी ( Revenue ) असो अगर संरक्षक ( Protection ) स्वरूपीं असो, ती गिऱ्हाइकावर करच असते. ऐपतीप्रमाणें कर द्यावा हा सिद्धांत आहे. परंतु राष्ट्रीय अर्थवादाच्या (Economic Nationalism) वातावरणांत निराळा सिद्धांत

उपलब्ध झाला आहे. देशी भांडवलवाल्यांचा ज्यायोगें जास्त फायदा होईल, गिऱ्हाइकांवर जास्त बोजा बसेल व सरकारला कमी उत्पन्न येईल असेच कर असावेत हा तो आधुनिक सिद्धांत होय. ( Taxes that will increase the profits of domestic capitalists, which will press most hardly on consumer and yield little fisc. ) माझें स्वतःचें मत असें आहे कीं, चैनीच्या वस्तूंवर जास्त दरानें जकात ठेवून जास्त उत्पन्न उभें करावें, आवश्यक अशा मुख्य वस्तूंवर ( Articles of Staple Consumption ) सरकारला गरज असेल तेवढें उत्पन्न उभें करण्याकरितां शक्य तितकी कमी जकात ठेवावी. चैनीच्या वस्तूंवरील कमाल जकात व आवश्यक वस्तूंवरील बेताची जकात यांपासून पुरेसे उत्पन्न सरकारला न झालें तरच उत्पादनाचीं साधनें, यंत्रसामुग्री व कच्चा माल यांवर जकात बसवावी. हीं तत्त्वें डोळ्यासमोर ठेवून सर्व जकातीचा प्रश्न तपासून परिशिष्ट तयार करण्यांत यावें. हें काम सरकारचेंच आहे. कोणत्या वेळीं दर कमी करून उत्पन्न वाढेल हें सरकारनेंच ठरविलें पाहिजे. व्यापाराचा कल पाहूनच हें ठरविलें पाहिजे. तज्ज्ञांचें हें काम नाहीं किंवा सल्लागार कमिटीचा उपयोग होणार नाहीं." या भाषणानंतर युरोपियन गटानें आपली कपात सूचना परत घेतली. तथापि हा प्रश्न पुन्हां चर्चेस निघाला व एकंदर सरकारी धोरण स्पष्ट झालें. सर वासुदेव राजा हे एक मद्रासी जमीनदार आहेत. त्यांनी कपात सुचवून संरक्षक जकातीचा प्रश्न चर्चेस काढला. देशांत उद्योगधंदे वाढल्याशिवाय देश संपन्न होणार नाहीं, बेकारी जाणार नाहीं, रोजगार वाढणार नाहीं, भांडवल वाढीस लागणार नाहीं, असा फडणिसी कमिटीचा ( Fiscal Commission ) अभिप्राय आहे. उत्पन्नासाठीं जकातीचे-आयात जकातीचे-दर जास्तच असले पाहिजेत व त्यामुळे इच्छा असो अगर नसो, देशी धंद्यांना संरक्षण मिळणार हें स्पष्ट आहे. असाही अभिप्राय सदरहू समितीनें नमूद करून ठेविला आहे. संरक्षण दिलें म्हणजे उत्पन्न वाढतें असा अनुभव कांहीं काळ येतो. मोठ्या मोठ्या धंद्यांना सरकारनें संरक्षण दिलें पण लहान लहान घराऊ धंदे यांना संरक्षण नाहीं तें दिलें पाहिजे असें राजासाहेब यांचें म्हणणें पडलें. जपानचें निम्में उत्पादन लहान लहान केंद्रांतून घराऊ धंद्यापासून होतें; तेंच धोरण येथें स्वीकारावें व तें यशस्वी होण्यासाठी संरक्षक जकातीचें क्षेत्र वाढवावें अशी त्यांनीं मागणी केली. एका एका धंद्याला संरक्षण द्यावें की नाहीं हें ठरविण्यासाठीं सरकार ९ वर्षे घेतात हें अयोग्य आहे. टॅरिफ बोर्ड कायम

असावें व त्यानें लवकर लवकर येणारे अर्ज निकाली लावावेत अशी सूचना पण त्यांनीं केली.

या चर्चेत अनेकांनीं भाग घेतला व हा प्रश्न संपूर्णपणें चर्चिला गेला. सरकारी धोरण विवेकी संरक्षणाचें ( Discriminating Protection ) आहे तें सोडून निरपेक्ष संरक्षणाचें धोरण स्वीकारल्याशिवाय हिंदी धंदे वाढणार नाहींत असें म्हणणारे कांहीं लोक होते. खुद्द इंग्लंडमध्यें साखरेवर आयात कर असून देशी साखर धंद्याला उत्तेजन देण्यासाठीं हजारों पौंड मदत ( Bounty ) तेथील सरकार देतें. अनंत कालपर्यंत शेती माल व कच्चा माल या देशानें तयार करीत राहावें हा अन्याय आहे. हा देश उद्योगधंद्यांत पुढे गेलाच पाहिजे व त्यासाठीं वाटेल त्या प्रमाणांत संरक्षक जकाती बसवाव्यात असें अनेकांनीं सांगितलें. जकाती बसविल्या म्हणजे पदार्थांचे भाव वाढतात व गिऱ्हाइकांवर अन्याय होतो म्हणून उत्पादक व उपभोगी यांच्या हितसंबंधांत समतोलपणा ठेवला पाहिजे असा सरकारी दृष्टीकोन एका सरकारी सभासदानें मांडला. शेतीप्रधान व उद्योगप्रधान देश हें वर्गीकरणच चुकीचें आहे. अमेरिका हिंदुस्थानच्या ८ पट गहूं पिकविते.तेथील लोकसंख्या या देशाच्या लोकसंख्येच्या $\frac{1}{3}$ आहे. तथापि तो देश कोणी कृषिप्रधान म्हणत नाहीं. प्रत्येक देशांत दोन्ही तऱ्हेचें उत्पादन पाहिजे. त्याच्या गरजा लक्षांत घेऊन दोन्हींत तोल ठेवून व्यवहार झाला पाहिजे ही विचारसरणीही मांडण्यांत आली. संरक्षणानें धंदे उभारले गेले, ते यशस्वी झाले कीं अंतर्गत जकात बसवून कमी झालेलें सरकारी उत्पन्न भरून काढतां येतें. मात्र ही जकात प्रमाणानें बसविली पाहिजे. पदार्थांच्या किंमती वाढणार नाहींत अशी काळजी घेतली पाहिजे. जेवढे गिऱ्हाईक जास्त तेवढें उत्पन्न जास्त हें विसरता कामा नये असेंही एकानें सांगितलें. व्यापारमंत्री व रेल्वेमंत्री यांनींही चर्चेत भाग घेतला. झाफरुल्ला म्हणाले, " संरक्षण केव्हां द्यावें याबाबत 'फिसकल कमिशन'नें कांहीं अटी ठरविल्या आहेत. भरपूर कच्चा माल, भरपूर मागणी अगर भरपूर मजूर-पुरवठा असला पाहिजे. संरक्षण न दिल्यास फार काल पर्यंत सदरहू धंदा उभा राहाणार नाहीं अशी परिस्थिति असली पाहिजे. संरक्षण दिल्यापासून ठराविक कालांत सदरहू धंदा आपल्या पायावर उभे राहाण्याच्या परिस्थितींत आला पाहिजे. त्याला कायम संरक्षणाची जरुरी नसली पाहिजे. या धोरणाला अनुसरून लोखंड, पोलाद, साखर, कागद, कापड, कच्चें रेशीम वगैरे अनेक धंद्यांना सरकारनें संरक्षण दिलें आहे. शिवाय सर्वत्र उत्पन्नासाठीं जकात

आहेच, त्यामुळेंही अनेक इतर धंद्यांना संरक्षण मिळतेंच. अर्थात् उत्पन्नस्वरूपी जकातीची निश्चिती नसतेंच व पुरेसें संरक्षणही मिळत नाहीं हें खरें, तथापि कांहीं तरी संरक्षण मिळतेंच. सरकार सर्वांनाच कांहीं खूष करूं शकत नाहीं. नवीन प्रांतिक सरकारें व मध्यवर्ति सरकार यांनीं याच मार्गानें गेल्यास लवकरच प्रगति होईल." या भाषणानें सभागृहाचें समाधान झालें नाहीं व कपात मंजूर झाली.

याही वर्षी पुनः सैन्यांतील हिंदीकरणाचा प्रश्न स्वतंत्र पक्षानें कपात सुचवून चर्चेस आणला सात हजार गोरे अधिकारी जाऊन त्याजागीं हिंदी अधिकारी हल्लींच्या धोरणानें संपूर्णपणें येण्यास १०० वर्षें लागतील अशी तक्रार मुर्तजासाहेब यांनीं कपात सूचना मांडतांना केली. याही वेळेस मी भाषण केलें. ब्रिटीश भाग मोठ्या प्रमाणांत ठेवूनसुद्धां सरहद्दीवरील संरक्षण योग्यप्रकारें होत नाहीं. अनेक इंग्रज अधिकाऱ्यांचेंच म्हणणें देऊन सरहद्दीवरील मोहिमा अयशस्वी झाल्या व कायम शांततेच्या दृष्टीनेंही त्या कार्यक्षम ठरल्या नाहींत हें दाखवून दिलें. नंतर असलेलें सैन्य एकंदर दृष्टीनें जास्त आहे. हिंदीकरण म्हणजे नुसते हिंदी अधिकारी आणावयाचे हें नव्हे तर एकही गोरा सैनिक अगर अधिकारी राहातां कामा नये आणि हिंदी अधिकाऱ्यांचा पगार येथील परिस्थितीप्रमाणें असला पाहिजे. हें माझें म्हणणें ऐकतांच कित्येक नाखूष झाले. "या धोरणानें दरसाल निदान रु. २५ कोटी वाचतील. तेजस्वी, हुशार आणि सशक्त असे शेंकडो तरुण अधिकारी होण्यास लायक आहेत व तसा सरकारी अभिप्रायही आहे. लष्करी व बिनलष्करी वर्ग हा भेद खोटा आहे. युद्धतंत्र पार बदललें आहे. शरिराच्या आकारापेक्षा अकलेवर सैनिकाची कार्यक्षमता अवलंबून आहे ( Brains not bulk )," असें म्हणतांच कॅप्टन लालचंद म्हणाले, "अक्कल कांहीं तुमच्याच वाट्याला आली नाहीं." ताबडतोब मी म्हणालो "जाडजूड शरिरें कांहीं तुमचा मक्ता आहे असें मी म्हणत नाहीं. आमच्या बाजूसही लाला शामलाल आहेत." (प्रचंड हास्य) नंतर सोव्हिएट सरकारनें सबंध लष्कराची पुनर्घटना करून समाजांतील सर्व वर्गांना लष्करांत आणलें याची माहिती दिली व हें धोरण स्वीकारून हा कृत्रिम भेद नाहीसा करता येईल, लष्कर खरें राष्ट्रीय होईल, कमी खर्चाचें व पूर्वीपेक्षाही जास्त कार्यक्षम होईल." माझ्या भाषणानंतर मि. ग्रिफिथ यांनीं लायक माणसें मिळत नाहींत म्हणून तक्रार केली व एकंदर भाषणानें वातावरण कडवट केलें. गियासुद्दीन यांनीं उत्कृष्ट भाषण करून हिंदीकरणाला लॉर्ड रॉबर्टस यांनीं कसा विरोध केला हें सांगितलें.

हिंदी मनुष्य कितीही हुशार व शूर असला तरी तो ब्रिटीशांच्या बरोबर येऊं शकत नाहीं व ब्रिटिश अधिकारी व सैनिक त्याला तसें मानणार नाहीत म्हणून हिंदीकरण नको असें लॉर्ड रॉबर्टस यांचें मत त्यांनीं वाचून दाखविलें. लष्करी अधिकारी पण हिंदीकरणाचे विरोधी होते व हिंदी अधिकाऱ्यानें गोऱ्या सैनिकांवर हुकमत चालवावी या विरुद्ध सर्व ब्रिटिश अधिकारी होते. ( A deep-seated racial repugnance to any step which brings nearer the day when Englishman in the Army may have to take orders from Indians. ) व तसा त्यांचा अभिप्राय लॉर्ड किचनेर यांनी नमूद केलेला गियासुद्दीन ह्यांनी वाचून दाखविला. " आजही कांही सुधारणा करा म्हणतांच Kings Regulations च्या विरुद्ध कांहीं करतां येत नाहीं असें सांगण्यांत येतें. ' लष्करी खात्याचे चिटणिस महाशय तुम्ही या सर्व ब्रिटीश अधिकाऱ्यांना सांगा कीं, हिंदी सैनिकांवर जो अधिकार तुम्ही चालविता तो असह्य व न पाहवणारा ( abhorrent and repugnant) आहे. हा सर्व देशाच्या मानाचा प्रश्न आहे. हा अपमान यापुढें सहन होणार नाही. " चर्चेत इतर अनेकांनी भाग घेतला पण त्यांत नवीन मुद्दे नव्हते. टॉटनहॅम यांनीं उत्तर देतांना सांगितलें कीं, " गेल्या १८ वर्षांत गोरें सैन्य २०००० कमी केलें आहे. नवीन घटनेप्रमाणें सेनापती हे हिंदुस्थान सरकारांत रहात नाहींत. त्यांची जागा स्वतंत्र व सर्वसंरक्षणाची जबाबदारी यांची राहाणारच आहे. या सभागृहाला घटना बदलण्याचा अधिकार नाहीं. गव्हर्नर जनरल आपल्या मंत्र्याचा सल्ला घेईल, तो घ्यावा असें सूचनापत्रांतही म्हटलें आहे. " नवीन युगाची ही कल्पना दिल्यानंतर मतनोंदणीचा परिणाम काय होणार हें जाणून सरकारनें ती मागितलीसुद्धां नाहीं. कपात सूचना मंजूर झाली.

सरकारनें कामगार वर्गाच्या विम्यासंबंधीं एक पद्धतशीर योजना करून ती अंमलांत आणावी अशी श्री. जोशी यांची इच्छा होती. कपात सूचना ठेवून त्यांनीं हा प्रश्न चर्चेला मांडला. बेकारी, वार्धक्य, अपघात, आजार वगैरे बाबतींत अनेक खाजगी पद्धतीनें विमे उतरले जातात. कांहीं ठिकाणीं सरकार पण भाग घेतें. सर्वत्र सरकारनें हें काम आपल्या हातीं घ्यावें म्हणजे कमी खर्च येऊन कामगारांना भरपूर आधार मिळेल असें जोशी यांचें म्हणणें. गिरी यांनीं कॉंग्रेस पक्षातर्फे पाठिंबा दिला व मिळणारी मदत धर्म अगर दान म्हणून न मिळतां हक्क म्हणून सरकारनें दिली पाहिजे अगर देवविली पाहिजे अशी विचार-

सरणी मांडली. सरकारतर्फे उत्तर देतांना सर फ्रँक नॉईस म्हणाले "हा प्रश्न नवीन घटनेप्रमाणें प्रांतांचा आहे, त्यांनीं तो आतां सोडवावा." नवीन घटनेचा अंमल याप्रमाणें मध्यवर्ति सरकारनें सुरू केला ! ! तथापि खुद्द मध्यवर्ति सरकारच्या अधिकारांतील बाब म्हणजे परदेशीं असलेल्या हिंदी लोकांचें हितसंरक्षण. ही कपातसूचना देऊन ती कॉंग्रेस पक्षानें चर्चेला मांडली. मोहनलाल सक्सेना यांनीं निरनिराळ्या ब्रिटिश वसाहतींत हिंदी लोकांवर कसकसा अन्याय होतो याचा पाढा वाचला. निव्वळ प्रवासासाठीं गेलेल्या लोकांनासुद्धां अपमान सहन करावा लागतो व तोसुद्धां केवळ हिंदी म्हणून व हें सर्व कायद्याच्या नांवाखालीं होतें. हिंदी लोकांची बाजू घेण्याबद्दल दक्षिण आफ्रिकेंतील मंत्री मि. हॉमफ्रेयर यांना मंत्रीमंडळांतून बाहेर पडावें लागलें. सरकारी प्रचारक हिंदी लोकांचा द्वेष करावा म्हणून तेथील स्थानिक रहिवाशांना सांगतांना आढळून आल्याचेंही वृत्त सक्सेना यांनीं निवेदन केलें. सार्वजनिक उद्यानांतून गोऱ्याकरितां बाकें निराळीं, तीं हिंदी लोकांना वापरण्यास मनाई आहे अशी माहिती दिली. रेल्वेखात्याची चौकशी करण्याकरितां मात्र येथील सरकारनें दक्षिण आफ्रिकेंतील गोरा गृहस्थ नेमला. रेल्वेखातें हिंदी मंत्र्याकडे. परदेशस्थ हिंदी हें खातेंही हिंदी चिटणिस यांच्या देखरेखीखालीं ! ! धोरणांत मतभेद नाहीं. गांधी, सरकार, मुसलमान सर्वांचें एकमत पण कांहीं होत नाहीं. ब्रिटिश अमलाखालील वसाहतींत ही स्थिति आहे तर स्वतंत्र परकी देशांत काय असेल हें विचार करण्याचें कारणच नाहीं. दक्षिण आफ्रिकेच्या पार्लमेंटमध्यें, एकानें हिंदी लोकांनीं गोरे नोकर नेमूं नयेत व दुसऱ्यानें हिंदी पुरुषांनीं हिंदी व्यतिरिक्त स्त्रियांशीं लग्न केलें असल्यास तें बेकायदेशीर मानावें अशीं दोन बिलें आलीं असून हिंदी लोकांवर तीव्र अन्याय होणार आहे याची जाणिवसुद्धां येथील सरकारला नाहीं. काय ही उपेक्षा ! ! सरकार म्हणतें, वाट पहा, धीर धरा. प्रयत्न चालू आहेत. तुमचा दवा साप चावलेला मनुष्य मेल्यानंतर येणार कां ? मोहनलाल संतापानें प्रश्न विचारून बसले. हुसेनभाई लालजी यांनीं अनेक वसाहतींत पूर्वी असलेलें सैन्य हिंदी खर्चानें होतें असें सांगितलें व पुढें म्हणाले, "जेव्हां जेव्हां मी इटालियन अगर जर्मनांच्या मालकीच्या वसाहतींत जाई तेव्हां ते म्हणत, तुम्ही आम्हीं ब्रिटिश वसाहतींत एका रस्त्यावरूनसुद्धां जाऊं शकत नाहीं, तुमचें सरकार हा अन्याय कसा सहन करतें ? कोट्यावधी रुपये तुम्ही सरकारला देतां, सरकारनें तुमच्याबद्दल कांहींतरी निष्ठा दाखविली पाहिजे. आम्हांला

सांगण्यांत येतें कीं हिंदुस्थान मोठा देश आहे, त्याबाहेर कशाला जाता ? ठीक आहे, आम्ही बाहेरचे आंत येतो पण येथील सर्व परदेशीं लोकांनीं बाहेर जावें, आमची होणारी लूट थांबवावी. तुम्ही राहाणारच व आमचे लोक परत धाडणार हा अन्याय आहे, अनीति आहे. हा काय साम्राज्यांत राहाण्याचा फायदा ?" "बाहेर निघा कीं ! सोडा मोह" एकानें सल्ला दिला. "त्याचाच विचार करण्याची वेळ आली आहे" हुसेनभाई उत्तरले. मि. जेम्सनें सहानुभूति दाखविण्याचा देखावा करून म्हटलें, "आपण सारखा प्रयत्न केला पाहिजे, भांडलें पाहिजे, धीर धरला पाहिजे. आपल्याला खास चांगला भविष्यकाळ आहे असा विश्वास धरला पाहिजे. ब्रिटिश साम्राज्याचा अभिमान व प्रतिष्ठा राखण्याचा हा प्रश्न आहे. या कामीं युरोपियन गट शक्य ती सहानुभूति दाखवील."

सरकारतर्फे बाजपेयी यांनीं सांगितलें, "या सरकारचें धोरण हिंदी लोकांना सर्वत्र समतेची वागणूक मिळावी हें आहे. हिंदुस्थान हें ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें समान दर्जाचें राष्ट्र आहे व त्यादृष्टीनें सर्व साम्राज्यांत समान नागरिकत्वाचे हक्क स्थायिक झालेल्या हिंदी माणसास असणें जरूर आहे असा ठराव सन १९२१ मध्यें साम्राज्य परिषदेंत करण्यांत आला आहे. १९२३ सालीं केनियामध्यें हिंदी लोकांना शेतजमिनी घेण्यास बंदी करण्यात आली. या व्यतिरिक्त कायद्यानें अन्य कोठल्याहि वसाहतींत हिंदी लोकांविरुद्ध पंक्तिप्रपंच केला गेलेला नाहीं. १९२३ सालानंतर सन १९३५ मध्यें पुन: केनियांत हिंदी हक्क आणखी मर्यादित करण्याचे प्रयत्न झाले. पण ते आम्हीं थांबविले. दक्षिण आफ्रिकेंत गांधीजींनीं तडजोड केल्यानंतर सन १९१३ चा कायदा पास करण्यांत आला व आशियांतील लोकांना बंदी करण्यांत आली व यामुळें परवानगीशिवाय कोणाहि हिंदी गृहस्थास तात्पुरतें सुद्धां तेथें जातां येत नाहीं. सन १९१३ पासून परिस्थिति कायम आहे. सन १९२४–२५ मध्यें दक्षिण आफ्रिकेच्या पार्लमेंटनें दोन बिलें आणून गोऱ्या लोकांसाठीं खास जागा निवासासाठीं राखून ठेवण्याकरितां व काळ्यांना निराळें ठेवण्याकरितां योजना केली होती. त्यावेळीं हिंदुस्थान सरकारनें प्रयत्न केले व तीं बिलें परत घेण्यांत आलीं. १९३० सालीं ट्रान्सव्हॉलमध्यें हिंदी लोकांनीं जमिनी विकत घेऊं नयेत म्हणून एक बिल आलें होतें. त्यावेळीं सरकारनें खटपट केली. सरोजिनीबाई नायडू यांचें शिष्टमंडळ तेथें गेलें व तेंही बिल परत घेण्यांत आलें. आतां पुन्हां दोन बिलें आणण्यांत आलीं आहेत. तीं निवडक कमिटीकडे धाडण्यांत

आलीं आहेत, त्यांचें नक्की स्वरूप काय राहतें हें पाहून नंतर सरकार काय करावयाचें तें ठरविणार आहे. मध्यंतरीं आमचें म्हणणें मांडण्यासाठीं तेथील एजंट जनरला सांगण्यांत आलें आहे. आपल्या लोकांची प्रतिष्ठा व अभिमान राहील यासाठीं हिंदुस्थान सरकार शक्य ते प्रयत्न करील. झांजीबारच्या बाबतींत आम्हाला उशीरा माहिती मिळाली. आमचा प्रतिनिधि तेथें जाण्यापूर्वीच तेथील कौन्सिलनें लवंगाच्या व्यापाराबद्दल कायदा करून टाकला. मि. मेनन यांना धाडण्यांत आले. त्यांनीं रिपोर्ट केला. नंतर मि. बाइंडर यांना या कायद्याचा परिणाम काय होतो हें पाहण्यास धाडले. नंतर बोझमन गेले व त्यांनीं हिंदीहितासंबंधीं दक्षता घेतली. बाइंडर कमिटीचा रिपोर्टही आला. लवंगाच्या व्यापाराबाबत व कर्जकायद्याबाबत आम्ही सारखे प्रयत्न करीत आहोंत. जमिनीवर हिंदी लोकांनीं कर्ज दिलें आहे व नवीन कायद्याप्रमाणें कर्जापायीं जमिनी विकल्या जाणार नाहींत. हिंदी व्यापाऱ्यांना नुकसान पोहोंचणार हें उघड आहे. तथापि आम्ही शक्य तें करीत आहोंत या स्थितींत सभागृहानें निंदाव्यंजक कपात पास न करतां आम्हांस पाठिंबाच द्यावा.”

नंतर भुलाभाई बोलले, “ साम्राज्य सरकारचें स्वयंशासित वसाहतींपुढें कांहींही चालणार नाहीं. किन्स म्हणतात त्याचप्रमाणें या स्वायत्तवसाहति उभयतांच्या संमतीनें बाहेर पडल्या आहेत. ( British Empire is by common consent disintigrating except the Colonies and India. ) तथापि जर एखाद्या इंग्रजाला वसाहतींत हिंदी लोकांप्रमाणें वागविण्यांत आलें तर ब्रिटिश सरकार आकाशपाताळ एक करील. येथील सरकार आम्हास जबाबदार नाहीं पण समर्थही नाहीं. आम्हास जबाबदार नाहीं म्हणून आमच्याशीं माजोरीपणा पण ब्रिटिशांपुढें अगदीं भेदरट वृत्ति या सरकारनें ठेवावी ही अगदीं नामुष्कीची गोष्ट आहे. परदेशस्थ हिंदी लोकांसाठीं जें कोणीं चांगलें केलें तें गांधीजींनीं हें जगजाहीर आहे. दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी कॉंग्रेसनें नवीन बिलांचा तीव्र निषेध केला आहे. गोऱ्या बायका करणें हिंदी लोकांना अशक्य केलें जाणार आहे व कारण काय तर म्हणे मिश्रप्रजा नसावी. हा हिंदी लोकांचा अपमान आहे. आज दक्षिण आफ्रिकेंत १० लाख मिश्रप्रजा आहे व हा सर्व प्रताप गोऱ्या लोकांचा आहे ! ! बिलें निवडक कमिटीकडे गेलीं आहेत पण त्यांतील दोन सभासदांशिवाय सर्वांना हीं हवीं आहेत. थांबण्यानें काय होणार आहे ? विलंब करून कालहरण करावयाचें हा सरकारचा हेतू आहे. सामर्थ्य असेल तें दाखविलें पाहिजे.

सर्व दक्षिण आफ्रिकेंतील गोऱ्यांना येथें बंदी केली पाहिजे. सन १९२४ मध्यें एक कायदा या सरकारनें पास केला आहे, त्याप्रमाणें ही बंदी करतां येईल. ज्या वसाहतींत हिंदी लोकांना योग्य हक्क नाहींत, त्या वसाहतींतील गोऱ्या नागरिकांना येथें बंदी करण्याची सोय या कायद्यांत आहे. सरकारनें नियम करून हें तावडतोब करावें. ब्रिटिश पार्लमेंट हिंदुस्थानाला नीट वागवत नाहीं, ठीक आहे. आम्ही आमच्या देशबांधवांसाठीं वाटेल तें करूं व समता मिळवूं. सरकारानें आपला विवेक आणि आपलें नामर्दाचें शहाणपण स्वतःजवळ ठेवावें. ("You may keep your ways of prudence and wisdom of cowards to yourselves. ") इतकें जोरानें व इतकें टाकून भुलाभाई कधीच बोलले नाहींत. सर जगदीश कुंवर हे मुद्दाम चर्चेच्या वेळीं हजर होते. त्यांनीं नंतर ५।१० मिनिटें भाषण केलें व सहानुभूतीनें सरकाराकडे पहावें म्हणून याचना केली. सर्व पक्षांनीं मान्यता दिल्यामुळें कपातसूचना पास झाली व एका महत्त्वाच्या प्रश्नाबद्दल सभागृहाचें मत जाहीर झालें.

दरसालप्रमाणें राज्यकारभारावर व सर्वसाधारण सरकारी धोरणावर टीका करून निषेध करण्याच्या दृष्टीनें काँग्रेस पक्षानें कपातसूचना मांडली व ती मांडण्याचें काम पक्षाचे नेते भुलाभाई यांनीं केलें. निरनिराळ्या खात्यांबाबत कपातसूचना सुचवून चर्चा झालीच होती पण कार्यकारी मंडळाच्या मागणीस कपात सुचवून, राज्यकारभाराविरुद्ध निंदाव्यंजक ठराव पास करण्याची ही प्रथा काँग्रेस पक्षानें पाडली होती. आपल्या भाषणांत भुलाभाईंनीं सर्व राज्यकारभाराचें सिंहावलोकन केलें व सर्वत्र अपयश व निराशा दिसून येते असा अभिप्राय दिला. व्यक्तिस्वातंत्र्यावर घाले घातले, सरहद्दींत स्वतंत्र जमातींवर हल्ले केले, रेल्वेकारभार कार्यक्षम करूं शकले नाहींत, परदेशस्थ हिंदी लोकांचे हितसंबंध राखले नाहींत, देशांतील संपत्तींत भर घातली नाहीं, व्यापाराला उत्तेजन दिलें नाहीं. यशाची व मानाची देशाच्या कल्याणाची कोणतीही गोष्ट विद्यमान सरकारनें केली नाहीं. फक्त देशामध्यें पहारा ( Policing of this country ) केला. एवढेंच आधुनिक सरकारचें काम नाहीं. सर्व दृष्टीनें सरकार अपयशी झालें आहे असा स्पष्ट निकाल त्यांनीं दिला. अनेक सभासदांनीं चर्चेंत भाग घेतला व आपापल्या दृष्टीनें कारभारावर टीका केली. रेल्वेमंत्री झाफरुल्ला यांनीं सरकार अगदींच बेमुर्वत नाहीं असें सांगितलें. निरनिराळ्या खात्यांत सरकारनें

लोकमताचें किती प्रमाणांत ऐकलें याचा तपशील दिला. " विरोधी पक्षानें टीकाच करावयाची असते हें खरें, तसें न केलें तर सनदशीर सरकार चांगल्या रीतीनें चालणार नाहीं. पण टीका अतिव्याप्तीच्या स्वरुपाची नसावी. विद्यमान घटनेंत विरोधी पक्षाची भूमिका विचित्र आहे हें मी मान्य करतो, तथापि सरकारचीही भूमिका तशीच विचित्र व बिलक्षण आहे हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे. या परिस्थितींत विरोधी पक्ष सरकारचा पराभव करून अधिकारारूढ होऊं शकत नाहीं. तथापि हें जाणूनच त्यांच्या टीकेला जास्त मान द्यावयास पाहिजे व सरकार देत आहे. सरकार जर कोठें मान देऊं शकत नसेल तर अन्य व अपरिहार्य कारणांमुळेंच देऊं शकत नाहीं हें होय. " नरम वातावरणांत या प्रकारें त्यांनीं भाषणाचा शेवट केला. अणे यांनीं सरकारची वृत्ति बेगुमानपणाची व विरोधीपक्षाला कस्पटासमान लेखण्याची आहे अशी तक्रार केली. नंतर त्यांनीं फडणिसी खात्यावर टीका करून म्हटलें, " या अव्यवस्थेमुळें प्रांतिक स्वायत्त सरकारांचें काम बिकट करून ठेवलें आहे. ज्या प्रमाणांत ही नवीन स्वायत्त सरकारें अपेशी ठरतील, त्या प्रमाणांत, पूर्वींच्या सरकारची अव्यवस्था कारणीभूत होती असेंच मानलें पाहिजे. ही घाण काढण्यास ५।२५ वर्षें लागतील. कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणतात त्याप्रमाणें कॉंग्रेसचा खराटा या घाणीवर लवकरच फिरेल व ती दूर करील. कायदेमंडळांत व खुद्द सरकारांत सांचलेली घाणसुद्धां त्यांना काढावी लागेल. ती निघत असतांना कोणाकोणाला खराट्याचा रट्टा बसेल हें मला सांगतां येणार नाहीं." सूचक भविष्य वर्तवून त्यांनीं कपातसूचनेला पाठिंबा दिला. सर फ्रँक नॉईस यांनीं विरोध करतांना सांगितलें, " आम्हीं निव्वळ अंमलदार आहोंत, राजकारणी नाहीं, त्यामुळें आमची बाजू आम्हांला चांगली खुलवून मांडतां येत नाहीं. विरोधी पक्षांतील लोकांनीं चांगली बाजू वाईट आहे असें दाखवून दिलें आहे. ( The better cause appears the worse. ) ही विद्या मला अवगत नाहीं. आमची तुतारी फुंकणारे येथें कोणीही नाहींत!!" एवढी प्रस्तावना करून पोस्ट, तार, विमान, शिक्षण वगैरे खात्यांतून सरकारनें काय केलें याचें वर्णन केलें व तें ऐकून तुतारी वाजविण्याची कला त्यांच्याजवळ आहे अशी सभागृहाची खात्री झाली. सर कावसजी यांनीं सन १९१९ च्या कायद्यांत जरी जबाबदारीचें तत्त्व नसलें तरी व्यापकपणें घटनेचा अर्थ सरकारनें लावावयास पाहिजे होता अशी तक्रार केली. हळुहळूं घटनेंत न कळता कांहीं प्रगति झाली

आहे, शब्दशः घटना कायदा घेऊन चालणार नाहीं. ज्या वृत्तीनें सन १९१९ चा घटनाकायदा मानला पाहिजे होता, त्याप्रमाणें होत नाहीं म्हणून सरकार व जनता यांत तेढ उत्पन्न होत आहे याबद्दल त्यांनीं खेद व्यक्त केला. पंतजींनीं सांगितलें कीं, "कार्यकारी मंडळांतील हिंदी सभासदांनीं स्वाभिमान दाखवाव-यास पाहिजे. नुसतें कायद्याकडे बोट दाखवून असमर्थता दाखविणें त्यांना न शोभणारें आहे. जर हिंदुस्थानमंत्री हिंदी हितास विरोध करीत असेल तर त्यांनीं बाहेर पडावयास पाहिजे. स्वाभिमानानें त्यांना तेथें राहातां येत नाहीं. कोणीही हिंदी इसम कार्यकारी मंडळांत नसला म्हणजे देशावरील जुलूम, जगाच्या नजरेस अधिक स्पष्टपणें येईल. या अनीतिमान राज्यकारभाराला एक दोन हिंदी इसम जोडून त्याला नीतीचा उजाळा देण्याचा हा डाव सर्वांनीं ओळखला पाहिजे. त्यांनीं असहकार केला कीं हें यंत्र कोलमडेल. सन १९१९ ते आजतागायत अन्य देशांत–इंग्लंडांत–सर्वत्र प्रगति झाली. सोव्हिएट रशियांत तर कमालीची प्रगति झाली आहे. येथें शिक्षणांत नाममात्र वाढ, उत्पादनांतही बेताचीच वाढ, दडपशाहींत मात्र अफाट वाढ आहे. निवडणुकीच्या वेळीं कसें वागलात? आतां म्हणतां, प्रांतांत कामगिरी करून दाखवा. पण अशी परिस्थिति तुम्ही निर्माण करून ठेविली आहे कीं कोणाला कांहींच करतां यावयाचें नाहीं व हें अगदीं खबरदारीनें करण्यांत आलें आहे. गव्हर्नरच्या खास अधिकारांची तलवार लटकत ठेवून प्रांतांत काय बाढ होणार? तुम्ही गेल्या १५० वर्षांत इतकीं दुष्कृत्यें–हा सुद्धां सौम्य शब्द–केलीं आहेत कीं तीं जर एखाद्या निःपक्षपाती न्यायाधिशासमोर मांडलीं तर तुम्हांस तो देहान्त शासन करील. या देशांत सर्वांचे गळे दाबण्याचा शक्य तेवढा प्रयत्न तुम्ही केला आहे, सर्व प्रांतांची तीच स्थिति केली आहे. याला उपाय म्हणजे ही सगळी राज्यपद्धति गळा दाबून निकाली लावली पाहिजे. तोंपर्यंत दर मिनिटाला तुमचा निषेध योग्य आहे व ही राज्यपद्धति आम्ही चालून देतों म्हणून आमचाही निषेध त्यांत आहे." (The censure will be there for you, although this censure has to be borne also by us every minute of our life for tolerating this system.) बुद्धी, भावना, संताप, संयम, टीका, आत्मनिरिक्षण वगैरे अनेक लक्षणांनीं सजलेलें हें भाषण संपताच ताडकन फडणिस उठले व बोलूं लागले, "विद्यमान घटना निष्फळ आहे, विचित्र आहे, हें सत्य आहे. जबाबदार राज्यपद्धतींत फडणिसाला पाठिंबा देणारा पक्ष तयार असतो. येथें माझ्यामागें पक्ष नाहीं. शांत बसलेले व

आम्ही नेमलेल्या सभासदांचासुद्धां पाठिंबा मिळेल कीं नाहीं याची खात्री नसते. विरोधी पक्षाला अधिकार ग्रहणाची व्यवस्था नाहीं. पण त्याचबरोबर लोकमताचा पाठिंबा व तदंगभूत संघटना आमचें धोरण अमलांत आणण्यास आमच्या हातीं नाहीं. हल्लींची घटना वाईट पण नवीन कां टाकतां ? नवीन घटनेनें राज्यकारभाराचा बोजा व जबाबदारी लोकप्रतिनिधींवर बसणार आहे. हल्लींच्या घटनेनें तुम्हांस पाहिजे तें आम्ही करूं शकत नाहीं व आम्हांस तुम्ही घालवूं शकत नाहीं. नवीन घटना स्वीकारल्यास तुम्ही निदान आम्हाला तरी घालवाल. आम्हांवर निंदाव्यंजक ठराव आणण्यांत काय अर्थ आहे ? बेफाम विरोध व बेमुर्वत सरकार ( Irresponsible Opposition and Irremovable Government. ) हा पेंचप्रसंग सुटण्याची वेळ निवडणुकीच्या निकालानें आली आहे. बेजबाबदार विरोधी पक्ष व बिनबदल सरकार हा तेढा अधिकार ग्रहणानेंच सुटणार. अधिकारग्रहण केल्याबरोबर एक महान ओझें वाहण्याचें कार्य तुमच्यावर पडणार आहे. लोकांवर राज्य करण्याची जबाबदारी व त्याहीपेक्षा स्वतः संयम दाखविण्याची जबाबदारीही लहानसहान गोष्ट नाहीं. हें एक ओझें आहे व आधुनिक इतिहासकार त्याला अंत नसलेलें धाडस ( Endless adventure ) म्हणतात. अधिकारग्रहणानंतर विरोधीपक्षाला सर्व प्रश्न सोपे व सहज सुटणारे आहेत असें वाटणार नाहीं. तसे सोपे उपाय व इलाज असते तर यापूर्वीं कुणाला तरी सुचले असतेच. अधिकारावर बिराजमान असतांना स्तुतीची अगर बक्षिसाची आशा त्यांनीं धरूं नये. कटकटी व कृतघ्नता हेंच त्यांचें नशीब आहे. सारखे नवे नवे व न सुटणारे प्रश्न उपस्थित होतील व शेवटीं विशाल आकांक्षा असतांना पदरीं पडलेली सिद्धी म्हणजे अगदींच अल्प हा अनुभव त्यांना येईल. अधिकारग्रहण न केल्यास जें काय इतर करीत होतें तें वाईट व अप्रामाणिकपणें करीत होते ही टीका केली जात होती, तशी करण्याचा त्यांना अधिकार राहाणार नाहीं. मागें अव्यवस्था होती असें म्हणून कांहीं होणार नाहीं अशी आगाऊच सूचना पंतांनी केली आहे ! हें चालणार नाहीं. काय करावयाचें हें ठरविण्याचा क्षण आला आहे !" "होय आला आहे" भुलाभाई म्हणाले. "माझ्या अनेक देशबांधवांनीं या देशाची सेवा केली आहे. तथापि त्यांना स्वार्थी व अप्रामाणिक म्हणण्यांत येतें. येथें तर तो दररोजचाच कार्यक्रम आहे. मी व माझे देशबांधव, विरोधीपक्ष योग्य निर्णय घेईल अशी आशा करतो व तसा घेतल्यानंतर आम्ही केलेले प्रयत्न व केलेल्या चुका

यांकडे ते अधिक सहानुभूतीनें पाहातील व शेवटीं आम्हां परक्यांना जास्त करतां आलें नाहीं म्हणून जशी निराशा वाटते व भ्रमनिरास होतो, अगदीं तीच स्थिति या पक्षाची होईल." तीन वर्षांत अगदीं प्रथम उत्तान भाषण न करतां, नरमाईनें केलेलें हें भाषण ऐकून अनेक सभासद चकित झाले. तथापि कपात-सूचना ६८ विरुद्ध ४८ मतांनीं पास झाली व एक चांगली गोष्ट केल्याच्या समाधानांत आम्हीं त्या दिवशीं घरीं गेलों.

सरकारच्या दडपशाहीचा अंमल कायम स्वरूपाचा असल्यामुळें दरसाल दडशाहीच्या धोरणाचा निषेध करण्याकरितां कपात सुचविली जाई. यावर्षीं सदरहू सूचना काँग्रेस नॅशनॅलिस्ट पक्षानें सुचविली. अखिल दत्त यांनीं परिस्थिति बदलली असतांनासुद्धां सन १९३६ अखेर एकट्या बंगालमध्यें १२३१ स्थानबद्ध कैदी असल्याचें सांगितलें. "याशिवाय ग्रामबद्ध अनेक होते, अनेकांच्यावर जुलमी निर्बंध लादण्यांत आले होते. दररोज कोणींतरी स्थानबद्ध होत आहे व कोणाला तरी प्रांत सोडून जाण्याचा हुकूम होत आहे. या स्थानबद्धांची चौकशी व्हावी अगर त्यांना सोडून द्यावें असें अनेक वेळां विनवण्यांत आलें, पण सरकार कांहींही करीत नाहीं. अद्याप कांहीं काँग्रेस कमिट्या बंगालमध्यें बेकायदेशीर आहेत. त्यांच्यावरील बंदी दूर केली गेली नाहीं. २६ जानेवारीला पूर्वीचीच स्वातंत्र्याची प्रतिज्ञा असतांना तिला बंदी करण्यांत आली. राजद्रोह, राजद्रोह म्हणून घोपटावयाचें. निवडणुकींच्या ऐन रंगांत अनेक काँग्रेस उमेदवारांच्या घरांच्या झडत्या झाल्या. सालोसाल दडप-शाही वाढतच आहे" असें सांगून आपलें भाषण संपविलें. सरकारतर्फे एस्. एन्. रॉय यांनीं प्रथम भाषण केलें. ते म्हणाले, "१९०८ सालीं या चळवळीला सुरवात झाली व सन १९३४ पर्यंत ती चालूच होती. त्या सालीं बंगालचे गव्हर्नर अंडरसन यांच्या खुनाचा प्रयत्न झाला. त्यामुळें लोकमत या दहशतवादी लोकांच्या विरुद्ध जाऊं लागलें. हा एक त्यांतून फायदा झाला. स्थानबद्धांना शिक्षण देण्याची व्यवस्था केली जाते. ठराविक मुदतीनंतर त्यांच्या प्रकरणांचा फेरविचार केला जातो. तरुण स्थानबद्धांच्या पालकांना विचारांत घेऊन सुटकाही करण्यांत येते. एकदम सर्वांना सोडणें धोक्याचें आहे. बंगालमध्यें तरी 'दडपशाहीचा कायदा' बहुमतानें पास झाला आहे. शक्य तेवढें सहानुभूतीनें सरकार वागत आहे. अमरेंद्र चतर्जीनीं, "दमननीतीमुळेंच काँग्रेसला निवडणुकींत जय मिळाला. आयर्लंड, इजिप्त सर्वत्र या नीतीमुळें सरकारचा पराभव होऊन स्वातंत्र्यवादी लोकपक्ष पुढें आला"

असें सांगून ते म्हणाले, "केवळ समाजसत्तावादी मतें असल्याबद्दल लोकांना स्थानबद्ध करण्यांत आलें आहे. कांहीं स्थानबद्ध गेलीं २१ वर्षे केवळ संशयावरुन तुरुंगांत आहेत ! ! त्यांची उघड चौकशी नाहीं. सरकारचा स्वतःच्या कोर्टांवर विश्वास नाहीं. नातेवाईक शांत राहतील असें सरकारला कसें वाटतें ? तेही भडकतात व दहशतवाद वाढतो. सरकारनें ही नीति सोडली पाहिजे." मी कॉंग्रेस-पक्षातर्फे भाषण करतांना सांगितलें, "अनेक संस्थांवरील बंदी उठली नाहीं. खुद्द पुण्यांत एका वर्षात 'काळ' 'सकाळ' व 'लोकशक्ति' यांच्याकडून जामीन मागण्यांत आला. स्वातंत्र्यदिनाच्या सभेस लोकांनीं जाऊं नये म्हणून अधिकाऱ्यांनीं गुप्त रितीनें खटपट केली. अनेक लोकांना स्थानबद्ध करण्यांत आले. अनेकांवर भाषणबंदीचे हुकूम सोडले. निवडणुकींतून तर बहुतेक प्रांतांतून हस्तक्षेप करण्यांत आला. दडपशाही ही जीर्ण व जुनाट नीति झाली आहे हें सरकारनें ओळखावयास पाहिजे. सरकार चिंतितें एक पण कॉंग्रेस दुसरेंच करून तें निकालीं लावतें. ( Government proposes and Congress disposes. ) देशांतील कायद्यानें आपला हवि पूर्णपणें घेतला आहे; न्यायालयाचा रथ, जगन्नाथाच्या रथाप्रमाणें चालून मार्गास लागला आहे. फांशीं देणाऱ्यांचेंही काम संपलें पण एवढें झालें तरी तकलुपि सुधारणा सरकार थांबवूं शकलें नाहीं अगर कॉंग्रेसला चिरडूं शकलें नाहीं. दडपशाहीनेंच क्रान्ती निर्माण होते हा ऐतिहासिक सिद्धांत आहे. ( The law of the land has exacted its pound of flesh; the Judiciary has run its course like the Car of Jagannath. The hangman has done his work and yet, inspite of all these things, neither the shadowy reforms could be prevented nor the Congress crushed. Repression leads to revolution that is the historic law. ) भाषणबंदी, सभाबंदी असतांना दडपशाही नाहीं म्हणणें यावर विश्वास निदान विरोधीपक्ष तरी ठेवणार नाहीं." घनःशाम गुप्त, कुलधर छालिया, मंगलसिंग यांनीं आपापल्या प्रांतांतील दडपशाहीचीं उदाहरणें दिलीं. सरकारचें धोरण योग्य होतें हें सांगण्याचा मान नेहमींप्रमाणें सर हालीम गझनवी यांनीं घेतला. नेहमींप्रमाणें असंबद्ध भाषण केलें. नेहमींप्रमाणें सभासद त्यांना सतावीत होते. 'हेंच भाषणस्वातंत्र्य जर कॉंग्रेस अधिकारावर आल्यावर मिळणार असेल, तर कठीणच काम आहे' असा त्रागाही त्यांनी केला. शौकतमीयांनीं सरकारनें नवीन धोरण स्वीकारावें असें सुचविलें.

भुलाभाईंनीं दडपशाहीच्या धोरणाचें पृथ:करण करतांना सांगितलें दडपशाही शेवटीं करणाऱ्यांवरच उलटतें. "तरुण, हुषार, तेजस्वी माणसें शेवटीं दहशतवादी होतात याला कारण सरकारचें राजकीय धोरण हेंच होय. आकांक्षांना वाव नाहीं. कर्तृत्वाला क्षेत्र नाहीं. वातावरण निराशाचें. या स्थितींत हेंच होणार. शिक्षा दिल्यानें सुधारणा न होतां उलट परिणाम होतो. तुरुंगांतसुद्धां जाण ते अधिकारी हें ओळखतात व फार शिक्षा झालेल्या कैद्यास बॉर्डर करून त्यांच्या अंगच्या सद्गुणांस वाव देतात. फटक्यानें जें काम होत नाहीं तें या धोरणानें होतें. कैदी सुधारतात. बंगालसारख्या तेजस्वी, देशाभिमानी व बुद्धीमान प्रांतांत दडपशाही केल्याबद्दल गृहमंत्र्यांनीं सभागृहाची माफी मागावयास पाहिजे आहे. तुम्ही या तरुणांना गुन्हेगार म्हणा, पण स्वतंत्र हिंदुस्थान त्यांना स्वातंत्र्याच्या सत्कार्यांतील हुतात्मेच समजेल. देशप्रेम हा सद्गुण नाहीं कां ? देशप्रेमासाठीं मागील युद्धांत हजारों जर्मनांना कंठस्नान घालणाऱ्या इंग्लिश युवकांना व्हिक्टोरिया क्रॉस बहाल केलेत ना ? मोठ्या प्रमाणावर घातपात झाले म्हणजे ते चांगले व देशभक्तीचें द्योतक असें आहे कां ? केवळ व्यक्तीनें केलें म्हणून त्याचा निषेध करावा काय ? हीं तरुण माणसें मार्ग चुकलीं असलीं तरी त्यांचा हेतू वाईटच असें कसें मानणार ? स्वतंत्र देशांत याच तरुणांतून सैनिक भरती झाली असती. त्यांना देशप्रेमी म्हटलें तर त्याचा निषेध करतां येणार नाहीं म्हणून तुम्ही त्यांना अराजक म्हणता. त्यांना तुमचें राज्य नको. हिंदी लोकांचें राज्य पाहिजे आहे. लवकरच या देशाचा कारभार हिंदी लोकांच्या हातीं येणार म्हणून तुम्हीं म्हणतां. मग यावेळीं तरी नीट बोला. या स्थानबद्धाना कां अटकेंत ठेवतां ? कोणता गुन्हा ते करतील हें सुद्धां तुम्ही सांगूं शकत नाहीं. गुन्ह्याची व्याख्यासुद्धां करूं शकत नाहीं. कांहींतरी अगम्य गुन्हा सुटल्यावर ते करतील म्हणून त्यांना आज अटकेंत ठेवावयाचें हा खासा न्याय. २० वर्षे याप्रमाणें अटक, विनाचौकशी अटक !! एवढे अन्याय केल्यानंतर तुम्ही लोकांच्या हातीं राज्यकारभार देणार. नूतन सरकारचें प्रथम कृत्य म्हणजे या लोकांची मुक्तता करणें हेंच असलें पाहिजे. जातां जातां तरी धोरण चुकलें एवढें मान्य करण्याचें मोठेंपण दाखवा." सरकारतर्फे गृहमंत्री यांनीं सांगितलें, "मी दुष्ट नाहीं किंवा बंगालमधील दहशतवादी मोठे देशभक्त नाहींत. कायदा व सुव्यवस्था हीं दोन्ही खातीं पुढील महिन्यापासून प्रांतिक होणार. लोकपक्षाच्या मंत्र्यांकडे जाणार; निवडणुकींत सरकारनें हस्तक्षेप केला हें खरें नाहीं. उलट सर्व प्रांतांतून जी माहिती

मजकडे आली आहे त्यावरून सर्वत्र सरकारी नोकरांनीं कॉंग्रेसलाच मतें दिलीं असें समजतें !! स्वातंत्र्यप्रतिज्ञा, जी सन १९३० सालीं होती, तीच बेण्यांत येईल म्हणून आम्ही बंदी ठेवली. स्थानबद्धांच्या बाबतींत सरकारचें धोरण ठरलेलें आहे. परिस्थिति बदलली तर स्थानबद्ध कबकरच मुक्त होतील. कायदा मानला पाहिजे. तसें न झालें तर स्वातंत्र्य राहाणार नाहीं." गृहमंत्री यांनीं कांहींही सांगितलें तरी वातावरण इतकें गरम झालें होतें कीं प्रचंड बहुमतानें कपात पास झाली. नंतर 'कत्तल' सुरू होऊन सर्व मागण्या मतास मांडण्यांत येऊन बजेटाची चर्चा संपली.

ता. १२ मार्चपासून चार दिवस फडणिसी व्यवस्था ( Finance ) बिलावर साधारण चर्चा झाली. डॉ. खरे यांनीं सांगितलें कीं, " ही चर्चा म्हणजे हिंदी लोकांना ' कत्तलची रात्र ' वाटते तर गोऱ्या लोकांना ' शादीची रात्र ' वाटते. एखाद्या शेतकऱ्यानें कोंबड्यांना सांगावें कीं आतां नाताळ आला आहे. मी आजपर्यंत तुम्हांला पोसलें, आतां कठीण आहे. तुम्ही उकीरडा अगर अन्य ठिकाणीं फुंकून पोट भरलेंत, मी तुम्हास पूर्ण स्वातंत्र्य दिलें. आतां पाहुणे आले आहेत, मुलें उपाशीं आहेत, तेव्हां तुम्हाला कापणें जरूर आहे. तथापि मी तुम्हांला कोणता मसाला घालून जेवावें हें ठरविण्याचा स्वयंनिर्णयाचा हक्क देतो. ( हास्य ) सरकारानें ग्रामोद्धाराचें खूळ काढलें. जनतेच्या पैशाचा ' उद्धार ' होऊन सरकारी नोकरांच्या खिशांत तो गेला, एवढेंच झालें !! नभोवाणीचा शेतकऱ्यांना काय उपयोग ? सर्वत्र दडपशाही चालूंच आहे. पण या सरकाराचे दिवस भरले " त्यांच्यानंतर डॉ. डिसोझा यांनीं तक्रार केली कीं, " सरकार व सावकार एक झाले आहेत, शेतकऱ्यांवरील कर्जाचा बोजा रु. २२०० कोटींपर्यंत गेला आहे. सर्वत्र असंतोष वाढत आहे. भावांत बदल होतात व त्यांचा परिणाम म्हणजे धनको व ऋणको यांच्या परिस्थितीवर होतो, व त्यांतूनच सामाजिक असंतोष निर्माण होतो. सरकारनें वेळींच सावध झालें पाहिजे." सरकार बेफिकिर व न जुमानणारें हें जाणूनच पंडित कृष्णकांत म्हणाले, " सरकार जरी आमचें म्हणणें वेडेपणाचें समजतें तरी त्यांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ' बात लेकीन कभी कर जाते है दीवानें भी । काम आ जाते है तुटे हुये पैमाने भी । ' ( वेडेसुद्धां प्रसंगीं यथार्थ बोलतात, प्रसंगीं तुटलेलें मापसुद्धां उपयोगी पडतें. ) एकंदर आर्थिक धोरण नाशकारक आहे. इंग्लंड नुकसानींत आलें तरी हरकत नाहीं पण हिंदुस्थानचें नुकसानच झालें पाहिजे. ' हम तो डुबेंगे मगर यार को लेके डुबेंगे ' हेंच

फडणिसाचें धोरण दिसतें. फडणिसी-व्यवस्था बिल म्हणजे विश्वासनिदर्शक बिल आहे. आमचा विश्वास नाहीं, तें आम्हीं पास करणार नाहीं. आमच्या लोकांना दारिद्र्यांत ठेवून आमचे हे विश्वस्त चैन करीत आहेत. आमचें संरक्षण आम्हीं करूं. सर्वत्र लष्करी शिक्षण सुरूं करूं. आवश्यक तें नेतृत्व व परंपरा सुरूं होईल. संधी द्यावयाची नाहीं व मग लायकी नाहीं म्हणून हिणवावयाचें हें अयोग्य आहे. हा देश इंग्रजांच्या उपयोगीं पडला. ' हमने तो हमेशा तेरी खुष मुदी ही चाही। खुद बिगडे मगर काम तेरे सारे संभाले।' आणि त्याचें फळ काय, 'उसका ये सीला हम को मिला उफ्री मुरवत। बरबाद कीया डालदिया जान के लाले ॥'. साधे माणुसकीचे हक्कसुद्धां देशी नाहीत. परदेशी नाहीत. आमचें दुर्दैव, आमचें लांछन आमच्या मागें सर्वत्र येतें. ' की सी दायर गे गम का समार नहीं बदला। जमीन बदली अस्मान नहीं बदला। बनाया आशिया जिस जहां वही सय्यद जा पोंहचा॥ उन्ही तो उमर गुजरी जिनके चुनते बागबां मेरी ॥' जेथें जेथें गेलो व जें कांहीं उभारलें तेथें तेथें आकाश व सय्यद-आमचे राज्यकर्ते-येवून पोहोचलेच. झांजीबार, दक्षिण आफ्रिका, केनिया, कोठेंही हें दुर्दैव थांबलें नाहीं. सर्व राज्ययंत्र बदललें पाहिजे. आमच्या दृष्टीनें तुम्ही पहा. आमचा प्रत्येक शब्द यापुढें निश्चयाचा आहे. हें तुम्हीं न समजलात तर ठीक नाहीं." शेट गोविंददास यांनीं कॉंग्रेसला मारुन टाकण्याचे प्रयत्न कसे विफल झाले तें सांगितलें. "असितगिरीसमंस्यातकजलं सिंधुपात्रे । सुरतरुवरशाखा लेखनी पत्र मुर्वी । लिखति यदि गृहीत्वा शारदा सर्व कालम्। तदपि तव गुणानामिश पारं न याति।" हें जसें देवाबाबत आहे, तीच स्थिति, आमच्या दुःखांबाबत, तक्रारीबाबत आहे. कोण तिचें पुरेपुर वर्णन करूं शकेल." कॅप्टन लालचंद सरकारच्या मदतीस धावले. या वेळेस त्यांचा पवित्रा थोडा निराळा होता. ते म्हणाले, " कॉंग्रेस सर्वत्र गरीबांच्या बाजुस असल्यामुळे निवडणुकींत विजयी झाली. फक्त पंजाबमधील कॉंग्रेसवाले हे गरीबांच्या विरुद्ध आहेत सबब त्यांचा पराभव झाला व हें योग्य झालें. सरकारनें शिक्षण थोडया लोकांना दिलें, त्यामुळे आम्ही गरीब शेतकरी हे अज्ञानीच राहिलों एकाला पंचपक्वान्न व दुसरा उपाशी हें सरकारचें धोरण ठीक नाहीं.मी लष्करी व बिनलष्करी असा फरक करतो म्हणून लोक रागावतात. या देशांत चातुर्वर्ण्य आहे. क्षत्रिय निराळे, ब्राह्मण निराळे. त्यांनीं फक्त पूजाच करावी. सर कावसजी रागावतात पण लोकशाही म्हणजे थोड्या श्रीमंतांचा अधिकार नव्हे. बहुसंख्यांक लोकांचा अधिकार होय. मला आनंद

वाटतो कीं, कॉंग्रेस या लोकांच्या बाजूची आहे. प्रागतिक पक्षाचें सरकार ऐकत नाहीं म्हणून सर कावसजी रागावतात. सरकार जाणतें कीं हा पक्ष दुबळा आहे. निवडणुकींत कॉंग्रेसचा जय झाला म्हणून सर कावसजींनीं कां तक्रार करावी? आजपर्यंत कॉंग्रेसनें कष्ट केले, त्याग केला, हाल सहन केले, व सर्व फायदा या श्रीमंत व्यापारी लोकांनीं स्वदेशीच्या नांवाखालीं लाटला. आम्ही आतां शहाणे झालों आहोंत, आमचा हिस्सा आम्हांस पाहिजे." कॉंग्रेसला हें प्रशस्तिपत्र मिळालेलें पाहून आम्हांस बरें वाटलें. डॉ. खान जे सरहद्द प्रांतांत निवडून आले होते व पुढारीही झाले होते त्यांनीं सांगितलें, "कॅप्टन लालचंद हे जर लढाऊ असते तर सरकारी पक्षाचे राहातेंच ना. निवडणुकींत सरकारनें कॉंग्रेसला शक्य तेवढा विरोध केला. सत्याग्रह तहकूब असतांसुद्धां मुद्दाम भाषणांतून उल्लेख करून विरोधी वातावरण निर्माण करण्याचा खुद्द गव्हर्नरनें प्रयत्न केला. भाषणांतून चुकीचीं विधानें केलीं. मला माझ्या निवडणुकीच्या वेळीं प्रांतांत जावयाची बंदी होती हें माहीत असून उलट सांगितलें. चालू निवडणुकींत डेराइस्माईलखानच्या डे. कमिशनरनें लोकांना बोलावून सांगितलें कीं, जर कॉंग्रेसला मतें दिलीं तर शिक्षा होईल. सरकारी अधिकाऱ्यांनीं तेंच धोरण स्वीकारलें. पोलिसांनीं निरोधन करून मतदारांना येऊं दिलें नाहीं. सरकारी अधिकारी तक्रारी मानीतना. बन्नूंत कॉंग्रेसचीं निशाणें, पताका, नेहरूंचे फोटो काढून घेतले. मंत्र्यांच्या तंत्रानें चालून लाग्याबांध्याचे अधिकारी निवडणुकीच्या कामासाठीं नेमून घेतले. पोलीस अधिकारी मदत करीतच होते; मतदान पत्रिका उमेदवारच भरून टाकीत होते व हें सर्व पोलिसांच्या साहाय्यानें होत होतें. कांहीं अधिकाऱ्यांच्या लीला काय वर्णाव्यात." सरकारतर्फे आक्षेप घेण्यांत आला कीं गैरहजर लोकांबद्दल बेअब्रुकारक विधानें होत आहेत. पंतजींनीं सांगितलें कीं, "सरकारी नोकरांच्या सार्वजनिक वर्तनावर टीका करणें अगदीं रास्त आहे." अध्यक्षांनीं निर्णय दिला कीं नामोच्चार करून आक्षेपार्ह विधानें करूं नयेत. डॉ. खानसाहेब पुढें म्हणाले, 'ऑनररी मॅजिस्ट्रेटस यांनीं राजिनामे दिले व निवडणुकीस उभे राहिले. ते पडले. आतां सरकारनें त्यांना पुन्हां नेमलें आहे व ते ज्यांनीं विरुद्ध मतें दिलीं त्यांना शिक्षा करीत आहेत. हें मी सांगूं नको कां ? इतर कोण सांगणार ? ठिकठिकाणीं निवडणुकांच्या वेळीं १४४ वें कलम लावण्यांत आलें पण अंमल मात्र कॉंग्रेसविरुद्ध. एके ठिकाणीं मंत्र्याचा एक नातेवाईक पिस्तुल घेऊन माझ्या अंगावर धावला, त्यावेळीं लढाऊ जातीचा

सुभेदार पळाला ! मी त्याच्या हातांतून पिस्तुल काढून घेऊन त्याला पोलिसांच्या हवाली केलें. सरहद्द प्रांतांत पोलिस, न्यायखातें, अंमलबजावणीखातें हीं सर्व एकच आहेत. जिल्हाधिकारी म्हणजे सुलतान आहे. आतां आम्हीं त्यांना सरळ करूं. निवडणुकीपूर्वी अनेक उमेदवारांना सरकारनें उभे राहाण्यास बंदी केली. कांहींना शिक्षा दिल्या. कांहींना मतदार संघांत जाण्यास बंदी केली. निवडून आले तरी बंदी कायमच !! सद्भावना ठेवा म्हणून सांगतां, कशी राहील ? सरहद्द प्रांतांत लष्करी अधिकारी मुलकी खात्यांत नेमतात. एका प्रमुख अधिकाऱ्यांशीं मी लष्करांत असतांना बोलण्याचा प्रसंग आला. तेव्हां एका अधिकाऱ्याबद्दल तो म्हणाला, 'हा लायक नाहीं, नुसता कारकून आहे व पीकॅडली सर्कसमध्यें ऐटीनें फिरावें एवढीच लायकी आहे. थोड्या दिवसांनीं त्याला सरहद्द प्रांतांतील राजकीय खात्यांत नेमण्यांत आलें ! ! अशींच माणसें आमच्याकडे डि. मॅजिस्ट्रेट्स असतात !! ' तुम्हाला सद्भावना हवी तर हे लष्करी अधिकारी प्रथम काढा." या भाषणानें सरहद्द प्रांतांतील कॉंग्रेसच्या विजयाची सर्वांना कल्पना आली व सर्वांनीं धन्योद्गारच काढले. हुसेनभाई लालजींनीं सरकारच्या व्यापार व उद्योगविषयक धोरणावर कडक टीका केली. बी. दास यांनीं आफ्रिका खंडाबाबत युद्ध सुरू होणार म्हणून सांगितलें. युरोपीयन संस्कृतीचा परिणाम काय होतो हें सांगतांना 'The Rape of Africa' या पुस्तकांतील खालील उतारा वाचून दाखविला— "The drift to war over Africa is unmistakable. The cheering outlook is the result of sixty years of duplicity and chincanery practised by the Chancellories of Europe. If a Continent has been stolen from 14,00,00,000 natives, it is assuaging to remember that the fraud was committeed in the holy cause of civilisation; and that in compensation the African is testing the transcendent delight of Chain-gangs, taxes, military conscription, flogging, gin, rum, jack-in-the-boxes and other boons of occidental invention." गुलामी, मद्यप्राशन फटके, कर, सक्तिची लष्करी भरती आणि हें सर्व सुधारणेच्या नांवाखालीं !! बी. दास यांनीं नंतर कर्ज उभारणीच्या धोरणावर टीका केली, "जास्त व्याजाचें कर्ज काढून टाकून हल्लींच्या दरानें कर्ज काढावें व जुन्याची फेड करण्यांत यावी. हिंदी भांडवलवाल्यांनीं हें खुषीनें करावें व देशाभिमान दाखवावा." लक्ष्मीकांत

मैत्र यांनीं हुंडणावळीच्या धोरणावर टीका केली. १८ पेन्स या दराविरुद्ध संघदेश असतां सरकारनें जुमानलें नाहीं. अन्य देशांनीं आपलीं चलनें निर्मूल्य केलीं व्यापार वाढविला, सावरला, पण येथं कांहींहीं केलें नाहीं म्हणून सरकारची हजेरी घेतली. मि. राउटन यांनीं मोटार वाहतुक कशी अनर्थकारक होत आहे हें सांगून कर्ज निवारण्याचे प्रयत्न मध्यप्रांतांत कसे झाले याची माहिती दिली. सोन्याच्या निर्यातीमुळें पत राहिली व शेतकरी नादारींतून वांचले. हें सुवर्ण निर्यातीवर बंदी न करण्याचें सरकारी धोरण योग्य होतें असें त्यांनीं ठासून सांगितलें. रामनारायण, सिंग म्हणाले, " सरकारचा कारभार अंधेर नगरीचा आहे. जनतेची इच्छा म्हणजे कायदा. जनतेला विचारलेंच नाहीं. हें बजेट आम्हीं मानीत नाहीं. येथें खरें व कायदेशीर सरकारच नाहीं ! ! एका म्हाळ्याजवळ मोहोर होती. तो म्हणे राज्य चांगलें. प्रत्येकाजवळ सोनें आहे. त्याला कोणीतरी लुबाडलें. त्याबरोबर राज्य वाईट. कोणाजवळही सोनें नाहीं. लोक दुःखी आहेत, असें तो म्हणूं लागला. अगदीं हीच गोष्ट रेल्वेमंत्र्यांची आहे. मोठा पगारवाले आमची स्थिति काय जाणणार ? 'बांझा की जाने प्रसव की पीरा'. सरकारला सर्व गोष्टी माहीत आहेत पण त्याचें शहाणपण मलिन होत आलें. 'असंभवम् हेममृगस्य जन्म। तथापि रामो लुलुभे मृगाय॥ प्रायः समापन्नविपत्तिकाले । धीयोपि पुसां मलिना भवन्ति ॥' राम जेथें भ्रमला तेथें या सरकारचें काय होणार ? " कथापंडित शामलाल म्हणाले, " या देशाला खुल्या व्यापाराचें महत्त्व सांगतां, दरवाजे उघडे ठेवा म्हणतां, पण आम्ही लुटले जातों. एका सधन पण सशक्त जाटाची संपत्ती चोरांना लुटावयाची होती. पण त्यांना ताकद नव्हती. पंडिताकडून त्याच्या बायकोला सांगितलें कीं दिवाळींत दारें उघडीं ठेवावींत म्हणजे लक्ष्मी घरांत येते. बायकोनें जाटास सांगितलें. त्यानें पंडिताचें वचन म्हणून ऐकलें. परिणाम असा झाला कीं, चोरांनीं धन लुटलें. सकाळीं जाट स्त्रीस म्हणाला ' लक्ष्मी तर आलीच नाहीं पण लक्ष्मण मात्र धन घेऊन गेला. ' तीच अवस्था आम्ही खुल्या व्यापारानें ( Open door ) अनुभविली आहे. आतां आम्हाला सांगण्यांत येतें कीं प्रांतिक स्वायत्तता दिली. एका जाटाजवळ ८ शेर दूध देणारी गाय होती. सावकार बनिया होता. त्यानें सांगितलें कीं मला देण्यांत गाय दे व त्यानें घेतली. जाट शेतकऱ्याचीं मुलें दुधाशिवाय रडूं लागलीं. सर्व कुटुंब कष्टी झालें. चार महिन्यांनीं गाय दूध देईनाशीं झाली. सावकारानें जाटास सांगितलें कीं, तुझ्या मुलांची मला दया येते, तरी ही गाय

परत घे व मला फक्त २ शेर दूध रोज देत जा. भोळया जाटानें मान्य केलें. घरीं गाय आणली. दूध आटलेलें आढळून आलें. गाय लाथ मारूं लागली. दूध न मिळतां कडबा घालावा लागला व २ शेर दूध दररोज सावकारास द्यावें लागलें. तीच स्थिति आमच्या मंत्र्यांची होणार आहे. कर यापुढें सहन करणें शक्य नाहीं. जाटानें गाय परत केली. अहो फडणिस महाराज, आम्ही ही प्रांतिक स्वायत्तता परत करीत आहों. जुलूम दडपशाही चालूच आहे. देश उजाड झाला. या स्थितींत कसली सद्‌भावना घेऊन बसलात ?" शामलाल यांचें कथामय भाषण संपल्यानंतर मथुरंग मुदलियार यांनीं तासभर खातेवार कारभारावर टीका केली. सर होमी मोदी यांनीं सांगितलें, "फडणिसाला चांगलें वाईट करण्यास बजेटांत फारशी जागा नाहीं. वाईट असेल तें खुलासा करून नीट करावें, चांगलें असेल तें खुलवून सांगावें, एवढेंच करतां येण्यासारखें आहे. दरसाल कर बसविण्यापेक्षां चीनच्या सरकारनें जसे सन १९५७ पर्यंतचे कर एकदांच बसवून टाकले आहेत, तसेंच फडणिसांनीं करावें असा माझा त्यांना सल्ला आहे !! (हास्य) येथील आर्थिक स्थिति सुधारलेली नाहीं. माणशीं वार्षिक औद्योगिक उत्पादन येथें रु. २० आहे तर जपानमध्ये रु. १५८, ब्रिटनमध्ये रु. ४१०, कॅनडांत रु. ४७०, अमेरिकेंत रु. ७२० आहे; माणशीं बँकांतील ठेव येथें रु. २, जपानमध्ये रु. ९०, फ्रान्समध्ये रु. १२५ व अमेरिकेंत रु. २७० आहे. या परिस्थितींत संपत्ति जास्त उत्पादन केली पाहिजे व त्याला मार्ग म्हणजे औद्योगीकरण हाच होय. देशांतील दारिद्य, मागासलेली वृत्ति, परंपरेला चिकटून राहाण्याची प्रवृत्ति ही घालवून हुशारी, हुन्नरीवृत्ति, कार्यक्षमता, व प्रगतिप्रियता आणावयाची असेल व राष्ट्राचें शील जास्त प्रतिष्ठित करावयाचें असेल तर उद्योगधंदेच वाढवावयास पाहिजेत 'फिसकल कमिटी' चें मत असें आहे कीं उद्योगांत मागासलेल्या देशांत बुद्धीला जडपणा येतो, विविधतेला वाव देणारीं क्षेत्रें कमी असतात. व्यापक व विविध क्षेत्र नसल्यामुळें बुद्धी अगदी परंपरागत व ठरविक सांच्यात काम करणारी होते. उद्योगधंदे वाढले, म्हणजे बुद्धीला चालना मिळते व राष्ट्राचें शीलसंवर्धनही होतें. पण फडणिसाचें मत अगदी विरुद्ध आहे. संरक्षण द्यावें म्हणजे उद्योग वाढतील हें उघड आहे पण विपर्यास करून फडणिस म्हणतात, जास्त जास्त संरक्षण जास्त जास्त कालपर्यंत कमींत कमी चौकशी करून आम्ही तें मागतों हें खरें नाहीं. उलट जास्त जास्त चौकशी, कमींत कमी वेळ व कमींत कमी संरक्षण असा त्यांचा संकल्प

आहे. परिणाम असा होणार कीं, जास्त जास्त आयात, कमी कमी उत्पादन व जास्त जास्त बेकारी होणार. संरक्षण मिळावें तें लहान मोठया दोन्ही धंद्यांना. हें माझें मत सत्यमूर्तिंच्या मताशीं पटतें. मोठीं माणसें सारखाच विचार करतात, पण येथें थोडा फरक असा आहे कीं, मी तो विचार आधीं करतो. ( प्रचंड हंशा ) सरकारनें कायम सल्लागार कमिटी नेमून जकातीचें धोरण ठरवावें. ब्रिटनमध्यें ही कमिटी आहे व तिचें काम तेथील व्यापाऱ्यांना परदेशी मालाशीं कशी टक्कर देतां येईल या दृष्टीनें मदत करण्याचें असतें. जकातीचा परिणाम काय होतो, परकी माल उत्पादन खर्चापेक्षांही कमी किंमतीस विकला जातो कीं काय, वगैरे पाहून ही कमिटी सरकारला सल्ला देते. तेथील व्यापारीखातें संघटित, देशोदेशीं त्यांचे प्रतिनिधी आहेत. या देशाचे ४४ देशांशीं व्यापारी करार आहेत. सरकारला तरी ते करार माहीत आहेत कां नाहींत याबद्दल शंका आहे. आता ते बदलून घेण्याची वेळ आली आहे. बदलून घेतांना त्यांतील एकाला अधिक सवलत दिली तर सर्वांना ती मिळावी ( The most favoured nation clause ) हें कलम गाळून टाकण्यांत यावें, नाहीं तर आतां कठीण प्रसंग येईल. आतां दोन दोन राष्ट्रांतील करार ही प्रथा सुरू आहे. त्यांत ही अडचण नको. एका देशाला स्विस दूध जकातीशिवाय यावें असें वाटत होतें, पण तसें केलें तर ही सवलत सर्व देशांतून येणाऱ्या दुधांना द्यावी लागेल म्हणून त्या राष्ट्रानें " १०,००० फूट उंचीवरील पठारावर चरणाऱ्या गायींचें दूध " ( Milk produced from cows grazing on an altitude of 10,000 ft. ) अशी एक नवीन वस्तू कायद्यानें केली व मार्ग काढला ! ! व्यापारी करार करतांना हातचा उपयोगीं पडावा म्हणून हें कलम गाळून टाकण्यांत यावें.व्यापाराची पठाड आतां बदली आहे हिस्सेरशी, हुंडणावळी वरील नियंत्रण, आयातनिर्बंध, व्यापारबंदी यांचें युग सुरू आहे. कांहीं देशांत तर प्राचीन काळाप्रमाणें वस्तू वस्तूंत विनिमय सुरू झाला आहे. रणक्षेत्रांतसुद्धां हें अदलाबदलीचें धोरण सुरू झाल्यासारखें दिसतें. नुकतेंच मेक्सिकोंत २० दुधाचे डबे घेऊन पकडलेल्या सेनापतीला सोडून देण्यांत आले ! ! जुन्या व जीर्ण उपायांनीं हा देश संपत्तिमान होणार नाहीं. नवीन माणसें, नवीन पद्धत, नवीन ध्येयें स्वीकारलीं तरच देशाचा तरणोपाय आहे. " मोदींच्या चटकदार भाषणानंतर सर यामीनखान यांनीं तासभर कंटाळवाणें भाषण करून जगाप्रमाणें सभागृहांतही सुखदुःखाचें द्वंद्व असतें असा अनुभव आणून दिला. जोशी यांनीं

वाटेल त्या धंद्यांला संरक्षण देऊं नये. संरक्षण दिल्यानंतर ते धंदे कार्यक्षमतेनें चालतात कीं नाहीं हें पाहावें व नवीन कारखाने काढण्यापूर्वी त्यांनीं सरकारची परवानगी घ्यावी म्हणजे नालायक धंदेवाल्यांना फायदा मिळणार नाहीं व गिऱ्हाइकांवरही अधिक बोजा बसणार नाहीं, असें प्रतिपादिलें. पुढें ते म्हणाले, " लहानमोठीं १८९०० पोस्ट ऑफिसें आहेत व पोस्टाच्या पेट्या ४०,००० आहेत. एकंदर खेडीं ७ लाख, त्या मानानें ही सोय पुरेशी नाहीं. २१,००० खेडीं ज्यांची लोकसंख्या १,००० च्यावर असूनसुद्धां त्यांत एकही पोस्टाची पेटी नाहीं अशीं आहेत आणि एक हजारापेक्षां ज्यांची लोकवस्ती कमी आहे पण ५०० पेक्षां जास्त अशीं १,००,००० खेडीं आहेत कीं तेथें पोस्टाची व्यवस्था नाहीं, पेटीसुद्धां नाहीं. श्रीमंतांसाठीं तार, टेलिफोनची अधिक सोय करण्यांत येते पण गरीब जनतेकडे सरकार पाहात नाहीं. करांच्या बाबतींत पण हेंच धोरण. प्राप्तीवरील जादा कर कमी केला व साखरेवरील अंतर्गत जकात वाढविली व गरीबांना महाग केली. अप्रत्यक्ष कर व प्रत्यक्ष कर यांचें प्रमाण या देशांत अन्य देशापेक्षां जास्त आहे. खुद्द नेमीयर यांचें मत असें आहे कीं, येथील करपद्धति अशी आहे कीं, व्यापारी वर्गाच्या हिताकडे अधिक लक्ष दिलें जातें. आवश्यक वस्तूंवर अप्रत्यक्ष कर बसवून त्या गरीबांना महाग करणें व श्रीमंतांना थोडक्यांत सोडणें हें धोरण अयोग्य आहे." श्री. चंदा हे एक शिक्षणाधिकारी असून बंगाल प्रांतातर्फे सरकारनियुक्त सभासद होते. त्यांनीं सांगितलें, " सन १९३०-३१ मध्यें साखरेच्या जकातीपासून रु. १०·७८ कोटी उत्पन्न आलें तें १९३५-३६ सालीं रु. ५५ लक्षांपर्यंत आलें. अंतर्गत जकात साखरेवर बसविली तेव्हांपासून जें उत्पन्न येऊं लागलें तें वाढलेल्या दरानेंसुद्धां रु. २·७५ कोटींपेक्षां जास्त जात नाहीं. रु. ८ कोटींची तूट या संरक्षणाच्या धोरणापायीं येत आहे. साखरेचें उत्पादन १९३०-३१ सालीं सुमारें ३००००० टन होतें तें सन १९३५-३६ सालीं ९,३७००० टनापर्यंत आलें आहे. लवकरच १०,००,००० टनापर्यंत जाईल व हिंदुस्थानची स्थानिक गरज संपूर्णपणें भागेल. अंतर्गत जकात प्रथम बसविली तेव्हां हा धंदा बुडेल अशी तक्रार करण्यांत आली. अनुभव उलट येत आहे. गिऱ्हाइकाला जरा किंमत जास्त द्यावी लागेल पण जर त्यानें धंद्याकरितां कोटयावधि रुपयांचें नुकसान संरक्षणाच्या नांवाखालीं सोसलें तर सरकारला उत्पन्न हवें म्हणून हा थोडासा त्याग त्यानें करणें वावगें नाहीं !! शेतकऱ्यांचें या जकातवाढीनें नुकसान होणार नाहीं. भाव

वाढले म्हणजे उसांचे भाव वाढतीलच व थोडासा फायदा शेतकऱ्यांचाही होईल. पुढें मागें फाजील उत्पादनामुळें त्यांचें नुकसान होईल; पण आज नाहीं. धंद्याच्या दृष्टीनें पाहिलें तर भागांचे भाव तेजींत आहेत. कोणत्याही दृष्टीनें केलेली जकात-वाढ नुकसानकारक नाहीं!!" चंदांचें भाषण चुकीची विचारसरणी असली तरी चांगलें झालें व आमच्यांतील कांहीं जणांच्या बैठकींतील ते असल्यामुळें भाषण संपतांच त्यांच्या 'पहिल्या' भाषणाचें अभिनंदन करून त्यांना उपाहार-गृहांत चांगलीच जकात द्यावयास लावली!!

सत्यमूर्तींनीं सभागृहाचे दोन तास घेतले. त्यांनीं ब्रम्हदेश बेगळा केला गेला म्हणून तक्रार केली. करपद्धति सदोष आहे व आवश्यक वस्तूंवर कर बसविणें अयोग्य म्हणून सांगितलें. खर्चाचें धोरण व्यापक व धनोत्पादक नसल्याची तक्रार केली. उत्पन्न जास्त वाढवावयाचें तर प्राप्तीकरांत वाढ केली पाहिजे, वारसा कर बसविला पाहिजे, स्थानिक कर अधिक व्यापक केले पाहिजेत हें सर वॉल्टर लेटन यांचें मत त्यांना मान्य असल्याचें त्यांनीं सांगितलें. फडणिस इंग्लंडचें हित पाहातात. लँकेशायरच्या मालावरील जकात कमी करून सुद्धां त्याचा खप वाढत नाहीं म्हणून त्यांना वाईट वाटतें. हें जर खरें तर मग आणखी आयात-जकात कां कमी करावयाची? ती वाढविली तर जकातीचें उत्पन्न वाढेल पण आयात जकात कमी करण्यांत कोणाचेंच हित नाहीं. तेऽमि मानवराक्षसा परहितं स्वार्थाय निघ्नन्ति ये। ये तु घ्नन्ति निरर्थकं परहितं ते केन जानीमहे॥ अशी वृत्ति फडणिसाची आहे असा आरोप त्यांनीं केला. तुटीचें बजेट आहे, व्यापार मंदावत आहे, हें कबूल करून सुद्धां 'एकंदरीनें पहातां जर मी आशा-बादीपणा दाखविला तर फारसें चूक नाहीं' हेंही म्हणण्याचें धाडस फडणिसांनीं करावें याबद्दल आश्चर्य व्यक्त केलें. "प्रांतांत जा, कर बसवा, देश सुधारा हा उपदेश म्हणजे थोतांड आहे" असें त्यांनीं सांगितलें. 'मध्यवर्ति सरकारनें वाटेल तो खर्च करावा व त्यासाठीं प्रांतानें व जनतेनें कर द्यावा हें चूक आहे. टॉटनहॅम आणि त्यांचे भाऊबंद यांना पोसण्यासाठीं आम्हीं कर बसविणार नाहीं. अधिकारग्रहण करा म्हणजे आमच्या चुकांकडे तुम्ही सहानुभूतिपूर्वक पहाल असें फडणिस म्हणतात. एकंदरीनें सर जेम्स ग्रिग. हिंदुस्थानचे फडणिस, सर्वज्ञ चुका करतात तर!! हीही कबुली वाईट नाहीं. दोन कोट मतदारांनीं कॉंग्रेसचे ७११ सभासद निवडले आहेत. देश कोणाच्या मागें आहे? १५० वर्षें देश निकाली

लाऊन जाणार आहेत, पण या देशाचें कल्याण केलें हें सांगून जाणार म्हणतात. हे नोकरशाही तूं मूर्तिमंत ढोंग आहेस !! आमचें दारिद्र्य, उपासम[illegible], दुःख व तुमची ढोंगबाजी यामुळेंच तुमचें साम्राज्य नष्ट होईल,

Rome for Empire, far renowned
Rome shall perish,
Write that word
In the blood she has spilt.

या इंग्रज कवीच्या उक्तींत रोमच्या जागीं ब्रिटन घातलें म्हणजे झालें" अशी शापवाणी उच्चारून हा तापसी मद्रासी खालीं बसला. गिडने यांनीं अँग्लो-इंडियनांना नोकऱ्या कमी मिळूं लागल्या म्हणून तासभर भुणभुण केली. शौकत-अली यांनीं सांगितलें, " मला शांतता पाहिजे, तंटे नकोत, पण वेळच आली तर पळतां सुद्धां येणार नाहीं म्हणून लढावेंच लागेल हाही फायदा कांहीं कमी नाहीं. निवडणुकींत सरकारी अधिकारी हस्तक्षेप करणार नाहींत अशी सरकारनें ग्वाही दिली होती. मला काय अनुभव आला तें सांगतो. मुराराबादचे अधिकारी मेजर नेदरसोल म्हणाले, 'सरकार काय मूर्ख आहे; आम्हाला निःपक्षपाती राहण्यास सांगतें. हुकूम असो, वा नसो, मी आपले नेहमींचे डाव खेळणारच. (Look at the idiocy of this Government, they are issuing orders that we should be impartial, but orders or no orders, I will play my usual game.)' या अधिकाऱ्यानें कहरकेला. त्याबद्दल तक्रार घेऊन मी दिल्लीस आलो व गृहमंत्री सर हेन्री क्रेक यांना भेटण्यास गेलो, त्यांना या अधिकाऱ्याची लीला सांगितली. ते रागावले व मला म्हणाले, ' संयुक्तप्रांताच्या सरकारकडे जा.' मी म्हणालों, 'तुम्ही सांगितलें होतें कीं, निश्चित तक्रार असेल तर मी दूर करीन म्हणून आलो.' ते रागावून म्हणाले, 'माझ्या घरांतून चालते व्हा.' ( Get out of my house. ) मी ज्या भाषेंत उत्तर दिलें ती येथें उच्चारणें योग्य नाहीं. मी असहकारवादी नाहीं. माझ्या सहकाराला हें उत्तर!! त्यांना गुलामी पाहिजे. उलट मी कायदेमंत्री नृपेंद्र सरकार यांच्याकडे एक तक्रार घेऊन गेलो. दोन तास माझ्याशीं बोलले. तक्रार दूर होवो अगर न होवो, त्यांचें वर्तन अगदीं सभ्य होतें. १७ वर्षें या सरकारची नोकरी केली, निदान सभ्य वर्तणूक तरी ठेवा." सहकार्याची किंमत बडेभाईला जी मिळाली त्याबद्दल आम्हां सर्वांना आश्चर्य वाटलें नाहीं पण त्यांच्याबद्दल कींवच वाटली. अविनाशलिंगम् चेट्टी यांनीं इंग्लंड-मध्यें साखर धंद्याला कसें उत्तेजन दिलें जातें याची माहिती दिली. डॉ. झियाउद्दिन

यांनीं काय सांगितलें, 'हें रिपोर्टांत भाषण वाचीपर्यंत कोणालाच कळलें नाहीं!!' रॅमसे स्कॉट हे कानपूरचे इंग्रज व्यापारी. त्यांनीं साखरेवरील जकातवाढीचा निषेध केला व स्वार्थ पक्षसंघटनेवर व शिस्तीवर मात करूं शकतो हें दाखवून दिलें. अर्थात् त्यांच्या धैर्याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन केलें!! डॉ. बानर्जी यांनीं सरकारनें नवीन नवीन कायदे काढून खर्चाचें योग्य धोरण ठेऊन, बेकारी घालवावी हा उपाय सुचविला.

. चर्चेला उत्तर देतांना फडणीस म्हणाले, 'इंग्लंडमध्यें परकी देशांत गुंतविलेल्या भांडवलापासून ३०० दशलक्ष पौंड उत्पन्न येतें हें खरें नाहीं. एका सालीं, गेल्या १७ वर्षांत हा आंकडा २५० दशलक्ष पौंडापर्यंत गेला होता. सन १९३५–३६ मध्ये तर हा आंकडा ७५ दशलक्ष पौंडापर्यंत आला आहे. पंतजींचे आंकडे अतिरंजित आहेत. भाव वाढले ही गोष्ट सत्य आहे. ते, युरोपांत शस्त्रसामुग्रीचें उत्पादन वाढलें म्हणून वाढलें हें त्याचें कारण असेलही; पण भाव वाढले नाहींत हें खरें नाहीं. हिंदुस्थानच सुवर्ण निर्यात करतें असें नाहीं. जपानही करीत आहे. उत्पन्न कमी झालें म्हणून मला दोष देण्यांत येतो. वास्तविक कर कमी केले म्हणून उत्पन्न कमी झालेलें आहे. या सर्व गोष्टींचा विचार केला तर वस्तुतः उत्पन्न कमी झालेलें नाहीं. परकी अधिकाऱ्यांना मिळणारा पगार, एकंदर वेतन रकमेच्या मानानें कितीतरी कमी आहे. विनाकारण गवगवा केला जात आहे. जमिनदार यामीनखान यांचें अंतःकरण गरीब कुळासाठीं तळमळतें हें पाहून मला गहींवर आला!! त्यांनीं दिलेली माहिती बरोबर असेल तर हीं कुळें चांगलींच श्रीमान् आहेत!! बी. दास हे कॉंग्रेसपक्षाचे सभासद जनतेच्या बाजूनें बोलतील असें मला वाटलें पण व्यापाऱ्यांच्याच बाजूनें बोलले. पण हा व्यापाऱ्यांचा प्रतिनिधि व्यापारी प्रकाशनें वाचीत नाहीं असें दिसतें. भाव वाढत आहेत हें वाचलें असतें तर त्यांना कळलें असतें. हुसेनभाईनीं मुसोलिनीशीं झालेली मुलाखतच विशेष सांगितली. मी त्यांना अशी माहिती देतो कीं, इटालीचा व्यापार तेजींत नाहीं. येथें मात्र तो सुधारत आहे. सत्यमूर्ति बरेच बोलले पण ते मार्गे वळून बोलले; मग कोणासाठीं कोण जाणे! त्यांनीं उद्योग–सूत्रधारांची पूजा केली, त्यांना संतुष्ट केलें व ते जनतेला कांहीं तरी देतील ही आशा बाळगली!! फारच आशावादी दिसतात. करपद्धतीच्या बाबतींत, एकाच वेळीं डोक्यानें व पायानें चालण्याचा प्रयत्न केल्यामुळें, त्याच्या विचारांत घोंटाळाच दिसून येतो!! गरिबांवर कर जास्त म्हणून तक्रार, तर संरक्षण कमी करूं नये ही मागणी. मोठ्या धंद्यांना संरक्षण द्या

व लहान धंदेही तगवा हेंही सांगितलें. त्यांचें मत असें दिसतें कीं श्रीमंतांवर कर जास्त जास्त बसवावेत पण काँग्रेस तें करणार नाहीं. काँग्रेस फक्त जकाती वाढवून संरक्षण देईल पण त्याला कर म्हणणार नाहींत औद्योगीकरण म्हणतील!! गिऱ्हाईकाला कोण विचारतो ? सर होमी औद्योगीकरणाचें मूर्तस्वरूप विचारणार नाहींत, सत्यमूर्ति कां विचारत नाहींत ? आणि सरकार त्याची काळजी करतें म्हणून ते कां रागावतात ? औद्योगीकरणानें बेकारी कमी होईल हा भ्रम आहे, पाश्चात्य राष्ट्रांचा काय अनुभव आहे ? साखरेच्या बाबतींत राष्ट्राध्यक्ष म्हणतात, 'बेफामपणें साखरेचे कारखाने निघाले, शेतकऱ्यांनीं ऊंसाची लागवड वाढविली व शेवटीं पुरवठा अधिक झाला, भाव पडले व लाखों शेतकरी बिहार व संयुक्त प्रांतांत निकाली निघाले.' निदान राष्ट्रीयसभेचे अध्यक्ष भांडवलवाल्यांची पूजा करीत नाहींत एवढी गोष्ट तरी सत्यमूर्ति यांनीं लक्षांत घ्यावी!! रु. ५ कोटी खर्च करून जी साखर जावांत पैदा होते ती येथें पैदा करण्यास रु. १५ कोटी लागतात. यापेक्षां हा पैसा, ही सामुग्री जर दुसऱ्या धंद्यांत लावली तर सरकारचें उत्पन्न वाढेल व देशाची प्रगती होईल. संरक्षण देऊन उत्पादनाची पेठ बदलणें यांत आर्थिक नुकसान होतें हा सर्वमान्य सिद्धांत आहे. ( Diversion of production by means of protection must result in economic loss.) बजेटांत बदल करावा असें निदान वादविवादांत दिसलें नाहीं. बिलाबाबत अन्य संस्कार करावे लागतील ते होतीलच." बिल नामंजूर होणार हें जाणूनच. शेवटचें विधान करून फडणिसांनीं चर्चा संपविली. कलमवार चर्चेत मिठाचा कर कमी व्हावा ही काँग्रेसपक्षाची सूचना ५३ विरुद्ध ५२ मतांनीं नापास झाली. साखरेवरील करवाढ रद्द व्हावी या सूचनेवर दोन दिवस चर्चा होऊन ती ७४ विरुद्ध ४१ मतांनीं पास झाली. पोस्टाचे दर कमी करण्याबाबत दोन उपसूचना पास झाल्या व याप्रमाणें बिलाचे तुकडे झाले. दरसालप्रमाणें तिसरें वाचन करावें ही सूचना फडणिसानें मांडली नाहीं व ता. २०।३।३७ रोजीं गव्हर्नर जनरलच्या शिफारशीसह किरकोळ दुरुस्त्या करून पूर्वीचेंच बिल फडणिसानें मांडलें.

दरसालप्रमाणें व्हॉईसरॉय यांचा संदेश सभागृहाच्या चिटणिसानें वाचला. सरकार व तत्सम पक्ष यांनीं तो उभें राहून ऐकला. आम्ही बसून त्याला आमच्या 'काँग्रेसी' पद्धतीनें उत्तर दिलें. पुन्हां मांडलेल्या बिलावर नेहमींप्रमाणें, 'हिंदुस्थानच्या राज्यकारभाराबाबतचें कमल ६७ ब-चें पोटकलम १ प्रमाणें' प्राप्त झालेल्या अधिकारान्वयें, 'हिंदुस्थानचें संरक्षण करण्याकरितां, शांतता व सुव्यवस्था

राखण्यासाठीं ' हें बिल सभागृहानें पास करावें अशी शिफारस व्हॉईसरॉय यांनीं केली होती. हा सर्व मजकूर छापील होता. व्हॉईसरॉय यांची सहीसुद्धां छापील होती. फक्त ता. १९-३-३७ मात्र सर्वांच्या प्रतीवर शाईनें घातली होती. बिलाचे तुकडे होणार हें जाणूनच सरकारनें सर्व छापून ठेविलें होतें !! किती तत्परता व किती दीर्घदृष्टी !! अर्थात् याही गोष्टींचा उल्लेख उत्तरक्रियेच्या चर्चेत झालाच. शिफारसित बिल मांडतांना फडणिस ' कमी बोलल्यानें झटकन सुधारता येतें, ( Least said soonest mended )' एवढेंच म्हणून बसले. वाचाळपणा घातुक, निदान विलंब लावणारा एवढी जाणीव त्यांना झाली हा फायदाही कांहीं कमी नव्हता. भुलाभाई म्हणाले, " हा फार्स आतां पुरें करा. लोकशाहीचें हें थोतांड पुरें. या मायाजालांत अनेक सुशिक्षित लोक फसले. आम्ही येथें आलों ते लोकांना राजकारणाचें शिक्षण मिळावें व प्रत्यक्ष कार्य व प्रतिकार करण्याची तयारी व्हावी म्हणून आलों. व त्याच दृष्टीनें आम्ही आमचीं मतें जाहीर करीत आलों. आमच्यामागें असलेले लोक व सभागृहाबाहेर असलेले लोक व ज्यांच्यावर देशाचा भाग्योदय अवलंबून आहे त्यांची या बाबतींत खात्री करावयाची होती. मी कबूल करतों कीं यांतूनच कांहीं निघेल, हा निव्वळ देखावाच राहाणार नाहीं अशी थोडी आशा मला होती. पण तें संपलें. सभागृहाचें आयुष्यही सरत आलें आहे. बजेटाचें तर क्षणमात्र राहिलें आहे. या सुधारणा व या घटना, या सर्वांचा हाच अर्थ असेल तर गंभीरपणें विचारच करणें जरूर होईल. यापेक्षां ही घटना नको. सरळ ती बंद करा, परत घ्या व हा देश गुलामींत आहे हें जगांस स्पष्टपणें कळूं द्या. ( I confess I had a little faith that forms will not remain forms and they will not be reduced to a farce. And, I have more faith that the more we coutinue to expose the delusion, the sooner I am able to convince those who stand outside this House and at our back, on whom the salvation of this country depends that we might, by a constant expression of our views on every public question that comes before it, and it would be, if nothing else, an education to my countrymen to the extent necessary to lay the foundation of direct action.)" सत्याग्रहाचा सूर याप्रमाणें त्यांनीं काढला. सर कावसजी यांनीं सांगितलें कीं, " सरकारनें आपलें धोरण स्पष्ट केलें आहे. कायद्याच्या अर्थाकडे न पाहतां अक्षरांकडे पाहून सरकार चालणार व जनता ठोकारणार. एकंदरीनें या सरकारचें दुर्दैव आहे, मला भविष्य भीषण दिसत आहे.

मजसारख्यांची, ज्यांचा विश्वास ब्रिटिशांशीं सख्य असावें, संबंध असावा असा होता व आहे त्यांची स्थिति केविलवाणी झाली आहे. तुम्ही इंग्रज आज आहांत; उद्यां जाल, पण मी व माझीं मुलें ! आम्ही हिंदी आहोंत, येथेंच राहाणार, काय आमचें होणार ! ब्रिटीश साम्राज्य राहावें म्हणून तरी धोरण बदला " अशी करुणा भाकून त्यांनीं आपलें भाषण संपविलें. अणे यांनीं सरकार अदूरदर्शीपणानें वागतें याबद्दल दोष दिला. यामीनखान म्हणाले, " आम्ही फडणिसाइतके हुषार नसूं, आम्हाला विशेष अक्कल नसेल. " ' अहो स्वतः पुरतेंच बोला, एका मद्राशानें रट्टा मारला. " तथापि थोडी दूरदृष्टी दाखवा. निवडणुकीच्या निकालाचा अर्थ नीट समजा. " पंतजींनीं सरकार हें एक यंत्र असून त्यांत सर्व जनता भरडली जात आहे असें सांगून, ' गरिबांचे हुंदके व अश्रू, आमच्या प्रार्थना व प्रयत्न यांच्या जोरावर विरोधक समजतात त्यापेक्षां कितीतरी लौकर आम्ही या राज्यपद्धतीचा शेवट करूं. " अशी श्रद्धा प्रगट करून मध्यवर्ति कायदे मंडळांतील आपली कारकीर्द संपविली. प्रचंड बहुमतानें शिफारसित बिल नामंजूर झालें. लागोपाठ तिसऱ्यांदा ही घटना झाली. जगांत असा विक्रम कोणत्याही विरोधी पक्षानें केला नाहीं व कोणत्याही लोकशाहीचा मुखवटा धारण करणाऱ्या सरकारनें निःशंकपणें व निर्लज्यपणें अधिकारास चिकटून राहाण्याचाही विक्रम ज्ञात इतिहासांत केला नाहीं ! ! सत्य हेंच कीं सरकार तलवारीच्या जोरावर चालतें आहे. तथापि कांहीं काल, कांहीं लोक या मायाजालाला फसले. अनुभवानें कांहीं शहाणे होतात, कांहीं शहाणे अनुभवाला विशेष मानणें बेडगळपणाचें समजतात !!

अधिवेशनांत आर्य मॅरेज व्हॅलिडेशन बिल (Tne Arya Marriage Validation Bill) पसार झालें. बिल मांडणारे डॉ. खरे व त्याचे प्रत्यक्ष जनक घनःश्याम गुप्त हे दोघेही प्रांतांत निवडून आले होते. बिल पसार व्हावें म्हणून आम्ही तडजोड काढली व कलम दोनमध्यें 'Notwithstanding any law' या ऐवजी ' Notwithstanding any provisions of Hindu-law ' अशी दुरुस्ती करण्यांत आली. ती मान्य झाली. मुसलमानी विरोध कमी केला गेला. अणे यांनीं पण आपला विरोध परत घेतला व या नव्या कायद्याचा उपयोग शहाणपणानें होईल अशी आशा प्रदर्शित केली. मी, डॉ. खरे, व गुप्त यांचें अभिनंदन केलें. सामाजिक बाबतींत बिलें आणण्याचें कार्य महाराष्ट्रीय मंडळींनीं—डॉ. देशमुख, डॉ. खरे वगैरेंनीं—केलें याबद्दल समाधान व्यक्त करून 'आर्य समाज हा हिंदु संघटनेंत राहिला व सनातन्यांचा प्रयत्न फसला हें ठीक

झालें तथापि 'कायद्याचा अवलंब शहाणपणानेंच केला जाईल' अशी ग्वाही अणे यांना मी दिली. घनःश्याम गुप्ता यांनीं सर्वांचे आभार मानले. बिल पसार झालें. तथापि जें कार्य व्यापकपणें झालें असतें तें झालें नाहीं व त्याला कारण जें हिंदु-संघटन करूं इच्छीत होते तेंच, हें दुःखानें नमूद करणें जरूर आहे. हा कायदा झाल्यानंतर अनेक लग्नें याप्रमाणें झालीं व त्यांत आर्यसमाजी सभासद नसलेल्या मुलांचींही झालीं हें ऐकून तरुणांची कुचंबणा दूर झाली हें जाणून अनेकांप्रमाणें मलाही बरें वाटलें!!

हें अधिवेशन चालू असतां दिल्ली येथें मार्चच्या तिसऱ्या आठवड्यांत निवडून आलेल्या काँग्रेसपक्षीय कायदेमंडळांतील सभासदांचें अधिवेशन भरलें. अ. भा. काँग्रेस कमिटीची सभाही झाली. निवडणुकींतील विजयामुळें सर्वत्र अधिकार-ग्रहणाचा प्रश्न महत्त्व पावला होता. त्याची चर्चा व त्यावर निर्णय या सभेंत होणार होता. प्रांताप्रांतातून विधिमंडळांतील पक्षाचे नेते निवडले गेले होते. मुंबईतील वाद विकोपाला गेला होता. वास्तविक तेथील निवड, माहितगारांनां आश्चर्य वाटेल अशी नव्हती. तथापि तेथील वादाचे प्रतिध्वनी दिल्लीच्या वातावरणांतही उठले. सर्वत्र असेंच झालें तर सरकारला बरें वाटणार होतें. हा वाद मिटावा म्हणून मीही कांहीं प्रयत्न केले. प्रसंग येईल त्यावेळीं ते वर्णनही करीन. अ. भा. काँग्रेस कमिटीनें केलेला ठराव झाल्यानंतर मंत्रिमंडळांत निवड व्हावी म्हणून चाललेल्या धांदली व डांवपेंच मोठे उद्बोधक व उद्वेगजनक होते. देशभर अधिकारग्रहण केलेंच पाहिजे असें वातावरण उत्पन्न झालें होतें. क्षणिक व क्षुद्र सत्तासुद्धां गेल्या १५० वर्षांत लोकप्रतिनिधींना भेटली नव्हती. विश्वामित्राचा तपोभंग निदान स्वरूपसुंदर मेनकेनें केला, येथें 'कुरूप, हिडिस, राक्षसीवृत्तीची' असें नामाभिधान पावलेली घटनासुंदरी तपोभंग करणार होती. १५० वर्षांचा उपवास अनेक लोकांची खरकटें खाऊन सोडण्याची तयारी उत्कटतेनें दिसून येत होती. मी अनेक वेळां अधिकारग्रहणाला विरोध जाहीर केला होता. 'घटनाभंग' ही काँग्रेसची घोषणा होती. लग्नानंतर संसारत्याग क्षणाक्षणाला कठीण होत जातो हा अनुभव जमेला धरण्यास या वेळेचें राजकारण तयार नव्हतें. महाराष्ट्रांतही तीच स्थिति होती. रत्नागिरीचे कार्यकर्ते विरोधी होते, पण तो निवडणुकींतील पराभवाचा परिणाम होता. तेथील पराभव खोतीबाबत स्वीकारलेल्या धोरणामुळेंच झाला हें तेथील कार्यकर्त्यांना पटलें 'खोती खलास' या आवाजानें सर्व कुळें व कसणारे प्रफुल्लित झाले असते व त्यांनीं काँग्रेसला पाठिंबा दिला

असतां हेंही त्यांना आतां मान्य झालें होतें. स्वतःवरच ते रागावले होते व त्यामुळेंही लाग्यानें ते अधिकारग्रहणाला विरोधीत होते. थोडेसे समाजसत्तावादी व थोडे मजसारखे विरोधी होते. तथापि माझा दृष्टीकोन निराळा होता. उसळणाऱ्या उत्साहांत अधिकारग्रहणाचा विरोध कमकुवत ठरला. कॉंग्रेस बाहेरील पक्ष, स्वीकारासाठीं तयारच होते. गव्हर्नरजवळ खुलासे व आश्वासनेंही पण ते मागावयास तयार नव्हते, त्यांना जरूरी वाटत नव्हती. कांहींना बहुमताचें सामर्थ्य गव्हर्नरला नीट वागण्यास भाग पाडील अशी आशा वाटत होती. कॉंग्रेसनें घेतलेली भूमिका घटनापंडितांना मान्य नव्हती. घटनेंत जें असेल तें आहेच, जें नसेल तें कोण आहे म्हणून सांगणार? संकेत, अलिखित संकेत, ठरवून होत नाहींत, ते हळूंहळूं होत जातात अशी त्यांची विचारसरणी होती. कॉंग्रेसचें बहुमत असणाऱ्या प्रांतांत, कॉंग्रेसचीं मंत्रीमंडळें होत नाहींत असे वृत्तान्त सर्वत्र आले. अपेक्षाभंग झाला ही गोष्ट स्पष्ट होती, पण ती कबूल करण्यास थोडेच तयार होते! नीट झालें नाहीं असें मलाही वाटलें. तात्त्विक व व्यवहारी या दोन्ही दृष्टींनीं जें नको तें व्यक्तिमहात्म्यानें स्वीकार्य व्हावें व त्यायोगें एक तीव्र आकांक्षा व अपेक्षा उत्पन्न व्हावी व तिचा कांहींच्या मतें अकल्पित व कांहींच्या मतें अपेक्षित असा भंग व्हावा व जनतामनाची कष्टमय स्थिति व्हावी हा हिंदी राजकारणांतील अनुभव पुन्हां एकदां आला. घटनाभंग झाला म्हणून सर्वत्र पुकारा झाला, त्यांत आवाज होता पण अर्थ नव्हता. विरोधी असणारा मी पण मलासुद्धां आनंद वाटला नाहीं. कां, तें सांगणें कठीण आहे. सुप्त मनाचा ठाव कोणाला लागला आहे?

वरील वातावरणांत मार्चचे शेवटचे दिवस व एप्रिलचे पहिले तीन दिवस आम्हीं काढले. पण कामाकडे कोणाचेंही लक्ष नव्हतें. ता. १-४-३७ ला देशभर हरताळ होता. दिल्लीस त्या दिवशीं लाठीमार व पकडापकड झाली. ता. २-४-३७ ला आम्हीं सर्व पक्षसभासद हातांत कॉंग्रेसचीं निशाणें घेऊन सभागृहांत आलों. टोप्यांना पण निशाणें लावलीं होतीं. टेबलावरही निशाणें ठेवलीं व 'कॉंग्रेस झिंदाबाद' असें ओरडतच प्रवेश केला. सभागृह नेते यांनीं तक्रार केली. अध्यक्षांनीं सांगितलें, "टेबलावर फक्त निशाणें ठेवतां येणार नाहींत, बाकी माझा आक्षेप नाहीं." टेबलावरील निशाणें कोटाला चिकटविलीं गेलीं. चार वाजतां तहकुबीची सूचना असफअल्ली यांनीं आणली. दिल्लीस घडलेल्या प्रकाराबद्दल, त्यांनीं सरकारची हजेरी घेतली. गोऱ्या अधिकाऱ्यांनीं स्त्रियांची विटंबना कशी केली याची हकीगत सांगितली. निशाण कसें तुडवलें तें सांगितलें. ज्या निशाणा-

साठीं लाखोंनीं तुरुंगवास भोगला, अनेक फांशीं लटकले तें निशाण तुडवून नाहींसें होणार नाहीं असें बजावलें. अणे यांनीं कॉंग्रेस कार्यकर्ते शांततेनेंच वागले असें सांगून त्यांचें अभिनंदन केलें व सरकारी कृत्यांचा तीव्र शब्दांत निषेध केला. शौकतअल्ली यांनीं अपराधी पोलीसांना शिक्षा करावी अशी मागणी केली. सरकार तर्फे मि. थार्न यांनीं सांगितलें कीं " जर स्त्रियांची विटंबना झाली असेल तर ते निषेधार्हच आहे. ज्या अधिकाऱ्यानें कॉंग्रेसच्या निशाणाचा अपमान केला असें म्हणणें आहे, त्यानें तो केला नाहीं, असें त्याचें म्हणणें आहे. स्थानिक अधिकारी योग्य रीतीनें वागले. सरकारचा निषेध करण्यासारखें कांहींही झालें नाहीं." भुलाभाई यांनीं सांगितलें, " पोलिसांच्या हस्तकांमार्फत गेल्या आठवड्याभर दंगा घडवून आणण्याचे प्रयत्न होत होते. कॉंग्रेसनें शांतता राखली म्हणून रक्त सांडलें नाहीं. पोलिसांना वाईट वाटले असेल. त्यांची निराशा झाली. अन्य शहरांतून दंगे झाले नाहींत याचें श्रेय पोलीसांना नाहीं तर अहिंसेचे शिक्षण जनतेला मिळत आहे, त्या गोष्टीला आहे. जें न करुन श्रेय संपादिलें असतें, तेंच करून, दिल्लीच्या पोलिसांनीं आपली नामुष्की करून घेतली आहे." चॅपमन मार्टीमरनें निशाण कॉंग्रेसचें असेल पण सर्व देशाचें नाहीं. त्याला राष्ट्रीय निशाण म्हणतां येणार नाहीं हा शोध लावला. जनता शांत असेल पण सरकारही शांतपणेंच वागलें अशी माहिती दिली. जर्मनींत सरकारी विरोधक प्राणास मुकतात असा इशारा दिला. स्त्रियांनीं राजकारणांत आल्यानंतर धक्काबुक्की झाली तर तक्रार करतां कामा नये असा दंडक सांगितला. सर कावसजींनीं निरपराधी व तटस्थ लोकांना संरक्षण पाहिजे पण निशाणाच्या बाबतींत सरकारी कृत्य चुकलें असें सांगितलें. सर फ्रँक नॉईसनें पोलिसांचें अभिनंदन केलें !! सरकार व जनता प्रतिनिधि यांच्यांतील अंतर केवढें आहे हें सहजच कळून आलें. तहकुबीची सूचना पास झाली. ' कॉंग्रेस झिंदाबाद 'च्या आरोळ्या मारीत आम्हीं सभागृह सोडलें. दुसऱ्या दिवशीं मामुली काम होऊन सन १९३७ चें दिल्लीचें अधिवेशनही संपलें. त्याच दिवशीं पक्षाची साधारण वार्षिक सभा झाली. नेते भुलाभाईच निवडले गेले. उपनेते सत्यमूर्ति झाले मी व असफअल्ली चिटणीस झालों. व्यक्तिशः माझें, एक पाऊल पुढें पडलें. या अधिवेशनाबरोबर एक युग संपलें. प्रांतिक स्वायत्ततेचें युग सुरू झालें. यानंतरचें मध्यवर्ति कायदे मंडळाच्या कामावरही या नवीन युगाचा परिणाम दिसूं लागणें अपरिहार्य होतें. नवीन युगांतील कामकाजाचा विचार दुसऱ्या भागांत करणेंच योग्य होईल.

*

# सूची

---

प्रकाशक—नारायण वामन धारू
४१९ शनिवार पेठ पुणें २.

मुद्रक—शंकर सखाराम दाते
कलागृह छापखाना
६६६ सदाशिव पेठ पुणें २.